'विविधज्ञानविस्ताराच्या पन्नाशीच्या आनंदोत्सवाचें स्मारक'

ग्रंथ पहिला; उत्तरार्ध.

# निबंधावली.



अथवा

'विस्तारा'च्या पन्नाशीच्या आनंदोत्सवार्थ अनेक विद्वानांनीं लिहिलेले विविध विषयांवरील

## निबंध.

---

जुलै १९२३



---

किंमत २ रुपये.

# अनुक्रमणिका.

✿ ✿ ✿

## ६ अर्वाचीन मराठी कवि व काव्यें ( पृ. ६३-९८ ).

[ रा. रा. नारायण महादेव भिडे, बी. ए. ]



✿ ✿ ✿

## ७ मराठी कथात्मक वाङ्मय ( ९९- १४ ).

[ रा. रा. नारायण केशव बेहेरे, एम्. ए. बी. एस्सी. ]



✿ ✿ ✿

## ८ मराठी नाटकें ( पृ. ११५-१३४ ).

[ रा. रा. बळवंत हरि पंडित, बी. ए., एलूएल्. बी. ]

## ९. स्त्रीशिक्षण व स्त्रियांचें कार्यक्षेत्र ( पृ. १३५-१४८ ).

[ सौ. सरलाबाई नाईक, एम्. ए. ]



## १० मराठी वाङ्मयांतील चरित्रपर ग्रंथ ( पृ. १४९-१५८ ).

[ रा. रा. लक्ष्मण जनार्दन खरे, एम्.ए., एल्एल्. बी. ]



## ११ प्राचीन संशोधन आणि संशोधक ( पृ. १५९-१६८ ).

[ रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी. ]



## १२ ग्रंथप्रकाशनाचे मालकी-हक्क ( पृ. १६९-१८० ).

[ रा. रा. सालोमन मोझेस वाकरूळकर, बी. ए., एलूएल्. बी., सॉलिसिटर ]

# दोन प्रास्ताविक शब्द.



विविधज्ञानविस्तार मासिकास पन्नास वर्षें पूर्ण झाल्यानंतर, ईश्वरकृपेनें लाभलेल्या दीर्घायुष्यानिमित्त कांहीं मंगलकार्य साजरें करावें, अशा अनेक हितचिंतकांकडून सूचना आल्या. वाङ्मयसेवा हेंच विस्ताराचें ध्येय असल्यामुळें ग्रंथरूपानें हें मंगलकार्य सिद्धीस नेण्याचा विचार ठरला, व त्याप्रमाणें आमच्या आश्रयदात्यांना तीन पुस्तकें नजर करण्याचा आम्हीं आपला संकल्प जाहीर केला. १९२१ सालीं या संकल्पित ग्रंथत्रयीपैकीं दोन ग्रंथ बाहेर पडले. त्याला आज दोन वर्षे होत आलीं. वास्तविक आज आम्ही जें पुस्तक वाचकांच्या हातीं देत आहों, तें पुस्तक ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें पहिलें असून, दोन वर्षांपूर्वीचीं पुस्तकें त्या क्रमानुसार दुसरें आणि तिसरें होतीं. पण योगायोग असा विचित्र कीं, दुसरा आणि तिसरा ग्रंथ वाचकांना अगोदर सादर होऊन पहिल्या ग्रंथाचें काम आजवर रेंगाळलें. त्यांतही पुनः उलटा क्रम आहेच, कारण आजचें पुस्तक, या समग्र पुस्तकाचा उत्तरार्ध आहे. मूळचा उद्देश पार पडावा असा आग्रह जर आम्हीं धरला असता, तर आणखी किती काळ आमच्या उत्सुक आश्रयदात्यांना या ग्रंथाची प्रतीक्षा करावी लागली असती, हें सांगणें कठिण आहे.

विविधज्ञानविस्तार हें मासिक महाराष्ट्र वाङ्मयक्षेत्रांत अवतीर्ण झाल्यापासून जीं पुढें पन्नास वर्षे गेलीं, त्या अर्धशतकाच्या कालावधीमध्यें वाङ्मय व कला यांच्या बाबतींत झालेल्या सर्व घडामोडींचा साद्यंत इतिहास प्रस्तुत पुस्तकांत निरनिराळ्या निबंधांच्या रूपानें ग्रथित करावयाचा, असा आमचा मूळचा उद्देश होता. त्याच्या अनुरोधानें जो ज्या विषयांत अभ्यास व अनुभव या दोन्ही बाजूंनीं प्रवीण असेल, त्याच्याकडे आम्हीं लेखनाविषयींचीं विनंती-पत्रें धाडलीं, व अनेक लेखकांनीं आम्हांस निबंध लिहिण्याचीं आश्वासनेंही दिलीं. पण पुढें जसजसा काळ लोटत चालला, तसतसें तज्ज्ञ लेखकांकडून वचनदत्त लेख मिळण्याची आशा दुरावत चालली. विस्तारावरील केवळ निरपेक्ष प्रेमासाठींच लेख लिहिण्याचें काम बऱ्याच विद्वानांनीं आंगावर घेतल्यामुळें, त्यांना तगाद्याची तसदी देणें आम्हांस इष्ट वाटेना. अखेरीस एकदां दोनदां त्यांनीं पत्करलेल्या जबाबदारीचें त्यांना स्मरण देऊन, व स्मरणानंतर त्यांनीं दिलेली मुदत टळून गेल्यावर जेवढे निबंध हातीं आले तेवढयावरच समाधान मानून. त पुस्तकरूपानें वाचकांच्या हवालीं करावे आणि आश्रयदात्यांच्या ऋणांतून मुक्त व्हावें असा बेत केला. अपेक्षित लेखकांकडून निबंध न आल्यामुळें आमची जशी निराशा झाली, तशीच आमच्या वाचकांचीही होईल, हें आम्ही जाणून आहों. तथापि नाइलाजानेंच हा विलंबाचा व पुस्तकांतल्या उणीवांचा प्रकार घडला असल्यानें, वाचक आणि लेखक (-ज्यांचे लेख कितीक महिने छापून पडून राहिले ते ) या विलंबाबद्दल आम्हांस क्षमा करतील अशी आशा आहे. वरील मजकूर लिहिण्यांत कोणाला दोष लावावा अगर लागावा, अशी आमची मुळींच इच्छा नाहीं. ज्यांनीं लेख देण्याचें कबूल करून इतर कार्यांच्या निस्सीम उपाधींतून सुटका न झाल्यामुळें लेख दिले नाहींत, ते लेखक विस्ताराचें कट्टे अभिमानी आहेत. फुरसत मिळाल्यावर ते आपलीं आश्वासनें जेव्हां पूर्ण करतील तेव्हां 'विस्तार' त्यांच्या स्वागताला सिद्ध आहेच. तथापि या पुस्तकांत जर त्यांच्या आश्वासनाची पूर्तता होण्याचा योग आला असता तर दुधांत साखर पडून पन्नाशीच्या आनंदोत्सवाची शोभा बहुतपटीनें वृद्धिंगत झाली असती, एवढेंच आम्हांस येथें सुचवावयाचें आहे.

या पुस्तकांत एकंदर बारा निबंध आहेत. त्यांचीं नुसतीं नांवें पाहिल्यास कला, शास्त्र आणि वाङ्मय ( Art, Science and Literature ) या परस्परांशीं संबद्ध असलेल्या तिन्ही विषयांचा परामर्ष यांत घेतला गेला आहे, हें वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. जीवनशास्त्र, वनस्पतिशास्त्र, यांवरील निबंध त्या त्या शास्त्रांचीं मूलतत्त्वें समजावून देणारे आहेत. पदार्थविज्ञानशास्त्रावरील निबंधांत हिंदुस्थानच्या प्रांतोप्रांतीं व परदेशीं या विषयाची प्रगति कितपत व कोठवर झाली आहे, याचा तुलनात्मक परिचय लेखकानें करून दिला आहे. कथात्मक वाङ्मय, महाराष्ट्रांतील कवि, मराठींतील नाटयवाङ्मय, चरित्रवाङ्मय वगैरे निबंध नाटकें, कादंबऱ्या, चरित्रें व काव्यें यांच्या गेल्या पन्नास वर्षांतील अभिवृद्धीची कल्पना वाचकांस आणून दिल्याशिवाय राहणार नाहींत. कलाविषयाचा या पुस्तकांत एकच निबंध—'संगीत कलेची हकीकत'—हा आहे. त्याशिवाय इतर कलांची वाढ महाराष्ट्रांत झालेली आहे. चित्रकलेंत व शिल्पकलेंत अनेक महाराष्ट्रीय नाणावले गेले आहेत; पण या कलां-

संबंधीं लिहिलेले गुणदोषविवेचनात्मक निबंध आमच्याकडे आले असते, तर तें योग्यच झालें असतें. पण कुंचली व टाकी या दोन साधनांच्या जोडीला लेखणी हें साधन पेलण्याची विद्या चित्रकारांना व शिल्पकारांना अवगत नसल्यानें, --किंवा आणखी कांहीं कारणास्तव म्हणा--या कलांसंबंधीं लेख प्रसिद्ध करण्याचें भाग्य आमच्या वांट्यास आलें नाहीं. आम्हांस या स्थळीं प्रामुख्यानें एका लेखाचा उल्लेख करावासा वाटतो. ग्रंथकारांच्या हक्काविषयींचा शेवटचा निबंध हाच तो लेख होय. सांप्रत ग्रंथकारांची महाराष्ट्रामध्यें वाण नाहीं. पण ग्रंथकारांच्या हक्कांचें यथार्थ ज्ञान असणारे ग्रंथकार विरळाच सांपडतील. हा विषय वाङ्मयांत वावरणाऱ्या लोकांना जरूर माहीत पाहिजे. परंतु तो मराठींत उतरण्याची कोणी फारशी खटपट आजवर केली नाहीं. ही पूर्वस्थिति ध्यानांत ठेवल्यास आमचे मित्र रा. रा. सालोमन मोझेस वाकरूळकर यांनीं मराठी भाषेवर प्रस्तुत निबंधाच्या द्वारें उपकारच केला आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. या निबंधाच्या जोडीनें मुद्रणव्यवसायाविषयींच्या इंग्रजी [illegible] कायद्यांचा वृत्तान्त मांडतां आला असता तर या विषयाची पूर्तता झाली असती.

पुस्तकांत न्यूनें बरींच आहेत, व त्यांतलीं कांहीं आम्हीं [illegible] वर नमूद केलीं आहेत. हीं न्यूनें ग्रंथाच्या व्याप्तिसंबंधीं आहेत. पण जे निबंध प्रसिद्ध होत आहेत, त्यांमध्येंही गुणांच्या दृष्टीनेंही बऱ्याच उणीवा दाखवितां येतील. परंतु विस्ताराच्या पन्नाशीच्या आनंदोत्सवांत आपण भागीदार होऊन निस्पृह कृतार्थता संपादन करावी या हौसेनेंच लेखकांनीं लेख लिहिले असल्यामुळें, त्यांच्या प्रेमळ हौसेकडे नजर देऊन, लेखांतल्या गुणांचेंच वाचक चोज करतील अशी आम्हांस उमेद आहे. 'दसकी लकडी एकका बोजा' या स्वरूपाची आमची ही वाङ्मयसेवा आहे. विस्तारानें अर्धशतकासारख्या दीर्घ कालाची निर्विघ्न मजल मारली हें आनंदमंगल साजरें करण्यासाठीं स्वयंस्फूर्तीनें अनेक लेखक पुढें आले. त्यांनीं कामें वांटून घेऊन आपापल्या ज्ञानाच्या, शक्तीच्या व रसिकतेच्या मगदुराप्रमाणें व प्रकृतीच्या विशेषाप्रमाणें अत्यंत प्रेमबुद्धीनें तीं पार पाडलीं आहेत. शिवाय बहुतेक सर्व लेखक महाराष्ट्रांत आपापल्या परीनें नाणावलेले व कसलेले आहेत, एवढा इत्यर्थ पुस्तकाचें परिशीलन करतांना ध्यानांत वागविल्यास वाचकांची दृष्टि दोषांकडे वळण्याला धजणार नाहीं, अशी आम्ही या आनंदोत्सवाची जोखीम वाहात असतां मनाशीं खूणगांठ बांधल्यास ती अप्रस्तुत व अप्रासंगिक ठरणार नाहीं असा आम्हांस भरंवसा आहे.

पन्नाशीच्या आनंदोत्सवाचा भार शिरावर घेऊन चार वर्षें संपत आलीं. या चार वर्षांत विस्ताराचे कांहीं साह्यकर्ते लेखकाग्रणी काळानें गिळंकृत केले. त्यांचें स्मरण झालें कीं, पन्नाशीच्या आनंदोत्सवाचें कार्य चालू असतांही अंतरंगांत विषादाच्या घनदाट छाया पसरल्याशिवाय राहत नाहींत. अशा दिवंगत झालेल्या साह्यकर्त्या लेखकाग्रणींपैकीं कै. रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनि यांचा नामनिर्देश केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. पन्नाशीच्या आनंदोत्सवाला त्यांच्याकडूनच अतिशय जोराचें व कळकळीचें प्रोत्साहन मिळालें; परंतु त्या उत्सवकार्याची समाप्ति पाहण्याला ते जगले नाहींत; ज्यांच्या प्रोत्साहनाचे आशीर्वादपर शब्द हजारों रुपयांच्या मदतीसारखे कार्यप्रवृत्तीला बळकटी व चिकाटी आणणारे वाटत, ते उत्सवग्रंथांची समाप्ति झाल्याचें पाहून धन्यता व्यक्त करण्यापूर्वींच दिवंगत व्हावेत, हा विचार मनांत येतांच भावीं काळाविषयीं काळीज थरारून दचकल्यास त्यांत कोणास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. गेल्या चार वर्षांतली जर अशी खेदजनक स्थिति तर त्या मागल्या पन्नास वर्षांचें सिंहावलोकन किती कष्टप्रद होईल हें वाचकांनीं कल्पनेनेंच जाणल्यास उत्तम. विस्ताराला, त्याच्या बऱ्यावाईट प्रसंगांत, एकनिष्ठपणानें साह्य देणारे बरोबरीचे विश्वासू साह्यकर्ते परलोकाचा रस्ता धरीत आहेत, वार्धक्यावस्था विस्ताराच्या विद्यमान चालकाशीं, आयुष्याच्या सायंकाळाचा अंमल प्रत्यहीं वाढत असल्याच्या कानगोष्टी करीत आहे, ही परिस्थिति बाह्याभ्यंतर चक्षूंपुढें आली, म्हणजे ज्या विस्तारानें चौपन वर्षें निर्वेधपणानें महाराष्ट्रसरस्वतीची अनन्यगतिक उपासना करण्यांत घालविलीं त्याची अर्धशतसांवत्सरिक उत्सव साजरें करण्याची आतां सुरू झालेली परंपरा अधिकाधिक उज्ज्वलतेनें व जास्त जास्त भरीव स्वरूपांत अखंड चालू राहो अशी ईश्वराची प्रार्थना करण्याकडे विद्यमान चालकाची प्रवृत्ति होते, व मग मागील इतिहास त्याचें समाधान करून निश्चयाच्या वाणीनें सांगूं लागतो कीं, ज्यानें विस्ताराला गेल्या पन्नास वर्षांच्या अवकाशांत तारलें तोच विश्वचालक परमेश्वर त्यास नवे नवे अधिकारी लेखक, हितचिंतक व आश्रयदाते काळानुसार वाढत्या प्रमाणांत देऊन पुढेंही त्याचें संगोपन करतील.

# विविधज्ञानविस्तार-स्वरूप.

[ शार्दुलविक्रीडित ]

काव्यग्रंथ बघूनि सुज्ञ करिती साहित्यचर्चा सदा
ज्याच्या हस्त शिरीं सदैव अपुला ठेवीतसे शारदा।
विद्वद्वृन्द सदैव सज्ज करिती यल्लेखनीं लेखनी
लाभे उच्च उदात्त तत्त्व न कसें तद्वाचनानें जनीं ? ॥ १ ॥

शास्त्रें मंथुनि सार हें निवडिलें विद्वज्जनीं वाङ्मय
जन्मापासुनियां सदा दुमदुमे सर्वत्र ज्याचा जय।
पेरोनी सदसद्विचार हृदयीं ज्ञानामृतें शिंपुनी
पुण्यें रम्य सरस्वतीस जणुं कीं हीं अर्पिलीं गुंफुनी ॥ २ ॥

झाले जन्मुनि मासिकास अजि या पन्नास संवत्सर
सर्वांगें परिपूर्ण भव्य रचिली ग्रंथावली सुंदर।
अज्ञाना हरवी विचार करवी शोभे जसा कां रवी
जिज्ञासा पुरवी कवीस बरवी गीतांच वाटे नवी ॥ ३ ॥

घेती स्वस्थ मनें प्रफुल्ल सुमनें वाग्देवतेचीं जन
शब्दालंकृति पाहुनी रसवती तल्लीन होतें मन।
ज्ञानानें वर मासिकांत सगळ्या 'विस्तार' कैसा पहा
झाला तोंच सुरू गुरूच म्हणती आबालवृद्धांस हा ॥ ४ ॥

भाषा सुंदर लेखनीं निपुणता प्रौढत्व साधेपणा
नाहीं ग्राम्य कथा निरर्थक नसे शब्दांतही योजना।
कोणा कर्णकठोर ह्यांत न दिसे, प्रेमोपदेशामृत
पाजी नित्य, खपे जपे पढविण्या सर्वांसही विश्रुत ॥ ५ ॥

जैसे आजवरी तसेच पुढती लाभोत त्या लेखक
ज्ञानातें पसरूनि हो प्रियजनीं हें सर्वदा मासिक।
घ्यावा स्वाद तयास सेवुनि सदा ऐशी विनंती जना
दीर्घायुष्य असो तयास म्हणुनी माझी असे प्रार्थना ॥ ६ ॥

सांगली,
२०।७।२०

(सौ.) लक्ष्मीतनया.

"विविधज्ञानविस्ताराच्या पन्नाशीचा आनंदोत्सव."

ग्रंथ पहिला-उत्तरार्ध.

# निबंधावली.

## अर्थशास्त्र.

जें शास्त्र इंग्रजींत Political Economy अथवा Economics या संज्ञेनें ओळखिलें जातें, त्याला हल्लीं मराठींत 'अर्थशास्त्र' म्हणतात. 'अर्थशास्त्र' या शब्दाच्या प्राचीन व अर्वाचीन अर्थांत थोडा फरक आहे. इंग्रजींत Political Economy या शब्दाच्या अर्थांतही फरक पडत आलेला आहे. या दोन्ही शब्दांच्या अर्थपरिवर्तनाच्या इतिहासांत बरेंच साम्य आहे. Economy म्हणजे कुटुंबाची आर्थिक दृष्टीनें व्यवस्था, असा ग्रीक तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटल याचा अभिप्राय आहे. त्याच्या मतें कुटुंबांत तीन प्रकारचे संबंध असतात:—पतिपत्नीसंबंध, पितापुत्रसंबंध, व स्वामिसेवकसंबंध. हे संबंध व्यवस्थित राखून कुटुंबाचें योग्य तऱ्हेनें भरणपोषण व आर्थिक सुस्थिति हीं ज्या व्यावहारिक ज्ञानाच्या योगानें साधतां येतात तें ज्ञान Economy या शास्त्राचा विषय, असें ॲरिस्टॉटलचें मत आहे. सारांश,Economy म्हणजे कुटुम्बविषयक अर्थशास्त्र. राष्ट्र म्हणजे विस्तृत कुटुम्बच होय. तेव्हां Political Economy म्हणजे राष्ट्रविषयक अर्थशास्त्र. उत्पन्न वाढवून कौटुम्बिक स्थिति सुधारणें हें गृहपतीचें कर्तव्य; त्याप्रमाणेंच, कोषवृद्धि करून राष्ट्रीय सुख वाढविणें हें राजाचें कर्तव्य. तेव्हां, कोषवर्धनास साधनरूप जें शास्त्र त्यास Political Economy असें अन्वर्थ नांव देण्यांत आलें. अठराव्या शतकाचे अखेरीस या अर्थांत थोडें स्थित्यन्तर घडून आलें. फ्रान्स देशांतील निसर्गवादी तत्त्ववेत्ते ( Physiocrats ) व इंग्लंडांतील ॲडम स्मिथ यांनीं अर्थशास्त्राची मर्यादा थोडी संकुचित केली. "कोषसमृद्ध्यर्थ व व्यापारविस्तारार्थ विशिष्ट कायदे करण्याचें कारण नाहीं.कारण, तीं तीं कार्यें निसर्गनियमानुसार चाललींच आहेत. उलट, कित्येकदां मानवी प्रयत्नानें निसर्गाचे नियम बाधित होऊन राष्ट्रीय संपत्तीच्या वाढीस अडथळा येतो. सृष्टिनिर्मित 'योगक्षेमा'चे नियम अबाधितपणें चालूं दिले म्हणजे आपोआप कोषवृद्धि व राष्ट्रसुखवृद्धि घडून येते. म्हणून त्या नियमांच्या मार्गांतील अडथळे शक्य तितके दूर करणें व निसर्गाला स्वैर वावरूं देणें, एवढेंच राज्यनियामकांचें मुख्य कर्तव्य होय." अशा प्रकारचीं मतें रूढ होऊन, ॲरिस्टॉलटच्या मताप्रमाणें Political Economy चें जें मुख्य कार्य त्याला गौणत्व प्राप्त झालें. अठराव्या शतकाचे अखेरीस व एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धांत पुष्कळ नवे नवे शोध लागल्यामुळें व्यापाराच्या वाढीस फार मदत झाली, व त्या परिस्थितींत स्मिथनें प्रतिपादिलेलीं मतें, त्यांच्या उपयुक्ततेमुळें लोकांना ताबडतोब पटलीं, यांत आश्चर्य नाहीं. वस्तूत्पादन, वस्तुविनिमय, व द्रव्यविनिमय यांस लागू होणारे नैसर्गिक नियम कोणते ते शोधून काढणें हें अर्थशास्त्र्याचें काम; व सामाजिक व आंतरराष्ट्रीय परिस्थिति लक्षांत घेऊन त्या नियमांची अंमलबजावणी करणें हें राजाचें अगर मुत्सद्द्याचें काम, अशी कामाची विभागणी करण्यांत आली. एक अर्थशास्त्री म्हणतो:–Inquiries as to the means by which the industry of man may be rendered more productive by the action of government, distribu-

tion of wealth most desirable in a given state of society, the means by which any given country may facilitate such a distribution--such enquiries are undoubtedly of great interest. But they no more form part of the science of Political Economy than navigation forms part of the science of Astronomy. The business of a Political Economist 'is neither to recommend nor to dissuade, but to state general principles which it is fatal to neglect, but neither advisable nor perhaps practicable to use as the sole or even the principal guides in the conduct of affairs.' पूर्वीचें व्यावहारिक स्वरूप जाऊन Political Economy ला केवळ तात्त्विक स्वरूप प्राप्त झालें. पण ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत 'स्वातंत्र्यवादा'चे दुष्परिणाम उघड दिसून येऊं लागले, व अर्थशास्त्र व समाज यांची फारकत करणें अनिष्ट होय, असें मानण्याकडे लोकांची प्रवृत्ति होऊं लागली. देशाच्या परिस्थित्यनुरूप अर्थशास्त्राच्या सामान्य नियमांत फरक होतो व हे नियम बांधतांना अर्थशास्त्राचें वैशिष्ट्य राखून त्या त्या देशाची सामाजिक, धार्मिक, नैतिक व राजकीय स्थिति लक्षांत घेणें जरूर आहे, हें तत्त्व आतां सर्वमान्य होत चाललें आहे. सांपत्तिक स्थिति सुधारण्याचे उपाय सुचविणें, हा अर्थशास्त्राचा मुख्य विषय; पण उपाय सुचवितांना त्यांच्या योगानें सामाजिक, नैतिक वगैरे बंधनांना धक्का पोंचणार नाहीं अशीही खबरदारी घेणें जरूर आहे. असें केल्यानें अर्थशास्त्रास समाजशास्त्राशीं निकट संबंध राखूनही आपली विशिष्टता कायम ठेवतां येते.

याप्रमाणें Political Economy च्या विषयव्यवस्थेंत आतांपर्यंत तीन प्रकार झाले आहेत. प्रथम प्रथम तिला राष्ट्राच्या खजिन्याभोंवतीं घट्ट बांधून ठेवण्यांत आलें होतें. पुढें तिची सुटका होऊन तिला, भरारी मारण्याकरितां, तात्त्विक दृष्टीच्या अंतरालांत सोडून देण्यांत आलें. तेव्हां तिचें विमान इतकें भडकलें कीं, कांहीं काळ, मानवसृष्टीचा व तिचा कांहीं संबंध नाहीं अशी भीति वाटूं लागली. पण नंतर, गुरुत्वाकर्षणामुळेंच कीं काय, तें विमान खालीं उतरलें व त्याला सामाजिक कल्याणाची जोड, तें पुनः भडकूं नये म्हणून, घालून देण्यांत आली आहे; व आतां त्यामुळें तिची गति, कधीं अंतरळांत तर कधीं पृथ्वीच्या पाठीवर–पण सर्वदा मनुष्याच्या अंतिम हिताकडे नजर राहील अशा तऱ्हेनें असते.

आपल्या 'अर्थशास्त्र' या शब्दाच्या अर्थांतही थोडा फार असाच प्रकार झाला आहे. व्यक्तीचे व राष्ट्राचे पुरुषार्थ तीन,–धर्म, अर्थ, काम; म्हणजे अर्थशास्त्राचे विभाग दोन,–वैयक्तिक व राष्ट्रीय. त्याच प्रमाणें धर्म व काम यांच्या बाबतींत. वैयक्तिक अर्थशास्त्र म्हणजे ॲरिस्टॉटलची Domestic Economy, व राष्ट्रीय अर्थशास्त्र म्हणजे Political Economy. राष्ट्रीय अर्थशास्त्राचें महत्त्व व व्यापकता अर्थातच जास्त असल्यामुळें, अर्थशास्त्र हा शब्द राष्ट्रीय अर्थशास्त्र अशा अर्थानेंच बहुशः वापरण्यांत येऊं लागला. अर्थशास्त्राचा विषय कोणता हें कौटिल्यानें स्पष्ट केलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्राचा आरंभ असा आहे–'पृथिव्या लाभे पालने च यावन्त्यर्थशास्त्राणि पूर्वाचार्यैः प्रस्थापितानि प्रायशस्तानि संहृत्यैकमिदमर्थशास्त्रं कृतम्।' याच ग्रंथाच्या १५ व्या अधिकरणाच्या आरंभीं अर्थशास्त्राची व्याख्या दिली आहे, ती अशीः–'मनुष्याणां वृत्तिरर्थः। मनुष्यवती भूमिरित्यर्थः। तस्याः पृथिव्या लाभपालनोपायः शास्त्रमर्थशास्त्रमिति।' याचेंच विशदीकरण वात्स्यायनाच्या कामसूत्रांत केलें आहे. ( चन्द्रगुप्त मौर्याचा गुरु व प्रधान चाणक्य याचींच कौटिल्य व वात्स्यायन हीं दोन नांवें होतीं, असें सामान्यतः मानण्यांत येतें. हेमचन्द्रप्रणीत अभिधानचिन्तामणींत चाणक्याचीं इतर कोणकोणतीं नांवें होती हें सांगितलें आहे. 'वात्स्यायनो मल्लनागः कौटिल्यश्चणकात्मजः। द्रामिलः पक्षिलस्वामी विष्णुगुप्तोऽङ्गुलश्च सः।' )

' विद्याभूमिहिरण्यपशुधान्यभाण्डोपस्करमित्रादीनाम र्जनमर्जितस्य विवर्धनमर्थः । ' यावरून उघड दिसतें कीं, सांपत्तिक स्थिति कशी सुधारावी हें शिकविणारें शास्त्र तें अर्थशास्त्र, असा मूळचा अर्थ होता. महाभारतांतील विवेचनावरूनही अशाच प्रकारचें अनुमान काढतां येतें. ' वर्जनीयं सदा युद्धं राज्यकामेन धीमता । उपायैस्त्रिभिरादानमर्थस्याह बृहस्पतिः । ' ( शान्ति०६९-२३ ). कोषवृद्धि कशी करावी, प्रजेच्या द्रव्याचें शोषण करण्यास कोणत्या प्रकारचे मृदु उपाय योजावे, वगैरे विषयांचें बारीक विवेचन १३३ व पुढील अध्यायांतून केलें आहे. 'राष्ट्रवृक्षाचीं मुळें कोषागारांत रोवलेलीं असतात.' खजिन्यांत जितकी वाढ होते तितकीं मुळेंही अधिक खोल जातात व राष्ट्रवृक्ष त्या प्रमाणांत जास्त सामर्थ्यवान् होतो. असो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, अर्थोत्पादन व अर्थवृद्धि यांचें विवेचन करणारें एक स्वतंत्र शास्त्र होतें. शान्तिपर्व अ० ५९ यांत, राज्य व राज्यनीति हीं प्रथम उत्पन्न कोणीं व कशीं केलीं याचा इतिहास दिला आहे. एके काळीं अराजकतेच्या दुष्परिणामांमुळें लोक व देव परित्रस्त होऊन ब्रह्मदेवास शरण गेले. तेव्हां ब्रह्मदेवानें लोकमर्यादास्थापनार्थ 'दण्डनीति' नांवाचें, एक लक्ष अध्याय असलेलें, शास्त्र निर्माण करून लोकांचें भयनिवारण केलें. त्यांत धर्म, अर्थ, काम वगैरेंचा पूर्ण विचार केला होता. ( 'ततोऽध्यायसहस्राणां शतं चक्रे स्वबुद्धिजम् । यत्र धर्मस्तथैवार्थः कामश्चैवाभिवर्णितः ॥ २९ ॥ एतत्कृत्वा शुभं शास्त्रं ततः स भगवान्प्रभुः। देवानुवाच संहृष्टः सर्वाञ्शक्रपुरोगमान् ॥ ७५ ॥ दण्डेन नीयते चेदं दण्डं नयति वा पुनः। दण्डनीतिरिति ख्याता त्रींल्लोकानभिवर्तते ॥ ७८ ॥' ) पुढें मनुष्यांच्या सोईकरितां तो ग्रंथ शिव, इन्द्र, बृहस्पति व शुक्र यांनीं अनुक्रमें संक्षिप्त केला; इतकेंच नव्हे तर विषयपरत्वें त्याचे विभाग पाडण्यांत आले. वात्स्यायन म्हणतोः-'प्रजापतिर्हि प्रजाः सृष्ट्वा तासां स्थितिनिबन्धनं त्रिवर्गस्य साधनमध्यायानां शतसहस्रेणाग्रे प्रोवाच । तस्यैकदेशं स्वायम्भुवो मनुर्धर्माधिकारिकं पृथक्चकार । बृहस्पतिरर्थाधिकारिकम् ।महादेवानुचरश्च नन्दी सहस्रेणाध्यायानां पृथक्कामसूत्रं प्रोवाच ।' दण्डनीति व अर्थशास्त्र यांवरचे वरील प्राचीन ग्रंथ सर्व उपलब्ध नाहींत.* या सर्व माहितींत ऐतिहासिक तथ्य किती आहे, हा प्रश्न बाजूला ठेवून आपणांस इतकें मानण्यास हरकत नाहीं कीं, आपल्यांत एके काळीं निव्वळ अर्थशास्त्रविषयक प्रश्नांचा विचार करणारे ग्रंथ लिहिले जात होते. अर्थशास्त्राच्या विषयाच्या बाबतींत प्राचीन ग्रीक मत व भारतीय मत यांत येथपर्यंत साम्य आहे. पुढें कालान्तरानें अर्थशास्त्राचें विशिष्टत्व नष्ट झालें. भारतीयांची प्रवृत्ति अध्यात्माकडे विशेष आहे. प्रत्येक शास्त्र व प्रत्येक व्यवहार यांचें ध्येय आध्यात्मिक आहे, या प्रवृत्तीचा परिणाम अर्थशास्त्रावर झाला. अर्थशास्त्राचें रूप जाऊन त्याला नीतिशास्त्राचें रूप प्राप्त झालें. प्रथम ' अर्थशास्त्र ' हा दंडनीतीचा एक विभाग होता; पण नंतर दोहोंचें स्वरूप जवळ जवळ एकच झालें. हल्लीं ज्याला आपण Political Science म्हणतों, तो अर्थशास्त्राचा मुख्य विषय झाला. कौटिल्य सूक्ष्मशास्त्रज्ञ; त्यानें आपल्या ग्रंथाला नांव अर्थशास्त्र दिलें आहे, पण ग्रंथांत धर्म, अर्थ व व्यवहार (Jurisprudence ) या सर्वांचा विचार केला आहे ब्रह्मदेवानें

* अर्थशास्त्रासंबंधाची माहिती मुख्यत्वेंकरून खालील ग्रंथांत सांपडते. कौटिलीय अर्थशास्त्र, महाभारत, मनुस्मृति व इतर स्मृतिग्रंथ, शुक्रनीति, व अलीकडे प्रसिद्ध झालेलीं बार्हस्पत्य सूत्रें. याशिवाय जैन व बौद्ध ग्रंथांत तुटक माहिती पुष्कळ आहे; तिचा व्यवस्थित संग्रह करणें जरूर आहे. यांपैकीं कौटिलीय अर्थशास्त्र व महाभारत आणि मनुस्मृति यांचा पुष्कळ भाग बराच प्राचीन आहे. शुक्रनीति इतकी प्राचीन नाहीं असें मानण्यांत येतें. बार्हस्पत्यसूत्रांचा आरंभ ' बृहस्पतिराचार्य इन्द्राय नीतिसर्वस्वमुपदिशति । ' असा आहे; पण महाभारत व कामसूत्र यांनीं उल्लेखिलेला ग्रंथ तो हाच कीं काय, व तो कोणत्या कालीं निर्माण झाला असावा, वगैरे प्रश्नांचा निर्णय अजून झालेला नाहीं.

ज्या उद्देशानें 'दण्डनीति' रचिल्याचें महाभारत सांगत आहे त्यांतील एक–काम–वगळून बाकीच्या दोहोंबद्दलचा विचार अर्थशास्त्रांत कौटिल्यानें केला आहे.† केवळ पृथ्वीच्या लालनपालनाकडे (म्हणजे राष्ट्राच्या सांपत्तिक सुस्थितीकडे) नव्हे, पण लोकांच्या धार्मिक व नैतिक उन्नतीकडेही अर्थशास्त्रानें वळलें पाहिजे, असें त्याचें मत आहे. शुक्रनीतीची रचनाही याच उद्देशास अनुसरून आहे.‡ युक्तिकल्पतरु, घटखर्परनीति वगैरे ग्रंथांत हाच प्रकार आढळून येतो. त्यांत अर्थशास्त्र व इतर सामाजिक शास्त्रें (धर्म, व्यवहार, राजनीति वगैरे) यांचें मिश्रण आहे. सारांश, गेल्या हजार दोन हजार वर्षांत अर्थशास्त्राचें स्वतंत्र अस्तित्व नष्ट होऊन दुसऱ्या एका विस्तृततर शास्त्रांत त्याचा अंतर्भाव झालेला आहे.* अबुल फाझलच्या 'आईन अकबरी'त कांहीं भाग अर्थशास्त्राच्या दृष्टीनें लिहिलेला आहे; पण अर्थशास्त्रपर ग्रन्थ लिहिण्याचा त्याचा उद्देश नव्हता हें उघड आहे. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यन्त अशी स्थिति होती. नंतर ती स्थिति पालटून अर्थशास्त्राचा पुनरुद्धार होण्याचा प्रसंग आला. इंग्रजी विद्येच्या योगानें आपल्या आकांक्षा व उणीवा यांची जाणीव आपणांत उत्पन्न झाली, व त्या पूर्ण करण्याचें व भरून काढण्याचें काम सुशिक्षित वर्गानें थोडें फार सुरू केलें. कालिदासानें हिमालयाचें वर्णन करतांना म्हटलें आहे: 'पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य स्थितः पृथिव्याइव मानदण्डः ।' तोच प्रकार पाश्चात्य संस्कृतीचा सध्यां झाला आहे. पूर्व व पश्चिम तिनें व्यापून टाकल्या आहेत व पृथ्वीच्या पाठीवरील हरएक जुनी व नवी संस्कृति तिच्या मापानें मोजली जात आहे. तिनेंच आपणांत नवी जागृति उत्पन्न केली; व तिचा एक दृश्य परिणाम म्हणजे हिंदुस्थानची आर्थिक स्थिति सुधारण्याकरितां हिंदी लोकांनीं चालविलेले प्रयत्न. ते यशस्वी होण्यास दोन गोष्टींची अत्यंत जरूरी आहे. त्या ह्या:–अर्थशास्त्राच्या सामान्य नियमांचें सूक्ष्मरीत्या अध्ययन, व हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितीचें यथार्थ निरीक्षण. अर्थशास्त्रावरील कोणत्याही ग्रंथांत या दोहोंचें प्रतिबिम्ब जितक्या अंशानें उमटेल तितक्या प्रमाणांत तो ग्रंथ विश्वासार्ह समजावा.

अर्थशास्त्राचा गतकालीन इतिहास थोडक्यांत वरीलप्रमाणें आहे. आतां वर्तमान स्थिति–अर्थात् महाराष्ट्रापुरती–पाहावयाची. हल्लीं अर्थशास्त्राचा विषय कोणता याचें वर दिग्दर्शन केलेंच आहे. समाजाचा सांपत्तिक दृष्ट्या विचार मुख्यतः चार सदरांखालीं होतो: (१) उत्पादन (Production); (२) विनिमय (Exchange); (३) संविभाग (Distribution); व (४) व्यय (Consumption). कित्येक शेवटच्या तिहींबद्दल दोन पोटविभाग कल्पितात. व्यक्ति, समाज, व राष्ट्र यांच्या सर्व आर्थिक प्रश्नांचा विचार अर्थशास्त्रांत केला जातो त्यांबरोबरच समाजशास्त्र, नीतिशास्त्र, मानसशास्त्र, राजनीतिशास्त्र, व व्यवहार अथवा कायदेशास्त्र,

---

† अर्थशास्त्राचीं 'विद्यासमुद्देश' व 'वृद्धसंयोग' हीं प्रकरणें पाहावीं. अर्थशास्त्र म्हणजे दण्डनीति असा कौटिल्याच्या म्हणण्याचा उद्देश दिसतो. तो म्हणतो: 'आन्वीक्षिकीत्रयीवार्तानां योगक्षेमसाधनो दण्डः । तस्य नीतिर्दण्डनीतिः। अलब्धलाभार्था, लब्धपरिरक्षिणी, रक्षितविवर्धनी वृद्धस्य तीर्थेषु प्रतिपादनी च । तस्यामायत्ता लोकयात्रा । तस्माल्लोकयात्रार्थी नित्यमुद्यतदण्डः स्यात् ।' अगदीं अशाच अर्थाचें दण्डीच्या दशकुमारचरितांत एक वचन आहे:–'अर्थस्तावदर्जनवर्धनरक्षणात्मकः कृषिपशुपाल्यवाणिज्यसन्धिविग्रहादिपरिवासस्तीर्थप्रतिपादनफलश्च ।'

‡ म्हणूनच विनयकुमार सरकार यांनीं शुक्रनीतीच्या आपल्या इंग्रजी भाषांतराला जी विस्तृत प्रस्तावना लिहिण्याचा उपक्रम केला आहे तिला The Positive Back–ground of Hindu Sociology असें नांव दिलें आहे.

* कौटिल्यानंतर 'अर्थशास्त्र' या नांवाचाही जवळ जवळ लोप झालासा दिसतो. कौटिल्याच्या अर्थशास्त्राचा संक्षेप कामन्दकानें केला आहे त्याचें नांव 'नीतिसार,' 'अर्थशास्त्रसार' नव्हे. शुक्र, भोज वगैरे ग्रन्थकार आपापल्या ग्रन्थांना 'नीति' हेंच नांव देतात.

यांच्या मूलतत्त्वांचा विचार कांहीं कांहीं ठिकाणीं करणें जरूर असतें. हे जे चार पोटविभाग दर्शविले, त्यांपैकीं प्रत्येकावर व दरेकाच्या उपविभागावर अनेक ग्रंथ यूरोपियन भाषांत आजपर्यंत झाले आहेत, व दरसाल नवीन होत आहेत. 'अर्वाचीन भारतयुद्धा'नें अर्थशास्त्राला एक प्रकारचें चालन दिलें आहे. लोकांचा दृष्टिकोण बदलून 'नवी सृष्टि, नवा खेळ' हीं दिसूं लागलीं आहेत; व नवे नवे प्रश्न उद्भवून त्यांवर चर्चात्मक ग्रंथ निर्माण होत आहेत. हिंदुस्थानालाही हें वारें लागलें आहे. प्रत्येक राष्ट्र आपापलें अर्थशास्त्र बनवीत आहे. अशा वेळीं हिंदुस्थान मागें राहिल्यास त्याचें कायमचें नुकसान होण्याची भीति आहे. सध्यां हिंदी अर्थशास्त्राची अत्यंत आवश्यकता आहे, व त्या दिशेनें हिंदुस्थानच्या प्रत्येक प्रांताच्या वाङ्मयांतून प्रयत्न होणें इष्ट आहे. या बाबतींत महाराष्ट्रावर एक विशेष प्रकारची जबाबदारी आहे. हिंदुस्थानांत अर्वाचीन अर्थशास्त्राच्या इतिहासांत प्रथम कायमचें स्थान दोन महाराष्ट्रीय पुरुषांनीं मिळविलें. त्यांचीं नांवें महाराष्ट्राला पूज्य आहेत; म्हणून त्यांची परंपरा चालू ठेवणें हें महाराष्ट्राचें कर्तव्य आहे. हिंदी अर्थशास्त्राची सुरवात **रानड्यांनीं** प्रथम केली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांनीं या विषयावर लिहिलेला निबंध अजूनही वाचण्यालायक आहे. त्यांत दर्शविलेलें ध्येय **गोखल्यांनीं** आजन्म आपल्या पुढें ठेविलें होतें. त्यांचीं अर्थशास्त्रविषयक भाषणें, विशेषतः व्हाईसराय साहेबांच्या काउन्सिलांतील बजेटावरील भाषणें, अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांस आदर्शरूप म्हणून बराच कालपावेतों समजलीं जातील. गोखल्यांसारखा अर्थशास्त्री त्यांच्या मागें अजून दिसून येत नाहीं, असें पुष्कळदां म्हणण्यांत येतें. तर, अशा प्रकारें एकदां मिळविलेला लौकिक महाराष्ट्रानें गमावतां कामा नये. आतां ही गोष्ट खरी कीं, रानडे व गोखले यांनीं आपलें महत्त्वाचें काम इंग्रजी भाषेंतून केलें आहे; पण याला बहुंशीं पारेस्थिति कारण होती. आतां परिस्थिति हळूहळू बदलत चालली आहे. मराठी भाषेविषयीं आस्था व प्रयत्न हीं वाढीला लागलेलीं दिसत आहेत. अशा वेळीं महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञांची परंपरा पुढें चालवून महाराष्ट्रनिर्मित मराठी व इंग्रजी वाङ्मयांत उपयुक्त व टिकाऊ भर टाकणें हें महाराष्ट्रीय विद्वानांचें कर्तव्य आहे. विद्वत्तेबद्दल महाराष्ट्रीयांची ख्याति पूर्वींपासून चालत आलेली आहे. प्रत्यक्ष व्यापारांत गुजराथी, पारशी वगैरे कांहीं ज्ञातींची बरोबरी मराठ्यांस आजपर्यंत करतां आली नाहीं हें खरें; तथापि अर्थाचें तात्त्विकदृष्ट्या जें विवेचन तें महाराष्ट्रानें पूर्वी केलें आहे, व यापुढें करण्यांत तो कसूर करणार नाहीं अशी आशा आहे.

अर्थशास्त्राच्या विषयांत महाराष्ट्र वाङ्मयानें आजपर्यंत किती भर घातली आहे, याचा आतां आढावा पाहूं. तो आम्ही 'महाराष्ट्रवाङ्मयसूची' च्या आधारानें देत आहों. १९१७ सालापर्यंत अर्थशास्त्रविषयक एकंदर पुस्तकें ८५ छापलीं गेलीं. त्यांत अर्थशास्त्राचा सामान्यरीत्या पूर्णत्वानें विचार करणारीं पुस्तकें तीनच दिसतात. त्यांपैकींही दोन भाषांतररूप असावींत असें वाटतें. म्हणजे गेल्या ७० वर्षांत, मराठींत अर्थशास्त्रावर एकच पुस्तक स्वतंत्र रीतीनें लिहिलें गेलें आहे, असा सारांश निघतो. बाकीचीं पुस्तकें अर्थशास्त्रांतर्गत विशिष्ट प्रश्नांबद्दलचीं आहेत. त्यांच्यामध्येंही कांहीं सहकारी वगैरे मंडळ्यांचे रिपोर्ट, व कांहीं प्रसिद्ध व्यापाऱ्यांचीं चरित्रें अशीं आहेत. हीं वगळलीं असतां अर्थशास्त्रविषयक वाङ्मय फारच थोडें शिल्लक उरतें. ही स्थिति केवळच अभिमानकारक आहे असें म्हणतां येत नाहीं. या ८५ पुस्तकांपैकीं ३ इ. स. १८५० च्या पूर्वींचीं आहेत. १८५१–१८७० या वीस वर्षांत एकंदर १० पुस्तकें छापलीं. एक दोन पुस्तकांच्या दोन आवृत्त्या निघाल्याचें दिसतें. १८७१–१८९० या वीस वर्षांत १६ पुस्तकें छापलीं. यांपैकीं कांहींच्या एकाहून अधिक आवृत्त्या निघाल्या आहेत. १८९१ ते १९१० या वीस वर्षांत २१ पुस्तकें बाहेर पडलीं, व १९११–१७ या वर्षांत १२ पुस्तकांची भर पडली. महाराष्ट्रवाङ्मयसूचींत ज्या पुस्तकांचें वर्ष दिलेलें नाहीं, तीं पुस्तकें या आढाव्यांत वगळलीं आहेत. याप्रमाणें हळूहळू थोडी प्रगति दिसून येत आहे. पण ती विशेष समाधानकारक आहे असें नाहीं.

पुस्तकांखेरीज विविध मासिकांतील लेखांच्या रूपानेंही अर्थशास्त्रांतील कांहीं प्रश्नांचा खल झाला आहे. महाराष्ट्रवाङ्मयाचा एकंदर आढावा काढतां, त्यांत अर्थशास्त्राचें कोणतें स्थान आहे, हें खालील तक्त्यांवरून दिसून येईल. ‘महाराष्ट्रवाङ्मयसूचीं’त दर पृष्ठांत दोन कालम याप्रमाणें यादी दिली आहे, म्हणून खालील तक्त्यांत सोईकरितां कालमवार माहिती दिली आहे. तक्ते दोन आहेत. एक पुस्तकांच्या कालमांचा व दुसरा मासिकांतील लेखांच्या कालमांचा. तक्त्यांत कांहीं चूकभूल असल्यास दुरुस्त करून घेण्याची विनंती आहे. या तक्त्यांवरून महाराष्ट्रवाङ्मयाचें स्वरूप संक्षिप्तपणें दिसून येईल, अशी आशा आहे.*

**तक्ता १. पुस्तकें.**

| विषय | कालम | विषय | कालम |
|---|---|---|---|
| इतिहास. | १५॥ | गोष्टी. | ८ |
| भूगोल व प्रवास-वर्णन. | १६ | चरित्रें. | ६ |
| | | नाटकें. | १८॥ |
| कला. | ३४ | भाषाविषयक ग्रंथ. | ४ |
| कायदा. | १० | भौतिक. | ६ |
| दर्शनें. | १० | अर्थशास्त्र. | ३॥ |
| कादंबरी. | ९॥ | धर्मनीति. | १८ |
| काव्यें. | २३ | समाजशास्त्र. | ८ |

**तक्ता २. मासिकांतील लेख.**

| विषय | कालम | विषय | कालम |
|---|---|---|---|
| इतिहास. | २५॥ | नाटकें | अर्धा कालम |
| भूगोल व प्रवास | ८ | पुस्तकपरीक्षा. | ६ |
| कला. | ५० | विविध देश-विषयक. | ३७॥ |
| कायदा. | १ | | |
| दर्शनें. | २ | भाषा. | ८ |
| | | भौतिक. | १७॥ |
| कादंबरी. | १हून कमी. | अर्थशास्त्र. | ४॥ |
| चटकें. | ३ | धर्म व नीति. | १९ |
| काव्यें. | ७३ | मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र, समाजशास्त्र. | ३५ |
| गोष्टी. | २६ | | |
| चरित्रें. | १२ | | |

या तक्त्यांवरून दिसून येईल कीं, अर्थशास्त्र या विषयाचें स्थान महाराष्ट्र वाङ्मयांत बरेंच खालीं लागत आहे. ही स्थिति सुधारणें इष्ट आहे. काव्यें, कादंबऱ्या, नाटकें, वगैरे अतीव लोकप्रिय विषयांचें स्थान अर्थशास्त्राला कधींच प्राप्त होणार नाहीं, हें आम्ही समजून आहोंत. अवाढव्य प्रगति दाखविणाऱ्या पाश्चात्य वाङ्मयांतही जर अर्थशास्त्राला काव्यादिकांच्या वर नंबर पटकावतां येत नाहीं, तर नुकतेंच विकास पावणाऱ्या महाराष्ट्रवाङ्मयांत अशी क्रांति घडून येईल, अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. तथापि, या विषयासंबंधानें जागृति उत्पन्न होऊन तो थोडा तरी अधिक लोकप्रिय व्हावा, या बाबतींत मतभेद असेलसें वाटत नाहीं. पहिल्या तक्त्यांत, अर्थशास्त्राचा पंधरापैकीं पंधरावा, व दुसऱ्या तक्त्यांत अठरापैकीं तेरावा नंबर लागतो; तो आणखी पांचांनीं जरी वर चढला तरी पुष्कळ सुधारणा झाल्याप्रमाणें होईल. म्हणून या विषयाच्या संबंधांत महाराष्ट्रांतील विद्वान्, विशेषतः उच्च विद्यालयांतून शिक्षण प्राप्त करून

* वरील तक्त्यांसंबंधानें एक दोन गोष्टींचा खुलासा केला पाहिजे. ‘सूची’च्या १६९–१७० पृष्ठांवर १८५६ साला पूर्वी प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची यादी दिली आहे. तीं पुस्तकें या तक्त्यांत मोजलीं गेलीं नाहींत. तसेंच ३५५ पृष्ठापासून पुढें दिलेल्या काव्यसंग्रहांतील प्रकरणांची मोजदाद केलेली नाहीं. ती केल्यास दुसऱ्या तक्त्यांत काव्यांच्या कालमांची संख्या ८३ होईल. पुस्तकांच्या सूचींतील ‘श्रुतिस्मृतिपुराणें व बौद्धिक इतिहास (ओ)’ ‘ संदर्भग्रंथ ( औ )’ व संस्कृत व प्राकृत वाङ्मय ( अं ), हे तीन विभाग तक्त्यांत घेतले नाहींत. त्यांच्या कालमांची संख्या अनुक्रमें, ५३, २॥ व ५ आहे.

दिलेल्या तक्त्यांवरून दिसून येईल कीं, ‘कला ’ या विषयानें बरीच आघाडी मारली आहे. पहिल्या तक्त्यांत त्याचा नंबर पहिला व दुसऱ्यांत दुसरा लागतो. महाराष्ट्रांत कलावृद्धि फार झाली आहे, असें यावरून कोणीं अनुमान केल्यास तें बरोबर होणार नाहीं. कारण, त्या सदरांत, करपल्लवी, मंत्रतंत्र, वैद्यक, शेतकी, संगीत वगैरे विषयांची सरसकट गणना केल्यामुळें, कालमांची संख्या मोठी दिसते.

घेऊन इतिहास व अर्थशास्त्र या विषयांचें अध्ययन केलेले विद्वान्, अधिक लक्ष घालतील अशी आशा आहे. सामान्य तत्त्वांचें विवेचन करणारे ग्रंथ लिहिणें व प्रत्यहीं नवीन उद्भवणाऱ्या प्रश्नांचें विवरण मासिकादिकांच्या द्वारा करणें या दोन मार्गांनीं हें काम साधतां येईल. हल्लींचा काळ आर्थिक पुनर्घटनेचा आहे. सगळ्या साम्राज्याचें आर्थिक स्थित्यंतर करण्याचा विचार मुत्सद्दीवर्ग करीत आहे. अशा वेळीं सामान्य जनतेला या विषयाची माहिती करून देणें हें विद्वानांनीं केलें नाहीं तर कोण करणार?

हिंदी विद्वानांनीं, अर्थशास्त्रावर लिहितांना, खालील गोष्टी मुख्यत्वेंकरून लक्षांत बाळगणें जरूर आहे:—

वर सांगितलेंच आहे कीं, अर्थशास्त्राच्या मूलभूत सामान्य सिद्धान्तांचा निर्णय केल्यानेंच अर्थशास्त्रज्ञाचें कार्य संपत नाहीं. कोणत्याही शास्त्राचें उद्दिष्ट एवढेंच असें साधारणत: मानण्यांत येतें खरें; परंतु अर्थशास्त्राची गोष्ट थोडी वेगळी आहे. त्याचें स्वरूप मुख्यत: तात्त्विक नसून व्यावहारिक आहे. परिस्थितीच्या भिन्नतेमुळें अर्थशास्त्राच्या नियमांत भिन्नता दिसून येते. फ्रान्स व जर्मनी या देशांतील विद्वानांनीं ऐतिहासिक दृष्टीनें अर्थशास्त्राच्या नियमांचें संशोधन सुरू केल्यापासून हें तत्त्व सर्वमान्य होत चाललें आहे. निर्बाध, देशकालापरिच्छिन्न अशीं कांहीं तत्त्वें आहेतच; पण तीं थोडीं. परिस्थितीवर अवलंबून असणारींच फार. उदाहरणार्थ: मोठ्या प्रमाणांत शेतीवर अवलंबून असणाऱ्या हिंदुस्थानासारख्या देशास जे नियम उपयुक्त होतील ते खनिजप्रचुर इंग्लंदासारख्या देशाला तंतोतंत लागू पडणें अशक्य आहे; ते लागू करण्याचा प्रयत्न केल्यास सांपत्तिकदृष्ट्या फायदा होणार नाहीं. प्रशस्त समुद्रकिनारा असल्यामुळें, समुद्रावरचा व्यापार जेथें उत्तम चालूं शकेल अशा देशांत एका प्रकारचीं तत्त्वें फायदेशीर होतील, तर स्वित्झर्लंडसारख्या बिलकुल दर्याकिनारा नसलेल्या देशाला दुसरीं तत्त्वें अनुकूल दिसून येतील. असाच प्रकार देशाची विस्तृतता, डोंगराळपणा, जलवैपुल्य, जमिनीचा सुपीकपणा, हवामानांतील फेरबदल, वगैरे नैसर्गिक परिस्थितीसंबंधानें आहे.

कित्येकदां असें घडून येतें कीं, नैसर्गिक परिस्थिति तीच कायम राहून देशांत सामाजिक अथवा राजकीय परिवर्तन होतें; त्याबरोबर अर्थशास्त्राच्या नियमांच्या उपयुक्ततेंतही तितक्या प्रमाणांत फरक पडतो. इंग्रज येण्यापूर्वीं हिंदुस्थानचा परदेशांशीं व्यापारसंबंध विशेष नव्हता; हल्लीं तो फार वाढला आहे. म्हणून विसाव्या शतकांतील आर्थिक धोरण सोळाव्या शतकांतल्यापेक्षां पुष्कळ वेगळें झालें आहे हें सांगणें नकोच. इंग्लंदांतही याप्रमाणें व्यापारी धोरण वरचेवर बदलत गेलें आहे. क्रॉम्वेलच्या वेळचें धोरण एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत नव्हतें; व १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील धोरण हल्लीं सोडून देण्यांत येत आहे. युरोपखंडाचीही तीच स्थिति. फ्यूडल पद्धतीचे दिवस, फ्रेंच राज्यक्रांतीच्या पूर्वीचा काळ, व नंतरचा काळ, या प्रत्येकांत समयानुरूप आर्थिक विचारांत व व्यवहारांत फरक झाला आहे. अशाबद्दल आणखी अनेक उदाहरणें दाखल करतां येतील.

ही बाह्य परिस्थितीची भिन्नता झाली; तीशिवाय देशादेशांत आंतरभिन्नता—असा शब्दप्रयोग करण्यास हरकत नाहीं, असें वाटतें—दिसून येते, व तिचें महत्त्व पहिलीपेक्षां फार आहे. प्रत्येक देशाची संस्कृति—अथवा राष्ट्रीय जीवनक्रम—भिन्न असते. प्रत्येकांत कांहीं विशेष असतो, तो दुसरे ठिकाणीं नसतो. पौर्वात्य संस्कृति वेगळी व पाश्चात्य वेगळी; व त्यांतही देशपरत्वें बारीकसारीक भेद आहेत. अर्थशास्त्राच्या अध्येत्यांनीं व लेखकांनीं हे संस्कृतिभेद नजरेपुढें ठेवून तदनुरूप सिद्धान्त बांधले पाहिजेत. हिंदुस्थानासंबंधानें विचार करतांना ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. इंग्रजी व अमेरिकन ग्रंथांचें शब्दश: भाषांतर करून हिंदी अर्थशास्त्र बनवितां येणार नाहीं. तिकडील सिद्धान्तांचें बीं हिंदुस्थानांत रुजूं घालण्यापूर्वीं जमीन कोणत्या प्रकारची आहे तिचा विचार झाला पाहिजे. नाहीं तर श्रम व्यर्थ होतील इतकेंच नव्हे, तर अनिष्ट परिणाम घडून येतील. आतांपर्यंत तसा कांहींसा प्रकार झाला आहे; पण तो पुढें घडून येणार नाहीं याबद्दल खबरदारी घेणें जरूर आहे.

अर्थशास्त्रदृष्ट्या हिंदी संस्कृतींत विशेष काय आहे, हें थोडक्यांत येथें दाखविल्यास अस्थानीं होणार नाहीं. व्यक्ति, राष्ट्र व समाज यांचे परस्परसंबंध काय आहेत हें पाहिल्यानें त्याची स्फुटता होते. हे संबंध तीन प्रकारचे आहेत. व्यक्ति व समाज यांमधील संबंध; व्यक्ति व राष्ट्र यांच्यामधील संबंध व समाज व राष्ट्र यांच्यामधील संबंध. प्रथम व्यक्ति व समाज हीं घेऊं. पाश्चात्य संस्कृतींत समाजाचा आद्यघटक(unit) व्यक्ति ( Individual ) आहे असें समजलें जातें. व्यक्तिस्वातंत्र्याचें महत्त्व तिच्यांत विशेष आहे. आपल्या संस्कृतींत तसें नाहीं. आपल्यांत व्यक्तीचें अस्तित्व समाज व कुटुंब यांच्या उपाङ्गत्वानें आहे. त्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याची महत्ता इकडे फारशी मानण्यांत येत नसे. इ. स. १६ व्या शतकापूर्वी युरोपांतही व्यक्तिस्वातंत्र्यवादाचा स्वीकार कोणीं फारसा केला नव्हता. ग्रीस व रोम या देशांत व्यक्ति राष्ट्रांच्या केवळ अंगभूत म्हणून मानिली जात असे इतकेंच नव्हे, तर, तद्व्यतिरिक्त व्यक्तीचें अस्तित्व म्हणजे केवळ गुलामगिरीचें अथवा जनावराप्रमाणें असे. ग्रीससंबंधानें एक जर्मन ग्रंथकार जें म्हणतो, आणि जें रोमलाही बरोबर लागू पडतें, तें येणेंप्रमाणें:—'The individual requires the State to give him a legal existence. Apart from the State he has neither safety nor freedom. The barbarian is the natural enemy, and conquered enemies become slaves...... The Hellenic State, like the ancient State in general......was all in all. The citizen was nothing except as a member of the State. His whole existence depended on and was subject to the State.........The State knew neither moral nor legal limits to its power.' (Bluntschli, '*Theory of the State.*') पुढें मध्ययुगांत पोपचें साम्राज्य वाढून व्यक्तीची मालकी चर्चच्या ताब्यांत गेली. जेथें पोपचें वर्चस्व चाललें नाहीं, तेथें जमीनदार सरदारांचा अंमल सुरू झाला. १६ व्या शतकांतल्या धर्मक्रांतीनें व्यक्तीची या पारतंत्र्यापासून सुटका केली. तेव्हांपासून व्यक्तिस्वातंत्र्याच्या वर्तुलाची सारखी वृद्धि होत आहे, व त्याची येथपर्यंत मजल पोंचली आहे कीं, कांहीं तत्त्ववेत्त्यांच्या मतें समाजाकरितां व्यक्ति नसून व्यक्तीकरितां समाज आहे. स्पेन्सरच्या मतें, In Society, the "living units do not and cannot lose individual consciousness, since the community as a whole has no corporate consciousness......This is an everlasting reason why the welfare of citizens cannot rightly be sacrificed to some supposed benefit of the State, but, why on the other hand, the State is to be maintained solely for the benefit of citizens. ......The corporate life in society must be subservient to the lives of the parts, instead of the lives of the parts being subservient to the corporate life." (The Encyclopœdia Britannica, xxv, p. 325.) अर्थशास्त्रांतही या व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वाचा अंगीकार केला गेला आहे. आपल्या संस्कृतींत याच्या उलट स्थिति आहे. कुटुंब, वर्णव्यवस्था, ग्रामपंचायत व समाज यांना प्राधान्य आहे, व व्यक्ति म्हणजे यांचा एक अंश अशी आपली कल्पना आहे. आपल्या धर्मानें स्वातंत्र्य कुणाला दिलें असेल तर तें संन्यासाश्रमाला. इतर आश्रम व सर्व वर्ण यांना पूर्ण नियमबद्ध करून ठेविलें आहे. मनुष्य जन्मतांच त्याचा वर्ण नक्की केलेला असतो; त्याच्या आयुष्यांत आश्रमव्यवस्था आहे; त्याचा धंदा कुलाचारानें अथवा वर्णपद्धतीनें ठरविलेला असतो. कुटुंब अविभक्त असल्यामुळें वैयक्तिक स्वातंत्र्याला बराच आळा बसतो. असो. अशा प्रकारें पाश्चात्य देशांत व्यक्तीचें स्वातंत्र्य व आपल्या देशांत व्यक्तीचें नियंत्रितत्व प्रधान आहे. म्हणून पहिल्या तत्त्वावर उभारलेलें अर्थशास्त्र हिंदुस्थानाला उपयोगी पडणार नाहीं.

व्यक्ति व राष्ट्र यांच्या संबंधानेंही पौर्वात्य व पाश्चात्य कल्पनांत फरक आहे. पाश्चात्य देशांत व्यक्ति व राष्ट्र यांचा संबंध फार निकट आहे. प्राचीन काळीं तो तसा होताच.पण अलीकडे तिकड व्यक्तिस्वातंत्र्याचें महत्त्व फार आहे, हें नुकतेंच सांगितलें; तथापि, तें पूर्णपणें अमलांत आणण्याचें काम राष्ट्राचें (State) आहे, असेंही मानण्यांत येतें. राष्ट्रामध्यें सत्ताधारी व्यक्ति अथवा मंडल यांच्या हातीं किती सत्ता आहे हें पाहिल्यास या म्हणण्याची सत्यता दिसून येईल. 'Hindustan Review' च्या आगष्टच्या अंकांत एका लेखकानें या सत्तेची व्याख्या मजेदार रीतीनें एक समीकरण मांडून दिलेली आहे. तो म्हणतो—

"The Western State is, to put it rather crudely, Soldier + policeman + judge + legislator + administrator+ educator + censor+ producer+ monopolist+ trader+ savings bank+insurance agent+postman+ carrier+ care-taker+ trustee+guardian+ ministering angel+ earthly providence, all rolled up into a great organisation marked by hide-bound underlings, only half-intelligent and as like machines as it is possible for human beings to become."

हें वर्णन उपरोधपूर्ण आहे खरें, तथापि, व्यक्तिस्वातंत्र्य असूनही व्यक्तीच्या जीवनक्रमावर सरकार किती तऱ्हेनें अधिकार गाजवूं शकेल, हें त्यावरून दिसून येतें. आपल्याकडे याच्या उलट स्थिति आहे, अथवा परवांपर्यंत होती. व्यक्ति व राष्ट्र यांचा प्रत्यक्ष संबंध फारच थोडा असे. वेदान्तग्रंथांत ' पिंडीं तें ब्रह्मांडीं ' अशी एक म्हण येते, ती हिंदी समाजाचें बरोबर वर्णन करणारी आहे. समाजास ब्रह्मांडाची उपमा दिली तर त्या ब्रह्मांडांत उपब्रह्मांडांची मालिका लागलेली दिसेल. या मालिकेंतील मणि या क्रमानें आपणांस दर्शवितां येतील:—समाज, राष्ट्र, ग्राम, जाति (अथवा वर्ण), कुटुंब व व्यक्ति. हा उतरता क्रम आहे. यांतील पूर्व पूर्व घटक व्यापक आहे व उत्तरोत्तर घटक व्याप्य आहे. उदाहरणार्थ, ग्रामांत जाति, कुटुंब, व्यक्ति हीं अंतर्भूत होतात; पण ग्रामाचा अंतर्भाव राष्ट्र व समाज यांत होतो. तथापि प्रत्येक घटक आपापल्यापरी पूर्ण व स्वतंत्र आहे. गांवाची सर्व व्यवस्था गांवपंचायतीच्या मार्फत होत असे; ठराविक कर राष्ट्राधिपतीकडे नियमित रीतीनें पोंचता केल्यावर, आंतरव्यवस्थेसंबंधानें गांवास स्वतंत्रता असे. तोच प्रकार कुटुम्ब व व्यक्ति यांचा. व्यापक घटकासंबंधानें व्याप्याचें जें कर्तव्यक्षेत्र आंखलेलें असेल तेवढ्यापुरती जबाबदारी त्यानें पतकरल्यावर त्याच्या स्वतःच्या इतर बाबतींत व्यापक घटकाला हात घालतां येत नसे. कुटुम्ब म्हणजे समाजाचें अगदीं लहान असें प्रतिबिम्ब. त्यामुळें होत असे काय कीं, व्यक्ति व राष्ट्र यांच्यामध्यें ग्राम, जाति व कुटुम्ब यांचा, जणुं काय, एका बाहेर एक असा कोट उभारलेला असे; म्हणून व्यक्तीचा राष्ट्राशीं संबंध फारच दूरचा असे. या व्यवस्थेचा परिणाम अर्थशास्त्रदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. प्रत्येक घटक स्वायत्त ( self-sufficient ) असे. गांवाला जरूर असणाऱ्या उद्योगधंद्यांची जातवार वांटणी होत असे, म्हणून गांवाचें परावलंबित्व नष्ट होत असेच, व त्याबरोबर प्रत्येक जात, प्रत्येक कुटुंब व प्रत्येक व्यक्ति यांच्याही पोटापाण्याची व्यवस्था आपोआप केली जात असे. राष्ट्राराष्ट्रामध्यें लढाया झाल्या अथवा राष्ट्रांत राज्यक्रांति झाली, तरी त्याचा परिणाम ग्राम व ग्रामांगभूत घटक यांना फार थोडा भोगावा लागत असे. कोणी राजा येवो अथवा जावो, ठराविक कर दिल्यावर त्याचा गांवास उपसर्ग लागत नसे, व त्यामुळें गांवाच्या सांपत्तिक स्थितीला फारसा धोका पोंचत नसे.* इंग्रजी राज्य झाल्या-

* अर्थशास्त्रदृष्ट्या या पद्धतीचें सविस्तर विवेचन होणें जरूर आहे. आम्हीं वर दर्शविलेली स्थिति मुसलमानांच्या येण्यापर्यंत सर्व हिंदुस्थानभर दिसून येत होती. मुसलमानांनीं येथें आपलें निवासस्थान

पासून ही स्थिति पालटत आहे. कुटुंब, जाति व ग्राम यांनीं पूर्वी घातलेलीं बंधनें सैल होत आहेत अथवा तुटत आहेत. या स्थितीच्या इष्टानिष्टतेचा निर्णय करून जेणेंकरून कायम उपयोगी परिणाम घडून येईल असा मार्ग दर्शविण्याचें महत्त्वाचें पण अवघड काम अर्थशास्त्रज्ञांचें आहे.

समाज व राष्ट्र यांच्या संबंधांतही असाच परिस्थितिभेद पूर्व व पश्चिम यांत आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पूर्वेकडे तो अवयव-अवयवी संबंध, व पश्चिमेकडे तादात्म्यसंबंध आहे. Sidgwick नांवाचा ग्रंथकार म्हणतो कीं, समाजशास्त्र व राजनीतिशास्त्र ( Politics ) यांचा विषय एकच आहे. अलीकडे समाजशास्त्राचें क्षेत्र अधिक विस्तृत व म्हणून भिन्न आहे असें दाखविण्याचा कित्येक शास्त्रज्ञांचा प्रयत्न चालला आहे. पण असें करतांना ते समाज शब्दाचा अर्थ जास्ती व्यापक करतात. समाज म्हणजे सगळी मनुष्यजाति असा त्यांच्या म्हणण्याचा अर्थ आहे. पण प्रत्येक देशाचा विशिष्ट समाज जर आपण घेतला तर सिज्विकच्या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे असें आढळून येईल. धर्म, नीति, शारीरिक व मानसिक शिक्षण, आर्थिक सुस्थिति, वगैरे सर्वांचा विचार करणें हें जर राष्ट्रनियामक सत्तेचें कर्तव्य, तर समाज व राष्ट्र यांत फरक नाहीं असेंच म्हणणें भाग आहे. आपल्याकडे हा भेद पहिल्यापासून मानला जात असे. अर्थ व व्यवहार हे राजाचे मुख्य विषय. समाजबंधनें घालण्याचें काम धर्मशास्त्राकडे असे व तदनुरूप राजास आपलें कर्तव्य बजावावें लागत असे. आर्यसंस्कृतीनें बद्ध तो आर्यसमाज व तदंतर्गत अनेक राज्यें, अशा प्रकारची व्यवस्था असे. म्हणून समाजाच्यापेक्षां राष्ट्राची कर्तव्यमर्यादा अधिक संकुचित असे.

ही सर्व आंतर व बाह्य भिन्नता लक्षांत ठेवून हिंदी अर्थशास्त्रज्ञानें आपले नियम घडविले पाहिजेत. असें केल्यानेंच प्राचीन परंपरा कायम ठेवून नवीन संस्कृतीचें यथायोग्य व यथोपकारक संमिश्रण आपणांस घडवून आणितां येईल. नाहीं तर, एकदेशी प्रयत्न होऊन अनिष्ट परिणाम उद्भवतील, अथवा पूर्वपरंपरा तुटेल.

या बाबतींत ग्रंथांपेक्षां मासिकांना अधिक कामगिरी बजावतां येईल असें आम्हांस वाटतें. ग्रंथ खरेदी करणारे व ग्रंथ वाचणारे यांच्यापेक्षां मासिकांचे वर्गणीदार व तीं वाचणारे यांची संख्या फारच मोठी आहे. सर्वमान्य अधिकारयुक्त ग्रंथ निर्माण झाले तर आपणांस पाहिजेच आहेत. पण, त्याबरोबर अर्थशास्त्राच्या हिंदुस्थानास लागण्याजोग्या सामान्य नियमांची माहिती जितकी होईल तितकी अधिक हवी आहे; व हें काम मासिकांच्या द्वारेंच बनण्याजोगें आहे. विविधज्ञानविस्तारासारख्या मुख्यत्वें प्रौढ विषयांस वाहिलेल्या मासिकांनीं या बाबतींत प्रयत्न केल्यास तें काम अशक्य आहे असें नाहीं.

या संबंधानें कांहीं व्यावहारिक सूचना कराव्याशा वाटतात, त्यांचा तज्ज्ञांकडून विचार व्हावा. खालीं दिलेल्या मार्गांनीं प्रयत्न करून ती माहिती मासिकांच्या

---

केल्यावर तिच्यांत फरक पडला. सामान्यतः असें दिसून येतें कीं, ज्या प्रमाणांत मुसलमानी राजसत्ता रूढमूल झाली त्या प्रमाणांत गांवपंचायतीचा नाश होत गेला. उत्तर हिंदुस्थानांत ही सत्ता फार दिवस टिकली; व तेथें गांवपंचायतीची पद्धत दिसून येत नाहीं. नर्मदा व कृष्णा यांच्यामध्यें मुसलमानी राज्य होतें. पण तें उत्तर हिंदुस्थानांतल्या प्रमाणें सतत राहिलें नाहीं व या टापूत गांवपंचायतीचे अवशेष अजून दिसून येतात. दक्षिणेंत मुसलमानी राज्य जवळ जवळ झालेंच नाहीं असें म्हटलें तरी चालेल; व तेथें गांवपंचायतीचें शुद्ध स्वरूप आढळून येतें.

पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतींत एक तऱ्हेचा मजेदार विरोधाभास आहे, तो येथपर्यंत केलेल्या संक्षिप्त वर्णनावरून स्पष्ट झाला असेल. पाश्चात्य संस्कृतींत व्यक्तिस्वातंत्र्याचा महिमा मोठा. पण तितकेंच सरकारचें कार्यक्षेत्र विस्तृत व सरकारचें व्यक्तीवरील नियंत्रण जास्त. पौर्वात्य संस्कृतींत व्यक्तिबंधनें फार, पण त्याबरोबर राजबंधनेंही तितकींच शिथिल; म्हणून व्यक्ति राजाचे तावडींत सांपडण्याचे प्रसंगही कमी.

द्वारें लोकांपुढें मांडली, तर अर्थशास्त्र या विषयासंबंधानें लोकांत अधिक जागृति उत्पन्न होईल व त्यायोगें अर्थशास्त्राच्या त्या त्या प्रश्नांचें सांगोपांग विवेचन अधिक सुलभ व शक्य होईल.

( १ ) सध्यां जीं व्यापाराचीं केंद्रस्थानें आहेत—अहमदाबाद, सोलापुर, हुबळी वगैरे—या ठिकाणीं त्या त्या विशिष्ट परिस्थितीचा अभ्यास झाला पाहिजे व कोणत्या प्रकारें ते ते धंदे समाजाचें उत्तम रीतीनें पोषण करतील, याचा निश्चय करून तो तडीस नेण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. मुख्य धंद्याचा विचार करतांना तदनुषंगानें चालण्यासारखे कोणते धंदे आहेत, याचाही विचार होणें अत्यंत जरूर आहे. आपली पूर्वींची राहणी व हल्लींची संक्रमणकालीन राहणी यांचा मेळ घालण्यास याचा फार उपयोग होईल. नवीन धंद्यांच्या योगानें पहिल्या धंद्यांस किती व कसा धक्का पोंचला व त्यांचें पुनरुज्जीवन करणें शक्य आहे कीं काय, याचाही विचार व्हावा.

(२) नवीनधंदे व नवीन व्यापार यांची कुठें, कशी व किती शक्यता आहे याबद्दल माहितीपत्रकें तयार करणें. सरकारकडून व लोकांकडून आजपर्यंत या संबंधानें पुष्कळ लिहिण्यांत आलें आहे व लोकांनीही पुष्कळदां ठोकर खाल्ली आहे, म्हणून त्याचें अधिक विवेचन नको. तथापि प्रयत्न झाले पाहिजेत हें उघड आहे.

( ३ ) मोठ्या शहरांची वाढ हा हल्लींच्या परिस्थितीचा एक विशेष दिसून येत आहे. साधारणतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं देशाचा व्यापार व समृद्धि हीं त्यांतील मोठ्या शहरांच्या संख्येच्या प्रमाणांत असतात. हल्लींचा काल मोठ्या शहरांचा आहे; दुसऱ्या अर्थानें तो खेड्यांचाही काल (विनाशक मृत्यु) आहे असें म्हटलें तरी चालेल. या पद्धतीचा हिंदुस्थानानें कितपत अंगीकार अथवा प्रतिकार करावा हा विचारणीय प्रश्न आहे. Bertsand Russell हा प्रख्यात इंग्रजी ग्रंथकार म्हणतोः—'Every great city is a centre of race-deterioration.' म्हणजे प्रत्येक मोठें शहर हें समाजविनाशाचें केन्द्रस्थान आहे. आपल्याकडेही रा. गांधी हे खेडोखेडीं स्वदेशीचा प्रसार करून प्रत्येक खेड्यास आर्थिक दृष्ट्या स्वायत्त बनविण्याचा उद्योग करीत आहेत. शहर व खेडें यांनीं संस्कृतिविकासाच्या कामीं कोणता भाग घ्यावा याचा निर्णय अर्थशास्त्रज्ञांनीं केला पाहिजे.

( ४ ) वरील प्रश्नाच्या अनुषंगानें दुसरा एक प्रश्न उद्भवतो. मोठ्या प्रमाणावर चालणारे धंदे वाढविणें हीही अलीकडील व्यापारपद्धतींतील एक मुख्य गोष्ट आहे. व तींत मोठ्या शहराच्या उत्पत्तीचें बीज आहे. ज्या ठिकाणीं धंदा मोठ्या प्रमाणावर चालतो त्या ठिकाणीं लोकसंख्या वाढत्या प्रमाणांत असते. हल्लींचें श्रमविभागाचें तत्त्व व पूर्वींचें श्रमविभागाचें तत्त्व यांच्या कार्यांत एक फेर आहे. पूर्वीं गांवोगांव श्रमविभागाच्या तत्त्वाचा अंमल होत असे व तेणेंकरून जरूरीचा असा प्रत्येक धंदा बहुधा प्रत्येक गांवीं चालवणें शक्य असे. हल्लीं ग्रामगत श्रमविभाग नाहीं. एक शहर सभोंवतींच्या अनेक खेड्यांस वेगवेगळ्या तऱ्हेनें जरूरीच्या बहुतेक वस्तूंचा पुरवठा करूं शकतें, म्हणून त्या खेड्यांतील धंद्यांचें एकीकरण शहरांत झालेलें दृष्टीस पडतें. ज्याची खेडेगांवापासून फारकत करतां येत नाहीं, असाच धंदा खेडेगांवांत शिल्लक राहत चालला आहे: उदाहरणार्थ, शेती. या व्यापारी धोरणाचा निरोध करून खेडेगांवीं चालवितां येण्यासारखे लहान प्रमाणावरचे धंदे कोणते आहेत व त्यांची वाढ कोणत्या तऱ्हेनें करावी हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे. हिंदुस्थानदेशाच्या दृष्टीनें तें महत्त्व विशेष आहे. हिंदुस्थानचा मुख्य धंदा शेती,—शेतीवरच अवलंबून राहाणारे लोक हिंदुस्थानांत शेंकडा ७५ हून अधिक आहेत. म्हणून खेडेगांवांचें महत्त्व इतर देशांपेक्षां हिंदुस्थानाला फार आहे. पण नुसत्या शेतीवर खेडेगांवांचा निभाव लागणें कठीण. शेतीला दुसऱ्या हातकामाची अगर लहान प्रमाणावर चालणाऱ्या धंद्याची जोड दिली तर शहर व खेडें या दोहोंचाही मिलाफ होऊन देशाचें उत्तम हित होईल.

( ५ ) या संबंधांत पूर्व तयारी म्हणून खेड्याच्या आर्थिक स्थितीचें आपल्यास अधिक ज्ञान झालें पाहिजे.

पुण्याचे डॉ. मॅन व मद्रासचे डॉ. स्लेटर यांनीं गांव-पाहणी करून पुस्तकें लिहिलीं आहेत.पण अशा तऱ्हेचा प्रयत्न याहून अधिक जोरानें झाला पाहिजे. आर्थिक दृष्टीनें गांवपाहणी करतांना खालील गोष्टींसंबंधानें चौकशी करून माहिती मिळविली पाहिजे. ( १ ) लोकसंख्या कमी जास्ती झाली असल्यास तिचीं कारणें. (२) जमीन, तिचे प्रकार, तींत उत्पन्न होणारीं धान्यें, लागवड सुधारण्याचे प्रयत्न, वगैरे. पडीत जमीन व रानें. (३) उत्पन्न-एकंदर, सरासरी, दर माणसीं, व दरकुटुंबीं. शेताचे मालक व निवळ मोलमजुरी करणारे यांचें प्रमाण. ( ४ ) इरिगेशन. ( ५ ) इतर धंदे. ( ६ ) भाव व मजुरी. ( ७ ) सामान्यरीत्या आर्थिक स्थिति; कर्जबाजारीपणा व त्याचीं कारणें; व्यसनें व तन्निवारणार्थ उपाय. ही यादी अगदींच तुटपुंजी आहे. पण निव्वळ मार्ग दर्शविण्याच्या हेतूनें ती येथें दिली आहे. कोणी हें काम अंगावर घेऊन प्रयत्न करूं लागल्यास त्याला ती वाटेल तितकी वाढवून आपल्या कामांत पूर्णता आणतां येईल.

( ६ ) अशा प्रकारचे शोध मध्यम स्थितींतील वर्ग व मोलमजुरी करून राहाणारा वर्ग यांच्या बाबतींतही झाले पाहिजेत.

( ७ ) मुख्यतः सामाजिक कल्याणाचा लक्ष्यबिंदु पुढें ठेवून, म्हणजे सामाजिक दृष्ट्या अर्थशास्त्रज्ञांनीं कोणतें काम हातीं घेतलें पाहिजे तें दर्शविण्याचा वरील यादीचा उद्देश आहे. त्याशिवाय, निव्वळ अर्थ-शास्त्रदृष्ट्या ज्यांचा विचार करतां येईल असे-चलनी नाणें, ब्यांका, वगैरेसंबंधींचे प्रश्न आहेत ते वेगळेच. यांची प्रत्येक अर्थशास्त्रज्ञास माहिती आहेच, म्हणून ते येथें देऊन जागा अडविण्याचें कारण नाहीं.

अर्थशास्त्राची वर्तमानस्थिति व त्या बाबतींत आपलें भविष्यकालीन कार्य यांचें येणेंप्रमाणें दिग्दर्शन आहे. वर्तमानस्थिति ठीक आहे, पण फारशी समाधानकारक नाहीं; पण भविष्यकालीं ती तशी होणें इष्ट आहे, एवढाच एकंदरींत वरील विवेचनाचा मथितार्थ आहे.

ह. बा. भिडे.



# हिंदुस्थानांतील पदार्थविज्ञानशास्त्रीय संशोधनाची सांप्रतची स्थिति.

प्रो० गोपाळ रामचंद्र परांजपे, एम्. एस्सी.; ए. आय्. आय्. एस्. ( स्प्रिंगर रिसर्च स्कॉलर, युनिव्हर्सिटी ऑफ् बॉंबे ); आय्. ई. एस्.

## १ प्राचीन काळ.

गेल्या पंधरा वीस वर्षांत पाश्चात्य देशांत किती एक मोठमोठया व उपयुक्त गोष्टींचे शोध लावण्यांत आले. शस्त्रप्रयोगावांचून शरीरांतील अदृश्य भाग दृश्य करणारे क्ष-किरण, मध्यंतरीं संयोग करणारा कांहीं पदार्थ नसतां हजारों मैलांवर बिनचूक संदेश पोहोंचविणारें बिनतारांचें तारायंत्र, दिवसासारखा स्वच्छ व नेत्रांना सुखदायक असा विद्युत्प्रकाश, लोहचुंबकाचा उपयोग करणें अशक्य अशा जागीं वापरतां येण्याजोगें व दक्षिणोत्तरच नव्हे तर वाटेल त्या स्थितींत स्थिर राहणारें होकायंत्र, स्वाभाविक रंगांत फोटो घेण्याची व छापण्याची कला, हवेमध्यें पक्ष्याप्रमाणें व समुद्रांत माशांप्रमाणें स्वच्छंद संचार करणारीं विमानें व पाणबुडया नौका, ह्या व ह्यासारख्या कल्पनातीत व अशक्य वाटणाऱ्या गोष्टी पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं विलक्षण बुद्धि व कौशल्य खर्च करून जगाच्या उपयोगासाठीं निर्माण करून ठेविल्या आहेत.

पण जें हिंदुस्थान प्राचीनकाळीं ज्योतिःशास्त्र, गणित वगैरे विद्यांचें माहेरघर म्हणून नांवाजलें होतें, त्या हिंदुस्थानची आजची स्थिति फार निराळी आहे. वर निर्दिष्ट केलेल्या अनेक शोधांपैकीं एकही महत्त्वाचा शोध लावण्याचा मान हिंदुस्थानचे वांटयास येऊं नये ही फार लाजिरवाणी गोष्ट आहे असें देखील आज आम्हांस वाटेनासें झालें आहे. दुसऱ्यांकडून आपल्या गरजा भागवून घेण्याच्या आपल्या संवयीमुळें नुकतें नुकतें म्हणजे तीस चाळीस वर्षांपूर्वींपर्यंत उत्तम काम करीत असलेल्या संस्था सुद्धां लुप्तप्राय झाल्या असून त्यांनीं स्वतःचें व मागाहून येणाऱ्या तरुण विद्यार्थ्यांचें नुकसान करून ठेविलें आहे. त्रावणकोरची राजधानी त्रिवेंद्रम् येथें फार पूर्वीपासून चालत आलेली वेधशाळा होती, पण आज तेथें कोणतेंही काम केलें जात नाहीं. यंत्रांवर सांचलेली धूळही निघत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वीं दरबारांतील मुत्सद्द्यांनीं एक शोध लावला कीं, आपणांस जरूर असलेली सर्व माहिती सिमला व कोडेकनाल येथील वेधशाळांतून मिळूं शकते; सबब आणखी एका स्वतंत्र वेधशाळेची आवश्यकता नाहीं. आपली स्वतःची उत्तम वेधशाळा असतांना त्रावणकोरमधील लोकांना ह्या मुत्सद्द्यांचे शहाणपणामुळें परक्या ठिकाणीं ठरविलेल्या कालमानावर व हवामानावर अवलंबून राहणें भाग पडत आहे.

अशा रीतीनें आयत्या पिठावर रेघा ओढण्याची संवय झाल्यामुळें हिंदु लोकांचा कार्यक्रम दिवसेंदिवस बदलत चालला, त्यांची शिक्षणपद्धति बिघडली व शिक्षकांचें आपल्या कामावरील मन उडालें. तयार व आयतें पदरांत पडेल त्यांत समाधान मानून स्वस्थ बसण्याकडे मनाची प्रवृत्ति झाल्यावर ज्ञानवृद्धि कशी होणार व संशोधनास चालन कसें मिळणार ?

पूर्वीं एका वेळेस हिंदुस्थानांत शास्त्रीय शोध करण्याची प्रवृत्ति होती व त्या वेळेस नमूद केलेले शोध बरेच महत्त्वाचे असत. सध्यांचे मानानें जरी ते फार क्षुल्लक वाटले तरी ज्या कालीं ते केले गेले तो काल लक्षांत घेतां त्यांची योग्यता फार मोठी आहे असें दिसून येईल.

पादप्रशस्तानें इसवी सनाच्या तिसऱ्या किंवा चवथ्या शतकांत लिहिलेल्या ' कर्मग्रंथां'त जे गतिसंबंधाचे नियम दिले आहेत त्यांत एक नियम असा आहे कीं, जोंपर्यंत संस्कार चालू असतो तोंपर्यंतच पदार्थांत गति असूं शकते. संस्काराची शक्ति एकाद्या पदार्थावर घडणाऱ्या कार्यामुळें जसजशी क्षीण होत जाते तसतशी त्या पदार्थांतील गतिही कमी होते.

**संस्कारो यावत् पतनमनुवर्तते । यथा यथा चास्य कार्यकारणात् शक्तिः क्षीयते तथा तथा कार्यं मन्दतरतमादिभेदभिन्नमुपजायते ।**

**श्रीधरन्यायकन्दली–कर्मग्रंथ,**

इंग्लिश गणिती न्यूटन ह्यानें ह्याच नियमाचा शोध सतराव्या शतकांत लाविला.

उद्योतकार व श्रीधर यांच्या गुरुत्वाकर्षणाच्या कल्पना न्यूटन व गॅलिलिओ ह्यांच्यासारख्याच होत्या, तरी त्या शास्त्रज्ञांनीं एक विलक्षण गोष्ट नमूद केलेली आढळते, ती ही कीं, " एकाद्या पदार्थाचें गुरुत्व तो पदार्थ ज्या अवयवांचा बनलेला असतो त्यांच्या गुरुत्वांच्या बेरजेपेक्षां कांहीं विशेष प्रसंगीं भिन्न असूं शकेल. " अर्थात् हा फरक फारच सूक्ष्म असल्यामुळें सहज दृष्टोत्पत्तीस येण्याजोगा नाहीं. हीच कल्पना मध्यां हालंड देशांतील प्रसिद्ध शास्त्रज्ञ लोरेंट्झ व जर्मनींतील काल व आकाश ह्यांचेसंबंधीं नवीन उपपत्ति (Theory of Relativity) प्रसिद्ध करणारा आइनस्टाईन ह्यांचे कल्पनेशीं बरीच जुळते !

गणित व ज्योतिःशास्त्राप्रमाणें ध्वनिशास्त्रांतही प्राचीन काळीं बरेंच संशोधन झालें असावें. मृदंग वीणा, सतार, वेणु, जलतरंग, सारंगी, बीन, सनई वगैरे वाद्यांची उत्पत्ति उत्तम प्रकारचे ध्वनिशास्त्राचे अध्ययनाशिवाय झाली नसावी.

इतकी उत्कृष्ट पूर्वतयारी असून आज हिंदुस्थानांत पदार्थविज्ञानशास्त्रासंबंधीं कोणत्याही प्रकारचें काम करण्यास अडचण कां पडावी ? कांहीं तरी कारणानें एकदां जी घडी बिघडली ती अजून दुरुस्त होत नाहीं. चुकीची शिक्षणपद्धति चालू असतांना संशोधनाचें काम होणें जवळ जवळ अशक्यच. अशी स्थिति कां व केव्हां झाली त्याबद्दल मतभेद असेल. पण तिचे परिणाम फार घातुक झाले आहेत ह्याबद्दल जवळ जवळ एक मत आहे, व त्यामुळें कांहीं विद्वान् व संपन्न गृहस्थांचे प्रयत्नांनीं गेल्या दहावीस वर्षांत ह्या निराशाजनक गाढ अंधकारांतच जीं कांहीं कांहीं प्रकाशकिरणें दिसूं लागलीं आहेत, त्यांची माहिती ह्या लेखांत देण्याचें योजिलें आहे.

## २ चाळीस वर्षांपूर्वीं.

सामान्य लोकांचा असा समज असतो कीं, नवीन शोध लागणें दैवाधीन आहे. ह्यांत थोडासा जर सत्यांश असेल तर भास्कराचार्य, श्रीधर, विश्वनाथ वगैरे प्राचीन शोधकांनंतर सुमारें पंधराशें वर्षें हिंदुस्थानांत एकही महत्त्वाचा शोध लागूं नये हें आश्चर्य नव्हे काय कीं इतक्या अवधींत एकही दैववान् निर्माण झाला नाहीं ? जेथें शिक्षणाची चांगलीशी सोय नाहीं, योग्य व मन लावून काम करणारा शिक्षकवर्ग फारसा नाहीं, तेथें निष्काम व सत्यशोधनाचे बुद्धीनें काम करणारीं माणसें कोठून उत्पन्न होणार, व दैव तरी काय करणार ?

" ज्या वेळेस ( १८७६ सालीं ) हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयें निवळ परीक्षायंत्रें होतीं-अद्याप आहेतच-, ज्या वेळेस येथील शाळांत नुसतीं पुस्तकें पाठ केलीं जात असत, ( तेथें शिक्षण मिळतें असें म्हणणें हें महत्पाप होय ) व जेव्हां हिंदु विद्यार्थ्यांना इंग्लंडाहून आणविलेल्या विद्वानांकडून प्राचीन इंग्रजी काव्यांवरील टिप्पणांचा भुसा चारण्यांत येई " * त्या वेळेस कलकत्त्यास डॉ. महेंद्रलाल सरकार ह्या सत्पुरुषानें " भारतीय शास्त्रीयज्ञानप्रसारक मंडळ " स्थापन केलें. परंतु अशा एका अल्प प्रयत्नानें विस्तीर्ण हिंदुस्थानांत काय होणार ? जवळ जवळ हीच स्थिति विसाव्या शतकाचे आरंभापर्यंत होती.याच सुमारास सुदैवानें एक नवीन चेतना उत्पन्न झाली व शिक्षणपद्धतींत बऱ्याच सुधारणा केल्या गेल्या. पण त्यांत उच्चप्रतीच्या शास्त्रीय संशोधनाचा समावेश झाला नाहीं. ही अडचण दूर करण्याचे बुद्धीनें परलोकवासी सर जमशेटजी टाटा यांनीं उदारपणानें तीस लाख रुपये सरकारचे स्वाधीन केले व शास्त्रीय शोध करण्याची व उच्चप्रतीचें धंदेशिक्षण मिळण्याची जेथें सोय होईल असें विद्यापीठ स्थापन करण्याची विनंती केली. बंगलूर येथील 'भारतीय शास्त्रीय विद्यापीठ' हें ह्या देणगीचेंच फळ होय. टाटांचे विनंतीवरून प. सर विलियम रॅमसे हे स्वतः हिंदुस्थानांत

*At a time (1876) when Indian Universities were purely examining bodies so dear to the Philistine Soul, when Secondary Education in India was only, book-mongery ( to call it 'literary' would be a fault to heaven ) and literary gentlemen were brought from England to feed raw Indian Yorth with husks of Commentary laboriosly ground from the English Classics......)

*Nature, May. 3 1916.*

आले होते, त्यावेळेस त्यांनीं येथील शिक्षणपद्धतीचें फार बारकाईनें अवलोकन करून आपलें मत नमूद केलें आहे. आपले पट्टशिष्य डॉ. ट्रॅव्हर्स यांस त्यांनीं त्यावेळीं लिहिलेल्या पत्रांतील पुढील उताऱ्यावरून हिंदुस्थानांतील शिक्षणपद्धतीबद्दल त्यांचें मत काय होतें, तें दिसून येईल.

"एकाद दुसरा अपवाद सोडल्यास साधारणपणें येथील कॉलेजांची स्थिति अत्यंत करुणास्पद आहे व लंडन युनिव्हर्सिटीप्रमाणें येथील शिक्षणपद्धति परीक्षांचे भाराखालीं दडपली असून सर्व देशभर घोकंपट्टीचीं यंत्रें ह्यांनाच कालेजें म्हणतातः–स्थापन झालीं आहेत."*

अद्याप पावेतों हीच स्थिति सर्वत्र आहे. फक्त बंगाल्यांत थोडीशी प्रगति झालेली दिसते व तिचें कारण बंगालला डॉ. रॅाय व डॉ. बोस सारखे सत्यान्वेषणाचें व्यसन लागलेले उत्कृष्ट शिक्षक लाभले हें होय. अलीगड येथील पदार्थविज्ञानशास्त्राचे मुख्याध्यापक डा. वलीमहमद ह्यांनीं कलकत्त्याच्या विश्वविद्यालय कमिशनपुढें साक्ष देतांना या शोचनीय स्थितीचें पुढीलप्रमाणें कारण दिलें आहे.

"हिंदी विद्यार्थ्यांमध्यें खऱ्या ज्ञानलालसेचा अभाव असण्याचीं मुख्य कारणें म्हटलीं तर त्यांच्या मनांत ही भावना उद्भूत करणाऱ्या शिक्षकांची दुर्मिळता, परीक्षांचा जुलूम, उत्तम पुस्तकालयें व प्रयोगशाला यांचें दुर्भिक्ष हीं होत. पण याहीपेक्षां महत्त्वाचें कारण म्हणजे बोजड, निर्जीव, काष्ठमय शिक्षणपद्धतीनें शिक्षक व विद्यार्थी दोघेही इतके जखडून गेले आहेत कीं, स्वतंत्र विचाराच्या शिक्षकाला विद्यार्थ्यांच्या मनाला नवीन वळण देण्यास वावच नाहीं."+

## ३ सध्यांची स्थिति मुंबई.

सध्यांचे काळीं मुंबई इलाख्यांत पदार्थविज्ञानशास्त्राचे अभ्यासाविषयीं जो विलक्षण निष्काळजीपणा दृष्टोत्पत्तीस येतो तो पूर्वीपासून वहिवाटीनें आलेला असो, अगर नवीन निर्माण झालेला असो, एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसून येते कीं, एक दोन अपवाद वगळून मुंबई विश्वविद्यालयाचे अधिकारांतील कोणत्याही कॉलेजांत पदार्थविज्ञानशास्त्रासंबंधीं स्वतंत्र शोध तर राहोतच, पण उच्च दर्जाचें शिक्षण मिळण्याची देखील आशा बाळगणें व्यर्थ आहे. पदार्थविज्ञानशास्त्र व गणित ह्या दोन विषयांचा इतका निकट संबंध आहे कीं, एकाशिवाय दुसऱ्याचा अभ्यास करणें म्हणजे चुन्याशिवाय नुसत्या विटांचें घर बांधण्यासारखें आहे. पण परवांपरवांपर्यंत ह्या मुंबई विश्वविद्यालयांत केवळ विटांचींच घरें बांधीत. त्रिकोणमितीपेक्षां वरच्या दर्जाचे गणिताचा उपयोग लागणारे प्रश्न विचारले जाणार नाहींत अशी हमी, पदार्थविज्ञानशास्त्र घेऊन एम्. ए. चे परीक्षेस बसणारे विद्यार्थ्यांस दिली जात असे; व आतां जरी ही हमी काढून घेतली आहे तरी अजून परीक्षांचे प्रश्नांत फारसा बदल झालेला नाहीं.

पदार्थविज्ञानशास्त्राची व उच्च दर्जाचे गणिताची जशी सांगड आहे तशीच पदार्थविज्ञानशास्त्राची व औपपत्तिक ( General ) रसायनशास्त्राची आहे. संशोधकास तीनही विषय परिचित असावे लागतात. अशा तऱ्हेचे सव्यसाची पुरुष दुर्मिळ खरेच; परंतु अशा दर्जाचे शिक्षक विश्वविद्यालयांत असल्याशिवाय संशोधनच काय पण प्राथमिक शास्त्रीयशिक्षणसुद्धां नीट होणें शक्य नाहीं. इंग्लंड, फान्स व जर्मनी येथील

* The Colleges are wretched places as a rule though here and there exceptions must be made, and the whole system is rigidly examinational like the London University. They are reaping the fruits of it in a number of cramming shops mis-called colleges......

*Ramsay, Letter to Dr. Travers 19th, Feb. 1901.*

+The chief causs of the absence of genuine intellectual curiosity among Indian students are to be found in the scarcity of really able and good teachers capable of inspiring their pupils, in the tyranny of examination by external agencies, in the lack of good libraries and laboratories, and above all in the absence of freedom of teaching and the the freedom of learning. The rigid, lifeless, and wooden system of Universities leaves no room to an original teacher to found a School of Thought or a School of Research..

*(Report of the Calcutta University Commission 1919, Vol. XI page 224.*

विश्वविद्यालयांत बहुतेक सर्व अध्यापक त्या त्या देशांतच नव्हे तर सर्व जगभर प्रसिद्ध आहेत. मुंबई सरकारच्या ताब्यांत असलेल्या विद्यापीठांपैकीं अहमदाबाद येथील " माधवलाल रणछोडलाल शास्त्रीय विद्यापीठ, " मुंबई येथील ' एल्फिन्स्टन कॉलेज ' व पुणें येथील ' एंजिनिअरिंग कॉलेज ' या तीन ठिकाणीं पदार्थविज्ञानशास्त्र शिकविण्यांत येतें. पण ह्यांपैकीं एकाही ठिकाणीं वरील दर्जाचे व स्वतंत्र विचाराचे अध्यापक नसल्यामुळें अद्यापपर्यंत ह्या विद्यापीठांतून संशोधन करणारा एकही विद्यार्थी तयार झाला नाहीं! मिशनरी व खासगी विद्यापीठांतील अध्यापकांना जरूर तो वेळ, पैसा व अधिकाराचे अभावीं इच्छा असूनदेखील संशोधनाचे कामांत फारसें यश आलेलें नाहीं. मुंबई येथील सेंट झेविअर कॉलेजांतील पदार्थविज्ञानशास्त्राचे अध्यापक डॉ. स्टाइशन् यांनीं गेलीं दहा वर्षे " किरणोत्पादक झरे (Radio-Active Springs) व मुंबईच्या हवेंतील विद्युत्प्रवाह" ह्या विषयासंबंधीं संशोधन करून कांहीं निबंध प्रसिद्ध केले आहेत. कांहीं झऱ्यांचें पाणी औषधी असतें, ही गोष्ट फार पूर्वीपासून माहिती आहे. पण हा गुण कोणच्या पाण्यांत व किती प्रमाणांत असतो हें ठरविण्यांत वरील निबंधांचा बराच उपयोग होईल, अशा समजुतीनें मद्रास सरकारानें डॉ. स्टाइशन् ह्यांस सांपत्तिक मदत दिली होती.

शाळांतील शिक्षण निरुपयोगी व कॉलेजांतील एकतर्फी, उत्तम शिक्षकांचा अभाव, व शेवटचे परिक्षेकरितां नेमलेले परीक्षकही दुय्यम दर्जाचे, ह्यामुळें शिक्षक व विद्यार्थी या दोघांचेंही आपल्या कर्तव्याकडे दुर्लक्ष होतें. बी. ए. च्या अगर बी. एस्सी. च्या परीक्षेनंतर पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास कोणी चालू ठेवीत नाहीं व कोणीं केलाच तर फक्त आणखी एक परीक्षा-एम्. ए. अगर एम्. एस्सी.-देण्याकरितां! ह्या परीक्षेंतही पुष्कळ वेळां गुळाचा गणपति व गुळाचाच नैवेद्य, असा प्रकार होतो व मास्तरची पदवी मिळालेले बरेच विद्यार्थी ह्या पदवीला योग्य असतातच असें नाहीं. मुंबई विश्वविद्यालयांतील शिक्षक व परीक्षक ह्यांची ही स्थिति कधीं सुधारेल तो सुदिन; व त्यानंतरही जर संशोधनाचे कामास सुरवात झाली नाहीं, तर मात्र तो विद्यार्थ्यांचा दोष म्हणतां येईल, तोंपर्यंत सर्व दोष शिक्षणपद्धतीचे व शिक्षकांचे!

सबंध इलाख्यांत एकही उत्तम प्रयोगशाला अथवा पुस्तकालय नाहीं. कांहीं थोडेसे शास्त्रीय ग्रंथ पुण्याचे शेतकी कॉलेजांत व मुंबईच्या झेविअर व मेडिकल कॉलेजांत आहेत. पण त्यांचा उपयोग इतर ठिकाणचे विद्यार्थ्यांस करितां येत नाहीं व त्यांचा उपयोग कसा करावा हें दाखविणारा शिक्षकवर्ग नाहीं. ते ग्रंथसंग्रह त्यामुळें असून नसून सारखेच. आज पांच सात वर्षे सुरू होणार म्हणून गाजत असलेलें मुंबईतील नवीन शास्त्रीय विद्यापीठ "Royal Institute of Science" अजूनपर्यंत तरी अस्तित्वांत आलेलें नाहीं, तेव्हां तें आपली कामगिरी कशी काय बजावितें तें आतांच सांगतां येत नाहीं. तेथें खरी ज्ञानलालसा असलेला विद्यार्थी व शिक्षकवर्ग जमावा व मुंबई इलाख्यांतील शास्त्रीयशिक्षणावरील डाग साफ निघून जावा, अशी जर चालकांची इच्छा असेल तर त्यांनीं सध्यांच्या शिक्षण व परीक्षा पद्धतींत बरीच क्रांति घडवून आणिली पाहिजे.

## ४ बंगाल.

बंगालची स्थिति मुंबईहून आरंभापासूनच थोडीशी निराळी होती. बंगालचे सुदैवानें कलकत्त्याचे प्रेसिडेन्सी कॉलेजास डॉ. प्रफुल्लचंद्र राय व डॉ. जगदीशचंद्र बोस यांसारखे अध्यापक लाभले व युनिव्हर्सिटीचे चालकांतही डॉ. अशुतोष मुकर्जीसारख्यांचा प्रवेश झाला. पण संशोधनाचें काम दहा पंधरा वर्षांपूर्वीपर्यंत फारसें जोरास लागलें नव्हतें. कलकत्ता युनिव्हर्सिटींत फार पूर्वीपासून पदार्थविज्ञानशास्त्राची व गणिताची सांगड घातलेली असे, तरी पण कित्येक वर्षेपर्यंत संशोधनाला योग्य अशी परिस्थिति प्राप्त झाली नाहीं. डॉ. बोस व मुकरजीसारखे विद्वान ह्या पूर्वीच्या परिस्थितींत निर्माण झाले हा केवळ चमत्कार होय.

संशोधनाची पूर्व तयारी करण्यास खरा आरंभ झाला तो प्रथम बंगाल्यांत व तोही एका खाजगी गृहस्थांचे प्रयत्नामुळें. ह्या गृहस्थांचें नांव डॉ. महेंद्रलाल सरकार. हे स्वतःचे उपजीविकेकरितां आपला वैद्यकीचा धंदा चालवून त्याशिवाय फावल्या वेळीं एका लहानशा

खासगी प्रयोगशाळेंत काम करीत असत. हिंदुलोकांना शास्त्रीय शिक्षणाची व संशोधनाची किती आवश्यकता आहे आणि त्याकरितां योग्य व हौशी विद्यार्थ्यांना स्वतंत्र व निवांतपणें काम करण्याची सोय व्हावी म्हणून देशांतील संपन्न लोकांनीं काय केलें पाहिजे याबद्दल सतत उपदेश करून जमविलेल्या थोडयाशा पैशानें १८७६ सालीं त्यांनीं एक " भारतीय शास्त्रीयज्ञान-प्रसारक मंडळ" Indian Association for the Cultivation of Science स्थापन केलें. ह्या मंडळाची आजपर्यंतची कामगिरी इतकी उच्च दर्जाची आहे कीं, जगांतील विद्वानांच्या संस्थांमध्यें ह्या मंडळाचा नंबर बराच वर लागेल.

प्रारंभीं ह्या संस्थेंत अत्यंत मन लावून काम करणारे सद्गृहस्थ म्हणजे प्रसिद्ध बंगाली विद्वान् व शिक्षणाचे भोक्ते सर अशुतोष मुकरजी. कोणताही मोबदला न घेतां ह्या संस्थेंतील विद्यार्थ्यांना गणित व पदार्थ-विज्ञान ह्या विषयांवर व्याख्यानें देण्यास त्यांनीं सुरुवात केली. त्याचा परिणाम असा झाला कीं, कलकत्ता [illegible] शास्त्रीय शिक्षणाचे पद्धतींत बराच बदल करावा लागला, व इ.स.१९०९ पासून ह्या दोन विषयांस फारच प्रोत्साहन मिळालें. व पाश्चात्य शास्त्रज्ञांस कलकत्त्यास कांहीं कालपर्यंत तरी अध्यापकाचें काम करण्यास निमंत्रणें जाऊं लागलीं. प्रसिद्ध गणिती व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ 'फोरसाइथ,' 'यंग,' 'शूस्टर,' 'वॅाकर' इत्यादि विद्वान् लोकांनीं व्याख्यानें देऊन त्यावेळच्या तरुण मंडळींत जें ज्ञानलालसेचें रोप लाविलें तें आज फार बळकट झालें असून त्याचीं भक्कम मुळें लवकरच सर्व हिंदुस्थानभर पसरतील, अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं.

अशा रीतीनें गणित व पदार्थविज्ञान या शास्त्रांचे शिक्षणाची आवड उत्पन्न झाली. पुष्कळ विद्यार्थी बी. एस्सी. व एम्. एस्सी. ह्या परीक्षांसाठीं हे विषय घेऊं लागले. पण हे विषय शिकण्याची सोय फक्त प्रेसिडेन्सी कॉलेजांतच असल्यामुळें विद्यार्थ्यांची फार अडचण होत असे व ग्रंथसंग्रहालय व प्रयोगशाळा ह्यांचे अभावीं योग्य तयारी असलेल्या विद्यार्थ्यांनाही संशोधन चालू ठेवितां येईना. पण ही उणीव लवकरच सर राशबिहारी घोष व सर तारकानाथ पलित ह्यांच्या देणग्यांनीं भरून निघाली. पूर्वीच्या कालेजांत फक्त विद्युत्, चुंबकता, व प्रकाश ह्या तीन शाखांचे अभ्यासाचीच सोय होती, पण ह्या देणगीमुळें उष्णता (Heat उष्णतागतिशास्त्र Thermo-dynamics), स्थितिस्थापकता ( Elasticity), ध्वनि (Sound) इत्यादि विषयांचे संशोधनाची सोय करितां आली. पलित इन्स्टिटयूटमध्यें फक्त वरच्या दर्जाचेंच शिक्षण देण्यांत येत असल्यामुळें जागेचा व पैशाचा क्षुल्लक कामाकडे अपव्यय होत नाहीं. संशोधनाचें काम करणाऱ्या विद्यार्थ्यांना पुरेशी शिष्यवृत्ति देण्यांत येते. आज अशी उत्तम स्थिति आली आहे कीं, तेथील सर्वोत्कृष्ट पुस्तकालयांत व प्रयोगशालांत विद्वान् अध्यापकांचे साह्यानें बंगाली विद्यार्थी करीत असलेल्या शोधांना युरोपीय मासिकांत प्रमुख जागा मिळूं लागली आहे.

डॅा. देवेंद्रनाथ मलिक व श्री. महालनवीस हे प्रेसिडेन्सी कॅालेजमध्यें आणि श्री. व्यंकटरामन् आणि डॅा. देवेंद्रनाथ बोस हे पलित कॅालेजमध्यें मुख्याध्यापकांचें काम करीत आहेत. यांनीं केलेल्या शोधांमुळें ह्यांचीं नांवें जगप्रसिद्ध झालीं आहेत. ह्यांचा साह्यकारी शिक्षकवर्गही तसाच उच्च दर्जाचा आहे. श्री. फणींद्रनाथ घोष, जे. सी मुकरजी, सुधनसुकुमार बानर्जी, एस. के आचार्य, शिशिरकुमार मित्र, ए. बी. दास, एस्. एन्. बस, मेघनाद शहा ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या गणित व पदार्थविज्ञान विषयक निबंधांमुळें युरोप व अमेरिका खंडांतही त्यांचीं नांवें माहीत झालीं आहेत.

याशिवाय तेथें बरेच विद्यार्थी लहान मोठे विषय घेऊन संशोधनाचें काम करीत असलेले दिसून येतात. गेल्या पांच वर्षांत या विद्यार्थिसंघानें कमींत कमी पन्नास निबंध जगांतील सुप्रसिद्ध मासिकांत प्रसिद्ध केले आहेत. प्रो. व्यंकटरामन् व त्यांचा शिष्यवर्ग यांनीं फारच अल्प काळांत पदार्थविज्ञानशास्त्रांतील बहुतेक सर्व शाखा व्यापून टाकल्या आहेत. त्यांतले त्यांत ध्वनिशास्त्र हा त्यांचा फार आवडता विषय आहे. संगीतांत वापरल्या जाणाऱ्या Violin व Cello ह्या वाद्यांचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करून आतांपर्यंत अगम्य व ध्वनिशास्त्रज्ञांस चकविणाऱ्या

Wolf-note चें कारण सोपपत्तिक दाखविण्याकरितां ह्या एकच विषयावर त्यांनीं कित्येक निबंध लिहिले आहेत. जर्मन पंडित हेल्महोल्ट्झ् व इंग्लिश पंडित रेले ह्यांच्यासारख्या असामान्य बुद्धीचे लोकांना ज्या प्रश्नाचें आजपर्यंत समाधानकारक उत्तर देतां आलें नाहीं त्या तार छेडल्यास स्वर कां उत्पन्न होतो या प्रश्नावर, एक स्वतंत्र ग्रंथ गतवर्षी प्रसिद्ध करून प्रो. व्यंकटरामन् यांनीं सर्व शास्त्रज्ञांत अशी आशा निर्माण केली आहे कीं, ह्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर लवकरच पलित इन्स्टिटयूटमधून बाहेर पडणार !

डॉ. द्रेवेंद्रनाथ मलीक ह्यांचें नांव विलायतेंत शास्त्रज्ञांना बरेच दिवस माहित आहे. त्यांचें संशोधनाचें मुख्य कार्यक्षेत्र गणित असून, गणिताचे साह्यानें पदार्थविज्ञानशास्त्राला केवढी मदत होते हें डॉ. मलीक ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या पंधरा वीस निबंधांवरून दिसून येईल.

ह्या दोघां विद्वानांनीं स्वतःचीं नांवें अजरामर केलीं आहेत, एवढेंच नव्हे, तर आपल्या पाठीमागें आपलें काम निर्वेध चालू ठेवण्याच्या योग्यतेचा शिष्यवर्ग तयार केला आहे. प्रो. रामन् ह्यांचे शिष्यवर्गांत श्री. अशुतोष दे, सुधनसुकुमार बानर्जी व आप्पास्वामी आयर हे प्रमुख होत. प्रकाशशास्त्रांतील कांहीं गहन प्रश्न—प्रकाशकिरणांचे मार्गांत अडथळा आल्यास दिसणारे चमत्कार-सोडविण्यासंबंधानें श्री. एम्. एन्. बसु, शिशिरकुमार मित्र व चिन्मयानंदम् यांचें काम अप्रतिम आहे. पदार्थविज्ञानशास्त्राचीं कूटें उकलण्यास गणिताचा केवढा उपयोग होतो हें समजून घेण्याची इच्छा असल्यास ह्या तीन गृहस्थांनीं लिहिलेले निबंध वाचावे. श्री. मेघनाद शहा हे डॉ. मलीक यांचे वळणावर गेले आहेत. त्यांचे कार्यक्षेत्रास मर्यादा नाहीं व त्यांचे कामगिरीस मोल नाहीं. श्री. चिन्मयानंदम् अशुतोष दे व फणीन्द्र घोष यांचे निबंध लंडन येथील रायल सोसायटीनें प्रसिद्ध करून ह्या संशोधकांचा सन्मान केला आहे. रॉयल सोसायटीचे मासिकांत फक्त उत्तमोत्तम निबंधच प्रसिद्ध होतात !

पदार्थविज्ञानशास्त्राचे संशोधक व पहिल्या प्रतीचे शिक्षक म्हणून नांवाजलेले सर जगदीशचंद्र बोस ह्यांच्या कामाची बहुतेकांस आतांशी माहिती आहेच. प्रारंभीं विद्युत्शास्त्रांत व नंतर दृश्य आणि अदृश्य प्रकाश या विषयांत उत्तम प्रकारची कामगिरी बजावून प्रो. बोस यांनीं निर्जीव व सजीव पदार्थ व वनस्पति यांचे परस्परसंबंधाचा अभ्यास करण्यास सुरुवात केली, व प्राणिशास्त्रांतील हें कोडें सतत पंधरा वर्षे मेहनत करून सोडविण्याचा उपक्रम केला. त्यांच्या ह्या कर्तबगारीबद्दल कांहीं दिवसांपूर्वी लंडनचे रॉयल सोसायटीनें त्यांस आपले सभासद करून घेतलें. रॉयल सोसायटीचे सभासदत्वाचा मान मिळविलेले हे दुसरे हिंदी गृहस्थ होत. पहिले सभासद प्रसिद्ध गणिती परलोकवासी रामानुजम् होत.

सध्यांची बंगाल्यांतील संशोधनाची स्थिति वर वर्णन केल्याप्रमाणें बरीच समाधानकारक आहे. परंतु ती सरकारी शिक्षणखात्याचे प्रयत्नानें झाली नसून केवळ खाजगी प्रयत्नानेंच झालेली आहे हें केव्हांही विसरतां कामा नये. आजच्या स्थितीचें सर्व श्रेय तनुमनधन खर्च करून अहोरात्र खपणाऱ्या-डॉ. महेंद्रलाल सरकार, सर गुरुदास बानर्जी, सर अशुतोष मुकरजी, सर प्रफुल्लचंद्रराय, सर तारकनाथ पलित, सर राशबिहारी घोष, या शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनाच दिलें पाहिजे.

प्रारंभीं विद्याखात्यांत नोकरी नसतांना विलक्षण नेटानें प्रयत्न करून ज्यानीं आपली शास्त्रीय विषयांवर असलेली भक्ति जगाचे निदर्शनास आणून दिली, आणि सर्व पदार्थविज्ञानशास्त्रांतील, विशेषतः ध्वनिशास्त्रांतील, अप्रतिम संशोधक म्हणून आज ज्यांची ख्याति झाली आहे, त्या प्रो. व्यंकटरामन्चे कामगिरीचें जितकें कौतुक करावें तितकें अपुरेंच पडणार आहे. यांनीं गणित व भौतिकशास्त्र या विषयांच्या शिक्षणांत सुधारणा घडवून आणल्या, भारतीय शास्त्रीयज्ञानप्रसारक मंडळास स्थिरता आणिली व 'पलित इन्स्टिटयूट'मध्यें मुख्याध्यापकाचें काम करून मेहनती व विद्वान् शिष्यसमुदाय तयार केला. असे प्रो. व्यंकटरामन् जर प्रत्येक कॉलेजास, निदान प्रत्येक विश्वविद्यालयास लाभले तर हिंदुस्थानची आजची दुरवस्था नाहींशी होण्यास फारसा अवधि लागणार नाहीं.

## ५ मद्रास.

मद्रासमधील शिक्षणपद्धति मुंबईपेक्षां थोडीशी निराळी आहे. येथील कॉलेजांत गणित, पदार्थविज्ञान व रसायन हे तीनही विषय परस्परांच्या साह्यानें शिकविले जातात. येथील विद्यापीठांतून गणित फारच उत्तम प्रकारें शिकविलें जातें, ही गोष्ट मद्रास येथें स्थापन झालेल्या "भारतीय गणिती मंडळ" ( Indian Mathematical Society ) या संस्थेच्या मासिकांत मुख्य लेख कोणीं लिहिलेले असतात इकडे नजर टाकिली म्हणजे सहज ध्यानांत येईल. कलकत्त्यास 'उपयुक्त गणिता' ( Applied mathematics ) कडे विशेष लक्ष पुरविलें जातें तर मद्रासेस 'शुद्ध गणिता'-( Pure mathematics ) चा जास्त अभ्यास केला जातो. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं, कलकत्त्याप्रमाणें मद्रासेस पदार्थविज्ञानशास्त्राचे संशोधनास उत्तेजन मिळालें नाहीं. पण मद्रासनें शुद्धगणिताचे संशोधनांत आघाडी मारिली आहे. अखिल जगाच्या स्तुतीस पात्र होऊन नुकतेच अकालिक स्वर्गवासी झालेले मद्रासी गृहस्थ प्रो. रामानुजम् ह्यांनीं गणितशास्त्रांत केलेल्या शोधांचें वर्णन करण्याचें हें स्थल नव्हे; तथापि इतकें सांगितलें म्हणजे पुरे, कीं कित्येक पाश्चात्य विद्वान् रामानुजम् ह्यांस प्रसिद्ध जर्मन गणिती ऑइलर व गाऊस यांचे जोडीला नेऊन बसविण्यास तयार आहेत.

अध्यापक उत्तम, शिष्यवर्ग उत्तम, व प्रयोगशाळाही उत्कृष्ट, अशी स्थिति असून सुद्धां मद्रासेस पदार्थविज्ञानशास्त्राचे संशोधनास सुरुवात झालेली दिसत नाहीं. क्वचित् प्रसंगीं एकादा निबंध प्रसिद्ध होतो. प्रो. परमेश्वर अय्यर यांनीं गेल्या वर्षीं बरेचसे बिकट प्रयोग करून प्रकाशशास्त्रांत वापरलें जाणारें Interferometer नांवाचे यंत्रांत सुधारणा सुचविल्या होत्या. पण संशोधनाची खरीखुरी हौस उत्पन्न झाल्याशिवाय कलकत्त्याची स्पृहणीय स्थिती मद्रासला प्राप्त होणार नाहीं.

विद्याख्यात्याचे बाहेर मात्र थोडें थोडें काम चाललेलें दिसून येतें. कोडेकनाल येथील वेधशाळेंत डॉ. एव्हरशेड यांनीं दोन तीन वर्षांपूर्वी जे महत्त्वाचे शोध लावले त्यांचा नवीन निघालेल्या सापेक्षतावादा- ( Theory of Relativity ) ची सत्यता ठरविण्यास बराच उपयोग झाला.

## ६ म्हैसूर.

म्हैसूर विश्वविद्यालयांत पदार्थविज्ञान शिकविण्याची चांगली सोय केलेली आहे. तेथील शिक्षक प्रो. व्यंकटेश आचार्य यांनीं विद्युत् व प्रकाश शास्त्रांतील कांहीं प्रश्न सोडविण्याचें हातीं घेतलें आहे. त्यांचे प्रयोग अद्याप चालू आहेत, आणि त्यांस बरेंच यश येईलसें वाटतें. पण संशोधन करणारा विद्यार्थिवर्ग येथें जमलेला नाहीं.

कलकत्ता युनिव्हर्सिटीचे शास्त्रीयविद्यालया- (College of Science) करितां सर राशबिहारी घोष व सर तारकानाथ पलित यांनीं जसे पंचवीस लाख रुपये दिले, तसेच वीस वर्षांपूर्वीं प. वा. सर जमशेटजी टाटा या उदार पुरुषानें तीस लाख रुपये हिंदुस्थान सरकारचे स्वाधीन केले. हिंदुस्थानांत रासायनिक व इतर धंदे शिक्षणाची सोय करण्याकडे ह्या पैशांचा विनियोग व्हावा अशी टाटांची इच्छा होती, व त्या इच्छेस मान देऊनच बंगलूर येथील भारतीय शास्त्रीय विद्यापीठाची ( Indian Institute of Science ) ची स्थापना झाली आहे. येथें मुख्यत्वेंकरून रसायन व विद्युत् यांचा अभ्यास करण्याची उत्तम व्यवस्था आहे. येथील ग्रंथसंग्रहालय, प्रयोगशाला व अध्यापक फारच उत्कृष्ट असल्यामुळें पदार्थविज्ञानशास्त्राचे संशोधकांसही येथें काम करणें शक्य आहे. प्रस्तुत निबंधलेखकानें पदार्थविज्ञान व रसायन ह्या दोन्हींचा समावेश होणाऱ्या म्हणजे रासायनिक पदार्थविज्ञान ( ChemicoPhysical ) शास्त्रांत प्रयोग करून गेल्या तीन चार वर्षांत सहा निबंध प्रसिद्ध केले आहेत. निऑन (Neon), ॲर्गॉन (Argon), हेलियम (Helium) इत्यादि दुर्मिळ वायूंतून विद्युत्प्रवाह जातांना जे चमत्कार दृष्टीस पडतात त्यांचें कारण व नियम शोधून काढणें हा दोन निबंधांचा विषय आहे. गारेच्या नळींतून हवा जात असतां थोडीशी नळीला चिकटून राहते ती कां, व किती, ह्या संबंधाचे प्रयोग चालू आहेत.

इतर सर्व शोध रासायनिक असल्याकारणानें त्यांचें वर्णन या ठिकाणीं देतां येत नाहीं. बंगलूर येथील संस्था नेहेमींच्या शिक्षणसंस्थांच्या नमुन्यावर बनविलेली नसल्यामुळें येथें विद्यार्थिसंघ फारसा जमणें शक्य नाहीं. येथें असलेल्या इलेक्ट्रिकल एंजिनिअरिंग खात्याच्या प्रयोगशाळेंत विद्युदुत्पादक यंत्राचे रचनेसंबंधीं बरेंच काम तेथील अध्यापक डॉ. हे आणि त्यांचा विद्यार्थिवर्ग ह्यांनीं केलें आहे. विद्युत्यंत्रांचें संशोधन करणारी हिंदुस्थानांतील ही पहिलीच संस्था आहे, परंतु अजून तिचा जसा उपयोग व्हावा तसा झालेला दिसत नाहीं.

## ७ निजामचें संस्थान.

दक्षिण हैदराबाद येथील वेधशाळेचे मुख्याधिकारी श्री. भास्कर अय्यर यांनीं कांहीं दुर्घट प्रयोग चालविले आहेत. गेल्या वर्षीं सूर्यग्रहणाचे वेळीं वेध घेऊन ज्याप्रमाणें इंग्लिश ज्योतिषी प्रो. एडिंग्टन यांनीं गुरुत्वाकर्षणाचा प्रकाशकिरणांवर होणारा परिणाम मोजून दाखविला, व जर्मन पंडित आइन्स्टाइन ह्यांचे सापेक्षतावादास ( Theory of Relativity ) बळकटी आणिली, त्याचप्रमाणें द्विवृत्त(Binary)ताऱ्यांपैकीं, दूरच्या ताऱ्याचा प्रकाश जवळच्या ताऱ्याच्या अंगावरून पृथ्वीकडे येत असतांना गुरुत्वाकर्षणानें येणाऱ्या प्रकाशाची दिशा किती बदलते हें वेध घेऊन तपासून पाहण्याची श्री. भास्कर अय्यर यांची खटपट चालू आहे. हैदराबाद येथील वेधशाळेंत त्यांनीं आजपर्यंत केलेल्या कामगिरीची पाश्चात्य देशांतही चहा झालेली आहे, तेव्हां त्यांस ह्या बिकट कामगिरींतही यश येईलसें वाटतें.

## ८ मध्यप्रांत.

मध्यप्रांतांत अद्यापि विश्वविद्यालय नाहीं. परंतु कांहीं वर्षांपूर्वीं नागपूर येथें एक शास्त्रीय विद्यापीठ स्थापण्यांत आलें आहे. सध्यां ह्या विद्यापीठाचें कार्यक्षेत्र निवळ परीक्षेकरितां विद्यार्थी तयार करण्यापुरतेंच असल्याकारणानें त्यांत स्वतंत्र काम करण्यास सुरुवात झालेली नाहीं.

## ९ संयुक्तप्रांत व पंजाब.

कलकत्त्याच्या इतक्या नजीक असून सुद्धां अलाहाबादची स्थिति कलकत्त्याप्रमाणें स्पृहणीय नाहीं, ह्याचें आश्चर्य वाटतें. तेथील शिक्षणक्रम कलकत्त्याचे नमुन्यावरच बनविलेला आहे. म्यूर सेंट्रल कॉलेजच्या अत्त्युत्तम प्रयोगशाळेचें चालकत्व आतां पाश्चात्य देशांत कीर्ति संपादन केलेले डॉ. नीलरत्न धार यांचेकडे आलें आहे. तेव्हां सध्यांची स्थिति बदलून अलाहाबादचे विद्यार्थी लवकरच कलकत्त्याची बरोबरी करतील असें वाटतें. डॉ. धार यांनीं गणित, रसायन, व पदार्थविज्ञान ह्या तीनही शास्त्रांत मिळविलेल्या प्राविण्याबद्दल युरोपीय पंडितांची खात्री पटली आहे.

कदाचित् संशोधनाचे कामांत बनारसचें हिंदु विश्वविद्यालय पुढें सरकेल. डॉ. गणेशप्रसाद ह्यांच्यासारखा विद्वान् गणिती, उत्कृष्ट शिक्षक व प्रसिद्ध संशोधक लाभणें, फारच थोड्या विश्वविद्यालयांचे नशिबीं असतें.

अलीगड येथील डॉ. वलीमहमद ह्यांनीं गॉटिंजन येथें चुंबकीयप्रकाशा ( Magnato-Optico ) संबंधीं केलेले प्रयोग प्रसिध्दच आहेत. परंतु संशोधन करणारा विद्यार्थिवर्ग त्यांनीं अजून तयार केला नाहीं ह्याचें आश्चर्य वाटतें. ह्याचें कारण कदाचित् अलीगडची विशेष प्रकारची परिस्थितीही असेल.

लाहोर येथें पदार्थविज्ञानशास्त्रांत संशोधन करणारे अध्यापक मि. हेमी ह्यांनीं बरेंच काम केलें आहे. प्रो. रुचिराम शहाणी ह्यांचा रेडियम सारख्या किरणोत्पादक पदार्थांसंबंधीं दांडगा व्यासंग आहे. सर्वांत वरचे दर्जाचें काम लखनौ येथील प्रो. सत्येंद्र राय ह्यांचें होय. पृथ्वीस लोहचुंबकत्व कसें आलें असावें, ह्याची प्रो. राय ह्यांनीं बसविलेली उपपत्ति फारच कुशलतेची व विचारणीय आहे. येथें लवकरच चांगले विद्यार्थी जमूं लागतीलसें वाटतें.

शिक्षणखात्याशीं कांहीं एक संबंध नसतां केवळ शास्त्रीय संशोधनाचे आवडीनें डॉ. गिल्बर्ट वॉकर व डॉ. सिंप्सन त्या गृहस्थांनीं केलेलें काम अप्रतिम आहे. ह्यांचें मुख्य काम म्हणजे सिमल्याचे वातावरणांत होणारे फरकांची नोंद करावयाची. पण स्वतः अत्युत्तम गणिती व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ असल्यानें कलकत्त्यास पुढें येत असलेल्या तरुण शिक्षक व विद्यार्थिवर्गाबद्दल त्यांस अभिमान व सहानुभूति वाटूं लागली, व हिंदुस्थानांत हिंदी शिक्षकांचे नेतृत्वाखालीं तयार झालेल्या ह्या विद्यार्थ्यांची व त्यांनीं केलेल्या प्रयोगांची लंडन येथील 'रॉयल सोसायटी'पुढें तारीफ करून त्यांचा त्यांनीं फार गौरव केला, हें डॉ. वॉकर यांस अत्यंत

भूषणास्पद आहे. कलकत्ता विश्वविद्यालयाशीं डॉ. वॉकर यांचा जसा निकट संबंध जडला आहे, तसा इतर विश्वविद्यालयांशीं जडेल तर फार उत्तम होईल.

### १०. भारतीय शास्त्रीय परिषद्.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या ठिकाणीं पदार्थ-विज्ञानशास्त्रांतील संशोधनाची काय स्थिति आहे ह्याचें आतांपर्यंत त्रोटक विवेचन केलें आहे. त्यावरून एका बंगालखेरीज बाकी सर्व ठिकाणीं कसा अंधार आहे, व आपल्या मुंबई इलाख्यांत तो किती घनदाट आहे, याची थोडी तरी कल्पना होईल. विश्वविद्यालयांची ही स्थिति असल्यावर दुसऱ्या खाजगी संस्थांची स्थिति त्याहूनही वाईट असणारच. पण दुर्दैवानें-किंवा सुदैवानें-अशा संस्था हिंदुस्थानांत नाहींतच.

कलकत्त्याच्या "एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल" ह्या संस्थेच्या आश्रयाखालीं अलीकडे दरसाल एक **भारतीय शास्त्रीय परिषद्** भरत असते. या संस्थेला स्वतःचे शिक्षक नाहींत किंवा स्वतःची प्रयोगशाळा नाहीं. तिचें काम फक्त दरवर्षी एकदां हिंदुस्थानांतील शास्त्रज्ञांना एके ठिकाणीं जमवून त्यांच्याकडून शास्त्रीय विषयांवर वादविवाद करवावयाचा. रसायन, वनस्पति, वैद्यक, पदार्थविज्ञान व गणित इतक्या शास्त्रांचा सध्यां खल तेथें होत असतो. ही संस्था आज सात वर्षे चालू आहे; व तिचे रिपोर्ट वाचल्यास दिवसेंदिवस संशोधनाची प्रगति कशी चालू आहे तें दिसून येतें. गेल्या वर्षी नागपूर येथें ही परिषद् भरली होती व त्यासंबंधी 'इंडियन एज्युकेशन' मासिकांत पुढील उद्गार आढळतात:--

" ....भारतीय शास्त्रीय परिषदेंत वाचले जाणारे निबंधांत हिंदी लोकांनीं स्वतंत्रपणें लिहिलेले बरेच निबंध असतात. यंदाच्या नागपूर येथील बैठकींत जर हिंदी लोकांचे निबंध नसते तर पदार्थविज्ञान-शाखा नामशेष झाली असती......."*

शिक्षणपद्धतींत काय सुधारणा करावी, सध्यांच्या पद्धतींत काय उणीवा आहेत, अध्यापक कसे असावे, शिष्यवृत्त्या किती ठेवाव्या, वगैरे विषय ह्या लेखाच्या मर्यादेबाहेरचे असल्यामुळें त्यांचा येथें विचार करणें शक्य नाहीं; परंतु शिक्षणासाठीं दिलेल्या पैशाचा व्यय कसा करावा ह्यासंबंधीं पुढील उतारा मनन करण्यासारखा आहे, तेवढा येथें देतों.

१८७६ सालीं बाल्टिमोर येथील विद्यालय सुरू करण्याचे प्रसंगीं प्रो. हक्सले म्हणाले:—

"माझ्या मतें सर्वांत उत्तम व दूरदर्शी धोरण म्हणजे, सध्यां कोणत्याही तऱ्हेचें बांधकाम सुरू करूं नये, हें होय. शिक्षणासाठीं जमविलेल्या फंडांपैकीं पुष्कळांचें दगडामातींत रूपांतर होऊन, ज्या कामासाठीं ते जमविले त्या कामाकरितां कांहींही शिल्लक राहत नाहीं असें पाहण्याचें माझ्या नशिबीं आलें आहे. एका महान् योद्ध्यानें सुपीक प्रदेशाचें अरण्य बनविलें व आतां शांतता प्रस्थापित झाली अशी तो ऐट मारूं लागला. शिक्षणफंडाचे व्यवस्थापक पुष्कळ वेळां राजवाडे बांधून त्यांना 'युनिव्हर्सिटी' असें नांव देतात. माझें आपणांस असें सांगणें आहे कीं, जेव्हां आपण इमारती बांधण्यास सुरुवात कराल तेव्हां एखादा इमानी गंवडी बोलावून जरूर तेवढ्याच खोल्या बांधून घ्या, व वाढीसाठीं पुरेशी खुली जागा ठेवा. आणखी शंभर वर्षांनीं ज्या वेळेला बाल्टिमोर-ओहिओ-शेअर्स एक हजार प्रीमिअमनें खपूं लागतील, ज्या वेळेस तुमचे येथें पुरेसे प्रोफेसर्स होतील, ज्या वेळेस त्यांना त्यांचे योग्यतेप्रमाणें मोठा पगार देऊं शकाल, ज्या वेळेस तुमचीं पुस्तकालयें व तुमच्या प्रयोगशाला अप्रतिम बनतील, व राहिलेल्या पैशाचें आतां काय करावें अशी तुम्हांस काळजी पडेल, त्या वेळेस एखाद्या शिल्पशास्त्र्यास बोलावून तुमचे इमारतीस शोभिवंत करण्यास सांगा. "‡

* ".....The papers contributed to the Science Congress have included many that were the work solely of Indians ; at Nagpur the Physics Section would have been nothing without their papers."

*Indian Education, vol. 18, p. 290, 1920.*

‡Most wise and sagacious seems to me the determination not to build for the present. It has been my fate to see great educational funds fossilize into mere bricks and mortar, in the petrifying springs of Architecture, with nothing left to work the institution they were intended to support. A great warrior is said to have made a desert and called it peace. Administrators of Educational funds

अमदाबाद येथील 'सायन्स इन्स्टिटयूट,' व मुंबईचें गर्जणारें, परंतु, प्रचंड इमारतीशिवाय अस्तित्वांत नसलेलें, "रॉयळ सायन्स इन्स्टिटयूट," स्थापणाऱ्या अधिकारिवर्गाचा व प्रो. हक्सले यांचा जबरदस्त मतभेद असावा असें दिसतें. शिक्षक व विद्यार्थी यांची योग्य सोय लावल्यावर उरलेला पैसा इमारतींत खर्च करणें योग्य होईल. पण जेथें लाखों रुपये प्रथमतःच चुन्यामातींत संपवून टाकितात तेथें हिंदुस्थानांतील धनिकांना

**तन्नष्टं यन्न दीयते ।**

**या सूत्राची आठवण देऊनही काय फायदा ?**

**पुरवणी—**( ता. ४ जानेवारी १९२१ )

वरील निबंध लिहिला त्या वेळेस हिंदुस्थानांतील अगदीं झाडून सर्व ठिकाणीं चाललेली पदार्थविज्ञानसंशोधनाची माहिती विशेष सविस्तरपणें देतां येणें शक्य नव्हतें. प्रमुख अशा ज्या गोष्टी ध्यानांत आल्या त्या सांगितल्या इतकेंच. अर्थात् अमुक एक ठिकाण मुद्दाम वगळिलें असा समज करून घेण्याचें कारण नाहीं. तेव्हांपासून—म्हणजे मे १९२० पासून—आजपर्यंत एकंदर शिक्षणपद्धतींत कांहीं विशेष फरक घडून आला आहे किंवा अद्भुत शोध लागले आहेत अशांतला भाग नाहीं; परंतु आपल्या मुंबई इलाख्यांत एक दोन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या त्या याच वेळेस—मूळ निबंधाबरोबर—नमूद करणें अवश्य वाटल्यावरून ही पुरवणी जोडीत आहें.

कलकत्त्यास संशोधनाचें उत्कृष्ट काम करून कीर्ति संपादन केलेले श्री. चिन्मयानन्दम् यांस कुलाब्याच्या वेधशाळेंत मुख्य अधिकारी नेमिलें आहे. केवळ विद्वत्तेच्या व स्वतंत्रविचारशक्तीच्या जोरावर कमाविलेल्या या सन्मानीय जागेवर आरूढ झाल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें उचित आहे. यांच्या आगमनानें मुंबईंतील शास्त्रीय संशोधनास बरेंच साहाय्य होईल.

आज सहा वर्षे गाजत असलेलें " रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्स " एकंदरीनें गेल्या जूनपासून सुरू झालें. अर्थात् या बातमीनें कोणीं एकदम हुरळून जाण्याचें कारण नाहीं; कारण अद्यापपर्यंत तेथें एक भव्य इमारत व कांहीं शिक्षक याखेरीज कांहींएक नाहीं; परंतु आतां तरी प्रारंभ करण्याची सुबुद्धि झाली हें सर्वतोपरी उत्तम झालें. येथील प्रयोगशाळा, ग्रन्थसंग्रहालयें वगैरे अत्यंत जरूरीच्या गोष्टी जमून येऊन जेव्हां येथील शिक्षकवर्ग व त्यांचें शिष्यमंडळ स्वतंत्र रीतीनें शोध करूं लागतील, त्याच वेळेस मुंबईंतील पदार्थविज्ञानसंशोधनास खराखुरा प्रारंभ झाला, व या नूतन विद्यापीठाकरितां ज्या धनिकांनीं द्रव्यसाहाय्य केलें त्यांच्या औदार्याचें चीज होऊन त्या संस्थेचे वास्तविक कामगिरीस खरी सुरवात झाली, असें म्हणतां येईल.

अद्यापि अगदींच बाल्याऽवस्थेंत असलेल्या या शास्त्रीय विद्यापीठाबद्दल कांहींच सांगतां येत नाहीं. परंतु इतक्या वर्षांनंतर आतां तरी आपल्याकडील शास्त्रीय अज्ञानाचा अंधकार नाहींसा करणारीं संशोधनरूपी किरणें प्रकाशूं लागतील असा संभव असल्याबद्दल आशा प्रदर्शित करणें केवळ व्यर्थ होणार नाहीं.

have sometimes made a palace and called it a University. If I may venture to give you advice in a matter which lies out of my proper competency, I would say that whenever you do build, get an honest bricklayer and make him build you just such rooms as you really want, leaving ample space for expansion. And a century hence, when the Baltimore and Ohio shares are at 1000 premium, and you have endowed all the professors you need, and built all the laboratories that are wanted, and have the best museum and the finest library that can be imagined—then if you have a few thousand dollars you don't know what to do with, send for an architect and tell him to put up a facade."

# जीवनशास्त्र ( BIOLOGY ).

या भूतलावरील सजीव सृष्टीमध्यें प्राणी व वनस्पति ह्या दोहोंचा समावेश होतो. तेव्हां प्राणी व वनस्पति या दोहों संबंधाचें जें शास्त्र तें जीवनशास्त्र होय. प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र ह्या या जीवनशास्त्राच्या दोन शाखा होत. प्राण्यांच्या संबंधाचें जें शास्त्र तें प्राणिशास्त्र (Zoology) होय, व वनस्पतींसंबंधाचें शास्त्र तें वनस्पतिशास्त्र (Botany) होय. थोडासा विचार केला असतां असें आढळून येईल कीं, या अनंत कालामध्यें कांहीं प्राणी व वनस्पति या भूतलावर नामशेष होऊन अश्मीभूत ( fossilized ) झालेल्या आहेत व इतर प्राणी व वनस्पति हयात असून या भूतलावर आढळून येत आहेत. तेव्हां जीवनशास्त्राचीं प्रथमतः दोन अंगें होऊं शकतात. एका अंगांत निःकूल ( extinct. ) होऊन अश्मीभूत झालेल्या प्राण्यांचा व वनस्पतींचा समावेश होतो; व त्यांत असेच प्राणी व वनस्पति यांसंबंधीं वर्णन केलेलें असतें. या जीवनशास्त्राच्या अंगाला "उत्खातजीवनशास्त्र" ( paleontology. ) असें म्हणतात, व अर्थातच याच्या दोन शाखा पडतात; एक उत्खातप्राणिशास्त्र, आणि दुसरी उत्खातवनस्पतिशास्त्र. जीवनशास्त्राचें दुसरें अंग म्हटलें म्हणजे, ज्याच्यामध्यें आजमितीस आढळून येणारे हयात प्राणी व वनस्पति यांच्यासंबंधी वर्णन केलेलें असतें, तें होय. आतां नेहमींचा असा प्रघात पडून गेला आहे कीं, जीवनशास्त्र ही संज्ञा या दुसऱ्या अंगालाच संबोधून लावतात. तेव्हां जीवनशास्त्र म्हणजे हयात असलेले प्राणी व वनस्पति ह्या दोहोंबद्दलचें शास्त्र होय, व त्याच्या वर सांगितल्याप्रमाणें दोन शाखा आहेत.

प्राणी किंवा वनस्पति यांविषयीं बोलतांना, प्रथमतः आपल्या मनांत सजीवपणाबद्दल आपण बोलत आहों असा विचार येतो. तेव्हां जिवंत व निर्जीव वस्तु या दोहोंमध्यें काय भेद आहे हें जाणण्याविषयीं जिज्ञासा उत्पन्न होते. व तसें होणें साहजिक आहे. या दोहोंमध्यें कांहीं ठळक ठळक भेद आहेत ते येणेंप्रमाणें:-

१ पहिला भेद-'शरीराची वाढ होण्याची रीति' प्राण्यांची व वनस्पतींची वाढ होण्याची रीति अशी आहे कीं, तींत कांहीं बाहेरचे पदार्थ त्यांच्या शारीरिक द्रव्यांव्यतिरिक्त असे अन्नादाखल तीं शरीरांत घेतात व त्या पदार्थांना आपल्या शारीरिक द्रव्यांचें रूप देऊं शकतात. या क्रियेला पचनक्रिया म्हणतात व हिच्यामुळें नवे जुने शारीरिक कण सर्व एकत्र मिसळून जाऊन शरीराची वाढ होते. येथें मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती हीच कीं, या क्रियेंत नवे व जुने कण ओळखतां येत नाहींत अशा रीतीनें ते एकमेकांशीं मिसळून जातात. नवे कण म्हणजे कांहीं नुसते बाहेरून वरवर थराच्या रूपानें लागून शरीराची वाढ घडवून आणीत नाहींत. एखादा क्षाराचा स्फटिक त्याच क्षाराच्या पाण्यामध्यें कांहीं वेळ लोंबकळत ठेविला असतां त्याला बाहेरून क्षाराच्या कणांच्या थरांचीं पुटें लागून तो वाढतो. या स्फटिकाच्या वाढींत व जीवंत सृष्टीच्या वाढींत मुख्य फरक आहे तो हा कीं, हे नवीन लागलेले कण जसेच्या तसेच, त्यांच्यांत कांहींही रासायनिक फेरफार झाल्याशिवाय, लागतात व ते सर्व बाहेरच्या पृष्ठाला लागलेले असल्यामुळें नवे व जुने कण ओळखतां येतात. तसेंच दुसऱ्या तऱ्हेच्या रासायनिक क्षाराच्या पाण्यांत ह्या स्फटिकाची वाढ होऊं शकत नाहीं. म्हणजे बाहेरील द्रव्यांना आपल्या शारीरिक द्रव्यांचें रूप देण्याची शक्ति ह्या स्फटिकाला नाहीं. तेव्हां पचनक्रिया निर्जीव वस्तूंमध्यें होत नाहीं, व पचनक्रियेच्या अभावीं खरी वाढ होत नाहीं. या कारणास्तव नुसती वाढ होणें ही गोष्ट मुख्य नसून वाढ होण्याची रीति हीच मुख्य गोष्ट होय.

दुसरा भेद-'जीवफेऱ्यांतील घडामोडी'. निर्जीव वस्तूंमध्यें घटनेसंबंधी फेरफार होण्याची प्रवृत्ति नसून ते जसेच्या तसेच राहतात. जीवंत वस्तूंमध्यें नेहमीं घटक द्रव्यांच्यासंबंधी घडामोडी होऊन फेरबदल होत असतात व त्यांची प्रवृत्तीच अशी असते कीं कोणतीही क्रिया जिवंतपणें घडत असल्यास त्या क्रियेचें घडून

येणें हें चैतन्यद्रव्याचा ( Protoplasm ) उच्छेद थोडयाबहुत प्रमाणावर होण्यावरच अवलंबून असतें. चैतन्यद्रव्याचा मंद परंतु नित्य उच्छेद होऊन त्याचें निर्जीव पदार्थांत रूपांतर होणें ह्यावरच जीवफेऱ्यामधल्या घडामोडी अवलंबून असतात, व सजीवतेची दर्शक हीच गोष्ट आहे; आणि ह्याचमुळें चैतन्यद्रव्याचा जो ऱ्हास होतो त्याची भरपाई करण्यासाठीं नित्य अन्न शरीरांत घेऊन तें पचन करून अचेतन रूपांतून चैतन्यरूपांत आणलें जातें. ही शरीराची भरतीओहोटी चालू असणें ह्यालाच जीवनक्रिया ( Metabolism ) म्हणतात; व या जीवनक्रियेमध्यें अन्नापासून चैतन्यद्रव्य उत्पन्न होण्याच्या क्रियेला निर्माणजीवनक्रिया ( anabolism ) म्हणतात; व चैतन्यद्रव्याचा उच्छेद होऊन निर्जीव द्रव्यें शरीरांत उत्पन्न होणें तिला व्यवच्छेदजीवनक्रिया ( katabolism ) म्हणतात. ह्या सर्व घडामोडी चैतन्याची साक्ष देतात म्हणून ह्यांना जीवफेऱ्यामधल्या घडामोडी म्हणतात. प्राण जाईपर्यंत या अशाच शरीरांत चालतात.

**तिसरा भेद.**–' बाह्य सृष्टीशीं मिलाफी ' भौतिक व रासायनिक शक्ति आपला पगडा निर्जीव वस्तूंवर चालविण्यास नेहमीं तत्पर असतात व त्यांची क्रिया सतत चालू असते. निर्जीव वस्तूंमध्यें या शक्तींना क्षणभरसुद्धां थांबविण्याची, किंवा त्यांच्या कार्यांत फरक घडवून आणण्याची, अथवा त्यांचा प्रतिकार करण्याची शक्ति नसते. यामुळें त्यांच्यावर झालेले परिणाम तात्काल दिसून येतात. ह्याच्या उलट सजीव शरीर आपल्यांतील चैतन्यशक्तीमुळें ह्या शक्तींचा पगडा आपल्यावर चालूं देत नाहीं, किंवा त्यांच्या कार्याचे वाईट परिणाम अटकावूं शकतें. उदाहरणार्थ जीवंत शरीर व शव.

**चौथा भेद.**–'प्रजाजनकत्व' प्रत्येक जीवंत प्रकृतिरूपाला (organism) आपल्यासारखीं रूपें उत्पन्न करण्याची शक्ति असते. प्रत्येक प्रकृतिरूपाला शरीराचे कांहीं भाग ताबडतोब किंवा वेळानें काढून टाकण्याची शक्ति असते. हे शारीरिक भाग किंवा पेशीसम बीजांकुर योग्य व अनुरूप परिस्थितीमध्यें असतां आपल्या उत्पादकांप्रमाणें त्यांच्यासारख्या रूपांत विकास पावतात व त्यांच्यामध्यें सुद्धां पुढें ही प्रजाजनकत्वाची क्रिया घडून येते.

**पांचवा भेद**–' बाह्यसृष्टीज्ञान.' प्रत्येक प्रकृतिरूप हें चैतन्यद्रव्याचें झालेलें असल्याकारणानें त्याला इंद्रियबोध असणें हे स्वाभाविक आहे. कारण हा एक गुण चैतन्यद्रव्याचा आहे. त्या गुणामुळें बाह्यसृष्टीचें ज्ञान होतें.

आतां जीवंत प्रकृतिरूपाचें जीवित्व जीवात्म्यावर अवलंबून असतें, असें नेहमींचें म्हणणें आहे. परंतु जीवात्मा काय वस्तु आहे हें निश्चित असें सांगतां येत नाहीं. त्याच्या संबंधींचें कोडें अजून उकललें गेलें नसल्याकारणानें त्याच्याबद्दल वाटाघाट न करितां, कोणती विशिष्ट अनुकूल अशी स्थिति प्राप्त झाली असतां प्रकृतिरूपांच्या ठायीं चैतन्य अथवा जीवनशक्ति व्यक्त होऊं शकते, ह्याबद्दल थोडा विचार करणें आवश्यक आहे. सजीव सृष्टीचें अवलोकन व शोधन केलें असतां असें आढळून येतें कीं, चैतन्यशक्ति ही कांहीं विवक्षित गोष्टी साध्य झाल्या असतां व्यक्त होते, अथवा चैतन्यशक्ति व्यक्त होण्यास त्या सर्व गोष्टींची जरूरी आहे, व त्या सर्वांचा मिलाफ झालाच पाहिजे. या गोष्टींपैकीं प्रथम एक अंतर्गत मुख्य गोष्ट ही आहे कीं, एक विशिष्ट द्रव्य, ज्याला चैतन्याचें भौतिक मूल किंवा आधार असें म्हणतां येईल व जें सजीवत्वास साक्षात् कारणीभूत होतें तें, प्रत्येक प्रकृतिरूपांत प्रत्यक्ष हजीर असलें पाहिजे. याला चैतन्यद्रव्य किंवा आद्यद्रव्य अशी संज्ञा देतात. जीवंत शरीराच्या कोणत्याही भागामध्यें एखादी शारीरिक क्रिया प्रत्यक्ष घडत असल्यास असें आढळून येतें कीं, तेथें हें चैतन्यद्रव्य प्रत्यक्ष हजीर असतें. शरीराच्या ज्या भागांत हें चैतन्यद्रव्य प्रत्यक्ष हजीर असत नाहीं तेथें चैतन्यक्रिया घडून येत नाहीं. एकंदर अवलोकनावरून असें सिद्ध होतें कीं, सर्व शरीर सबंध चैतन्यद्रव्याचेंच झालें असलें पाहिजे असें नाहीं. चैतन्यद्रव्याबरोबर दुसरीं द्रव्यें मिळून शरीराची रचना झालेली असते. तथापि प्रत्येक जीवंत शरीरामध्यें प्राण्याच्या किंवा वनस्पतीच्या दर्जाप्रमाणें हीं निर्जीव द्रव्यें थोडया अधिक प्रमाणानें युक्त झालेलीं असतात. अतिसूक्ष्म क्षुद्रजंतूंचीं शरीरें सर्वस्वीं ह्या चैतन्यद्रव्याचीं त्यांत

कांहीं फरक न होतां झालेलीं असतात. उच्च दर्जाच्या संकीर्ण (comp'ex) प्रकृतिरूपांमध्यें जीं निर्जीव द्रव्यें युक्त झालेलीं असतात तीं सर्व या चैतन्यद्रव्यापासूनच उत्पन्न झालेलीं असतात. जरी संकीर्ण प्रकृतिरूपांच्या शरीरांत निर्जीव द्रव्यें असलीं, तरी त्यांच्या शरीरांत ज्या भागांत चैतन्य किंवा सजीवता अंतस्थ आढळून येते ते भाग चैतन्यद्रव्याचेच बनलेले असतात. आतां चैतन्यद्रव्य प्रत्यक्ष हजीर असणें ही अंतर्गत गोष्ट जरी साध्य झाली तरी जीवित्व किंवा जीवाचे व्यापार व्यक्त होण्यास दुसऱ्या उपांगी गोष्टींची सिद्धता व्हावी लागते; व त्या गोष्टी साध्य झाल्या तरच जीवाचे व्यापार चालू शकतात व दृष्टिगोचर होतात. परंतु जर ह्या उपांगी गोष्टी साध्य झाल्या नाहींत तर जीवित्व निद्रितावस्थेंत किंवा सुषुप्तावस्थेंत ( dormant ) फार किंवा थोडा वेळपर्यंत राहतें. उदाहरणार्थ, पक्ष्यांचीं अंडीं किंवा झाडांचें बियाणें. कित्येक वेळां ही अवस्था वाढलेल्या प्राण्यांत किंवा वनस्पतींत सुद्धां आढळून येते. या उपांगी गोष्टींपैकीं पहिली गोष्ट म्हटली म्हणजे पाणी होय, व तें चैतन्यद्रव्याशीं संलग्न होऊन राहिलेलें असतें. चैतन्यद्रव्यांत त्याच्याशीं संलग्न होऊन राहिलेलें पाणी थोडया किंवा जास्त प्रमाणावर नेहमीं असतें हें पाणी चैतन्यद्रव्यांतून अगदीं समूळ काढून टाकिलें असतां त्याचें चैतन्य अथवा जीवंतपणा नष्ट होतो. परंतु तें पाणी थोडयाबहुत प्रमाणानें निघून गेलेलें असलें किंवा काढून टाकिलें तर चैतन्यद्रव्याचा जीवंतपणा नष्ट न होतां त्याचे जीवंतपणाचे व्यापार मात्र व्यक्त होत नाहींत. जसें बियाणें.

दुसरी उपांगी गोष्ट म्हटली म्हणजे चैतन्यद्रव्यांमध्यें थोडीबहुत उष्णता असणें. उदाहरणार्थ पक्ष्यांचीं अंडीं. यांना उबविण्यास उष्णतेची जरूरी आहे. या उष्णतेचें मान मात्र निरनिराळ्या प्राण्यांत निरनिराळ्या प्रमाणांत असतें,व थोडयाबहुत प्रमाणावर ती शरीरांत चैतन्याचे व्यापार बंद न पडतां कमी जास्त होऊं शकते. जसें मनुष्य, पक्षी, बेडूक वगैरे. उच्च दर्जाचे प्राण्यांत त्यांच्या शरीरांतील उष्णता-जीवित्व कायम राहून फारच थोडया प्रमाणानें कमीजास्त होऊं शकतें. जसें मनुष्य. परंतु अगदीं खालच्या दर्जाच्या प्राण्यांत हें मान जास्त असूं शकतें. या शारीरिक उष्णतेच्या प्रमाणानें प्राण्यांना शीतरुधिर ( cold-blooded ) प्राणी अथवा उष्णरुधिर ( warm-blooded ) प्राणी ही संज्ञा देतात. ज्यांच्या शरीराची उष्णता ते ज्या वातावरणांत राहतात त्याच्या उष्णतेपेक्षां जास्त असते त्यांना उष्णरुधिर प्राणी असें म्हणतात. जसें पक्षी व सस्तन प्राणी. तसेंच ज्यांच्या शरीराची उष्णता ते ज्या वातावरणांत राहतात त्याच्या उष्णतेपेक्षां कमी असते त्यांना शीतरुधिर प्राणी असें म्हणतात. जसें मासे, बेडूक, सर्प. वनस्पतींना सुद्धां जीवित्व धारण करण्यास उष्णतेची जरूरी असते.

तिसरी उपांगी गोष्ट म्हटली म्हणजे प्राणवायु ( Oxygen ) हजीर असून चैतन्यद्रव्यास उपलब्ध असणें. चैतन्याचे किंवा जिवंतपणाचे व्यापार व्यक्त होण्यास चैतन्यद्रव्याशीं प्राणवायु संलग्न झालाच पाहिजे. जिवंतपणामध्यें हा एक चैतन्यद्रव्याचा चालू व्यापारच आहे,व तो होत असतांना चैतन्यद्रव्य हवेंतील प्राणवायु शोषून घेतें व कार्बानिक आसिड वायु व थोडी पाण्याची वाफ बाहेर टाकितें. जीवंतपणाची ही खूण आहे व यालाच श्वासोच्छ्वासाची क्रिया असें म्हणतात. ही प्राणवायु शोषून घेण्याची क्रिया होत असतांना चैतन्यद्रव्यामध्यें थोडा फरक होऊन तें प्राणवायूच्या संलग्नक्रियेमुळें अस्थिर होतें, व लगेच त्याच्यामध्यें व्यवच्छेदजीवनक्रिया घडून येऊन कांहीं निर्जीव अशीं द्रव्यें उत्पन्न होतात; व त्या व्यवच्छेदजीवनक्रियेचा परमावधि झाल्यानें तर एकतर्फी कार्बानिक आसिड वायु व पाण्याची वाफ अशीं द्रव्यें बाहेर पडतात, व दुसऱ्या परीनें एकसमयावच्छेदें करून लगेच पुन्हां निर्माणजीवनक्रिया सुरू होऊन चैतन्यद्रव्य बनूं लागतें. प्राणवायूच्या संलग्न क्रियेमध्यें जेव्हां ती क्रिया लांकूड किंवा कोळसा यांच्या बरोबर घडत असते तेव्हां लांकूड अथवा कोळसा जळतो व तो जळत असतांना ( म्हणजे ती क्रिया चालू असतांना) उष्णता उत्पन्न होते व ती उष्णता बाहेर पडते. तसेंच प्राणवायूच्या संलग्न क्रियेमध्यें प्रकृतिरूपाच्या चैतन्यद्रव्यापासून उष्णता उत्पन्न होते; परंतु ही

प्राणवायुसंलग्नक्रिया चैतन्यद्रव्यामध्यें फार मंद रीतीनें होत असते व ती क्रिया सतत चालू असते, व ती तशी चालू राहण्याकरितां मोकळा असा प्राणवायु सतत हजीर असणें आवश्यक होतें. या गोष्टीला अपवाद म्हणजे प्रकृतिरूपाला प्राणवायूची आवश्यकता नसते अशीं कांहीं अगदीं खालच्या दर्जाचीं प्रकृतिरूपें, ज्यांना ब्याक्टीरिया म्हणतात, हीं आहेत. व्यवच्छदजीवनक्रियेच्या व्यापारांत चैतन्यद्रव्याचा थोडा उच्छेद होऊन जी शक्ति बाहेर पडते व जिच्यामुळें निर्माणजीवनक्रिया त्याच्यामध्यें ताबडतोब सुरू होते, ती शक्ति या ब्याक्टीरियांना कांहीं विवक्षित कारणांमुळें दुसऱ्या तऱ्हेनें साध्य करून घेतां येते, म्हणून त्यांना या प्राणवायूची गरज लागत नाहीं.

सारांश, चैतन्यद्रव्याशिवाय प्राणधारणा होत नाहीं व चैतन्यद्रव्याखेरीज प्राणी प्रकृतिरूप किंवा वनस्पति प्रकृतिरूप असूं शकत नाहीं. तेव्हां चैतन्यद्रव्य म्हणजे काय, याविषयीं थोडासा खुलासा देणें जरूर आहे. चैतन्यद्रव्य म्हणजे घन पदार्थही नाहीं अथवा प्रवाही पदार्थही नाहीं. तें थोडा घन, थोडा प्रवाही असा मध्यम रीतीचा मधासारखा चिकचिकीत, निर्मळ आणि अतिसूक्ष्म कणयुक्त असा एक पदार्थ असून, त्याची रासायनिक घटना फारच दुर्धर अथवा गुंतागुंतीची अशी असते. चैतन्यद्रव्य म्हणजे एकाच तऱ्हेचें एखादें रासायनिक द्रव्य नसून बहुविध असें एक रासायनिक मिश्रण असतें, व या मिश्रणांतील अगदीं महत्त्वाचीं रासायनिक द्रव्यें म्हटलीं म्हणजे मांसोत्पादक द्रव्यें (proteids) होत. हीं मांसोत्पादक द्रव्यें म्हणजे फार गुंतागुंतीचे रासायनिक पदार्थ होत, व तीं सर्व कार्बान, प्राणवायु (oxygen), हैड्रोजन, नैट्रोजन, गंधक (Sulphur), अशा रासायनिक मूलतत्त्वांचीं बनलेलीं असतात. कित्येक वेळां या घटकद्रव्यांमध्यें फॉसफरस हें मूलतत्त्वही अंतर्भूत झालेलें असतें. मांसोत्पादक द्रव्याचें अगदीं चांगलें उदाहरण म्हणजे पक्ष्यांच्या अंड्यांतील निर्मळ बलक हें होय. वर सांगितल्याप्रमाणें चैतन्यद्रव्याशीं जिवंतपणीं पाणी पुष्कळ प्रमाणानें संलग्न झालेलें असतें व तें पाणी चैतन्यद्रव्यानें नसतें शोषून घेतलेलें असतें. चैतन्यद्रव्याला फार उष्णता दिल्यानें तें गोठून जातें व गतप्राण होतें. तसेंच मद्यार्कामध्यें सुद्धां तें गोठलें जातें. चैतन्यद्रव्याच्या जीवंतपणीं त्याच्यामध्यें विशेष असा एक गुणधर्म दिसून येतो, तो हा कीं, तें संकोच व विकास पावतें. चैतन्यद्रव्याच्या संकोच पावण्यांत व जडवस्तूच्या संकोच पावण्यांत एक मोठा फरक आहे, तो हा कीं, चैतन्यद्रव्य संकोच पावलें असतां त्याचें एकंदर परिमाण आकाराच्या मानानें कमी होत नाहीं. चैतन्यद्रव्याच्या संकोच व विकास पावण्यानें प्रकृतिरूपाची हालचाल घडून येते. ही हालचाल चैतन्यद्रव्य आपोआप संकोचविकास पावून घडवून आणूं शकतें, किंवा ती हालचाल एखाद्या बाह्यकारणामुळें चैतन्यद्रव्य संकोचविकास पावून घडून येते. एकंदरींत म्हणावयाचें म्हणजे चैतन्यद्रव्य स्वयंवह ( automatic ) आहे, व सचेतन ( irritable ). व इंद्रियगोचरही आहे. आतां वर म्हटल्याप्रमाणें प्राण म्हणजे चैतन्यद्रव्य; व चैतन्यद्रव्य हें विविध मांसोत्पादक द्रव्यांचें एक प्रकारचें मिश्रण आहे तरी, रसायनशाळेंत नामांकित रसायनशास्त्रवेत्त्यांनीं मांसोत्पादक द्रव्यांचीं नानाविध मिश्रणें प्रयोगरीत्या तयार करण्यांत आपली शिकस्त केली तरी प्राण किंवा चैतन्यस्फूर्ति त्या मिश्रणांत त्यांस उत्पन्न करितां आली नाहीं. तेव्हां प्राण म्हणजे काय ह्यासंबंधी शास्त्रीयरीत्या अजून कांहीं उलगडा झालेला नाहीं. म्हणून त्यासंबंधी वाटाघाट न करितां जें सिद्ध होतें तें हेंच कीं, प्राणधारण करणाऱ्या व्यक्ति किंवा प्रकृतिरूपें हीं चैतन्यद्रव्याचीं झालेलीं असतात, किंवा त्यांच्या शरीरांत चैतन्यद्रव्य असतें. चैतन्यद्रव्याशिवाय प्राणधारणा होत नाहीं. हीं प्रकृतिरूपें किंवा प्राणधारण करणाऱ्या व्यक्ति या जगांत कशा उत्पन्न झाल्या, ह्याविषयीं थोडासा विचार करणें जरूर आहे. अगदीं प्रथमतः सृष्टि कशी उत्पन्न झाली व तींत प्रथमतः प्राणी व वनस्पति कशा अस्तित्वांत आल्या या गहन विचारांत न शिरतां व्यवहारज्ञान आपणाला आज सांगत आहे कीं, प्रत्येक प्राणी किंवा वनस्पति हीं प्रजारूपानें पूर्वज प्राणी किंवा वनस्पति ह्यांपासून उत्पन्न झालेलीं आहेत व होत आहेत. एकंदरींत म्हणावयाचें म्हणजे, 'जीवो जीवस्य कारणं ' हाच न्याय चालू आहे. ह्या

जगावर किती तरी तऱ्हेचे प्राणी वास करीत आहेत त्यांचा एकंदर तपशील घेतला तर आपणाला असें आढळून येईल कीं, कांहीं प्राणी उच्च दर्जाचे आहेत. जसे–सपृष्ठवंश (Vertebrata) प्राणी म्हणजे ज्या प्राण्यांच्या शरीरांत हाडांचा कणा झालेला आहे असे प्राणी. ह्यांत ठळक असे किती तरी वर्ग (Classes) आहेत. उदाहरणार्थ सस्तनप्राणी (mammalia); मनुष्य, वानर, वाघ, मांजर, कुत्रा, गाई, घोडा इत्यादि ह्या सस्तनवर्गांत मोडतात. दुसरा वर्ग म्हणजे पक्ष्यांचा होय. तिसऱ्या वर्गात सर्प, सुसर, सरडे वगैरे सरपटणारे ( reptile ) प्राणी मोडतात. चौथ्या वर्गात बेडुक व त्यासारखे स्थलजलचर प्राणी ( amphibia ) येतात. पांचव्या वर्गांत मासे मोडतात. व्यावहारिक ज्ञानानें आपणांस साधारणपणें असें कळतें कीं, ह्या सर्व उच्च दर्जाच्या प्राण्यांची उत्पत्ति त्यांच्या पूर्वजांपासून प्रजाजनकत्व व प्रजेचें विकास पावणें ह्या रीतीनेंच झालेली आहे व होत आहे. या गोष्टीला दुसरा अन्य मार्गच नाहीं. तेव्हां 'जीवो जीवस्य कारणं' ही कल्पना आज मितीस बरोबर आहे व तदनुरूपच प्राण्यांची उत्पत्ति व वाढ होत आहे. हें जरी खरें आहे तरी प्रश्न उद्भवतो तो हा कीं, या सर्व वर्गांतील प्राण्यांचे एक एक प्रतिरूप (type) पूर्वज जोडप्या जोडप्यानें या सृष्टीवर एका काळीं निर्माण झाले असावेत; व ते कसे व केव्हां झाले असावेत ह्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळालेलें नाहीं. या प्रश्नासंबंधीं ऊहापोह येथें करण्याचें सोडून त्यासंबंधीं थोडेंसें विवेचन शेवटीं केलें आहे.

याच्या खालच्या दर्जाचे प्राणी म्हणजे ज्यांच्या शरीरांत पाठीचा कणा नाहीं असे व ज्यांना अपृष्ठवंश (invertebrata) प्राणी ही संज्ञा आहे ते. यांतसुद्धां पुष्कळ तऱ्हेचे प्राणी असून त्यांचेही निरनिराळे वर्ग व संघ (phyla) आहेत. उदाहरणार्थ मृदुकाय ( mollusca ) प्राणी. या संघांत गोगलगाई, शिंपले, म्हाकूल असे प्राणी मोडतात. दुसरा संघ संधिपाद ( arthropoda ) प्राणी यांचा होय जसे शेवंडी, झुरळ, माशा, विंचु, कोळी, गोम इत्यादि. तिसऱ्या संघांत कंगणीदार (Annelida) प्राणी मोडतात. जसे काडू, जळू इत्यादि. अपृष्ठवंश प्राण्यांतील अगदीं शेवटल्या दर्जाचा संघ म्हटला म्हणजे आद्यजंतूंचा ( Protozoa ) होय. यांत अतिसूक्ष्म प्राणी मोडतात. आतां साधारणरीत्या पाहतां नैसर्गिक नियम हाच दिसून येतो कीं, जीवापासून जीवाची उत्पत्ति घडते. तेव्हां साधारणतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति व वाढ जीवमूलक जीवोत्पत्ति (Biogenesis) ह्याच न्यायानें होते व झाली आहे. परंतु आद्यजंतूंसारखे प्राणी लक्षांत आणिले व त्यांची शारीरिक रचना ध्यानांत घेतली म्हणजे ते केवळ चैतन्यद्रव्याचे नुसते सूक्ष्म निरवयव ठिपकेच होत. अशीं निरवयव व साध्या चैतन्यद्रव्याचीं ठिपक्यासारखीं प्रतिरूपें, जर चैतन्यद्रव्य निसर्गतः सहजगत्या बनत असेल तर होऊं शकण्यासारखीं आहेत; व तीं निसर्गतः होतही असतील! कांहीं प्राणिशास्त्रज्ञांची अशी समजूत होती कीं, ही निर्जीवमूलक जीवोत्पत्ति (Abiogenesis) आजमितीसही घडून येत आहे. एकंदर अवलोकनावरून निर्जीवमूलकजीवोत्पत्ति हें मत अनुभवसिद्ध नाहीं व प्रयोगसिद्धही नाहीं. तूर्त बहुतेक जीवनशास्त्रवेत्त्यांच्या मतें जीवापासून जीवाची उत्पत्ति घडते. प्राणी कितीही सूक्ष्म व निरवयव असला तरी ह्या गोष्टीला अपवाद नाहीं. तेव्हां हेंच मत कायम धरून चालावयाचें; या पलीकडे जाण्याची जरूरी नाहीं. वनस्पतिकोटीमध्यें सुद्धां उच्च व नीच दर्जा आहे व त्या सर्वांची उत्पत्ति वर सांगितल्याप्रमाणेंच होते.

आतां प्रश्न असा आहे कीं, प्राणिकोटींतील किंवा वनस्पतिकोटींतील प्रकृतिरूपव्यक्ति ( Single organism) कोणाला म्हणावयाचें व त्याला कसें ओळखावयाचें. सावयव प्राण्यांतील व्यक्ति किंवा उच्च दर्जाचे वनस्पतींतील व्यक्ति ओळखणें कठीण पडत नाहीं; कारण तशा प्रत्येक व्यक्तिमात्रांत जीवंतपणीं कांहीं शारीरिक व्यापार साधारणतः सारखे घडत असतात. ते व्यापार ठोकळ मानानें पचनक्रिया, श्वासोच्छ्वासाची क्रिया, प्रजाजनकत्व व बाह्यसृष्टिज्ञान, इत्यादि होत. ह्या कसोटीनें पाहिलें तर अगदीं खालच्या दर्जाचे निरवयव साधे प्राणी

किंवा वनस्पति जे नुसते चैतन्यद्रव्याचे एक एक ठिपका असे असतात ते सुद्धां व्यक्तिशः प्राणी किंवा वनस्पति होत. कारण ह्या प्रत्येक चैतन्यद्रव्याच्या ठिपक्याचा आयुष्यक्रम ( life-history ) ताडून पाहिला तर त्यांत हे वर ठोकळ मानानें सांगितलेले सर्व शारीरिक व्यापार घडून येतात; तेव्हां प्रत्येक चैतन्यद्रव्याचा स्वतंत्र असणारा ठिपका ज्याच्यांत वर सांगितलेले सर्व व्यापार घडत आहेत तो व्यक्तिशः एक प्राणी किंवा वनस्पति होय. ह्यांच्या वरच्या दर्जाचे प्राणी किंवा वनस्पति यांच्या शरीराचें पृथक्करण करून पाहिलें असतां असें आढळून येईल कीं त्यांचीं शरीरें चैतन्यद्रव्याचे अनंत ठिपके एकत्र होऊन झालेलीं असतात व त्यांचा जीवनारंभ चैतन्यद्रव्याच्या मूळ एकच ठिपक्यापासून झालेला असतो. त्यांच्याही वरच्या दर्जाच्या सावयव प्राण्यांमध्यें किंवा वनस्पतींमध्यें असेंच दिसून येतें. तेव्हां प्राण्यांचा किंवा वनस्पतींचा उच्च किंवा खालचा दर्जा हा ठोकळ मानानें सांगितलेल्या शारीरिक व्यापारावर अवलंबून नसून तो या चैतन्यद्रव्याच्या ठिपक्यांच्या संख्येवर अथवा त्यांचीं रूपांतरें होऊन झालेल्या त्यांच्या रचनेवर अवलंबून असतो.

येथें कांहीं सूक्ष्मप्राणी व वनस्पति यांच्या आयुष्यक्रमाचें संक्षिप्त वर्णन देऊन त्यांच्यांत घडणाऱ्या शारीरिक व्यापारांसंबंधीं, व उच्च सावयव प्राणी व वनस्पति यांच्यांतील शारीरिक व्यापारासंबंधीं, थोडें तुलनात्मक विवेचन केलें असतां विषय सुलभ होऊन एकंदर संदर्भ चांगला समजण्यासारखा होईल म्हणून तसें केलें आहे.

**अमेबा** ( Amœba ) अथवा **कामरूप क्षुद्रजंतु**—हा प्राणिकोटींतील एक अति सूक्ष्म जंतु आहे. हा पाण्यांत किंवा ओलसर जमिनींत सांपडतो. सूक्ष्मदर्शक दुर्भिणीच्या (microscope) साह्यावांचून हा दिसत नाहीं. तसें याचें निरीक्षण केलें असतां असें आढळून येईल कीं, ह्याचें शरीर म्हणजे केवळ अतिसूक्ष्म चैतन्यद्रव्याचा एक ठिपका होय. म्हणून त्याला, व त्याच्यासारखे स्वतंत्र एक एक चैतन्यद्रव्याच्या ठिपक्याचे झालेले प्राणी यांना, आद्यजंतु (Protozoa) ही संज्ञा देतात. याच्या चैतन्यद्रव्याच्या ठिपक्यांत चैतन्यद्रव्याचाच एक केंद्रीभूत झालेला भाग-ज्याला चैतन्यकेंद्र ( nucleus ) म्हणतात–असतो व याच्या चैतन्यद्रव्याचे दोन थर झालेले दिसतात. मध्यभागाचा थर थोडा पातळ असून बहुतकणयुक्त असतो, व त्याला वेष्टन देऊन झालेला दुसरा बाहेरचा थर थोडा चिवट परंतु लवचिक असतो व तो कणरहित असल्याकारणानें पारदर्शक दिसतो. हे दोन्ही थर एकमेकांला अगदीं चिकटून राहून एकत्र असतात. ह्या चैतन्यद्रव्यानें शोषून घेतलेलें पाणी ह्या ठिपक्यासारख्या शरीरांत अतिसूक्ष्म वर्तुलाकार बुडबुड्यांप्रमाणें पोकळ्या बनून त्यांत साचलें जातें व त्यांना जलविवर ( vacuole. ) म्हणतात. वर सांगितलेंच आहे कीं, संकोचविकास पावणें हा एक चैतन्यद्रव्याचा गुण आहे, व चैतन्यद्रव्य जेव्हां संकोचविकास पावतें तेव्हां त्याचें एकंदर परिमाण कमी न होतां तें तसेंच राहतें; म्हणजे एका बाजूवर संकोच पावण्यानें जर तें कमी झालें तर दुसऱ्या बाजूस तें वाढतें. ह्या चैतन्यद्रव्याच्या गुणामुळें या अमेबाचें शरीर एका दिशेनें संकोच पावून कमी झाल्यास तें त्याच्या उलट दिशेस वाढतें. या वाढीचा किंवा अंगविक्षेपाचा परिणाम असा होतो कीं हा ठिपका थोडासा वाढत्या दिशेस ढकलला जातो, व अशा रीतीनें हा प्राणी आपल्या शरीराची हालचाल घडवून आणतो. हे अंगविक्षेप एकाच दिशेनें घडून येतात असें नसून पाहिजे त्या दिशेस होतात, म्हणून त्या ठिपक्यांची आकृति निरंतर सारखी कधींच राहूं शकत नाहीं; व या कारणास्तव याला कामरूप ही संज्ञा देतात. या [illegible] शरीराची हालचाल होते म्हणून त्यांना छद्मपाद ( pseudopodia ) असें म्हणतात. जेव्हां अंगविक्षेप होऊं लागतो तेव्हां प्रथमतः बाह्य पारदर्शक चैतन्यद्रव्याचा थर पुढें येतो व लगेच त्याची पोकळी मध्यभागाच्या कणयुक्त पातळ थरानें भरली जाते. याच्या शरीरांत एक जलविवर झालेलें असतें तें कांहीं वेळ त्या ठिकाणीं दिसलें व एकदम दिसेनासें होतें. कांहीं नियमित वेळानें तें पुन्हां त्याच स्थळीं दिसूं लागतें व पुन्हां नाहींसें होतें. याला संकोचविवर ( contrac-

tile vacuole)म्हणतात. म्हणजे अमेबाच्या शरीरांत ज्या ठिकाणीं हा पाण्याचा बिंदु सांठतो त्या ठिकाणीं तो सांठल्यावर त्याच्या सभोंवतालचें चैतन्यद्रव्य संकोच पावतें, व या संकोच पावण्यानें त्या पाण्याच्या बिंदूवर दाब पडतो व त्या दाबामुळें तो पाण्याचा बिंदु बाहेर एका तात्पुरत्या रंध्रावाटे निघून येतो. चैतन्यद्रव्य स्निग्ध, लवचिक व चिवट असल्याकारणानें हें रंध्र ताबडतोब बुजून जातें. ह्या पाण्याच्या बिंदूच्या योगें-करून अमेबाच्या शरीरांतील मलद्रव्यें बाहेर टाकिलीं जातात. अमेबा सजीव प्राणी असल्याकारणानें त्याला अन्नाची जरूरी आहे. याचे अंगविक्षेप होत असतांना एकादा अन्नाचा कण मध्यें आला व त्याचा ह्याला स्पर्श झाला म्हणजे अमेबा त्या अन्नाच्या कण।भोंवतीं अंगविक्षेपांच्या रूपानें आपलें अंग पसरतो व हे त्याच्या चैतन्यद्रव्याचे अन्नाचे कणासभोंवतीं वाढलेले सर्व भाग एकमेकांला लागून एकवटतात व त्यामुळें पूर्ववत् सर्व बाजूनें चैतन्य-द्रव्य अखंड होतें व अशा कृतीनें अन्नाचा कण याच्या शरीरांत दाखल केला जातो. हा अन्नाचा कण शरीरांत दाखल होतांना त्याच्याबरोबर थोडेंसें पाणी त्याला वेष्टन म्हणून दाखल केलें जातें व अशा रीतीनें अन्नकणाभोंवतीं एक अन्नविवर ( food vacuole ) बनतें. या अन्नविवरांत असलेला हा अन्नाचा कण त्याच्यांतील पचनीय द्रव्य पचलें गेलें म्हणजे कमी कमी झालेला दिसतो व त्याच्यांतील शेवटीं राहिलेला अपचनीय भाग अमेबा उलट दिशेस वाढत वाढत जाऊन बाहेर टाकून देतो. अन्नविवरामध्यें अमेबाचें चैतन्यद्रव्य कांहीं पाचक द्रव्य टाकीत असलें पाहिजे—कीं ज्याच्यामुळें अन्ना-मधील अद्राव्य पचनीय द्रव्य द्राव्य होऊन चैतन्यद्रव्यांत शोषलें जातें व त्यामुळें शेवटीं त्याचें चैतन्यद्रव्याशीं सात्मीकरण होतें. यालाच पचनक्रिया म्हणतात. तेव्हां पचनक्रियेच्या मूळाशीं मुख्य गोष्ट आहे ती ही कीं, अन्नांतील अद्राव्य पचनीय द्रव्यांचें द्राव्यरूपामध्यें रूपां-तर घडवून आणणें व तीं तशा रूपांत शोषलीं जाऊन यांचें चैतन्यद्रव्याशीं सात्मीकरण होणें. पुन्हां, अगोदर वर सांगितल्याप्रमाणें सजीव प्राण्यामध्यें व्यवच्छेद-जीवनक्रिया चालू असतेच, व ती क्रिया हवेंतील प्राण-वायूवर अवलंबून असते. प्राणवायूचें चैतन्यद्रव्याशीं संलग्न होणें याला श्वसनक्रिया ( respiration ) म्हणतात,व ती क्रिया अमेबामध्यें घडत असते.पाण्यांत विरलेला प्राणवायु अमेबारूपी चैतन्यद्रव्याच्या ठिप-क्याशीं सर्वत्र सभोंवार संलग्न होत असतो, व त्याच्या-पासून व्यवच्छेदजीवनक्रियेंत बनलेला कार्बानिक आसिड वायु त्याच्यासभोंवर निघून जातो. अमेबाची पूर्ण वाढ झाल्यावर कांहीं काळानें तो दुभागला जातो. पहिल्या प्रथम त्याचें चैतन्यकेंद्र दुभागून जाऊन त्याचीं दोन शकलें एकमेकांपासून दूर होतात, व नंतर त्यांच्या मध्यंतरांतील चैतन्यद्रव्याचा भाग आकुंचन पावत जातो व शेवटीं ते दोन भाग एकमेकांपासून अगदीं अलग होतात. याप्रमाणें मूळ एका अमेबापासून दोन लहान अमेबांच्या व्यक्ति तयार होतात. व त्यांची पूर्ण वाढ झाल्यावर त्या प्रत्येकापासून निराळ्या नवीन दोन व्यक्ति बनत जातात व अशा रीतीनें अमेबा-मध्यें प्रजाजनकत्व घडून येतें. कृत्रिम रीतीनें अमेबाचे दोन भाग अशा रीतीनें केले कीं, एका भागांत चैतन्यकेंद्राचा मुळींच कांहींही अंश आलेला नसेल तर असें आढळून येतें कीं, तो भाग वाढत नाहीं व त्याच्यांत जीवनक्रिया मुळींच घडत नाहीं व तो भाग कांहीं वेळानें मृत होतो. तेव्हां चैतन्यकेंद्राचा भाग महत्त्वाचा आहे व तो नव्यानें उत्पन्न होऊं शकत नाहीं. अमेबा पाहिजे त्या दिशेस अंगविक्षेपांच्या योगेंकरून हाल-चाल करतो, यावरून तो स्वयंवह आहे व अन्नकणाचा स्पर्श झाला असतां त्याला कळतें व त्या अन्नकणाला तो आपल्या शरीरांत घेतो. यावरून त्याच्या ठिकाणीं इंद्रियगोचरता आहे.

ज्या पाण्यांत किंवा ओलसर जमिनींत अमेबा जीवंत वावरत असतात तें पाणी किंवा ती जमीन सुकून जाऊं लागल्यास अमेबा आपले अंगविक्षेप करण्याचें सोडून देऊन एकदम गोलाकार बनतो व

आपल्या शरीरासभोंवतीं एक टणक कवच उत्पन्न करतो. या कवचामुळें चैतन्यद्रव्याशीं संलग्न झालेलें पाणी त्याच्यांतून समूळ निघून जाऊं शकत नाहीं. अशा ह्या सुषुप्तावस्थेंत तो सुक्या जमिनींत असतो व पुष्कळ काळपर्यंत जीवित्व-नाश पावल्याशिवाय धुळींत राहूं शकतो. वाऱ्यानें जेव्हां धूळ उडते तेव्हां हा पण तिच्याबरोबर उडला जातो व हवेंत रजःकणाप्रमाणें तरंगत असतो. एखाद्या उघड्या पाण्याच्या साठ्यांत किंवा काढ्यासारख्या द्रवपदार्थांत हवेंतून धूळ बसते तेव्हां तिच्याबरोबर हा कवचधारी अमेबाही आंत जातो. जर करितां हें स्थळ त्याच्या वाढीस सोईस्कर असलें, तर तो तें कवच टाकून देतो व पूर्ववत् सर्व आयुष्य पुन्हां कंठितो. काढ्यासारखे द्रव्य व पदार्थ कांहीं दिवस उघडे ठेविले असतां त्यांत अशा रीतीनें अमेबा तयार होतात.

आतां उच्च दर्जाच्या सावयव प्राण्याच्या शरीराचे सर्वसाधारण व्यापार म्हणजे अन्नपचनक्रिया, श्वसन-क्रिया, मलोत्सर्ग, हालचाल, सृष्टिज्ञान व इंद्रियगोचरता, प्रजाजनकत्व इत्यादि, हा अमेबाप्राणी निवळ निरव-यव चैतन्यद्रव्याचा ठिपका चालवूं शकतो. तेव्हां या शरीरव्यापारांना फारसें महत्त्व नाहीं; कारण हे चैत-न्यद्रव्याचे गुणधर्म होत. सावयव प्राण्यांत हे व्यापार कसे घडून येतात हें अवलोकन केलें असतां असें आढळून येईल कीं, या व्यापारांची त्यांच्या शरीरांत श्रमविभागणी किंवा वांटणी झालेली असते. व ही विभागणी जितकी जास्त प्रमाणावर झालेली असेल, तितका त्या प्राण्याचा उच्च दर्जा जाणला जातो. तेव्हां हें श्रमविभागणीचें तत्त्व निरवयव चैतन्यद्रव्याच्या ठिपक्याप्रमाणें असणाऱ्या अमेबाच्या शरीरांत दिसून येत नाहीं म्हणून त्याचा दर्जा खालचा होय. फार बारकाईनें विचार केला तर अमेबाच्या शरीरांतील संकोचविवर हें फक्त एकच कायमचा व्यापार–म्हणजे मलोत्सर्गाचा–घडवून आणतें. तेव्हां एवढ्यापुरती तरी थोडीशी श्रमविभागणी झालेली आहे. कारण हें संकोच-विवर पाहिजे त्या ठिकाणीं बनत नाहीं. त्याची जागा नेमून झालेली दिसते.

**पारामीसिअम** ( Paramœcium )–अथवा पादुकाकार क्षुद्रजंतु. हा पाण्यांत सांपडतो. ह्या सूक्ष्म-जंतूचें शरीर पण वर सांगितलेल्या अमेबाच्या शरीरा-प्रमाणें चैतन्यद्रव्याच्या लांबोड्या ठिपक्याचें झालेलें असून त्या चैतन्यद्रव्याचे एक मध्यस्थ व दुसरा त्याच्या बाहेर असलेला असे दोन थर झालेले अस-तात. परंतु बाह्य थर त्याच्या पृष्ठावर कांहीं रासाय-निक क्रियेनें एक टणक कवचासारखें आवरण तयार करितो, व यामुळें या प्राण्याचें शरीर टणक आवर-णानें वेष्टित असतें व त्याच्या शरीराला नियमित आकृति प्राप्त होते. ही शरीराकृति पादुकांप्रमाणें पूर्व शेवटाला रुंद असून पश्चिम शेवटाला चिंचोळी असते. याच्या चैतन्यद्रव्यांत दोन चैतन्यकेंद्र झालेले असतात व संकोचविवरेंही दोन–प्रत्येक शेवटाला एक याप्रमाणें-- झालेलीं असतात. ज्याअर्थी सर्व शरीर एका टणक कवचानें वेष्टिलेलें असतें त्याअर्थी याच्या चैतन्यद्रव्याला अमेबाप्रमाणें अंगविक्षेप करतां येत नाहीं. अमेबामधील अंगविक्षेपाचा मुख्य साध्य हेतु शरीराची हालचाल घडवून आणण्याकडे होतो, तो येथें निराळ्या तऱ्हेनें साध्य करून घेतला जातो. याच्या कवचाला सर्व बाजूनें सभोंवतालीं अति सूक्ष्म रंध्रें असून त्यांतून चैतन्यद्रव्याच्या बाह्यथराचे अति सूक्ष्म केश बाहेर आलेले असतात व त्यांच्या संकोच-विकासानें या प्राण्याच्या शरीराची हालचाल घडून येते, व ही हालचाल फार जलद रीतीनें होत असते. पुन्हां कवचरूपी टणक आच्छादनानें सर्व शरीर वेष्टित असल्यामुळें घनअन्नाचे कण या टणक आच्छादनांतून आंत चैतन्यद्रव्यांत प्रवेश करूं शकत नाहींत. म्हणून या प्राण्याच्या शरीराच्या उदरतलावर (ventral side) एक तिरकस खांचणी झालेली असते, व तिच्या दोन्ही कडांला वर सांगितलेले केश लागलेले असतात. ही खांचणी पूर्व शेवटाच्या डाव्या कडे-

पासून आरंभ पावून उदरतलाच्या मध्याला पोंचलेली असते, व जेथें ती शेवट पावते तेथें कवचरूपी आवरणाचा भाग झालेला नसतो. या कारणानें ह्या एवढ्या खांचणीच्या शेवटाच्या वाटोळ्या भागीं चैतन्यद्रव्याचा बाह्य थर उघडा असतो. या भागांतून अन्नाचे कण आंत शिरूं शकतात, म्हणून त्याला या प्राण्याचें मुख असें म्हणतात. खांचणीच्या दोहों कडांला लागलेले केश पाण्यामध्यें प्रवाह उत्पन्न करितात व त्यांचा सर्व ओघ पाणी मुखाकडे जाईल असा असतो. या पाण्याच्या प्रवाहांत तरंगणारे अन्नरूपी घन कण जेव्हां या मुखावर येऊन त्यांचा मुखाळा स्पर्श होतो, तेव्हां अमेबाच्या कृतीप्रमाणें हा मुखाचा भाग ते अन्नकण शरीरांत ओढून घेतो. अन्नकणांचा चैतन्यद्रव्याच्या आंत प्रवेश झाल्याबरोबर त्यांच्या सभोंवतीं अन्नविवर बनलें जातें व अमेबाप्रमाणें त्यांचें येथें पचन होतें. प्रजोत्पादनाची क्रिया शरीर दुभागून जाऊन होते. ही शरीर दुभागून जाऊन प्रजोत्पादनाची क्रिया पुष्कळ कालपर्यंत पिढयानुपिढया या पारामीसिअम प्राण्यांत चालते. परंतु वेळेवर असा काल येतो कीं, त्या पिढींत ही क्रिया बंद पडते. तेव्हां दोन निराळ्या वंशांतील पारामीसिअम प्राण्यांचा संयोग होतो, व नंतर संयोग पावून निराळे झालेल्या या पारामीसिअम प्राण्यांत ती शरीर दुभागून प्रजोत्पत्तिची क्रिया पुन्हां पूर्ववत् सुरू होते. ह्या प्राण्यालाही अमेबाप्रमाणें सुषुप्तावस्था प्राप्त होते, व तो त्या स्थितींत राहूं शकतो. आतां सूक्ष्म निरीक्षणांतीं असें दिसून येतें कीं, ह्या पारामीसिअमप्रमाणें एक-पेशीय प्राण्यांमध्यें सुद्धां थोडेंसें जास्त श्रमविभागणीचें तत्त्व अमलांत आलें आहे. अमेबामध्यें अन्नाचे कण पाहिजे त्या बाजूनें त्याच्या शरीरांत घेतले जातात. परंतु ह्या प्राण्यांत ते नियमित ठिकाणींच आले असतां आंत घेतले जातात, व त्याप्रमाणें त्यांच्यासाठीं एका पक्ष्मल खांचणीची योजना होऊन तिच्या शेवटीं मुखासारखा भाग बनला आहे. शरीराची हालचाल जलद रीतीनें होण्यास चैतन्यद्रव्याच्या खास केशरूपी भागांची योजना झालेली आहे. ही हालचाल होत असतांना शरीराचा एक शेवट म्हणजे रुंद टोंक पुढच्या दिशेस नेहमीं वळलेलें असतें. ह्याचा परिणाम असा होतो कीं, ह्या टोंकाला इंद्रियगोचरता विशेष प्राप्त होते; जणूं कांहीं हें या प्राण्याचें शीर्ष होय. एकंदरींत म्हणावयाचें म्हणजे, ह्या एक-पेशीय प्राण्यांत श्रमविभागणीची सुरुवात झालेली दिसते. ह्या श्रमविभागणीची, चैतन्यद्रव्याचे अनंत ठिपके मिळून झालेल्या—म्हणजे बहुपेशीय—प्राण्यांच्या शरीरांतील श्रमविभागणीशीं तुलना केली असतां ती कांहींच नाहीं. चैतन्यद्रव्याचे अनंत ठिपके मिळून झालेल्या बहुपेशीय प्राण्यांत अगदीं खालच्या दर्जाचा प्राणी म्हटला म्हणजे हैड्रा होय. त्याचें वर्णन संक्षिप्त रीतीनें खालीं दिलें आहे.

हैड्रा ( Hydra ) हा प्राणी पाण्यांत राहणारा एक जीव असून सूक्ष्म-देही आहे. तरी तो नुसत्या डोळ्यांनीं दिसण्यासारखा आहे. याचें शरीर एकाद्या पोकळ नलिकेप्रमाणें असून ती नलिका एका शेवटाला बंद असते व दुसऱ्या शेवटाला निमुळती होऊन एका छिद्रानें बाहेर उघडते. या छिद्राला हैड्राचें मुख म्हणतात. बंद असलेल्या शेवटानें हा प्राणी बाह्य पदार्थाला चिकटून राहिलेला असतो. मुखाच्या खालीं जेथून निमुळता भाग सुरू होतो त्या ठिकाणीं याच्या शरीराला सूक्ष्म पोकळ नलिकामय शाखा फुटलेल्या असतात. ह्या शाखा या प्राण्याचीं गात्रें होत. शरीराच्या पोकळींत पाणी मुखद्वारानें खेळत असतें. एकंदर शरीराच्या घटकारचनेसंबंधीं विचार केला असतां असें दिसून येईल कीं, शरीरनलिकेची भिंत चैतन्यद्रव्याचे स्वतंत्र पेशीसारखे अनंत ठिपके एकत्र मिळून त्यांचे दोन थर होऊन झालेली असते. ह्या दोन थरांच्या मध्यंतरीं एक स्निग्ध मधासारखा पदार्थ या पेशींच्यामुळेंच झालेला असतो. अंडाकृति गोल असे चैतन्यद्रव्याचे सकेंद्र ठिपके किंवा पेशी एकमेकांला लागून चिकटून राहतात व त्यांचा हा बाह्य थर झालेला असतो. या बाह्यांग पेशीचें निमुळतें टोंक आंतल्या बाजला

असतें व तें एका बारीक दांड्यामध्यें शेवट पावतें. हे बाह्यांगपेशींचे सर्व दांडे उभे किंवा अन्वायाम रीतीनें त्या मध्यंतरांतील स्निग्ध पदार्थांत बसलेले असतात. हे दांडे फार संकोचक असतात, व त्यांच्या संकोचानें हैड्राचें शरीर शाखा आंत ओढून घेऊन गोलाकार बनतें. या बाह्य पेशींच्या आंतल्या निमुळत्या शेवटीं त्यांच्या मध्यंतरीं कांहीं दुसऱ्या लहान वाटोळ्या सकेंद्र पेशी, ज्यांना सांधिक पेशी (interstitial) म्हणतात, त्या लागलेल्या असतात. बाह्यांग पेशींपैकीं कांहीं नाश पावल्यास या सांधिक पेशी त्या ठिकाणीं वाढून त्या बाह्यांगपेशींची जागा भरून काढतात. या सांधिक-पेशींपैकीं कांहींचें चमत्कारिक रूपांतर होत असतें व या रूपांतर पावलेल्या पेशींचा उपयोग म्हटला म्हणजे शत्रूला मारण्याकडे किंवा आत्मसंरक्षणाकडे होतो. ही आयुधरूपी प्रत्येक पेशी लहान असून तिच्यामध्यें बारीक तंतूसारखें एक नलिकामय शल्य झालेलें असतें, व त्या शल्याच्या आरंभीं कित्येकांत कांटे झालेले असतात. या पेशीची पोकळी किंवा विवर पाण्यासारख्या एका द्रव्य पदार्थानें भरलेलें असतें. या आयुधरूपी पेशीला शल्यकोश ( nematocyst ) म्हणतात. हा शल्यकोश दुसऱ्या एका त्याच्यासभोंवतीं असलेल्या पेशीमध्यें बनतो. या शल्यकोशआवरणपेशीला (Cnidoblast ) एक फार बारीक केशाप्रमाणें लांब शलाका (Cnidocil) लागलेली असते व ती बाह्यांगपेशींच्या पृष्ठतलाच्या बाहेर पाण्यांत तरंगत असते.ही शलाका फार नाजूक व शीघ्रग्राहक (Sensitive ) असते. एकाद्या दुसऱ्या जीवाचा किंवा जंतूचा स्पर्श हिला झाला असतां तावडतोब इंद्रियबोध होऊन ही शल्यकोशआवरणपेशी अथवा शलाकायुक्त पेशी गोळीबार झाल्याप्रमाणें फुटून जाऊन तिच्या आंतील शल्यकोशाला बाहेर गोळीप्रमाणें फेंकून देते. हा शल्यकोश बाहेर पडतांना त्याच्या आंतील द्रव्यपदार्थावर दाब पडतो, व त्या दाबामुळें त्यांत असलेलें अतिसूक्ष्म नलिकामय शल्य आंतील बाजू बाहेर आल्यामुळें बाहेर पडतें, व त्याचा चाबकाच्या वादीप्रमाणें त्या बाहेरच्या जीवावर किंवा जंतूवर प्रयोग होऊन तो उपद्रव करणारा जीव किंवा जंतु ठार होतो अथवा बेशुद्ध होतो. तद्यांतून या शल्याचे कांटे त्या जीवाला किंवा जंतूला रुतून त्याच्या शरीरांत शल्यकोशांतील द्रवपदार्थही टोंचला जातो, व त्याचा परिणाम विषारी होतो.

या सांधिक-पेशींपैकीं कांहीं पेशींचें खास इंद्रियबोधक किंवा इंद्रियज्ञानजनक (nerve-cells) अशा पेशींमध्यें रूपांतर झालेलें असतें. ही इंद्रियज्ञानजनक पेशी चैतन्यकेंद्रयुक्त असून साधारण गोलाकार असते व तिजपासून चैतन्यद्रव्याचे तंतु तारकित अशा रीतीनें निघून सर्व दिशांनीं पसरलेले असतात. तथापि या ज्ञानपेशी एकवटलेल्या नसून सर्व शरीरभर स्वतंत्र अशा पसरलेल्या असतात.

आंतील थराच्या पेशी-म्हणजे प्राण्याच्या शरीराच्या पोकळीसभोंवतीं लागलेल्या पेशी-मोठ्या लांबोड्या विवरयुक्त असून त्यांच्या बाह्य शेवटांना लागलेले संकोचक दांडे आडवे अथवा अनुविस्तर रीतीनें मध्यंतरांतील स्निग्ध पदार्थांत बसलेले असतात. त्यांच्या संकोचानें प्राण्याचें गोलाकार बनलेलें शरीर पुन्हां लांबवर होऊन शाखांचा विस्तार होतो. या आंतल्या थराच्या पेशींच्या अंतर्शेवटीं पुष्कळ पेशींना पक्ष्म लागलेले असतात व त्यांच्या हालचालीमुळें पाण्याचा प्रवाह मुखावाटे शरीराच्या आंत बाहेर चालू असतो. या पाण्याच्या अंतर्प्रवाहानें अन्नाचे कण शरीराच्या पोकळीमध्यें शिरतात. आंतल्या थराच्या कांहीं पेशींचें-मुख्यतः मुखाजवळील पेशींचें चैतन्यद्रव्य फारच कणयुक्त असलेलें दिसतें व त्या पेशी पाचक द्रव्यें शरीराच्या पोकळींत टाकीत असतात. त्यामुळें शरीराच्या पोकळींत गेलेल्या अन्नाचें पचन होतें व हें पचन झालेलें अन्न आंतल्या थराच्या सर्व पेशी शोषून घेतात व हें शोषून घेतलेलें अन्न त्यांच्यांतून पाझरून जाऊन बाह्यांगी सर्व पेशींना मिळतें व त्या योगानें त्यांचें पोषण होतें. पुन्हां, या आंतील थराच्या पेशींचीं आंतलीं टोकें एकमेकांना

अगदीं सारखीं चिकटून गेलेलीं नसतात, परंतु थोडीं थोडीं अलग अशीं असतात, व त्यांच्या चैतन्यद्रव्याचा बाहेरचा भाग टणक झालेला नसल्याकारणानें हीं त्यांचीं आंतील टोंकें अमेबाच्या चैतन्यद्रव्याप्रमाणें थोडया बहुत प्रमाणानें अंगविक्षेप करूं शकतात. ह्याचा परिणाम असा होता कीं, शरीराच्या पोकळींतील पचन होत असलेल्या अन्नकणाचा स्पर्श या एखाद्या टोंकाला झाला असतां तो घनकण लगेच अमेबाच्या कृतीप्रमाणें त्या पेशीच्या आंत ओढला जातो व तेथें तिच्या आंत पचन पावतो. सारांश, अन्नपचन या प्राण्यांत पेशींच्यामध्यें होतें किंवा त्यांच्या बाहेर असलेल्या शरीराच्या पोकळींत होतें. या पचनक्रियेसंबंधीं थोडा विचार केला असतां असें आढळून येतें कीं, या प्राण्याच्या बाह्यांगपेशींना अन्नपचन करण्याची शक्ति नाहीं. त्यांचा उपयोग शरीराचें संरक्षण व आच्छादन होण्याकडे होतो, व त्यांच्यापासून ज्ञानपेशींची उत्पत्ति झालेली असते. तेव्हां बहुपेशीय शरीरामध्यें सर्व शरीरपेशींचे व्यापार सारखे न राहतां निरनिराळे बनतात, व हीच त्या व्यापारांची श्रमविभागणी होय; व हे निरनिराळे तऱ्हेचे व्यापार पार पाडण्यास त्या पेशींचे निरनिराळे जमाव किंवा समूह तयार होतात त्यांना शारीरधातु ( tissues ) असें म्हणतात. या शारीरधातूंच्या घटकांचीं रूपें हीं त्यांच्या व्यापाराला अनुसरून व सयुक्तिक अशींच बनतात.

हैड्रामध्यें प्रजोत्पत्ति दोन प्रकारांनीं होते.एका प्रकारांत हैड्राच्या सांधिकपेशींची वाढ होऊन हैड्राच्या शरीराला एक लहान अंकुर फुटतो. तो वाढत जाऊन त्याचा एक नवीन हैड्रा बनतो, व नंतर हा नवीन बाल-हैड्रा जनकापासून सुटा पडतो. जेथें हैड्रा वास करीत असतो तेथील पाणी मुबलक असल्यास हीच पद्धत अमलांत येऊन नवीन हैड्राप्राणी उत्पन्न होत असतात. परंतु जर करतां पाणी संपुष्टांत येऊं लागलें तर दुसऱ्या पद्धतीनें हैड्रामध्यें प्रजोत्पत्ति होते. यामध्यें स्त्री।पुरुषभेदाचीं जननेंद्रियें हैड्राच्या शरीरांत सांधिक पेशींची वाढ होऊन तयार होतात. जरी हैड्रा उभयलिंगी आहे, म्हणजे हीं लिंगभेदाचीं जननेंद्रियें त्याच हैड्राच्या एकाच शरीरावर अन्यभागीं उत्पन्न होतात, तरी तीं एकाच वेळीं पक्व दशा पावत नसतात. पुंजननेंद्रियापासून उत्पन्न झालेलें एका हैड्राचें शुक्रबीज दुसऱ्या हैड्राच्या स्त्रीजननेंद्रियांत झालेलें एकच अंडें फलद्रूप करतें. व्यक्तिशः एकच शुक्रबीज एक अंडें फलद्रूप करण्यास लागतें. फलद्रूप झालेल्या अंड्यापासूनच नवीन हैड्रा बनतो. फलद्रूप झालेलें अंडें म्हणजे एक पेशीच होय. तिला नेहमींच्या पेशीप्रमाणें सर्व भाग असतात. हें अंडें प्रथम दुभागलें जातें, व ते दोन भाग एकामेकांला चिकटून राहून पुन्हां त्यांतील प्रत्येक भाग दुभागला जातो; व याप्रमाणें पुढें विभाग पडून व ते सर्व भाग एकमेकांला चिकटून राहिलेले असल्यानें त्यांचा एक अनेक-पेशीय भरींव गोल बनतो. या भरींव गोलाच्या पृष्ठतलावरील पेशी एका प्रकारचें जलाभेद्य कवच तयार करतात व अशा ह्या परिपूर्तितावस्थेंतील गोलाच्या स्थितींत राहिलेला हा अपूर्ण डिंब गतप्राण झाल्याशिवाय उन्हाळा काढूं शकतो. पावसाळ्यांत पाणी सांचलें म्हणजे हा अपूर्ण डिंब पुन्हां वाढूं लागतो, हा भरींव गोल तें कवच तेव्हां टाकून देतो व त्याच्या पृष्ठतलावरील पेशींचें हैड्राच्या बाह्यांगपेशींमध्यें रूपांतर होऊं लागतें, व त्या त्याप्रमाणें बहिर्भागीं रचना पावतात. हा गोल नंतर वाढूं लागतो व त्याच्या आंतील पेशींचें रूपांतर होण्यास सुरुवात होते. आंतील पेशी एकमेकांपासून सुटया पडूं लागून बाह्यांगपेशींच्या आंतल्या बाजूनें पसरल्या जातात. ह्या सुटया पडण्यानें गोलाच्या आंत पोकळी तयार होते, व त्या पोकळींत एक पाण्याप्रमाणें द्रव सांचतो. हा पोकळ गोल आतां दोन अस्तरांचा झालेला असतो. तो नंतर लांबोडा बनूं लागतो व त्याचें लहान नलिकेप्रमाणें रूप बनतें. कांहीं वेळानें या बंद असलेल्या नलिकेच्या एका शेवटाला एक निमुळता भाग वाढून त्याच्या शेवटीं मधोमध मुखद्वार उघडतें व त्याच्या पायथ्याशीं शाखा उत्पन्न होतात. अशा रीतीनें फलद्रूप झालेल्या

एकपेशीय अंड्यापासून बहुपेशीय नवीन हैड्रा उत्पन्न होतो.

सारांश, साधारणतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, प्राणधारण–चैतन्यद्रव्य हें सूक्ष्म ठिपक्याच्या आकारांत मूलभूत अशा व्यक्तिशः प्रकृतिरूपानें अस्तित्वांत आलें. या चैतन्यद्रव्याच्या मूलभूत ठिपक्याला पेशी असें म्हणतात. प्राण्याचें किंवा वनस्पतीचें शरीर हें एका पेशीचें बनलेलें असूं शकेल, किंवा अनंतपेशी एकत्र मिळून झालेलें असेल. यांना अनुक्रमें **एकपेशीय प्राणी** किंवा **वनस्पति** व **बहुपेशीय प्राणी** किंवा **वनस्पति** असें म्हणतात. वरील विवेचनावरून सहज लक्षांत येतें कीं, ढोकळ मानानें शारीरिक व्यापार जरी एकपेशीय प्राण्यांत व बहुपेशीय प्राण्यांत बहुतेक सारखेच होतात, तरी बहुपेशीय प्राण्यांत या व्यापारांची श्रमविभागणी किंवा वांटणी झालेली असते. बहुपेशीय प्राण्यांचे शरीरांत सर्व पेशी सारख्या न राहून त्यांचीं रूपांतरें होऊं लागतात व या रूपांतर पावलेल्या पेशी शरीराचे सर्व सरसकट व्यापार व्यक्तिशः चालवूं शकत नाहींत. कांहीं रूपांतर पावलेल्या पेशींत एखादा गुण जास्त विकास पावून त्या, तो एक तऱ्हेचा व्यापार कायम चालवूं लागतात व पुढें तोच त्यांचा व्यापार राहतो. तसेंच दुसऱ्यांत दुसऱ्या तऱ्हेचा व्यापार कायम होऊन त्या तोच व्यापार चालवूं शकतात. उदाहरणार्थ, संकोचविकास पावणें ही क्रिया चैतन्यद्रव्याच्या गुणांपैकीं एक गुण असून पुढें संकीर्णप्रकृतिरूपांमध्यें ती मांसपेशींमध्यें (musclecell.) सांठली जाऊन मांसपेशींचा हा एक व्यापारच बनून राहतो. चेतनास्फुर्ति व इंद्रियगोचरता ज्ञानपेशीच चालवूं शकतात. एकंदरींत म्हणावयाचें म्हणजे पेशींचीं रूपांतरें होऊन शरीरिक धातु व इंद्रियें बनतात, व त्यांनीं निरनिराळे व्यापार करण्याची योजना अमलांत येते. तेव्हां पेशींचीं रूपांतरें होणें म्हणजे त्यांचे गुणधर्म बदलणें होय, व याच गोष्टीला शारीरिक श्रमविभागणी म्हणतात. ही श्रमविभागणी ज्या मानानें जास्त पूर्णत्वानें झालेली असेल, त्या मानानें त्या प्राण्याचें शरीर उच्च दर्जाचें असें समजावयाचें. तेव्हां उच्च व खालच्या दर्जाच्या प्राण्यांत फरक जो आहे तो हाच कीं, शरीरिक व्यापारांच्या संख्येंत ढोकळ मानानें पाहिलें असतां वाढ न होतां ते व्यापार उच्च दर्जाच्या प्राण्यांत सुलभ रीतीनें व जास्त पूर्णत्वानें श्रमविभागणीच्या तत्त्वावर घडवून आणतां येतात. याचप्रमाणें साधारणतः वनस्पतिसंबंधींही समजावयाचें.

वरील सर्व विवेचनावरून सहज लक्षांत आलें असेल कीं, शरीराचा मूळ पाया हा सर्व प्रकारच्या प्राण्यांत व वनस्पतींत एका पेशीनें घातला जातो; व ही मूळ पेशी विभागून जाऊन तिचे विभाग एकपेशीय प्राण्यांमध्यें किंवा वनस्पतींत अलग होऊन स्वतंत्र रीतीनें विकास पावतात व त्यांपासून एकपेशीय नवीन प्राणी किंवा वनस्पति उद्भवतात. परंतु संकीर्ण बहु-पेशीय प्राण्यांत हे मूळ पेशीचे विभाग अलग न होतां एकत्र चिकटून राहतात व पुनः पुनः विभागून जाऊन व एकमेकांला लागलेले राहून विकास पावतात, व अशा रीतीनें त्यांच्यापासून संकीर्ण बहु-पेशीय प्राणी बनला जातो. वनस्पतींचें सुद्धा असेंच असतें. तेव्हां सर्व प्रकारच्या शरीराचा मूळ पाया व घटकावयव म्हणजे पेशी होय. तिच्या रचनेसंबंधी नीट अवलोकन केलें असतां तिच्यामध्यें मुख्य तीन भाग आढळून येतात ते असेः–

(१) चैतन्यद्रव्याचा. हाच भाग महत्त्वाचा असून प्रत्येक जिवंत पेशीमध्यें थोडाबहुत प्रत्यक्ष असलाच पाहिजे. ह्याच्याशीं पुष्कळ इतर द्रव्यें सूक्ष्म कणांच्या रूपानें संकलित झालेलीं असतात.

(२) चैतन्यद्रव्याचाच, परंतु त्याच्यामध्यें केंद्रीभूत होऊन त्याचे चैतन्याचे व्यापार चालविणारा एक बिंदुरूपी भाग ज्याला चैतन्यकेंद्र म्हणतात तो. बहुश. प्रत्येक पेशीमध्यें असा एक चैतन्यकेंद्राचा भाग असतो.

(३) पेशी-वेष्टन. चैतन्यद्रव्याला वेष्टित असलेला भाग ज्याच्यामुळें पेशीची आकृति स्वतंत्रतेनें दिसून येते. हें वेष्टन प्राण्यांच्या शरीरांतील पेशींमध्यें बहुशः चैतन्यद्रव्याखेरीज एखाद्या निराळ्या द्रव्याचें झालेलें

नसून चैतन्यद्रव्याच्याच पृष्ठावरील भागांत थोडा फरक होऊन झालेलें असतें. वनस्पतींच्या शारीरिक पेशींमध्यें मात्र हें वेष्टन निराळ्या द्रव्याचें झालेलें असतें. व तें चैतन्यद्रव्यानेंच तयार केलेलें असतें. हे निरींद्रिय आहे. ह्या गोष्टीला अपवाद आहेत, परंतु येथें साधारण विवेचन केलेलें आहे.

वर सांगितलेल्या तीन भागांशिवाय वनस्पतींच्या शरीरांतील पेशींमध्यें चैतन्यद्रव्याचेचबनलेले परंतु स्पष्टपणें अलग असे दिसणारे खास लहान मोठे ठिपके पेशीचैतन्यद्रव्यांतच रुतून असलेले असे झालेले असतात, व त्यांच्यापैकीं कांहींमध्यें रंगीत द्रव्यें तयार होतात. उदाहरणार्थ, झाडांत नेहमींचा आढळणारा हिरवा रंग–ज्याला हरितरंजन ( chlorophyl ) म्हणतात तो–अशा चैतन्यद्रव्याच्या ठिपक्यांशीं संलग्न झालेला असतो.

दुसरी गोष्ट ही कीं, वनस्पतींच्या पेशीमध्यें विशेषतः जलविवरें तयार होतात व तीं सर्व एकवटून त्या पेशीं-मध्यें मधोमध एक मोठी पोकळी बनते. या पोकळीच्या आंत पाण्याच्याप्रमाणें क्षारयुक्त द्रव्य सांठतें. याला पेशीद्रव (Cellsap) म्हणतात.

पेशींचे आकार निरनिराळे असूं शकतात व बनतात आणि त्यांचीं रूपांतरें होऊं लागलीं म्हणजे त्यांच्यांत पुष्कळच फरक होतो. श्रमविभागणींच्या तत्त्वानुरूप पेशींचें रूपांतर होऊन झालेले जे समूह त्यांना शारीरिक धातु म्हणतात, व या शारीरिक धातूंची वाढ कांहीं नियमानुसार शरीर बनत असतांना होत असते व त्यांचे व्यापारही निराळे निराळे पडतात. जसें, स्नायु (muscle) संयोजकधातु, ज्ञानेंद्रियसमूह इत्यादि. येथें मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, हे सर्व निरनिराळे शारीरिक धातु त्यांची पूर्ण वाढ झाल्या-वर त्यांच्या घटकरचनेंत कितीही फरक झाला असला तरी, प्रथमतः अगदीं सारख्या असलेल्या पेशींतून बनून आलेले असतात.

आतां वनस्पतींविषयीं विचार केला तर, त्यांच्या शरीराची उत्पत्ति ही एकाच पेशीपासून झालेली असते, व त्यांच्या शरीराची घटनाही पेशीमय झालेली असून त्यांच्या शरीरगुणधर्मानुरूप त्यांच्यांत शारीरिकधातु बनलेले असतात. त्यांचा एकंदर आयुष्यक्रम ताडून पाहिला असतां त्यांच्यामध्येंही प्राण्यांच्याप्रमाणें बहुतेक क्रिया घडून येत असतात. त्यांची वाढ होण्यास त्यांना अन्नाची जरूरी आहे. श्वासोच्छ्वासाची क्रियाही त्यांच्यांत चालू असते. जरी तिचें प्रमाण त्यांच्यामध्यें कमी असलें तरी ती क्रिया ते जिवंत राहण्यास आवश्यक आहे. प्रजोत्पत्ति त्यांच्यांत सुद्धां चालू असते. तर वनस्पति आणि प्राणी या दोहोंमध्यें फरक काय आहेत, हें जाणणें आवश्यक आहे. स्थूलमानानें पाहिलें असतां त्यांच्या शरीराच्या घटकपेशींचें पेशीवेष्टन'हें वर सांगितल्या-प्रमाणें बहुशः–निरींद्रिय पदार्थाचें झालेलें असतें, व ते टणक असल्याकारणानें त्यांच्या शारीरिक पेशींच्या आंत अन्नाचें घन-कण जाऊं शकत नाहींत. तेव्हां द्राव्यरूपांत व वायूच्या रूपांत असलेलें अन्न ते शोषून घऊं शकतात. म्हणजे वनस्पति आपली उपजीविका हवेंतील कार्बोनिक आसीड वायु व जमिनींतील पाण्यांत द्राव्य झालेले क्षार यांच्यावर करतात. यांच्या शरीरांत अन्नपचननलिकाही नाहीं, किंवा मलोत्सर्ग करणारीं इंद्रियेंही नाहींत. तेव्हां अन्नाचें पचन होऊन चैतन्यद्रव्याची वाढ कशी होते हें जाणलें असतां वनस्पति व प्राणी यांच्यामध्यें जो मुख्य फरक आहे तो लक्षांत येईल. त्यांच्या चैतन्यद्रव्यांत व प्राण्यांच्या चैतन्यद्रव्यांत रासायनिकरीत्या कांहींच फरक नाहीं. प्रथमतः नेहमींचे दृष्टोत्पत्तीस पडणारे वृक्ष, वेली, इत्यादि उच्च दर्जाचे वनस्पतींसंबंधी विचार केला तर त्यांच्यामध्यें हरितरंजन हें द्रव्य प्रामुख्यानें हजीर असल्याचें दिसून येतें. हें त्यांच्या शारीरिक पेशींमध्यें पेशीचैतन्यद्रव्यांत (cytoplam) त्याचे खास बनलेले लहान मोठे ठिपक्यांत तयार होऊन त्या ठिपक्यांमध्यें विरलेलें असतें. हे हरितरंजनयुक्त चैतन्यद्रव्याचे ठिपके विशेषतः पानांमध्यें पुष्कळ प्रमाणानें झालेले असतात व म्हणूनच पानांचा रंग हिरवा दिसतो. या

हरितरंजनयुक्त चैतन्यद्रव्याच्या ठिपक्यांमुळें ह्या वनस्पतींना आपले जीवनाचें पोषण करण्यास एका तऱ्हेनें विशिष्ट शक्ति प्राप्त झालेली असते. ती अशी दिवसा सूर्यप्रकाश पडल्यावर सूर्यकिरणांतील कांहीं किरणरूपी शक्ति हें हरितरंजन शोषून घेते व त्याच्याशीं संलग्न असलेल्या चैतन्यद्रव्याच्या ठिपक्याला ती मिळवून देते. या शक्तीच्या साह्यानें तो हरितरंजनयुक्त चैतन्यद्रव्याचा ठिपका हवेंतील शोषून घेतलेल्या कार्बानिक आसीड वायूचें पृथक्करण करूं शकतो व लगेच जमिनींतून शोषून घेतलेल्या पाण्याशीं त्या कर्बानचें मीलन करून त्याचें एक शर्करामय द्रव्य बनवितो. या प्रकारानें बनविलेल्या शर्करामय द्रव्यांपासूनच पुढें(starch) सत्त्व किंवा खळ बनली जाते व तिचा वनस्पतीला अन्नाप्रमाणें उपयोग होतो. हवेंतील कार्बानिक आसीड वायूचें पृथक्करण फक्त सूर्यप्रकाश असतांना म्हणजे दिवसास व ज्या पेशींत हरितरंजन आहे त्यांतच होतें. पुन्हां तें होत असतांना प्राणवायु जो निराळा पडतो तो वायुरूपानें वनस्पतीच्या शरीरांतून बाहेर पडून हवेंत मिसळून जातो. याप्रमाणें दिवसा वनस्पति या व्यापारांत हवेची शुद्धता घडवून आणतात. या तऱ्हेचा व्यापार प्राणी घडवून आणूं शकत नाहींत. कारण त्यांच्यामध्यें हें हरितरंजन बनलेलें नसतें. प्राण्यांना शर्करामय द्रव्यें किंवा सात्त्विक अथवा खळमय द्रव्यें उत्पन्न करण्याची शक्ति नाहीं. त्यांना या द्रव्यांसाठीं या वनस्पतींवरच अवलंबून राहवें लागतें. शिवाय चैतन्यद्रव्याची वाढ होण्यास जें नैट्रोजन मूलद्रव्य लागतें तें वनस्पति जमिनींतून नैट्रेट या क्षाररूपानें पाण्याबरोबर द्राव्यरूपांत शोषून घेतात. हे नैट्रेटक्षार, म्हणजे यवक्षार, सोराखार इत्यादि, जमिनींत थोड्याबहुत प्रमाणानें मुरलेले असतातच, व झाडांचीं मुळें त्यांचें द्राव्यरूपांत शोषण करतात. हें शोषून घेतलेलें क्षारयुक्त द्रव्य झाडांच्या स्कंधांतून व फांद्यांतून वर चढून पानांत येतें; व सूर्यप्रकाशांतच जेव्हां सत्त्व तयार होतें तेव्हां त्या ठिकाणींच बहुशः पृथक्करणक्रिया व मीलनक्रिया यांच्या साह्यानें त्यांच्यापासून झाडें चैतन्यद्रव्योत्पादक ओजसद्रव्यें(Nitrogenous) तयार करतात व त्यांचा उपयोग झाडांची वाढ होण्यास होतो. अशा रीतीनें जमिनींतील नैट्रेट क्षारापासून ओजस किंवा मांसोत्पादक द्रव्यें (proteids) तयार करून चैतन्यद्रव्याची वाढ घडवून आणण्याची शक्ति फक्त झाडांनाच आहे. तशी शक्ति प्राणिमात्राला नाहीं. प्राण्यांना ह्या तऱ्हेचा अन्नाचा पुरवठा होण्यास वनस्पति किंवा इतर प्राणी ह्यांच्यावरच अवलंबून राहावें लागतें. सारांश, वृक्ष वगैरे वनस्पतींना आपलें अन्न अति सुलभ अशा घटक क्षारांपासून बनवितां येतें, परंतु प्राण्यांना अशा प्रकारची शक्ति नसल्याकारणानें तसें करतां येत नाहीं. आतां अळंबें ( mushrooms ) वगैरेसारख्या कांहीं हरितरंजनरहित वनस्पति आहेत. त्यांना मात्र वर सांगितलेलें दोन प्रकारचें अन्न तशा प्रकारच्या पृथक्करण व मीलन क्रिया घडवून आणून, तयार करण्याची शक्ति नसते. हरितरंजनाच्या अभावीं तीं सत्त्वान्न बनवूं शकत नाहींत, म्हणून शर्करासम तयार झालेल्या पदार्थांचा अन्नादाखल पुरवठा त्यांना बाहेरून व्हावा लागतो. पुनः, चैतन्यद्रव्याचें एक मूलघटकद्रव्य नैट्रोजन हें त्यांना अगदीं सुलभ अशा यवक्षार-रूपानें शोषून घेऊन त्याचें ओजस पदार्थांत रूपांतर करतां येत नाहीं; तथापि चैतन्यद्रव्याची वाढ करणारे ओजस पदार्थ त्यांना वरच्या दर्जाचे जास्त गुंतागुंतीचे क्षारांपासून तयार करण्याची शक्ति आहे. केवळ प्राण्यांप्रमाणें त्यांना मांसोत्पादकद्रव्यांवरच त्यांच्यासाठीं अवलंबून राहण्याचें कारण पडत नाहीं. स्थलसंकोचास्तव येथें याच्यासंबंधीं जास्त तपशीलवार विवेचन करतां येत नाहीं.

वर म्हटल्याप्रमाणें प्राण्यांचीं अथवा वनस्पतींचीं शरीरें एकपेशीय किंवा बहुपेशीय असतात. बहुपेशीय शरीरांतील पेशींचीं रूपांतरें होऊन त्यांचे निर-

ताळे शारीरिक धातु झालेले असतात व त्यांच्या तऱ्हे-तऱ्हेच्या रचना होऊन इंद्रियें व अवयव झालेले असतात. अशा प्रकारानें शरीर उच्च दर्जा पावतें.तेव्हां प्राणिशास्त्रांतील प्राण्यांच्या शारीरिक रचनेसंबंधीं माहिती देणें अथवा वनस्पतिशास्त्रांतील वनस्पतींच्या शारीरिक रचनेसंबंधी माहिती देणें, ही एक त्या त्या शास्त्राची बाब होय. याला शारीरशास्त्र ( Morphology ) म्हणतात. परंतु नुसत्या शरीररचनेसंबंधीं माहितीनें पूर्ण बोध होऊं शकणार नाहीं; तर प्राण्यांचे किंवा वनस्पतींचे शारीरिक व्यापार कोणते आहेत व ते कसे चालतात, याविषयींची माहितीही ग्रथित झाली पाहिजे; व ही माहिती म्हणजे त्या त्या शास्त्राची दुसरी बाब होय. याला शरीरगुणधर्मशास्त्र ( Physiology) म्हणतात. बहुपेशीय शरीराचा पाया एकाच मूल पेशीनें घातला जातो, व तिची विभागणी होऊन व त्या विभागलेल्या पेशी पुन्हां पुन्हां विभागून जाऊन एकत्रपणानें विकास पावतात, व नंतर त्यांचीं रूपांतरें होऊन बहुपेशीय शरीर बनतें. यासंबंधाची सविस्तर माहिती ही त्या त्या शास्त्राची तिसरी बाब होय. याला गर्भविकासशास्त्र ( Embryology ) म्हणतात. तेव्हां, शारीरशास्त्राच्या अनुरोधानें प्रत्येक प्राण्याची माहिती देणें आवश्यक आहे, व अशी माहिती संक्षिप्त रीतीनें एखाद्या प्राण्याबद्दल किंवा वनस्पतीबद्दल दिली असतां तिच्यावरून त्या प्राण्याचा अथवा त्या वनस्पतीचा आयुष्यक्रम ( Life History) समजला जातो.आतां प्रत्येक व्यक्तिमात्राची या तिन्ही बाबींप्रमाणें निरनिराळी माहिती देणें अशक्य असलें तरी थोड्या प्रयत्नांतीं, व प्राण्यासंबंधी अथवा वनस्पतीसंबंधी चांगलें अवलोकन केलें असतां, असें आढळून येईल कीं, या भूतलावर सारख्या सारख्या व्यक्ति पुष्कळ असून त्यांचे सर्वसाधारण असे पुष्कळ समूह करतां येतात. उदाहरणार्थ, मांजर, चित्ता, वाघ, सिंह, या जनावरांचा एक लहानसा समूह होऊं शकतो, व त्याला व्याघ्रजाति ( genus ) हें नांव देतां येईल. तेव्हां हीं विविध जनावरें या समूहाचे जातिविशेष ( species ) होत. प्रत्येक जातिविशेष हा थोड्या किंवा पुष्कळ व्यक्तींचा झालेला असतो. या समूहापैकीं एखादें जनावर ( type ) प्रतिरूप कल्पून त्याच्या शरीराचें वर निर्दिष्ट केलेल्या बाबींप्रमाणें सर्वसाधारण वर्णन दिलें असतां तें या समूहांतील सर्व व्यक्तींना लागू होतें; व अशा रीतीनें सर्व प्राण्यांचे समूह करून तें वर्णन करणें शक्य होतें. तसेंच वनस्पतींसंबंधानें आहे. आतां व्याघ्रजाति मांसभक्षक आहे, तसेंच कुत्र्याची जात पण मांसभक्षक आहे. तेव्हां या दोहों जातींमध्यें ताडून पाहून जें साम्य दिसेल तें लक्षांत आणून त्यावरून त्यांचा एक वरच्या दर्जाचा समूह बनवितां येतो; त्याला मांसभक्षक पशु असें म्हणतात. या समूहाला ( order ) गण म्हणतात. याचप्रमाणें गाई, घोडा वगैरे सारखेपणा असणारे पशूंचा एक गण होतो; त्याला खूर-युक्त पशु म्हणतात. त्याचप्रमाणें मनुष्य व मनुष्यवत् प्राण्यांचा एक गण होतो. आतां हे सर्व गण जर ताडून पाहिले तर त्यांच्यांत कांहीं प्रकारानें थोडेंसें साम्य आहे असें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां या साम्यामुळें ह्या सर्व गणांचा एक मोठा समूह बनतो; त्याला वर्ग ( class ) म्हणतात. या वर निर्दिष्ट केलेल्या गणांचा वर्ग म्हणजे सस्तनप्राणी ( mammalia ) हा होय. याप्रमाणें शरीररचना, शरीरगुणधर्म, व शरीरविकास पावणें अथवा गर्भविकास पावणें, या सर्व गोष्टींचा विचार करून प्राण्यांचे अथवा वनस्पतींचे समूह निरनिराळ्या दर्जाचे बनविणें याला वर्गीकरण म्हणतात. ही एक चवथी बाब होय; व हिला वर्गीकरणशास्त्र ( Classification ) म्हणतात. वर्गीकरणाच्या रूपानें सर्व माणसांच्या किंवा वनस्पतींच्या संबंधीं माहिती एकवटून देणें शक्य होतें.

हें वर्गीकरण करतांना एक मुख्य गोष्ट प्रमुखत्वानें पुढें येते, ती ही कीं, अगोदर प्राण्यांचे किंवा वनस्पतींचे जातिविशेष ठरले पाहिजेत; व दुसरी ही कीं, जातिविशेष म्हणजे काय, आणि ते कसे ओळखावयाचे, व ते निश्चित आहेत किंवा बदलू शकतात, ह्या गोष्टींचा निर्णय करावा लागतो. जातिविशेषांमध्यें काले-

करून फरक होतो, किंवा होत नाहीं, ही या शास्त्रांतील एक मोठी वादग्रस्त बाब आहे. याबद्दल येथें जास्त ऊहापोह करतां येत नाहीं. जातिविशेष म्हणजे थोडया किंवा बहुत व्यक्तींचा अशा तऱ्हेचा एक समूह, कीं त्याच्यांतील व्यक्तिमात्रांत सर्व मुख्य लाक्षणिक गोष्टींमध्यें अगदीं साम्य असतें, व या सर्व व्यक्ति प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीनें फलद्रूप सुप्रजा निर्माण करूं शकतात, व या प्रजेंत त्यांच्या प्रतिरूपाहून थोड्याशा प्रमाणावर होणाऱ्या जन्मसिद्ध व्यक्तिभेदामुळें(variation)थोडासा फरक दिसला तरी तो फरक वजा केला असतां ही प्रजा पूर्वजांच्या प्रमाणेंच असणारी निपजलेली असते. पुनः, प्रत्येक जातिविशेषाला मर्यादा घालणारें एक लक्षण दिसून येतें, तें हें कीं, जातिविशेषांतील व्यक्तिमात्रांत फलद्रूपता किंवा सुप्रजाजनकत्व हें विपुलतेनें दृष्टीस पडतें. परंतु तें क्वचितच निरनिराळ्या जातिविशेषांच्या व्यक्तींमध्यें दृष्टोत्पत्तीस येतें. बहुतकरून अशा व्यक्तींमध्यें संयोग झाल्यास प्रजाजनकत्व घडून येत नाहीं, व यदाकदाचित् प्रजा निष्पन्न झाली तर ती वांझ निपजते.

जरी वर सांगितलेलीं हीं लक्षणें जातिविशेषांचा निर्णय करण्यास उपयोगीं पडतात, तरी जातिविशेष निश्चित करतांना मतभेद होण्याचा बराच संभव असतो. पुन्हां, कांहीं शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें जातिविशेष हे ईश्वरप्रणीत असल्यामुळें निश्चित आहेत व त्यांत फेरफार होत नाहींत, तर इतर शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें जातिविशेष हे निश्चित असे ईश्वरप्रणीत नसून उत्क्रांतीच्या तत्त्वानुरूप झालेले आहेत, व त्यामुळें त्यांत फेरफार होऊं शकतात व नवेनवे जातिविशेष कालांतरानें बनून येतात. आद्यकालीन प्राणी व वनस्पति आज या भूतलावर ज्या स्थितींत सांपडतात त्या स्थितींतच त्या या पृथ्वीतलावर उत्पन्न झालेल्या नसून या अनंत कालामध्यें, सृष्टीच्या आरंभापासून आतांपर्यंतच्या कालीं,प्रगतिपर उत्क्रांतितत्त्वानुसार विकास पावत पावत बनलेल्या आहेत. यावरून ह्या सजीव सृष्टीच्या उत्क्रांतीचा इतिहास किती अगाध आहे,व ही उत्क्रांति कशी पायऱ्यापायऱ्यांनीं घडून आली, यासंबंधींची माहिती किती महत्त्वाची आहे, हें वाचकाच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. ह्याबद्दल तपशीलवार विवेचन येथें देणें अशक्य आहे. तरी एकंदरींत सांगावयाचें म्हणजे,उच्च दर्जाचे प्राणी व वनस्पति हे अनुक्रमें खालच्या दर्जाचे प्राणी व वनस्पति यांच्यापासून क्रमाक्रमानें प्रगतिपर उत्क्रांति पावत जाऊन बनून आलेले आहेत. ह्या गोष्टीला मुख्य पुरावा मिळतो तो तुलनात्मक शारीरशास्त्राचा, गर्भविकासशास्त्राचा, व उत्खातजीवनशास्त्राचा होय. चार्लस डार्विन यानें इ. स. १८५९ ह्या वर्षी चांगल्या तऱ्हेनें मीमांसा करून शास्त्रज्ञांची खात्री करून दिली कीं, प्राणी व वनस्पति यांची प्रगतिपर उत्क्रांति होते. येथें ह्या विषयांत जास्त खोल जातां येत नाहीं. जातिविशेषांबद्दल आधुनिक शास्त्रज्ञांचा कल, साधारणतः, त्यांच्यांत उत्क्रांतिपर फरक होतो, हें तत्त्व ग्राह्य करण्याकडे झालेला आहे.

जातिविशेष हा वर्गीकरणाचा पाया होय, व ह्या पायाचा निर्णय झाल्यावर वर्गीकरणाची इमारत बांधावयाची असते. हें वर्गीकरण करीत असतांना एक मोठी गोष्ट लक्षांत येते, ती ही कीं, प्राण्यांचे किंवा वनस्पतींचे मोठमोठाले समूह जरी निरनिराळे अलग आहेत असे दिसले तरी ते पायरीपायरीनें उन्नतावस्थेप्रत आलेले असावेत, व ते सर्व साधारणतः प्रगतिपर उत्क्रांतीच्या तत्त्वावरच झालेले असावेत. तेव्हां प्राण्यांचें किंवा वनस्पतींचें वर्गीकरण करणें म्हणजे त्यांची एक प्रकारानें वंशावळीच तयार करणें होय.



वरील तुटक विवेचनावरून आधुनिक जीवनशास्त्राची खरी कल्पना सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आली असेलच. या निबंधांत स्थलसंकोचामुळें जीवनशास्त्राचें विस्ताररूपानें पूर्ण विवेचन करणें शक्य नाहीं. हें शास्त्र म्हटलें म्हणजे प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र ह्या दोन शाखांतील एकंदरींत सर्वसाधारण तात्त्विक सिद्धांतांचें रहस्य दाखविणारें शास्त्र होय. यांत सरसकट प्राण्यांविषयीं किंवा वनस्पतींविषयीं

विचार केलेला नसतो, तर या, शास्त्राच्या तात्त्विक सिद्धांतांची फोड होण्यास व त्यांच्या अंमलबजावणीचें कार्य कोणत्या रीतीनें होत असतें हें समजून येण्यास कांहीं ठळक प्राण्यांचा व वनस्पतींचा आयुष्यक्रम संगतवारीनें यांत दिलेला असतो, व त्यावरून ते सिद्धांत कसे निघूं शकतात हें दाखविलेलें असतें.

अशा प्रकारचा शास्त्रीय पद्धतीनें विवेचन करून लिहिलेला जीवनशास्त्रावरचा एकादा ग्रंथ आमच्या मराठी वाङ्मयांत इंग्रजी अमदानी सुरू होण्यापूर्वी एकही नाहीं. संस्कृत भाषेमध्यें सुद्धां अशा प्रकारचा स्वतंत्र ग्रंथ एकही नाहीं. ह्याचें कारण हेंच कीं, या विषयाचा अशा दृष्टीनें आमच्या आर्य ऋषींनीं अभ्यास केलेला दिसत नाहीं, व त्यांचें लक्ष ह्या विषयाकडे अशा धोरणानें वेधलें गेलें नव्हतें, असें म्हणणें भाग पडतें. कांहीं थोडीबहुत शास्त्रीय पद्धतीची माहिती प्राणी किंवा वनस्पति यांच्या संबंधानें वाग्भट वगैरे वैद्यकीय ग्रंथांत आहे; तरी आधुनिक शास्त्रांच्या माहितीशीं ताडून पाहिली असतां ती फारच कमी पडते, व तिचें धोरणच निराळ्या तऱ्हेचें आहे. हिंदुस्थानांत इंग्रजी अंमल पूर्णपणें बसल्यावर व पाश्चात्य संस्कृतीशीं दाट दळणवळण झाल्यावर, व विशेषेंकरून आमच्या देशांत आंग्लवैद्यकाचा अभ्यास सुरू झाल्यावर, आमच्या लोकांचें लक्ष या विषयाकडे किंचित् लागलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पाश्चात्य देशांतही हें शास्त्र अलीकडेच पूर्णत्व पावलें आहे. मुंबई इलाख्यांत "ग्रांट मेडिकल कॉलेज" स्थापन झालें तेव्हां ह्या विषयाच्या अभ्यासाचा ओनामा सुरू झाला म्हणावयाचा. मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें बी.ए.व बी. एस् सी. या परीक्षांसाठीं जीवनशास्त्र, प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र हे विषय अभ्यासाकरितां नेमले गेले, तेव्हांपासून याचा पाया घालण्यांत आला असें म्हणतां येईल. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत जरी हे विषय नेमले गेले तरी या विषयांकडे मंडळींचें लक्ष जसें लागावें तसें लागलेलें नाहीं. कांहीं तुरळक मंडळीनें या विषयाचा अभ्यास केला व त्यांच्या श्रमामुळें या विषयासंबंधीं थोडी माहिती सर्वसाधारण समाजामध्यें पसरली. परंतु ती माहिती फारच अपूरी असून या शास्त्राच्या आधुनिक प्रगतीच्या मानानें पासंगालाही पुरणारी नाहीं. जी माहिती उपलब्ध आहे ती केवळ भाषांतररूपानें प्रसिद्ध झालेली आहे. वनस्पतिशास्त्र म्हणून या शास्त्राची एक शाखा आहे, तीवर कांहीं किरकोळ पुस्तकें मराठी भाषेंत झालीं आहेत. तीं सर्व जुन्या इंग्रजी पुस्तकांच्या आधारानें केलेलीं असल्यामुळें आजच्या कालाला ती माहिती जुनी ठरते. इंग्रजी शास्त्रीय परिभाषिक शब्दांना मराठींत अनुरूप पारिभाषिक शब्द ठरलेले नसल्याकारणानें भाषांतर करतांना किंवा एकादा लेख लिहितांना मोठा घोटाळा उडतो व विविधता उत्पन्न होते, व ती तशी झालेली दिसून येते. अलीकडे सरकारी विद्याधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं कांहीं शाळांतील क्रमिक पुस्तकांमध्यें सजीव सृष्टिज्ञानासंबंधी स्वल्प अशी शास्त्रीय माहिती दिलेली आढळून येते. परंतु दिलगिरीची गोष्ट ही आहे कीं, हें मराठी वाङ्मय निव्वळ भाषांतररूपानें तयार केलेलें असून त्यांत वर सांगितलेला पारिभाषिक शब्दांच्या संबंधीं घोंटाळा झालेला आहे. शिवाय हें भाषांतराचें काम तज्ज्ञ मनुष्याजवळून करून घेतल्याचें दिसत नाहीं. कारण शास्त्रीय विषयाच्या ज्ञानाच्या अभावीं भाषांतरांत चुका झालेल्या आहेत.

जीवनशास्त्राची दुसरी शाखा म्हणजे प्राणिशास्त्र. ह्याचीही तीच स्थिति होय. मराठीमध्यें प्राणिशास्त्रावर स्वतंत्र असा एकही ग्रंथ निर्माण झालेला नाहीं. कांहीं ठळक जनावरांसंबंधी माहिती भाषांतररूपानें प्रसिद्ध झालेली आहे. त्या सर्वांत 'हिंदुस्थानांतील सर्प' हें पुस्तक कांहींसें बरें आहे. लेखक कै. वा. वि. गो. चिपळोणकर हे मोठे प्राणिशास्त्रज्ञ नव्हते, तरी त्यांचें पुस्तक शास्त्रीय पद्धतीनें लिहिलेलें असून पुष्कळ उपयोगी आहे. त्यांनीं वापरलेले पारिभाषिक शब्द पुष्कळ उपयोगी व सुलभ असून त्यांतील बरेचसे शब्द कायम असे ठरवितां येण्यासारखे आहेत. जती लोकांच्या बरोबर केलेली त्यांची सर्व खटपट व त्यांनीं मिळ-

विलेला अनुभव सर्वसाधारण जनतेच्या उपयोग-दृष्टीनें जरी विशेष नसला तरी त्यांची एकंदर माहिती विश्वसनीय होय. सविष व निर्विष सर्प ओळखण्याची माहिती जी त्यांनीं दिली आहे ती आजच्या काळाला जुनी असून व्यावहारिकदृष्ट्या फारसी उपयोगी नाहीं. आधुनिक सर्पशास्त्रवेत्ता कर्नल वॉल ह्यानें जें पुस्तक ह्या विषयावर छापलें आहे त्याच्यांत सर्वसाधारण जनतेला सुलभ रीतीनें सविष व निर्विष सर्प चटकन ओळखतां यावे अशी माहिती दिली आहे; व सरकारी सर्व ठिकाणच्या दवाखान्यांतून ही माहिती सचित्र प्रकाशाच्या रूपानें प्रसिद्ध करण्यांत आलेली आहे.

जीवमेंद्रियशास्त्र म्हणून एक लहानसें पुस्तक रा. मराठे यांनीं इंग्रजी इंद्रियविज्ञानशास्त्राचें भाषांतर करून छापलेलें आहे. हें पुस्तक सुधारून छापिलें असतां फार उपयोगी पडण्यासारखें आहे. आतां खुद्द जीवनशास्त्रावर कै. प्रो. बि. बा. भाटे, बी. ए., यांनीं लिहिलेलें "जीवनशास्त्राचीं सामान्य तत्त्वें" हें पुस्तक झालेलें आहे. ग्रंथकारानें जे पारिभाषिक शब्द वापरले आहेत, त्यांपैकीं पुष्कळ आमच्या मतें अग्राह्य आहेत. ग्रंथकार प्रस्तावनेंत म्हणतात कीं, प्राणी आणि वनस्पति यांच्यासंबंधी सामान्य माहिती अगदीं सोप्या भाषेंत देतांना पारिभाषिक शब्दांना देववेल तितका फांटा दिला पाहिजे. हें तत्त्व जरी ग्राह्य आहे तरी शास्त्रीय अर्थ साधण्यास व विषयाची सुसंगतता राहण्यास जिकडे ते शब्द आवश्यक आहेत तिकडे ते वापरलेच पाहिजेत. एकंदरींत विषय सुलभ होणें हें पारिभाषिक शब्दांच्या अडचणीवर अवलंबून नसून ते कुशलतेनें वापरतां येणें यावर अवलंबून आहे. पुनः ग्रंथकार म्हणतात कीं, विषय गोड, मनोरंजक व सुलभ करण्याकरितां उपमांची योजना जरा बऱ्याच ढिल्या हातानें केलेली आहे. आमच्या मतें या पुस्तकांत त्यांचा अतिरेक झालेला आहे. त्यामुळें कित्येक ठिकाणीं विषयाची सुसंगतता नाहींशी झालेली दिसते. या गोष्टी खेरीजकरून पुस्तक एकंदरींत बरें आहे, व तें निवळ भाषांतर आहे असें म्हणतां येणार नाहीं. सदर पुस्तक छापून वीस वर्षें होऊन गेलीं आहेत, व या दीर्घ कालावधींत जीवनशास्त्रामध्यें पुष्कळ प्रगतिही झाली आहे. तेव्हां जीवनशास्त्रावर मराठींत एकादा नवीन ग्रंथ होणें फार इष्ट आहे.

विनायक नानाभाई हाटे,



# वनस्पति-शास्त्राचा स्थूल इतिहास.

[ प्रो. रघुनाथ विष्णु दामले, बी. ए., शेतकी कॉलेज, कानपुर. ]

**व्याख्या:—**' अपुष्पा: फलवन्त: ये ते वनस्पतय: स्मृता:' अशी स्मृतिकारांनीं 'वनस्पति' शब्दाची व्याख्या दिली आहे. म्हणजे ज्यांस फुलें न येतां फळें लागतात, त्यांस वनस्पति म्हणावें. परंतु व्यवहारांत साधारणपणें ' वनस्पति ' शब्दाचा अर्थ ' औषधीय वनस्पति ' असा समजण्यांत येतो. अशा स्थितींत स्मृतिकारांचा अथवा व्यावहारिक वनस्पति शब्दाचा संकुचित अर्थ घेतला तर सर्व सपुष्प अथवा विपुष्प वर्गातीस [illegible] वेली, इत्यादि जातींचा किंवा शैवाल, पाणकेश, आलिंबी इत्यादि जातींचा पूर्ण अंतर्भाव वनस्पति शब्दांत न होतां, केवळ त्यांपैकीं फुलें न येतां फळें उत्पन्न करणाऱ्यांचा किंवा औषधीय वनस्पतींचा बोध वनस्पति शब्दानें होईल. वास्तविक वन म्हणजे अरण्य अथवा जंगल. अर्थात् अरण्यांत अथवा अरण्यसदृश जागेत उत्पन्न होणाऱ्या सर्व नैसर्गिक उद्भिज्जांचा अंतर्बोध 'वनस्पति' शब्दांत होणें अवश्य आहे, व याच अर्थानें आम्ही वनस्पति शब्दाचा उपयोग करणार आहों.

## प्राचीन माहिती.

मनुष्यप्राण्याच्या प्रथम उत्पत्तीपासून वनस्पतींचें ज्ञान त्याला असलें पाहिजे. कारण वनस्पतीवरच त्याची उपजीविका असे. कंदमुळांचा, पानांचा अथवा फळांचा उपयोग करून आपला निर्वाह करणें त्या प्राथमिक स्थितींत मनुष्यप्राण्यास भाग असे. असजसा वनस्पतींशीं त्याचा अधिक परिचय होत गेला, त्याप्रमाणें वनस्पतीकडून मिळणाऱ्या वेगवेगळ्या खाद्य वस्तूंबद्दल त्यास अधिक माहिती होत गेली. खाद्यादि वस्तु वेळेवर सतत मिळविण्याच्या त्याच्या मनांतील कल्पनेबरोबर कृषीची कल्पना उदय पावली. तसेंच वनस्पतींच्या उपयोगानें जखमादि दुखापती बऱ्या होतात अशा अनुभवामुळें वनस्पतींच्या औषधीय गुणांची कल्पना त्यास अधिकाधिक होत जाऊन त्या कल्पनेचा वैद्यकशास्त्रांत विकास झाला. म्हणजे क्रमाक्रमानें वनस्पतींच्या वेगवेगळ्या प्रकारच्या उपयोगाचा परिचय मनुष्यप्राण्यास जसजसा होत गेला, तसतशी वनस्पतिशास्त्राच्या भिन्न भिन्न अंगांच्या शास्त्रीय बाजूची उत्पत्ति होत गेली. वेदकालांत सोमादि वनस्पतींचें ज्ञान तत्कालीन ऋषींना चांगलें होतें. त्यांनीं सोमवनस्पतीचें वर्णन वेदाच्या ऋचेंत वेगवेगळ्या शब्दांनीं गायिलें आहे. आयुर्वेदांत वनस्पतींच्या औषधीय उपयोगाचें वर्णन केलें आहे. म्हणजे वेदकालीन लोकांना कांहीं वनस्पतींचें औषधीय तसेंच अन्नदृष्ट्या व्यावहारिक उपयोगी ज्ञान होतें यांत संशय नाहीं. अश्विनीकुमारासारखे वैद्य त्या कालीं झाले. त्यांना वनस्पतींच्या औषधीय गुणांचें साकल्यानें ज्ञान नव्हतें असें म्हणणें धाष्टर्याचें होईल. परंतु हल्लीं जसा वनस्पतींच्या अंतर्बाह्य भागांच्या एकंदर गोष्टींचा विचार वनस्पतिशास्त्रांत केला जातो, त्याप्रमाणें त्यावेळीं विचार होत असेल असें वाटत नाहीं. केवळ वनस्पतीचा औषधीय उपयोग कोणता, अथवा व्यवहारांत अन्नासाठीं तिचा उपयोग करितां येतो किंवा नाहीं, एवढ्याच दृष्टीनें विचार त्या वेळीं होत असेल. वनस्पतींच्या बाह्यांगाचें तसेंच अंतरंगाचें वर्णन प्रत्येक अंगाचा वनस्पतींच्या आयुष्यक्रमांत होणारा उपयोग, वनस्पतींचा परस्परसंबंध अथवा सृष्टींतील त्यांचा विकास, त्यांचे शारीरिक भेद व वर्गीकरण, प्राकृतिक गोष्टींमुळें त्यांच्या शरीररचनेवर दिसणारा परिणाम, त्यांचा भूतलांतील प्रसार, वगैरे शेंकडो प्रश्नांचा सोपपत्तिक विचार जसा प्रस्तुत वनस्पतिशास्त्रांत केला जातो, तशा प्रकारचा वनस्पतिशास्त्रावर विचार त्या कालीं झाला नव्हता. औषधीय ज्ञान अथवा अन्नदृष्ट्या उपयोग यापेक्षां अधिक माहिती तेव्हां नव्हती. जसें जसें लोकांच्या परिस्थितींत परिवर्तन होत गेलें त्याप्रमाणें त्याचा परिणाम शास्त्रीय शोधक विचारांवरही दृष्टीस पडत गेला.

प्राचीन इजिप्शियन व ग्रीक लोकांना सुद्धां वनस्पति-शास्त्राची थोडी बहुत माहिती होती. परंतु त्यांचेंही लक्ष्य इतरांप्रमाणें वनस्पतींच्या खाद्योपयोगी अथवा औषधीय गुणवैशिष्टयाकडे असे. ख्रिस्ती शकाच्या सुमारें तीनशें वर्षांपूर्वी थियोफ्रेस्टस् नांवाच्या ग्रीक शास्त्रज्ञानें 'वनस्पतींचा इतिहास' नांवाचा एक ग्रंथ लिहिला होता; व त्या ग्रंथांत त्यानें पांचशें वनस्पतींचा औषधीय दृष्टीनें विचार केलेला आहे. डायस्कोरिडीज्, प्लिनी वगैरे शास्त्रज्ञांनीं अशाच प्रकारचे ग्रंथ तयार केले होते. बृहत्संहितेचा काल साहाव्या शतकाचा जरी कल्पिला तरी त्या ग्रंथांतील वनस्पतींसंबंधी विचारांची दिशा अलीकडील शास्त्रीय वळणावर गेली आहे. अमरकोशांतील वनौषधिवर्गाच्या शब्दमालिकेवरून पाहतां त्याकालीं वनस्पतींचीं किती तरी नांवें लोकांस माहित होतीं. वाग्भट, सुश्रुत, चरक वगैरे ग्रंथांत वनस्पतिकांडाचा एक वेगळा अध्याय असून त्यांत वनस्पतींच्या वेगवेगळ्या गुणधर्मांचें विवेचन केलें आहे. उदयनानें वनस्पतींना जन्म, तारुण्य, जरा व मृत्यु ह्या चार अवस्था प्राण्यांप्रमाणें सारख्याच असल्याचा उल्लेख केला आहे. गुणरत्नानें वृक्षआयुर्वेद ग्रंथांत वनस्पतींसंबंधी जें वर्णन केलें आहे, त्यावरून पाहतां त्याला वनस्पतींच्या जीवनक्रियेविषयीं माहिती पुष्कळ होती असें कबूल करणें भाग पडतें. शरीर-वाढ, सात्मीकरण, उत्तेजनात्मक संवेदना, गति, रोगस्थिति वगैरे गोष्टींविषयीं साकल्यविवेचन त्यानें आपल्या ग्रंथांत केलें आहे. इंद्रियविज्ञानविषयासंबंधीं त्याची माहिती व अनुमानें आधुनिक शास्त्रीय शुद्ध स्वरूपाचीं होतीं ह्यांत संशय नाहीं.

## वर्गीकरण.

युरोपखंडांतील शास्त्रज्ञांनीं सुद्धां अठराशें शतकापर्यंत वनस्पतिशास्त्रांत जी कांहीं प्रगति केली ती बहुतेक वनस्पतींच्या शरीरवर्णनासंबंधींच होती. निरनिराळ्या वनस्पतींचा नामनिर्देश ठरविण्यांत व त्यांची जंत्री तयार करण्याकडे तत्कालीन शास्त्रज्ञांचें लक्ष असे. वनस्पतींच्या तुलनात्मक वर्णनामुळें कांहीं वनस्पतींत परस्पर निकटसाम्य व आप्तसंबंध असतो हें त्यांच्या सहज लक्षांत येऊं लागलें व त्यांचा परिणाम वनस्पतिवर्गीकरणांत झाला. मनुष्य स्वभावतःच वर्गीकरणशील आहे. यामुळें परस्परसाम्य असणाऱ्या वनस्पतींचा वर्ग वेगळा व साम्य नसणाऱ्या वनस्पतींचा वर्ग वेगळा, अशा कल्पनेस वाव मिळून वर्गीकरणपद्धतीस सुरवात झाली, व ह्या रीतीनें 'कृत्रिम' व 'नैसर्गिक' पद्धति अस्तित्वांत आल्या. कृत्रिम वर्गीकरणपद्धतींत वनस्पतींचे एक अथवा थोडे निवडक ठराविक रूपविशेष लक्ष्यांत घेऊन धर्म व मालिका ठरविलेल्या असतात. ह्या पद्धतींत वनस्पतींच्या इतर विशेष गुणांकडे लक्ष पुरविलें जात नाहीं. म्हणून वर्ग व मालिका ह्यांत समाविष्ट केलेल्या वनस्पतींत कांहीं ठराविक रूपविशेषांपेक्षां अधिक साम्य नेहमीं असतें असें नाहीं. शब्दकोशांत जवळ जवळ असणाऱ्या शब्दांच्या परस्पर अर्थाचा संबंध नसतांही केवळ शब्दाच्या प्रथम वर्णाप्रमाणें शब्दरचना केलेली असते. तसेंच कृत्रिम वर्गीकरणपद्धतींतील वर्गमालिकेंत असणाऱ्या वनस्पतींची रचना असते. कृत्रिम वर्गीकरणपद्धतीप्रमाणें आपल्याला एखाद्या वनस्पतीचें नांव शोधून काढितां येतें. परंतु त्याबरोबर तत्संबंधीय इतर गोष्टी लक्षांत येणें शक्य नसतें. कांहीं शास्त्रज्ञांनीं एक रूपविशेषाऐवजीं पुष्कळ रूपविशेषांचा विचार करून व परस्परांशीं संबंध असणाऱ्या वनस्पतींची जंत्री तयार करून कृत्रिम वर्गीकरणपद्धति सुधारण्याचा प्रयत्न केला. उलट पक्षीं, नैसर्गिक पद्धतीमध्यें गणांच्या सर्व रूपविशेषांचा विचार केला जाऊन बऱ्याच गोष्टींत साम्य असणाऱ्या गणांचा समावेश एका मालिकेंत केला जातो. तसेंच त्याच तत्त्वावर मालिका उभारून त्यापासून वर्गादि मोठे विभाग केले जातात. म्हणजे शारीरिक स्थूल सूक्ष्म गुणांचा तुलनात्मक विचार केला जाऊन साम्य असणाऱ्या वनस्पतींचाच वर्ग अथवा संघ एकत्र करण्याकडे नैसर्गिक वर्गीकरणपद्धतीचें मुख्य तत्त्व असतें. नैसर्गिक पद्धतीनें वनस्पतीचें नुसतें नांवच कळतें असें नाहीं, तर गणांतील अथवा मालिकेंतील वनस्पतींचा परस्पर आप्तसंबंधही त्याबरोबर लक्षांत येतो. म्हणूनच नैसर्गिक वर्गीकरणपद्धत कृत्रिम वर्गीकरण-

पद्धतीपेक्षां अधिक श्रेष्ठ व उपयुक्त असते, व त्याच पद्धतीचा अनुवाद सर्व शास्त्रज्ञ आजकाल करीत आहेत. सिझलपिनियस, कॅस्पर, जंग, बॅाव्हिन, मॅारिसन, टूर्नफोर्ट, लायनियस वगैरे मंडळी कृत्रिमवर्गीकरणपद्धतीचे पुरस्कर्ते होते. यद्यपि बहुतेकजण कृत्रिम पद्धतीचे अनुयायी म्हणवीत तथापि निर्णायक रूपविशेषांची संख्या अधिकाधिक योजून ते अप्रत्यक्ष रीतीनें नैसर्गिक वर्गीकरणपद्धतीलाच मदत करीत. लायनीयसला आपली कृत्रिम वर्गीकरणपद्धति नीरस आहे, याची जाणीव होती. तथापि त्यानें नैसर्गिक पद्धतीचा अवलंब न करितां इतरांप्रमाणें कृत्रिम पद्धतीचाच अनुवाद केला. रे, ज्युस्यु, कॅन्डोल, ब्राउन, लिंड्ले, हूकर, इंग्लर, वगैरे शास्त्रज्ञ प्रथमपासूनच नैसर्गिक पद्धतीचे पुरस्कर्ते होते. सूक्ष्मदर्शक यंत्राचा शोध लागल्यावर जसजसा त्याचा उपयोग वनस्पति पाहण्यांत होऊं लागला, तसतसें विपुष्प वनस्पतींचें वर्गीकरण करणें अधिक सोईचें झालें. हॅाफमीइस्टरचे शोधामुळें विपुष्प जातीच्या वनस्पति लोकांसमोर अधिक येऊं शकल्या. तसेंच त्यांच्या जननेंद्रियांसंबंधी माहिती अधिक मिळून उच्च सपुष्प व विपुष्प वर्गीतील वनस्पतींच्या जननेंद्रियांत साम्य असून गर्भधारणक्रिया व त्यानंतर बीजवृद्धि ह्या विषयासंबंधी अधिक प्रकाश त्याच्या शोधामुळें पडला; व ह्या गोष्टीचा परिणाम वर्गीकरणपद्धतीवर झाल्याशिवाय राहिला नाहीं.

### बगीच्यांची वर्गीकरणास मदत.

आपल्या देशांत फळझाडांच्या बागा अथवा सुवासिक फुलांचीं रम्य उद्यानें करण्याची जशी पद्धत असे, त्याप्रमाणें औषधीय वनस्पतींसंबंधी खास बगीचे केल्याचें कोठें ऐकिवांत नाहीं. मग वर्गीकरणपद्धतीवर सर्व वनस्पतींच्या खास बागा कोठून असणार ! अशा खासगी अथवा सार्वजनिक बगीच्यांत वेगवेगळ्या वनस्पतींचें तुलनात्मक दृश्य प्रत्यक्ष त्या जागीं पाहण्यास मिळतें. शिवाय एकाच नांवाच्या भिन्न वनस्पति ओळखण्यास त्या जागीं सोईचें झालें असतें. युरोपखंडांत अशा बागा करण्याची पद्धत निदान सोळाव्या शतकापासून दिसत आहे. ज्या ठिकाणीं वैद्यकीय विद्यापीठें असत, त्या ठिकाणीं वनौषधि ओळखण्यास कांहीं वनस्पतींची बाग मुद्दाम तयार करवीत. पॅडूआ शहरीं अशा प्रकारची बाग इ.स. १५४५ सालीं केल्याचा उल्लेख आहे. त्यानंतर मोठमोठ्या शहरीं स्थानिक विद्यापीठांनीं आपल्या विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां असले बगीचे तयार करविले. लिप्झिक्, फ्लॅारेन्स, बोलोना, स्ट्रासबर्ग, पिसा, पॅरिस, डब्लिन्, एडिंबरो, क्यू वगैरे ठिकाणीं अशा प्रकारचे जुने बगीचे पाहण्यास सांपडतात. यद्यपि प्रथम असल्या बगीच्यांत केवळ वनौषधींचा भरणा असे, तथापि पुढें पुढें सर्व प्रकारच्या वनस्पतींची लागण त्या बागांत होत गेली. कदाचित् आपल्या देशांत वनौषधि गुप्त राखण्याची प्रवृत्ति असल्यानें, तसेंच वनौषधींचा गुण षट्कर्णी झाल्यास तो गुण नाहींसा होईल ह्या भ्रामक समजुतीमुळें, सार्वजनिक अथवा खासगी वनौषधींचे खास बगीचे करण्याचा कोणीही प्रख्यात वैद्यराजांनीं प्रयत्न केला असल्याचें दिसत नाहीं. एरव्हीं राजे लोकांच्या आश्रयानें असले बगीचे, कोणीं प्रयत्न केला असतां, खचित निर्माण झाले असते. जेथें रम्य उद्यानें अथवा पुष्पवाटिका शहरोशहरीं असत, त्या जागीं असले स्वतंत्र बगीचें निर्माण होणें अशक्य नव्हतें. बगीचे न होण्याचें कारण कोणतेंही असलें तरी त्याच्या अभावीं वनस्पतिशास्त्राच्या प्रगतीस आळा बसला, ही गोष्ट नाकबूल करितां येणें शक्य नाहीं. युरोपखंडांतील बगीचे राखण्याच्या पद्धतीमुळें वनस्पतींच्या वर्गीकरणास सोईचें झालें. जेथें प्रत्यक्ष वनस्पति पाहण्याची सोय नसे त्या ठिकाणीं वनस्पति दुसरीकडून आणवून त्या वाळविल्या जात, व अशा वाळलेल्या वनस्पति एकत्र केल्या जात. ह्या रीतीनें निरनिराळ्या वनस्पति प्रत्यक्ष जरी जिवंत स्थितींत पाहण्यास सांपडत नसत, तथापि वाळलेल्या स्थितींत त्या पाहण्यास सांपडून त्यांची कल्पना

करून घेतां येई. वनस्पति वाळवून जमा करण्याची चाल प्रथम इटालियन शास्त्रज्ञांनीं सुरू केली. बगीचे करून, किंवा वाळविलेल्या वनस्पति जमा करून, अथवा वनस्पतींचीं हुबेहुब चित्रें तयार करवून, वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करण्याकडे युरोपीय देशांतील शास्त्रज्ञांची प्रवृत्ति होती. अगदीं अलीकडे याच पद्धतीनें आपल्या देशांत कांहीं बागा तयार झाल्या आहेत, व त्यामुळें वनस्पतिशास्त्रास थोडें प्रोत्साहन मिळालें आहे. शाहरणपूर, कलकत्ता, जयपूर, नागपूर, मुंबई, पुणें, बंगलोर वगैरे ठिकाणीं वनस्पतींच्या बागा शास्त्रीच पद्धतीनें तयार केलेल्या आहेत. त्याच प्रमाणें कलमें-झाडें, फुलें, बीं, बियाणें पुरविणाऱ्या कांहीं व्यापारी दृष्टींच्या बागाही अस्तित्वांत आल्या आहेत. ह्या सर्वांचा परिणाम वनस्पतिशास्त्राच्या प्रगतीस कारणीभूत झाला आहे असें म्हणणें भाग आहे.

### अंतररचना.

छेद घेऊन शरीरांतररचनेची माहिती अगदीं अलीकडील काळापर्यंत फारशी कोणास नव्हती. त्याचें कारण अंतररचना पाहण्याचें साधन जें सूक्ष्मदर्शक यंत्र, त्याचा शोध पूर्वी लागला नव्हता. जेव्हां त्या सूक्ष्मदर्शक यंत्राचा शोध लागला व त्यांतून सूक्ष्म पदार्थ पाहण्याची शक्ति अधिक वाढली, तेव्हां छेदशास्त्राचा अभ्यास करणें अधिक सोईचें झालें. तोंपावेतों सर्व ज्ञान अनुमानधबक्याचें होतें. त्या वेळीं वनस्पति कुजवून अथवा शिजवून तिच्या अंतर्भागाची कल्पना करावी लागे. माल्फी घी व ग्र्यू ह्या शास्त्रज्ञांनीं शरीररचनेसंबंधी पुष्कळ शोध केला; व त्यांचे शोधच ह्या विषयाचे आधारभूत पाये समजले जातात. रॉबर्ट हूकनें ह्या विषयावर एक ग्रन्थ लिहिला आहे, त्यांत वनस्पतिशरीर पेशीमय असतें वगैरे वर्णन केलें आहे; व त्यानें प्रथम पेशी अथवा 'सेल' हें नांव चालू केलें, व तें अजूनही चालत आहे. तथापि शरीर-रचनेचें खरें मर्म त्या वेळीं उकललें गेलें नव्हतें. हॉफमीइस्टरानें सूक्ष्मदर्शकयंत्राच्या साह्यानें साध्या रचनेपासून संकीर्ण रचनेंत पर्यवसान होत गेल्याचें सप्रमाण सिद्ध केलें. साध्या एकपेशीमय स्थितीपासून शरीर-रचनेस आरंभ होऊन उत्क्रमणानुसार वेगवेगळ्या संकीर्ण शरीर-रचनेंत त्याचा विकास होत गेला, असें त्यानें दाखविलें. वनस्पति-शरीर पेशीजालांचें बनलें असून जीवनव्यवहाराच्या वांटणीप्रमाणें वेगवेगळ्या पेशीजालाकडून वेगवेगळ्या प्रकारचें काम होत असल्याचा पुरावा मिळत गेला. प्रत्येक सजीव पेशींत जीवरस असून तो नेहमीं अस्थिर असतो व सर्व जीवनव्यवहार त्याकडून होतात, तसेंच पेशीपेशींचा परस्परसंबंध जीवरसाच्या धाग्यांतून राहतो व त्यामुळें शरीरांतील सर्व सजीव पेशी परस्पर निगडित झाल्या असतात, वगैरे शोध सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साह्यानें करितां आले. केंद्र, भित्तिका, जीवरस, जीवनपिंड यांची सूक्ष्म माहिती अधिकाधिक मिळून वनस्पति व प्राणी ह्या दोहोंच्या शरीरांत तीं सर्व एकच स्वरूपाचीं असतात असें आतां सिद्ध झालें आहे. केंद्रविभागानें नवीन पेशी उत्पन्न होतात. तसेंच वंशवाढींतील गुणपरंपरा सुद्धां केंद्रांतील सूक्ष्म धाग्यावर अवलंबून असते असें पुष्कळांचें म्हणणें आहे. नागेली व हॅन्स्टीन ह्या शास्त्रज्ञांनीं असें ठरविलें आहे कीं, प्राण्याच्या अण्डाशयांची तसेंच वनस्पतींच्या बीजकोशांची अंतर्रचना मुख्य गोष्टींत सारखी असते; व ह्याच गोष्टींचा अनुवाद व्हॅन टीट्टघेम वगैरेंनीं केला आहे. शरीररचनेचा व जीवन-व्यवहाराचा इतका निकट संबंध आतां सिद्ध झाला आहे कीं, ज्याप्रकारचें काम ज्या इंद्रियांकडून व्हावयाचें असतें, त्याप्रमाणें त्या कामाला योग्य अशी रचना त्यास मिळते; म्हणजे कामाप्रमाणें रचना बनत जाते. इतका शरीररचनेचा व जीवनव्यवहाराचा निकट संबंध असेल असें पूर्वी कोणास वाटलें नव्हतें. शरीर-रचनाशास्त्रास ऊर्जितावस्था आणण्याचें श्रेय हॉफमीइस्टर, ब्राऊन्, नागेली, हॅन्स्टीन वगैरे मंडळीस आहे. इंद्रियांच्या पेशी-जाल-रचनेंत फरक असून ते फरक इंद्रियांकडून होणाऱ्या कामाला अनुरूप असतात. खोड, मुळ्या, पानें व फुलें ह्या प्रत्येकाच्या पेशीजाल-रचनेंत पुष्कळ फरक असतो. तसेंच द्विदल, एकदल, बहुदल किंवा हंसराज वगैरे जातींतही रचना वेगळी

असते. रचनेच्या सरलासरलतेवरून वनस्पतींच्या विकासाची कल्पना दृढतर होते. डार्विन, वॅलेस वगैरे मंडळी विकासवादाचे कट्टे अभिमानी होते. डार्विनच्या ग्रंथांनीं विकासवादांत मोठी क्रांति करून सोडिली आहे. त्यानें सृष्टचमत्कारांचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यांची सांगड विकासवादृष्टीनें उत्तम वसविलेली आढळते. परिस्थित्यनुरूप वनस्पतींत फरक पडून कालानुसार ते फरक कांहीं ठिकाणीं दृढ होतात व त्यायोगें नवीन व्यक्तींची उत्पत्ति होते. कोणत्याही विशिष्ट व्यक्तीमध्यें नेहमीं एकच तऱ्हेचे रूपविशेष कायम राहतील असें नाहीं. हवामान, जोपासना वगैरे गोष्टींप्रमाणें फरक उत्पन्न होत जातात, व असे फरक वरचेवर होत जाऊन कायम झाले म्हणजे नवीन प्रकार अस्तित्वांत येतात. डार्विनची विवेचनपद्धत फारच मार्मिक असून ती दुसऱ्याची खात्री पटविण्यासारखी असे. चमत्कारांचा उलगडा त्याच्यासारखा दुसऱ्या कोणीं केला नाहीं. त्याच्या अनुमानांत नेहमीं तात्त्विक विचार असत. त्याची सृष्टिनिरीक्षणपद्धत स्फूर्तिदायक असे.

### इंद्रियक्रियाविज्ञान.

जरी इंद्रियक्रियाविज्ञानासंबंधी शोध अलीकडील आहेत तरी त्यांची कल्पना पूर्वी अगदीं नव्हती असें म्हणतां येणार नाहीं. उदगयन, गुणरत्न, वगैरे शास्त्रज्ञांनीं आपल्या ग्रंथांत ह्या विषयावरील तत्कालीन माहिती नमूद केल्याचें पूर्वी सांगितलें आहे. फुलें वनस्पतींचीं जननेंद्रियें असून त्याशिवाय फलोत्पत्ति होणें शक्य नाहीं, ही दृढ समजूत त्यांना होती. फुलांत 'नर व मादी' अशा दोन जाती असतात, ही समजूत सुद्धां पुष्कळ लोकांस असे. ईजिप्त व अरबस्थान देशांत खजूरीच्या नर व मादी फुलांचा कृत्रिम रीतीनें एकत्र संयोग करवून फलोत्पत्ति करण्याची पद्धत फार प्राचीन काळापासून चालू आहे. बाबिलियन लोकांमध्यें सुद्धां ही चाल प्रचारांत असे. तथापि इंद्रियक्रियाविज्ञानाचा व्यवस्थित विचार त्या कालीं झाला होता असें मात्र म्हणवत नाहीं. युरोपखंडांतही अशीच स्थिति पूर्वी होती. स्टीफन हेल्स नांवाच्या शास्त्रज्ञानें १७२७ सालीं आपल्या निबंधांत तत्कालीन सर्व माहितीचा एकंदर गोषवारा दिला आहे. वनस्पतीचें अन्न ह्या नात्यानें हवा उपयोगीं पडत असून पानामध्यें तें अन्न तयार होत असल्याचा उल्लेख त्यानें आपल्या निबंधांत केला आहे. माल्फीघीनेंही पानाच्या महत्त्वाविषयीं असेंच लिहिलें आहे. आधुनिक रसायनशास्त्राची ज्याप्रमाणें प्रगति होत गेली त्याप्रमाणें इंद्रियक्रियाविज्ञानाची वाढ झाली. अलीकडे 'इंद्रियक्रियाविज्ञान' हा विषय वनस्पति-शास्त्राचा मुख्य भाग झाला आहे. प्राण्यांच्या तसेंच वनस्पतींच्या शरीरांतील जीवरस एकच प्रकारचा असतो हें जेव्हां सिद्ध झालें त्यावेळेपासून ह्या विषयास नवीन दिशा मिळाली. दोहोंतील जीवनक्रिया सारख्या असाव्यात अशीं अनुमानें निघून त्याप्रमाणें शोध सुरू झाले. अन्नाची जरूरी, श्वासोच्छ्वास, पुनरुत्पत्ति, वगैरे क्रियांमध्यें दोहोंतही पूर्ण साम्य असतें. दोहोंस अवश्य लागणाऱ्या अन्नादि द्रव्यांसंबंधी तसेंच तीं द्रव्यें शोषण करण्याच्या भिन्न प्रकारांविषयीं प्रथम वाद सुरू झाला. वनस्पतींना जमिनींतून अन्नक्षार पाण्यांत विरल्यावरच शोषण करितां येतात. पण प्राण्यांस विरलेल्या तसेंच न विरलेल्या स्थितींत अन्नद्रव्यें ग्रहण करितां येतात. वनस्पति आपलें सेंद्रिय अन्न हवा, पाणी व क्षार ह्यांपासून स्वतः स्वशरीरांत बनवूं शकतात, पण ती गोष्ट प्राण्यांना शक्य नसते, वगैरे प्रकारचे वाद प्रथम उत्पन्न झाले. तरी त्यांची उपपत्ति व्यवस्थित रीतीनें सोडविली जाऊन वनस्पति व प्राणी ह्या दोहोंत विशेष भेद नाहीं, असें आतां पूर्णपणें सिद्ध झालें आहे. हिरव्या वनस्पतींना हरित्‌जीवनपिंडामुळें सूर्यप्रकाशांत सेंद्रिय अन्न हवा, पाणी व क्षार ह्या त्रयीपासून तयार करितां येतें, व तें सेंद्रिय अन्न वनस्पति व प्राणी ह्या सर्वांस सारख्याच रीतीनें उपयोगीं पडतें. एकदां असा गैरसमज उत्पन्न झाला होता कीं, वनस्पतींच्या श्वासोच्छ्वासक्रियेंत दिवसा शरीरांतून कारबनाम्ल वायु बाहेर न पडतां केवळ आक्सिजनवायु बाहेर निघतो, व रात्रीं ऑक्सिजनवायूऐवजीं कारबनाम्ल वायु बाहेर पडतो, अशी चुकीची कल्पना होती. कारण दिवसा तसेंच रात्रीं

श्वासोच्छ्वासक्रियेंत आक्सिजन वायु शरीरांत बाहेरून शोषिला जाऊन आंतून उलट कार्बनाम्ल वायु बाहेर टाकिला जातो. परंतु श्वासोच्छ्वासक्रियेबरोबर दिवसाउजेडीं दुसरी कार्बन–संस्थापन नांवाची क्रिया चालू असते, व त्या क्रियेंत बाहेरून कार्बनाम्ल वायु पानांतील रंध्रांवाटे शरीरांत घेतला जाऊन त्यांतील कार्बनद्रव्य शरीरांत राहतें व उरलेला आक्सिजन वायु शरीराबाहेर पडतो. ही क्रिया दिवसा अधिक जोरानें चालत असल्याकारणानें खऱ्या श्वासोच्छ्वासक्रियेचा प्रभाव लक्षांत येत नाहीं. म्हणून त्या वेळीं तो गैरसमज उत्पन्न झाला होता. श्वासोच्छ्वासक्रिया व कार्बनसंस्थापनक्रिया ह्या दोन्ही भिन्न असून एक घटनात्मक व दुसरी उलट विघटनात्मक असते. कार्बनसंस्थापनक्रियेंत कार्बन पदार्थ शरीरामध्यें वेगवेगळ्या संयुक्त स्वरूपांत जमा होत जाऊन शरीर वाढूं लागतें. पण श्वासोच्छ्वासक्रियेमध्यें शरीरांत जमलेले सेंद्रिय पदार्थ कमी होऊन शरीराबाहेर त्यांचा कार्बनाम्लस्वरूपांत उत्सर्ग होत असतो. म्हणून श्वासोच्छ्वासक्रिया विघटनात्मक होते.

जशी जशी इंद्रियक्रियांची माहिती अधिक होत गेली त्याप्रमाणें वनस्पतींच्या आरोग्यविषयाचें ज्ञान अधिक होत गेलें. अन्नपाण्याचा खुराक अपुरा पडून अथवा दुसऱ्या वनस्पतींचा उपसर्ग पोहोंचून वनस्पतींमध्यें रोगस्थिति उत्पन्न होते, वगैरे प्रकारचें ज्ञान इंद्रियक्रियांच्या माहितीमुळें झालें. तसेंच रोगाचें योग्य निदान झाल्यावर त्यावर उपायांची योजनाही सुचूं लागली उपाययोजना सुद्धां इंद्रियक्रियाविज्ञानशास्त्राच्या सिद्धांतावर अवलंबून असते. इंद्रियक्रियाविज्ञानशास्त्राच्या प्रगतीमुळें कृषिसुधारणेसही मदत झाली. वनस्पतींना उपयोगी पडणारें जमिनींतील अन्न कमी झालें तर तींत खतें घालून पुनः ती जमीन सुपीक करणें, अथवा जमीन वरचेवर नांगरून तिची उलथापालथ करून जमिनींतील घटकक्षार उपयुक्त स्थितीस आणणें व तद्द्वारा वनस्पतींना अन्नक्षार पुरविणें, ह्या गोष्टी इंद्रियक्रियाविज्ञानाच्या शोधामुळें शक्य झाल्या. सृष्टिशास्त्र, रसायनशास्त्र, भूस्तरशास्त्र वगैरे शास्त्रांचा उदय ह्याच वेळीं होत गेल्यानें परस्परांची मदत एकमेकांस होऊन सर्व शास्त्रीय शोधांस निराळें स्वरूप आलें.

वनस्पतींच्या जननेंद्रियांसंबंधीं माहिती अधिक होत जाऊन नवीन उत्पन्न होणाऱ्या बीजांत गुणपरंपरा कायम राखण्याच्या दृष्टीनें नवीन शोध सुरू झाले, व आजकाल ते जवळ जवळ पूर्णत्वास पोहचूं पाहात आहेत. मेंडल नांवाच्या एका शास्त्रज्ञानें साठ वर्षांपूर्वीं यासंबंधीं प्रयत्न करून कांहीं सिद्धांत ठरविले. पण त्याच्या सिद्धांतास त्या वेळीं कोणीं फारसें महत्त्व दिलें नाहीं. त्याचे शोध एका कोपऱ्यांत धूळ खात आजपावेतों पडले होते. पण गेल्या दहा पंधरा वर्षांपासून दुसऱ्या शास्त्रज्ञांनीं स्वतंत्र रीतीनें शोध करून त्याच्यासारखेच जेव्हां सिद्धांत काढिले तेव्हां धूळ खात असलेल्या मेंडलाच्या सिद्धांतांस उर्जितावस्था आली. डि व्हाईज, पनेट, टशेरमार्क वगैरे शास्त्रज्ञांनीं स्वतंत्र प्रयोग करून गुणपरंपरेच्या शोधास नवीन स्फूर्ति दिली; व त्या प्रयोगास आज यश मिळाल्यासारखें दिसत आहे. गुणवैशिष्ट्यांत हवामानामुळें विशेष फरक न पडतां आळंब्यांच्या हल्ल्यास न जुमानणारीं व पैदासीच्या दृष्टीनें श्रेष्ठ ठरलेलीं बीजें संकरपद्धतीनें तयार करण्यांत येऊं लागलीं व त्या योगानें कृषिसुधारणेंत क्रांति उडून गेली आहे. ही क्रांति घडवून आणण्याचें मुख्य श्रेय, अप्रत्यक्ष रीतीनें कां होईना, मेंडलास मिळतें. कारण संकरशास्त्राची प्रगति नसलेल्या कालांतही त्यानें नवीन शोध लाविला. पण तो मोठा सर्वसंमत शास्त्रज्ञ नसल्याकारणानें त्यानें काढिलेल्या शोधाचें चीज त्या वेळीं झालें नाहीं. तथापि जेव्हां आजकाल स्वतंत्र प्रयोग करून आधुनिक शास्त्रज्ञांनीं त्याच्यासारखे सिद्धांत ठरविले, तेव्हां त्याच्या प्रयोगांची किंमत लक्षांत आली. त्यानें केवळ वनस्पतींवरच प्रयोग न करितां प्राण्यांवरही तेच प्रयोग करून बीजाप्रमाणें गुणनिर्णयतत्त्व एकच असतें असें ठरविलें आहे.

प्राण्यांच्या श्रेष्ठ पैदाशीला ह्या प्रयोगांचा फार उपयोग झाला आहे. ह्या दृष्टीनें वनस्पति व प्राणी ह्या दोहोंत भेद नाहीं असें सिद्ध होतें. कलकत्ता प्रेसिडेन्सी कॉलेजांतील प्रोफेसर डॉ. जगदीशचंद्र बोस यांनीं अगदीं निराळ्या स्वरूपाचे स्वतंत्र प्रयोग करून वनस्पति व प्राणी ह्या दोहोंचें पूर्ण ऐक्य प्रस्थापित केलें आहे. प्रत्येक जीवनकार्य उत्तेजनास मिळालेलें प्रत्युत्तरकार्य आहे, अशी निराळी उपपत्ति त्यांनीं लाविली आहे. अन्न शोषून घेणें, श्वासोच्छ्वास करणें, पुनरुत्पत्तिकार्यें करणें, वगैरे सर्व जीवनव्यापार केवळ उपाधींच्या उत्तेजनप्रत्युत्तरकार्यावर अवलंबून असतात. हवेंतील उष्णता अधिक झाली तर पानांतून बाष्पोच्छ्वास अधिक होतो; म्हणजे उष्णतेचें उत्तेजन वनस्पतीस मिळून त्या उत्तेजनाचा प्रत्युत्तररूपी परिणाम बाष्पोच्छ्वासांत होतो. अशा प्रकारचीं बाह्य व आंतर शेंकडों उत्तेजनें वनस्पति-शरीरावर होऊन त्या सर्वांचा परिणाम त्या वनस्पतीच्या जीवनव्यापारांत दिसतो. म्हणजे तो जीवनव्यापार त्या सर्व उत्तेजनास मिळालेल्या प्रत्युत्तरांचें दृक्स्वरूप होय. क्लोरोफार्म हुंगण्यानें प्राण्याच्या मेंदूस जी एक विशिष्ट प्रकारची ग्लानि येते ती क्लोरोफार्मच्या उत्तेजनास मिळालेलें एक प्रत्युत्तर असतें. ह्या रीतीनें सर्व जीवनव्यवहारांची उपपत्ति डॉ. बोस ह्यांनीं लाविली आहे. तसेंच ज्या उत्तेजनांचा परिणाम वनस्पतींवर एक विशेष प्रकारचा होई, तसाच परिणाम प्राण्यावर सुद्धां त्याच उत्तेजनांनीं उत्पन्न होतो. म्हणजे जी विकृति अथवा ग्लानि ज्या विशेष कारणांनीं वनस्पतींमध्यें उत्पन्न होई, तीच विकृति अथवा ग्लानि त्याच कारणांनीं प्राण्यांमध्यें सुद्धां उत्पन्न होई. म्हणून वनस्पति व प्राणी ह्या दोहोंत उत्तेजन-प्रत्युत्तरकार्यांत फरक नाहीं असें त्यांस आढळून आलें. पण उत्तेजनप्रत्युत्तरकार्याची सांगड सर्व जीवनव्यवहाराशीं जोडिल्यानें वनस्पतींच्या व प्राण्यांच्या जीवनव्यवहारांत भेद नाहीं असें त्यांनीं सिद्ध केलें. डॉ. बोस यांनीं विद्युत्शक्तीनें मॅजिक लँटर्नाच्या पडद्यावर उत्तेजनप्रत्युत्तरक्रियांचें प्रतिबिंब सर्वांस दिसेल असें उमटविलें व त्या प्रतिबिंबांत वनस्पतींची व प्राण्यांची उत्तेजनप्रत्युत्तरकार्यांत एकच स्थिति होते अशी सर्वांची खात्री त्यांनीं आपल्या प्रयोगांनीं केली. आजपावेतों वनस्पति व प्राणी असे दोन भिन्न वर्ग समजण्यांत येत असत. परंतु यापुढें ते भिन्न समजण्याची जरूरी नाहीं त्यांमध्यें रचनावैचित्र्य व भिन्न राहणी जरी आढळली तरी ती भिन्न उत्तेजनामुळें उत्पन्न झालेली असते. येथें एवढें लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं, प्रत्येक उत्तेजनास तत्काल प्रत्युत्तर मिळतें असें मात्र समजूं नये. कित्येक वेळां बाह्य दृश्य कारण नसतां जेव्हां एखादें विशिष्ट प्रत्युत्तरकार्य घडतें, तेव्हां तें कार्य पूर्वी मिळालेल्या उत्तेजनांचें फळ असतें. तसेंच प्रत्येक उत्तेजनास निराळें उत्तर मिळण्याची जरूरी नाहीं; तर, एखाद्या प्रत्युत्तरांत पुष्कळ उत्तरांचा अंतर्भाव होतो. शिवाय उत्तेजनांच्या कमी अधिक तीव्रतेप्रमाणें प्रत्युत्तरकार्यांतही कमी अधिक जोर आढळतो.

डॉ. बोस यांनीं युरोपखंडांतील प्रमुख शहरीं जाऊन तेथील विद्वान् शास्त्रज्ञांपुढें प्रत्यक्ष प्रयोग करून आपले सिद्धांत प्रस्थापित केले आहेत. पूर्वी त्यांच्या सिद्धांतांविषयीं जो अविश्वास तेथील शास्त्रज्ञांस वाटे, तो सर्व आतां नाहींसा होऊन त्याजबद्दल सर्वांस आदर व कौतुक वाटूं लागलें आहे. आधुनिक सृष्टिशास्त्रज्ञांत आजपावेतों नवीन शोध लावण्याचा पाश्चात्यांनाच मान असे. परंतु डॉ. बोसांच्या ह्या क्रांतिकारक शोधामुळें पौर्वात्यांसही नवीन शोध करण्याची शक्ति असल्याबद्दल पाश्चात्यांची खात्री होत चालली आहे. परंतु अलीकडील काळांत डॉ. बोससारखे शास्त्रज्ञ आपल्या देशांत एकटेच झाले हेंही विसरतां कामा नये. डॉ. बोस भारतीय शास्त्रज्ञ असल्याबद्दल सर्व हिंदवासीयांना अभिमान वाटणें साहजिक आहे. डॉ. बोसांच्या शोधामुळें केवळ वनस्पति व प्राणी ह्यांतीलच भेदभाव नाहींसा झाला असें नाहीं, तर

अखिल वस्तूंत निर्जीव व सजीव असा भेदच उरला नाहीं. निर्जीव समजल्या जाणाऱ्या वस्तूंमध्यें उत्तेजन-ग्रहण करून त्यास उत्तर देण्याची शक्ति आहे असें त्यांनीं सिद्ध केलें आहे. ज्या वेळीं एखादें विशिष्ट उत्तेजन एखाद्या वस्तूस मिळतें त्यावेळीं तिच्या घटक परमाणूंच्या रचनेंत त्या उत्तेजनामुळें फरक होतो, व उत्तेजन नाहींसें झालें असतां तो परमाणूंतील रचना-भेद पुनः पूर्वस्थितीवर येतो; म्हणजे परमाणूंना संकोच अथवा विकास होऊन उत्तेजनास प्रत्युत्तर मिळतें. सचेतन वस्तूंमध्यें सुद्धां उत्तेजनामुळें अशाच प्रकारचा संकोच अथवा विकास उत्पन्न होतो. पेशीजालें अथवा स्नायु आंखडून, लांब करून, वळवून, किंवा इतर रीतीनें, जेव्हां सचेतन वस्तूकडून उत्तेजनास प्रत्युत्तर दिलें जातें त्यावेळीं आंखडणेवगैरे कार्यांत सचेतन वस्तूच्या घटकपेशींत संकोच अथवा विकास उत्पन्न होतो; म्हणजे घटक-पेशींत संकोच अथवा विकास उत्पन्न करण्याचें प्रत्युत्तर दिलें जातें. संकोचविकासादि क्रियेसच प्रत्युत्तर सम-जणें भाग आहे. जर निर्जीव व सजीव वस्तूंमध्यें एकच प्रकारें उत्तेजनप्रत्युत्तर दृष्टीस पडतें, व उत्तेजन-प्रत्युत्तर म्हणजे जीवनव्यापार, तर आजपावेतों निर्जीव व सजीव अशा भिन्न मानिल्या जाणाऱ्या वस्तूंमध्यें तो भिन्नभाव कसा राहूं शकतो ? सर्व वस्तूंत पूर्ण ऐक्य असून भिन्न उत्तेजनाच्या उपाधीं-मुळें वस्तूमध्यें भिन्नरचनादि प्रत्युत्तरें मिळतात. अशा प्रकारच्या वेदान्तानें अथवा तात्त्विक विचारसरणीनें डॉ. बोस यांनीं आपले नवीन सिद्धांत प्रस्थापित केले आहेत. ह्या मूलभूत तत्त्वावर ते वेगवेगळ्या प्रकारचे प्रयोग यापुढेंही करीत आहेत, व त्यांकडे सर्व शास्त्रीय जगाचें लक्ष वेधून गेलें आहे.

## वनस्पतिशास्त्रावरील वाङ्मय.

आपल्या देशांत केवळ वनस्पतिशास्त्रावर लिहि-लेला असा एकही ग्रंथ आढळत नाहीं. प्राचीनकाळीं वनस्पतिशास्त्रास इतका मान नसे. त्यावेळीं वनस्पति-शास्त्र वैद्यकशास्त्राचें एक अंग असून त्याचा स्वतंत्रग्रंथ-रूपानें विचार न करितां वैद्यकशास्त्रांतच वनस्पतिकांड अथवा वनस्पतिप्रकरण घालून वनस्पतींचे औषधीय गुणधर्म वर्णिलेले आढळत. वैद्यकशास्त्रावर सुद्धां चर-कादि प्रख्यातग्रंथांखेरीज फारसे सामान्य ग्रंथ लिहिलेले नाहींत. ह्याचें कारण ग्रंथ लिहिण्यास योग्य अधिकारी वैद्यमंडळी नव्हती असें नाहीं, तर, त्यावेळीं सामान्य नियम असा असे कीं, जेव्हां गतानुगतिक पद्धतीपेक्षां स्वतंत्र विचाराचें विशिष्ट व भिन्न प्रतिपादन एखाद्यास करावेंसें वाटे तेव्हांच तो निराळा ग्रंथ लिहून आपलें नवीन मत प्रस्थापित करण्याचे भानगडींत पडे. नाहीं तर एकाच विषयावर सामान्य ग्रंथ तयार झाला तर तो आपोआप निर्माल्यवत् होई. म्हणून सामान्य मंडळी ग्रंथलेखनास पुढें येत नसत. कोणताही नवीन ग्रंथ राजदरबारीं जाऊन प्रथम त्याची सर्व पंडितांकडून परीक्षणरूपी छाननी होई. मग ग्रंथकारास त्याच्या योग्यतेप्रमाणें पारितोषिक मिळे. तसेंच ग्रंथ पसंत पड-ल्यावर त्या ग्रंथकाराची वाहवा होऊन त्या ग्रंथाच्या प्रती तयार करविल्या जात. पूर्वी छापखान्याची सोय नसल्याकारणानें सामान्य ग्रंथाच्या प्रती काढवून प्रसिद्ध करणें मोठें त्रासाचें व कठीण काम असे. ह्याच कारणामुळें जे प्राचीन ग्रंथ आपणास आढळतात ते बहुधा उत्तम विद्वानांनीं लिहिलेले असून त्यांतील सिद्धांत सर्वसमंत जरी नसले तथापि बहुजनांस ते मान्य असत. मध्यकाळांत ह्या विषयासंबंधी पूर्ण अनास्था असल्यामुळें एतद्विषयक वाङ्मय त्यावेळीं सुद्धां तयार झालें नाहीं. अजूनही तीच स्थिति कायम आहे. सर्व हिंदुस्थानदेशांत वनस्पतिशास्त्रावर जे अलीकडे ग्रंथ तयार झाले आहेत त्या सर्वांमध्यें डॉ. बोस, कैलासवासी डॉ. कीर्तिकर, शंकरशास्त्री पदे व प्रो. आबासाहेब भाटे यांच्या ग्रंथांखेरीज नांव घेण्यासारखे चांगले ग्रंथ तयार झाले नाहींत. ह्या विषयावर लिहिलेले कांहीं जे इतर ग्रंथ आहेत

ते सर्व सामान्य प्रतीचे आहेत. सर्व हिंदुस्थान-देशाचा विचार बाजूस ठेवून आपण केवळ महाराष्ट्राविषयीं विचार करूं लागलों तर आपणास असें आढळून येईल कीं, ह्या विषयावरील मराठी वाङ्मय विशेषतः फारच कोतें व अपुरें आहे. उच्च इंग्रजी शिक्षणाचा प्रसार गेल्या साठ वर्षांपासून एकसारखा वाढत असून सुद्धां ह्या कालांत ह्या विषयावर लिहिलेल्या लहान मोठया ग्रंथांची संख्या पंचवीसही भरेल किंवा नाहीं ह्याची वानवा आहे. ही स्थिति खरोखर खेदजनक आहे असें कबूल करणें भाग पडतें. इतर देशांत एवढ्या कालांत ह्या विषयाचें ग्रंथभांडार किती मोठें झालें आहे, ही कल्पना मनांत आल्यावर आपण ह्या बाबतींत किती मागें आहों हें कळून येणार आहे. पूर्वीपासून आपला कल शास्त्रीय विषयांकडे कमीच आहे. त्यांतल्या त्यांत जी कांहीं थोडीबहुत शास्त्रीय वाङ्मयाची इच्छा असते ती जडशास्त्रीय विचारापेक्षां तात्त्विक शास्त्राकडे अधिक असते; व त्याप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहारांत त्याचा परिणाम झालेला दृष्टीस पडल्याशिवाय राहत नाहीं. नुसत्या शास्त्रीय वाङ्मयाकडे दृष्टि फेंकिली असतां सहज कळून येईल कीं, जडशास्त्रीय ग्रंथांपेक्षां तात्त्विक शास्त्रीय ग्रंथांची संख्या पुष्कळच मोठी आहे. जडशास्त्रें आपणास इतकीं प्रिय नाहींत. तात्त्विक शास्त्रांची आवड त्या मानानें पुष्कळच आहे. ग्रंथकारांच्या मानसिक कलाप्रमाणें ग्रंथकारांकडून वाङ्मयनिर्मिति होत असते. जिकडे प्रथमपासून प्रवृत्ति नाहीं तद्विषयक वाङ्मय कसें उत्पन्न होणार ? विशेषतः वनस्पतिशास्त्राची उपयुक्तता न समजल्यामुळें लोकांची त्या विषयाकडे अगदींच अनास्था दृष्टीस पडते व म्हणून त्या विषयावरील ग्रन्थसमुच्चय फारच अल्प व साधारण प्रतीचा झालेला आहे. नागपूरच्या ' ज्ञानकोशमंडळा'नें जी महाराष्ट्रीय वाङ्मयसूची प्रसिद्ध केली आहे, तीवरून पाहिलें तर वनस्पतिशास्त्रावर केवळ अकरा ग्रंथ आजपर्यंत झाले असल्याचें कळतें. ह्या ग्रन्थांकडे लक्ष दिलें असतां असें ताबडतोब आढळतें कीं, हे ग्रन्थ अगदीं प्राथमिक स्वरूपाचे आहेत. १८५७ सालीं ' उद्भिज्जशास्त्र ' नांवाचें एक पुस्तक प्रथम प्रसिद्ध झालें. यानंतर सोळा वर्षांनीं 'वृक्षविनोद' नांवाचा ग्रन्थ तयार झाला. ट्रेनिंग कॉलेजाच्या विद्यार्थ्यांच्या, तसेंच पूर्वीं जेव्हां मेडिकल कॉलेजांत मराठींत शिक्षणाचा एक वर्ग असे त्या वेळच्या विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां, ' वनस्पति म्हणजे काय ?, ' 'वनस्पतिशास्त्राचीं मूलतत्त्वें,' व 'वनस्पति-प्रायमर,' अशीं तीन पुस्तकें अस्तित्वांत आलीं. पुढें मेडिकल कॉलेजांत मराठींत शिक्षण देण्याचा उपक्रम बंद झाल्यावर सरकारी ट्रेनिंग कॉलेजाच्या विद्यार्थ्यांच्या सोईसाठीं सुद्धां निराळें एखादें पाठपुस्तक तयार करविलें गेलें नाहीं,एवढेंच नव्हे तर वरील जुनीं पुस्तकें सुद्धां आतां फारशीं आढळांत येत नाहींत. त्यांच्या नवीन आवृत्ति निघणें तर अशक्यच आहे. वनस्पतींचा संसार, उद्भिज्जसृष्टींतील चमत्कार, वनस्पति वर्णन व वनस्पति-विचार हीं चार पुस्तकें ह्या विषयावर ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीकडून प्रसिद्ध झालीं आहेत. डॉ. सांबारे यांनीं मुंबईंत हेमंतव्याख्यानमालेंत ' वनस्पतींचा संसार ' ह्या विषयावर एकदां व्याख्यान दिलें होतें, व त्या व्याख्यानाचा सारांश वरील पुस्तकांत समाविष्ट केला आहे. 'वनस्पति-वर्णनां'त वनस्पतींचें औषधीय दृष्टीनें वर्णन केलें आहे. 'वनस्पति-विचारां'त वनस्पतिशास्त्राचा थोडा बहुत शास्त्रीय पद्धतीनें विचार झालेला आहे. त्यांत चित्रांची उणीव असल्यामुळें विषय समजण्यास अडचण पडते. प्रत्यक्ष वनस्पति पाहून विषय समजून घेणें सर्वांत उत्तम पक्ष, पण पुस्तकांतून ती स्थिति शक्य नसल्यामुळें चित्रें घालून प्रत्यक्षाची तहान भागवणें अवश्य होतें. ह्याशिवाय त्या यादींत 'अंबा' व कविताबद्ध व्यवस्थेशीर वनस्पति-शास्त्र अशा दोन पुस्तकांचीं नांवें आढळ-

तात. जीवनशास्त्राचीं मूलतत्त्वें, जननमरणमीमांसा, वनस्पतिगुणादर्श, संत्रें, गुलाब वगैरे कांहीं दुसरीं पुस्तकें ह्याच विषयास अनुलक्षून लिहिलेलीं आहेत. 'जीवनशास्त्राचीं मूलतत्त्वें' ह्या पुस्तकांत वनस्पति व प्राणी ह्या दोहोंच्या जीवनकार्याचें वर्णन आलें आहे. ग्रंथकारास विषयप्रतिपादन उत्तम प्रकारचें साधलें आहे. भाषा चांगली भारदस्त आहे. परंतु चित्रांच्या अभावीं विषय समजण्यास कठीण जातें. जननमरणमीमांसेंत तार्किक विचारांचा पगडा अधिक दिसतो. हीं दोन्ही पुस्तकें दाभोळकर मंडळीनें प्रसिद्ध केलीं आहेत. वनस्पतिगुणादर्शांत वनस्पतींच्या औषधीय गुणांचें विवेचन केलेलें आहे. ह्याशिवाय स्वतंत्र पुस्तकाऐवजीं वर्तमानपत्रांत अथवा मासिकांत ह्या विषयावर लिहिलेल्या कांहीं लेखमाला आहेत. असल्या लेखांची सरासरी संख्या शंभरांपर्यंत भरूं शकेल. ह्यांतील कांहीं लेख सामान्य शरीरवर्णनात्मक आहेत व कांहीं चमत्कारवर्णनात्मक आहेत. अशा लेखांपैकीं डॉ. का. र. कीर्तिकर यांचा विस्तारांतून ( पु. २७, ३० ) प्रसिद्ध झालेला 'उद्भिज्जचमत्कार' ह्या लेखाचा निर्देश करणें अवश्य आहे. केवळ शास्त्रीय विषयांस वाहिलेलीं मासिकपुस्तकें बोटावर मोजण्याइतकीं सुद्धां नाहींत. ह्याचें कारण साधारण वाचकवर्गास तो विषय आवडत नाहीं. वनस्पतिशास्त्रासारख्या जडशास्त्रीय विषयावरील लेख वाचणारे फारच क्वचित् आढळतात. म्हणून एखादाच शास्त्रीय विषय केव्हां तरी देऊन कादंबऱ्या, गोष्टी, स्थलवर्णनें, चुटके वगैरे विषय मासिकांत घालून वाचकवर्गास खूष ठेवणें मासिकांच्या संपादकांस भाग पडतें. अशा स्थितींत वनस्पति-शास्त्राच्या विषयास मासिकांत स्थल मिळण्याचा प्रसंग फारच क्वचित् येतो. ह्यामुळें ह्या विषयावर नवीन वाङ्मय तयार होणें फार कठीण आहे. कोणत्याही वाङ्मयाची प्रगति लोकाभिरुचीवर अवलंबून असते. जरी ह्या विषयाची उपयुक्तता अधिक असली तरी मनाचा कल त्या विषयाकडे नसल्यामुळें झपाट्याची प्रगति होणें शक्य नाहीं. तसेंच जोंपर्यंत महाराष्ट्रभाषेस उच्च शिक्षणक्रमांत योग्य स्थान मिळणार नाहीं तोंपर्यंत महाराष्ट्रवाङ्मयाची प्रगति मंदस्थितींतच राहील. तथापि प्रत्येक महाराष्ट्रभाषाभिमान्यानें जर थोडी बहुत मदत करण्याचें मनांत आणिलें तर लेखकवर्गास प्रोत्साहन मिळून त्यांचेकडून वाङ्मयसेवा अधिक झपाट्यानें होईल ह्यांत संशय नाहीं. हा सोन्याचा काळ लवकर येवो अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करून वाचकवर्गाची रजा घेतों.



# गेल्या पन्नास वर्षांतील संगीतकलेची हकीकत.

[ रा. रा. मंगेश रामकृष्ण तेलंग, कारवार. ]

आपल्या भरतखंडांत संगीतशास्त्राची उत्पत्ति कोणत्या कालीं झाली, तिच्या विविध शाखांचे उत्पादक कोण, व त्या शाखांची वृद्धि व परिणति कशी होत आली, अनेक प्रकारचे राग, चिजा व ताल केव्हां, कोणी व कसे उत्पन्न केले, याविषयीं यथार्थ ऐतिहासिक माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. संगीतशास्त्रावरील प्राचीन संस्कृत ग्रंथांत त्रोटक माहिती मिळते. परंतु ती पुष्कळ अंशीं दंतकथांसारखी भासते. ती ऐतिहासिक दृष्टीनें लिहिलेली आढळत नाहीं. अलीकडे इतर कला व विद्या यांजविषयीं ज्याप्रमाणें लोकांत चिकित्सा उत्पन्न झाली आहे त्याचप्रमाणें ती संगीतकलेच्या इतिहासाविषयींही उत्पन्न झाली आहे. या गोष्टीचा पुरावा म्हटला म्हणजे या विषयावर अलीकडे लिहिले गेलेले कांहीं निबंध व ग्रन्थ वगैरे होत.

अलीकडे संगीतकलेवर जे ग्रन्थ लिहिले गेले आहेत त्यांत सुद्धां प्राचीन कालापासून पद्धतशीर भरपूर माहिती मिळत नाहीं. याचें कारण असें असावें कीं, ज्यांनीं संगीतविषयक ग्रन्थ लिहिले त्यांला तशा प्रकारचीं साधनें उपलब्ध नव्हतीं. शिवाय प्राचीन वेद, स्मृति, शास्त्रें, पुराणें व संगीतविषयक सर्व ग्रन्थ ऐतिहासिक दृष्टीनें अवलोकन करून, त्यांत या कलेविषयीं मिळणारी माहिती एकत्र करून, ती व्यवस्थेशीर रीतीनें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करणें हें एक दोन व्यक्तींकडून होण्यासारखें नाहीं. अशा प्रकारची ऐतिहासिक माहिती एकत्र जमविण्याला उत्तम उपाय म्हटला म्हणजे कांहीं संस्कृतज्ञ संगीतशास्त्रप्रवीणांची एक सभा निर्माण होऊन, त्या सभासदांपैकीं प्रत्येकानें आपापल्या सवडीप्रमाणें ऐतिहासिक दृष्टीनें कांहीं नियत ग्रन्थांचें मार्मिक अवलोकन करून, गायन, वाद्य व नृत्य यांबद्दलची आपणास उपलब्ध झालेली माहिती सभेपुढें मांडावी, व अशाप्रकारें सर्व सभासदांनीं मिळविलेली माहिती पुस्तकरूपानें छापून प्रसिद्ध व्हावी. याशिवाय इतर गृहस्थांनीं मिळविलेली माहिती सुद्धां या सभेकडे पाठवावी. या पद्धतीनें काम केल्यास संगीतशास्त्राच्या इतिहासाचीं साधनें बरींच सुलभ होऊन त्यांजपासून पद्धतशीर इतिहास लिहिणें सोपें जाईल. परंतु या सर्व कामाला पैशाची मदत फार लागणार. ती आमचे राजेरजवाडे व श्रीमंत लोक यांजकडून मिळाल्यास हा संकल्प सहज सफल होण्यासारखा आहे.

आपल्या भरतखंडांत संगीतशास्त्राचा उद्भव किती वर्षांपूर्वी झाला हें निश्चयपूर्वक ठरविणें आज अशक्य आहे. तथापि ही कला या देशांत फार प्राचीन कालीं विकास पावून वीणावाद्य बहुत प्रचारांत आलें होतें, असें ऋग्वेदाच्या ऐतरेय आरण्यकांतील खालील उताऱ्यावरून सिद्ध होतें.

" अथ खल्वियं दैवी वीणा भवति, तदनुकृतिरसौ मानुषी वीणा भवति, यथाऽस्याः शिर एवममुष्याः शिरः, यथाऽस्या उदरमेवममुष्या अम्भणं, यथाऽस्यै जिव्हा एवममुष्यै वादनं, यथाऽस्यास्तन्त्रय एवममुष्या अङ्गुलयः, यथाऽस्याः स्वरा एवममुष्याः स्वराः, यथाऽस्याः स्पर्शाः एवममुष्याः स्पर्शाः, यथा ह्येवेयं शब्दवती तर्द्मवती एवमसौ शब्दवती तर्द्मवती, यथा ह्येवेयं लोमशेन चर्मणाऽपिहिता भवति एवमसौ लोमशेन चर्मणाऽपिहिता । लोमशेन ह स्म वै चर्मणा पुरा वीणा अपिदधति । स यो हैतां दैवीं वीणां वेद श्रुतवदनो भवति, भूमिप्राऽस्य कीर्तिर्भवति, यत्र क्व चाऽऽर्या वाचो भाषन्ते विदुरेनं तत्र ॥" इति

ऐतरेयारण्यके आ. ३, अ. २, खं. ५
( आनन्दाश्रम–मुद्रितपुस्तक, पृ. २२२ ).

वरील उताऱ्यांत मनुष्याच्या शरीराची वीणावाद्याशीं तुलना केली आहे. या वर्णनांत शिर, अंभण, वादन, तंत्री, स्वर, स्पर्श इत्यादि वीणावाद्याचे भिन्न अवयव वगैरेंचे वाचक असे अनेक तत्कालीन पारिभाषिक शब्द आले आहेत. तंत्री शब्दावरून तर त्या कालीं आर्यलोकांची कलाकौशल्यांत किती प्रगति झाली होती,

याचें सहज अनुमान करितां येतें. याशिवाय सामगायनाच्या परिभाषेवरून सुद्धां संगीतशास्त्रांत प्राचीन आर्यांनीं बरीच मजल मारली होती हें स्पष्ट होतें.

अलीकडील पाश्चात्य विद्वान् व कांहीं तदनुयायी एतद्देशीय विद्वान् युक्तिवादानें वेदोत्पत्तीचा कालनिर्णय करण्याविषयीं यत्न करीत आहेत. परंतु त्या विद्वानांचे तर्क व मतें परस्परविरोधी असल्यामुळे वेदाचा कालनिर्णय सप्रमाण ठरला आहे असें निष्पक्षपातानें सांगणें अशक्य आहे. वेदकालाचा निर्णय झाल्यास संगीतशास्त्राच्या उत्पत्तीचा काल निदान तितकाच प्राचीन ठरेल. कित्येक आधुनिक प्राच्य व पाश्चात्य विद्वान् वेदांची उत्पत्ति ख्रिस्तशकापूर्वी ५०० पासून ३००० वर्षांपर्यंत झाली असावी असा आपआपल्या कल्पनेप्रमाणें तर्क करितात. हा विषय वादग्रस्त असल्यामुळें त्याचा विशेष विचार करण्यास हें उचित स्थल नव्हे. संगीतशास्त्र इकडे फार प्राचीन कालापासून प्रचारांत आहे इतकेंच म्हणता येईल.

संगीत व नाट्य हीं शास्त्रें भरतमुनीनें ब्रह्मदेवाकडून शिकून प्रचारांत आणिलीं असें भरतनाट्यशास्त्रांत सांगितलें आहे. व त्यानंतरच्या ग्रंथकारांनीं याच मताचा अनुवाद केला आहे. भरताचा 'नाट्यशास्त्र' हा संस्कृत ग्रन्थ प्रसिद्ध झाला आहे. भरतमुनि इसवी सनाचे पूर्वी तिसऱ्या शतकांत होऊन गेला असें एका अलीकडील विद्वानाचें मत आहे. परंतु दुसऱ्या विद्वानाचें मत भरतमुनि ख्रिस्तानंतर पांचव्या शतकांत होऊन गेला असें आहे. हा कालनिर्णयाचा प्रश्न सोडविणें हें योग्य प्रमाणांच्या अभावीं फार कठीण झालें आहे. या ठिकाणीं त्याचा ऊहापोह करणें शक्य नाहीं.

भरतानंतर नारद, मतंग, कोहल, याष्टिक, विश्वावसु, तुंबुरु, वेण, आंजनेय, दंतिल, कंबल, अश्वतर वगैरे ऋषींनीं संगीतशास्त्रावर ग्रन्थ लिहिले होते, असें शार्ङ्गदेवानें आपल्या "संगीतरत्नाकर" ग्रंथांत नमूद केलें आहे. व चतुरकल्लीनाथानें संगीतरत्नाकराच्या टीकेंत मतंग, कोहल, विश्वावसु, तुंबुरु, वेण, दंतिल यांच्या ग्रन्थांतून उतारे घेतलेले आहेत. परंतु ते ग्रन्थ आज उपलब्ध नाहींत ही मोठी हानि आहे. अलीकडे विद्वान् शोधकांचें लक्ष प्राचीन ग्रन्थ शोधून काढण्याकडे लागलें आहे. तरी यांपैकीं कांहीं ग्रन्थ भविष्यकाळीं उपलब्ध झाल्यास प्राचीन संगीतपद्धतीविषयीं बरीच माहिती मिळण्याचा संभव आहे.

वरील ऋषिप्रणीत ग्रंथांनंतरच्या कित्येक विद्वान् पंडितांनीं संगीतशास्त्रावर ग्रंथ लिहिले होते असेंही संगीतरत्नाकरावरून समजतें. त्या ग्रंथकारांचीं नांवें हीं आहेत:–मातृगुप्त, रावण, नंदिकेश्वर, स्वाति, गुण, बिन्दुराज, क्षेत्रराज, राहल, रुद्रट, नान्यभूपाल, भोजराजा, सोमराज परमर्दी. यांशिवाय भरतनाट्यशास्त्रावर लोल्लट, उद्भट, शङ्कुक, आणि अभिनवगुप्त यांनीं टीका रचिल्या आहेत असेंही संगीतरत्नाकरांत सांगितलें आहे. या टीकांपैकीं आज एकही उपलब्ध नाहीं.

संगीतरत्नाकरानंतर संगीतपारिजात, रागविबोध, संगीतदामोदर, संगीतदर्पण वगैरे अनेक ग्रंथ उत्पन्न झाले. त्या सर्वांचीं *नांवें येथें देणें शक्य नाहीं. हे सर्व ग्रंथ संस्कृत भाषेंत रचलेले आहेत. देशी भाषेंत या विषयावर त्या कालीं ग्रंथ झाले होते कीं काय हें निश्चयपूर्वक आज सांगतां येत नाहीं.

वर नमूद केलेला सर्व ग्रंथसमूह एकत्र करून त्याचें संशोधन करून संगीतशास्त्राचा इतिहास लिहिल्यास फार उपयोगी होईल. इकडे लक्ष देऊन आमच्या विद्याप्रिय संस्थानिकांनीं व श्रीमंतांनीं संगीतकलाप्रवीणांस साहाय्य करून उत्तेजन दिल्यास हें काम सुलभ होईल.

संगीतशास्त्रावर अनेक प्राचीन ग्रंथ आहेत हें वरील वर्णनावरून स्पष्ट होतें. त्या ग्रंथांत श्रुति, स्वर, राग, ताल वगैरेंचीं तत्कालीन लक्षणें दिलेलीं आढळतात. परंतु लक्ष्याचा-म्हणजे आज प्रचारांत असलेल्या रागांच्या व तालांच्या स्वरूपाचा–व त्या जुन्या ग्रंथांतील लक्षणांचा मेळ बसत नाहीं. असें असूनही कांहीं लोक प्रचारांतील रागांचें स्वरूप स्वतः समजून घेतल्या-

* ज्यांला या नावांची माहिती पाहिजे त्यांनीं पुणें 'आनंदाश्रम-ग्रंथमालें'त प्रसिद्ध झालेल्या संगीतरत्नाकर ग्रंथाच्या दुसऱ्या खंडाच्या शेवटीं दिलेली यादी पाहावी.

शिवाय तीं रूपें प्राचीन ग्रंथांतल्या लक्षणांशीं जुळत नाहींत या एका मुद्द्यावरून वर्तमानकालीन गाणें शास्त्रविरुद्ध आहे अशी ओरड करीत आहेत. हे लोक आपल्या भ्रांत मताचा अभिमान धरून वस्तुस्थितीकडे लक्ष देत नाहींत. कोणतीही कला किंवा विद्या जशी जशी वृद्धि पावते तसें तसें तिचें स्वरूप बदलतें व प्राचीनकाळीं लिहिलेल्या तद्विषयक ग्रंथांत तिच्या परिणतावस्थेंतील स्वरूपाचें यथार्थ लक्षण मिळणें अशक्य होतें; आणि त्यामुळें ते ग्रंथ प्राचीनकाळीं जरी प्रमाणभूत मानले जात तरी कालक्रमानें बदललेल्या परिस्थितींत त्यांचें प्रामाण्य पुष्कळ अंशीं कमी होतें. उदाहरणार्थ, कोणत्याही भाषेचें ५०० वर्षांपूर्वी लिहिलेलें व्याकरण कालगतीनें फेरफार झालेल्या त्या भाषेच्या स्वरूपास लागू पडणार नाहीं. अशीच स्थिति संगीतग्रंथांची झाली आहे. ही गोष्ट प्राचीन संगीतशास्त्रप्रवीण ग्रंथकारांच्या लक्षांत येऊन त्यांनीं तत्कालीन लक्ष्यावरून नवीन लक्षणें रचून ग्रंथ लिहिले, असें त्या ग्रंथांवरून समजतें. संगीतरत्नाकरग्रंथकर्ता शार्ङ्गदेव यानें हा सिद्धांत खालील श्लोकांत स्पष्ट सांगितला आहे:—

यद्वा लक्ष्यप्रधानानि शास्त्राण्येतानि मन्वते ।
तस्माल्लक्ष्यविरुद्धं यत्तच्छास्त्रं नेयमन्यथा ॥

संगीतरत्नाकर, पृष्ट. ५१६.

"या संगीतशास्त्रांत लक्ष्य हें प्रधान असल्यामुळें लक्ष्याच्या विरुद्ध असलेल्या लक्षणांचा अर्थ बदलून लक्ष्याला जुळवावा." यास्तव गुरुपरंपरेनें शास्त्रीय गायनांचें सप्रयोग ज्ञान संपादन करून सांप्रत काळीं सर्व रसिकांला संमत झालेल्या श्रेष्ठ गवय्यांच्या गायनप्रयोगास जुन्या ग्रंथांतील लक्षणें जुळत नसल्यास तीं लक्षणें दुरुस्त केलीं पाहिजेत किंवा बदललीं पाहिजेत. तसें न करितां त्या लक्षणांस अनुसरून राग वगैरे बदलण्याचा आग्रह धरणें म्हणजे केवळ उपहासास्पद होय. कारण तीं लक्षणें फार प्राचीनकाळीं बांधिलीं होतीं. परंतु उत्क्रांतितत्त्वाला अनुसरून हल्लींचें शास्त्रीय गायन बऱ्याच परिणतावस्थेला पोहोंचलें आहे हें प्राचीन ग्रंथांचें अवलोकन व वर्तमानकालीन संगीतशास्त्राचा सप्रयोग अभ्यास करणाऱ्या मार्मिक पुरुषाच्या लक्षांत येईल. ज्यानें संगीतरत्नाकर, संगीतपारिजात, रागविबोध वगैरे ग्रंथांचें निरीक्षण करून हल्लींचे प्रसिद्ध गवय्ये अल्लादियेखां, रहिमतखां, बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, भास्करबुवा बखले, रामकृष्णबुवा वझे, प्रो. विष्णुबुवा पलुसकर, अबदुलकरिमखां प्रसिद्ध वगैरे आधुनिक गवय्यांचीं गाणीं लक्षपूर्वक ऐकिलीं आहेत त्यांला वरील विधानाची साक्ष पटेल. हल्लींचे गवय्ये बिकट तालांत व रागांत बांधलेल्या चिजा नवीन तान-उपज व रागांचा विस्तार करून ज्या उत्तम प्रकारानें गाऊन अभिज्ञ रसिकांच्या अंतःकरणांत आल्हाद उत्पन्न करितात, त्यांतील एकही प्रकारचें लक्षण किंवा वर्णन प्राचीन ग्रंथांत मुळींच सांपडत नाहीं. असें असूनही आमचें गायन सशास्त्र नाहीं, आमच्या गायनांत इंग्रजी गायनांतले प्रकार नाहींत, आमच्या गायनांत 'हार्मनी' नाहीं, अशी अज्ञानमूलक तक्रार पुढें करून आमच्या वर्तमानकालीन संगीतशास्त्राचें मर्म न समजतां त्या शास्त्राची व गवय्यांची थट्टा करण्याला कांहीं पंडितंमन्य लोक प्रवृत्त होतात. याचें कारण असें दिसतें कीं, ते लोक गवय्यांकडे गायनाचा किंवा वादनाचा गुरुपरंपरेनें अभ्यास न करितां व ग्रंथांचेंही मर्म न समजतां संगीतशास्त्री म्हणून प्रसिद्ध होण्याची हांव धरितात. खालील श्लोकांत अशा लोकांचें संक्षिप्त वर्णन आहे.

गाणें नये तो नर तंत[1] वाजवी
तंतू नये त्या पखवाज वाजवी[2]
झाला जयाला पखवाज बोजड[3]
संगीतशास्त्री मग होइ तो जड.

जे लोक राग वगैरे ओळखतां येत नसून आपणांस गाण्याचें ज्ञान आहे असा आव घालण्याचा यत्न करितात त्यांनीं पुढें लिहिलेली गोष्ट लक्षांत घ्यावी. ती अशी:—उत्तर हिंदुस्थानांत एक संस्थानिक

१ तंतुवाद्य. २ योग्य. ३ अवजड, कठिण.

राजा होता. त्याच्या दरबारांत आपलें कौशल्य दाखवून बिदागी मिळवावी म्हणून उत्तम गवय्ये येत असत. राजास संगीतशास्त्राचें ज्ञान नसून राग तर मुळींच ओळखतां येत नसत. परंतु राणीला गायनकलेचें मार्मिक ज्ञान होतें. राजासमोर गाणें चाललें म्हणजे राणी पडद्यांत बसून राजाच्या द्वारें नवीन आलेल्या गवय्यांस निरनिराळ्या रागांच्या चिजा गाण्याला फर्मावीत असे. एकदां एक नवीन प्रख्यात गवय्या गात असतां राजानें राणीच्या सूचनेवरून एक दोन रागांचीं नांवें घेऊन फर्माइष केली. तेव्हां गवय्यानें त्या रागांतल्या चिजा आपल्या शक्त्यनुसार उत्तम प्रकारें गाइल्या. तथापि राजानें चिजेच्या समेवर किंवा उत्तम प्रकारच्या मनोवेधक भागांवर सुद्धां रीतीप्रमाणें आपली मान डोलवून आनंद प्रदर्शित केला नाहीं. हें पाहून गवय्याला गाण्याला उत्तेजन येईना. राजाला गाणें समजतें कीं काय, असा संशय त्याच्या मनांत आला. कारण समजदारापुढें कोणत्याही गुणी मनुष्याची स्फूर्ति वृद्धि पावते. एका कवीनें म्हटलें आहे–

'गुणानामज्ञाता प्रचुरधनदाता ऽपि न मुदे
मुदे विद्याज्ञाता भवति मितदाताऽपि गुणिनाम्.'

याकरितां तो गवय्या राजाचें संगीतकलेचें ज्ञान कितपत आहे याचा शोध लावण्याची संधि पाहात होता. गवय्याची चीज संपल्यावर पडद्यांतून राणी साहेबांनीं पंचमरागाची फर्माइष करण्याविषयीं राजास सूचना केली. गवय्यानें पंचमराग गाण्यास सुरवात केली. इतक्यांत राणी कांहीं कामाकरितां आंत गेली. हें गवय्याच्या लक्षांत येऊन थोड्याच वेळांत त्यानें पंचमराग बंद करून राजास विनंती केली: "हुजूर, अब कोनसा राग गावूं ?" राजाला रागांचीं नांवें बरोबर माहीत नसल्यामुळें आतां कोणत्या रागाचें नांव सांगावें, याचा विचार पडला. परंतु त्यांतल्या त्यांत त्यानें शक्कल काढली व गवय्यास सांगितलें कीं, आतां पंचम राग संपला तर 'षष्ठम' राग गा. गवय्याला राजाच्या संगीतकलेच्या ज्ञानाचा ठाव लागून तो मनांत हंसला. परंतु याचा पक्का निर्णय झाला पाहिजे म्हणून एक राग थोडा वेळ गाऊन पुन्हां राजास विनंती केली कीं,'हुजूर, षष्ठम राग पुरा हुवा, अब कोनसा राग गाऊं '? राजानें 'सप्तम ' रागाची फर्माइष केली. याप्रमाणें प्रत्येक राग संपला म्हणजे राजानें पुढें 'अष्टम' 'नवम' 'दशम' रागांपर्यंत फर्मायिष केली. गवय्याची पूर्ण खात्री झाली कीं, राजेसाहेबांस एकही राग ओळखतां येत नाहीं. इतक्यांत राणी आंतून परत येऊन पडद्यांत आपल्या आसनावर बसली व कोणत्या रागाची फर्माइष केली आहे म्हणून राजास विचारिलें. तेव्हां राजानें दशम राग चालला आहे म्हणून सांगितलें. हें ऐकून राजानें आपल्या संगीतशास्त्रविषयक ज्ञानाचा भोपळा फोडला हें राणीच्या लक्षांत आलें.परंतु तिनें त्याबद्दल विशेष गडबड न करितां चाललेला राग संपल्याबरोबर वसंत राग गाण्याची फरमाइष राजाकडून करविली. वसंत रागाची फर्माइष झाल्याबरोबर गवय्याला समजलें कीं ती राणीनें करविली आहे. तेव्हां त्यानें हात जोडून राणीस म्हटलें: "भली री माई दौडी, नें तो राजा जाते सोतोडी.[१]"

असो. संगीतशास्त्राच्या पुस्तकी ज्ञानापेक्षां सप्रयोग ज्ञान उपयोगी व खरें आनंददायक आहे हा मुख्य मुद्दा आहे. तो येथें किंचित् विस्तारानें वर्णिला आहे. याचा हेतु इतकाच कीं हल्लींच्या व पुढच्या पिढीच्या तरुणांनीं हा मुद्दा लक्षांत ठेवून केवळ ग्रंथांतल्या कोरड्या ज्ञानाचें अर्जन करून शाब्दिक वादविवाद करण्यापेक्षां चांगल्या गवय्यांकडून राग वगैरेंचें स्वरूप सप्रयोग शिकून स्वतःला व श्रोत्यांला परम आनंद देणाऱ्या संगीतकलेचें ज्ञान संपादावें हें श्रेयस्कर आहे.

या निबंधाचा उद्देश प्राचीन ग्रंथांचें व संगीतशास्त्राचें वर्णन करण्याचा नसून वर्तमानकालीन संगीतकलाप्रवीण गवय्ये,तंतकार वगैरेंची व त्यांच्या चालू संगीत-

१ "राणी साहेब, आपण योग्य वेळीं धांव मारली हें चांगलें झालें; नाहीं तर राजे साहेब शंभरपर्यंत अंक मोजीत गेले असते."

पद्धतीची सामान्य स्थिति संक्षेपानें लोकांपुढें मांडावयाची आहे. यांत अजमासें १८७० पासून १९१९ पर्यंतच्या पन्नास वर्षांच्या अवधींत संगीतकलेचा ऱ्हास किंवा उत्कर्ष कसा झाला, तींत काय काय फेरफार झाले, कोणकोणते प्रख्यात गवय्ये वगैरे होऊन गेले, हल्लीं कोण प्रसिद्ध आहेत, कोणतीं वाद्यें प्रचारांत आहेत, खरोखर परंपरागत राग व त्यांच्या आलापांच्या पद्धतीचें ज्ञान करून देणारे ग्रन्थ किती झाले, गीतलेखनपद्धति योग्य प्रकारची ठरली आहे कीं काय, वगैरे विषयांचें थोडक्यांत विवेचन करण्यांत येईल.

आपल्या भरतखंडांत हिंदुस्थानी व दक्षिणादि ऊर्फ कर्नाटकी अशा दोन संगीतपद्धति चालू आहेत. हिंदुस्थानी पद्धत ही पंजाब, सिंध, उत्तर हिंदुस्थान, बंगाल, गुजराथ व महाराष्ट्र या देशांत चालू आहे. दक्षिणादि पद्धत कर्नाटक, तैलंगण, द्रविड व केरळ ऊर्फ मलबार या देशांत चालू आहे. या दोन्हीं पद्धतींतलें स्वरसप्तक जरी एकच आहे, तरी पुष्कळ रागांचीं नांवें व वर्ज्यावर्ज्य स्वर, चिजांचे प्रकार, मींड, गमक इत्यादिकांच्या रीति वगैरे भिन्न असल्यामुळें त्या दोन पद्धति निराळ्या झाल्या आहेत. त्या ज्या काळीं विभक्त झाल्या तो काळ आज निश्चयपूर्वक सांगणें कठीण आहे. तथापि संगीतरत्नाकरग्रन्थावरून असें दिसतें कीं, तो ग्रन्थ लिहिला गेला त्यापूर्वीच, अर्थात् तेराव्या शतकापूर्वीं, या दोन पद्धतींला निराळीं स्वरूपें प्राप्त झालीं असावीं. संगीतरत्नाकर ग्रन्थ दक्षिणादि ऊर्फ कर्नाटकी गायनपद्धतीवर रचिला होता. परंतु चमत्कार असा आहे कीं, कांहीं अनभिज्ञ लोक तो ग्रंथ संगीतविषयक आहे इतक्यावरूनच हिंदुस्थानी संगीतपद्धतींतील हल्लींच्या रागांविषयीं तो प्रमाण मानून, लक्ष्य व लक्षणाचा विरोध पुढें आणून, वर्तमानकालीन हिंदुस्थानी संगीतपद्धति सशास्त्र नाहीं असा आरोप करितात. परंतु हा आरोप अज्ञानमूलक आहे. प्राचीनकाळीं बांधलेल्या लक्षणावरून वर्तमानकालीन प्रौढ दशेस पावलेल्या गायनाचें स्वरूप ठरविणें हें अज्ञान होय. वर्तमानकालीन उत्तम गायक जें गाणें गातात तें सशास्त्रच आहे. फारच झालें तर इतकें म्हणतां येईल कीं हल्लींचे राग, चिजा वगैरे यांचीं लक्षणें ग्रथित केलेले ग्रन्थ लिहिले गेले नाहींत. परंतु तें गायन शास्त्रविरुद्ध आहे असें प्रतिपादन करणें असमंजस होय. वर्तमानकालीन कर्नाटकी गायन सुद्धां संगीतरत्नाकरांतील लक्षणांस जुळत नाहीं–यावरून तेंही शास्त्रविरुद्ध आहे असें म्हणावें लागेल, आणि सर्वच गायन शास्त्रविरुद्ध आहे व तें आतां शास्त्रशुद्ध करण्याचा प्रसंग आला आहे, असें म्हणावें लागेल. कदाचित् असा प्रसंग खरोखर प्राप्त झाला आहे असें मानलें तरी, हल्लींची गायनपद्धति शुद्ध करण्याचा अधिकार गायनप्रवीण गवय्यांचा आहे किंवा गायन न समजणाऱ्या ग्रन्थपाठकांचा आहे, असा प्रश्न उद्भवतो. तो अधिकार गवय्यांचा आहे, असें म्हणावें तर गवय्यांचें मत असें आहे कीं, आज आपण गुरुपरंपरेनें आलेलें गाणें गातों तें सशास्त्र आहे, त्यांत अशास्त्र कांहीं नाहीं; याकरितांच ते प्राचीन ग्रन्थ वाचण्याच्या भानगडींत पडत नाहींत. आतां तो अधिकार ग्रन्थपाठकांचा आहे असें मानलें तर ज्यांला गायनशास्त्राचें सप्रयोग ज्ञान नाहीं ते त्या शास्त्रांतले सूक्ष्म व प्रौढ प्रयोग शुद्ध करण्यास समर्थ आहेत असें म्हटलें म्हणजे व्याघात होईल.

वर्तमानकालीन गवय्ये निरनिराळ्या रागांचे आळाप, चिजा वगैरे ज्या मार्मिक व नाजूक प्रकारांनीं गातात ते प्रकार शाब्दिक वर्णनानें किंवा गीतलेखनपद्धतीनेंही यथार्थपणें लिहून ठेवणें शक्य नाहीं, हें श्रीमंत विद्याप्रिय सयाजीराव महाराजांनीं बडोद्यास सन १९१६ मध्यें भरविलेल्या 'निखिलभारतवर्षीय संगीतपरिषदे'नें कबूल केलें आहे. गाण्यांतील आलापांचे व चिजांचे स्वर स,रि,ग,म वगैरे अक्षरांनीं लिहिण्याची सोपी लेखनपद्धति फार प्राचीनकाळापासून इकडे चालू होती, हें प्राचीन संगीतरत्नाकरादि ग्रंथांवरून सिद्ध होतें. त्यांत स्वरांचे भूषणभूत गमक, मींड, खटका, वगैरेचे अनेक सूक्ष्म प्रकार समजण्या-

करितां कोणत्याही चिन्हांची योजना केली नव्हती. तथापि "रागविबोध" ग्रन्थाचा कर्ता सोमनाथ यानें गमक वगैरे प्रकार सुद्धां समजावे म्हणून कित्येक चिन्हांची योजना करून शक्य तितकी पूर्ण लेखन-पद्धति तयार करून, त्या पद्धतीनें स्वतःच्या ग्रन्थांत कित्येक रागांचे आलाप वगैरे लिहून ठेविले आहेत. तथापि त्याच्या पद्धतीनें देखील रागांचें स्वरूप यथार्थ समजत नसल्यामुळें ती मागें पडली. रागांतील मेंड हा अलंकार फार सूक्ष्म व केवळ प्रयोगगम्य असल्या-मुळें अलीकडे सुद्धां कित्येक विद्वानांनीं तयार केलेल्या लेखनपद्धति आमचें श्रेष्ठ प्रकारचें गाणें लिहिण्याला निरुपयोगी झाल्या आहेत. या सर्व गीतलिपी ( notation ) पाश्चात्य पद्धतीचें गमकरहित ( मेंड नसलेलें ) गाणें लिहिण्यास मात्र उपयोगी आहेत. आमचे गवय्ये किंवा तंतकार आपल्या गाण्यांत किंवा वादनांत अंतःकरणाला परम आल्हाद देणारे जे अनिर्वचनीय प्रकार उत्पन्न करितात, ते कोणत्याही लिपींत लिहिणें शक्य नाहीं. आमच्या संगीतशास्त्राचा परिचय नसणाऱ्या गृहस्थांला वरील मत अतिश-योक्तिमूलक आहे असें कदाचित् वाटेल. परंतु त्यांनीं शोधकबुद्धीनें विचार केला असतां या गोष्टीची यथार्थता त्यांना कळण्यासारखी आहे.

आपल्या गायनकलेस जोंपर्यंत आमचे राजे महा-राजे यांजकडून भरपूर उत्तेजन मिळत होतें, तोंपर्यंत तिचा उत्कर्ष होत आला.सन१८८५ सालापर्यंत बहुतेक लहान मोठया संस्थानांत अनेक उत्तम गवय्ये, तंतकार वगैरे दरमहा १००पासून ४०० रुपये पर्यंत पगारावर दरबारच्या नौकरींत असत. याशिवाय त्यांना विशेष प्रसंगीं मक्कम इनामेंही मिळत. बडोदा, इंदूर, ग्वाल्हेर, जयपूर, रामपूर, अलवर, किसनगड, दतिया, रीवा वगैरे संस्थानांत प्रसिद्ध दरबारी गवय्ये होते. प्रत्येक संस्थानांतील प्रत्येक गुणिजनाचें नांव वगैरे येथें देणें शक्य नाहीं. तथापि दिग्दर्शनाकरितां थोडीं नांवें येथें देतों. बडोदे संस्थानांत खादिम हुसेनखां अमरोहिवाले ध्रुपदिये, गुलाम रसूलखां ख्यालिये, फैज महंमदखां ख्यालिये, प्रो. मौलाबक्ष, अल्लिहुसेन खां बीनकार, नासरखां पखवाजी, कन्हई भांडनर्तक, हे आपआपल्या कलेंत परम निपुण असून यांपैकीं बहुतेकांना दरमहा १०० रुपये पगार होता. ग्वाल्हेर संस्थानांत हद्दुखां, हस्सुखां, व नथूखां हे विख्यात गवय्ये होते. इंदुरांत देवजीबुवा, वासुदेव-शास्त्री ध्रुपदिये, बंदे अल्लीखां बीनकार, नानासाहेब पानसे पखवाजिये वगैरे होते. जयपूर संस्थानांत घघ्ये खुदाबक्ष, बहिरामखां गवय्ये, रजबअल्लीखां बीनकार, इमृतसेन, अमीरखां सतारिये वगैरे होते.रामपुर संस्था-नांत बहादूर हुसेन गवय्या व सूरशृंगार वाजविणारा अमीरखां बीनकार, हैदर बक्ष सारंगीवाला वगैरे प्रख्यात गुणिजन होते. अलवर संस्थानांत विख्यात गवय्ये तानरस खां वगैरे होते. दतिया संस्थानांत कुदोसिंग हा फार श्रेष्ठ दर्जाचा पखवाजी होता. रीवा संस्थानांत बडेमहंमदखां नांवाचा सुप्रसिद्ध गवय्या होता. याशिवाय शादेखां मुरादखां ध्रुपदिये, नूरखां चौगाशिये धम्मार गाणारे, वजिरखां ध्रुपदिये, रहिमखां बीनकार हे दिल्लींत होते. जाफरखां व प्यारखां गवय्ये व सतारिये, महमद अल्लीखां बीनकार, सिडी हैदरखां गवय्ये हे बनारस येथें होते. याचप्रमाणें लखनौ, आग्रा, जोधपूर वगैरे शहरांत मानतोलखां, मुबारक अल्लीखां, सादक अल्लीखां, वारस अल्लीखां, वगैरे पुष्कळ नामी गवय्ये त्या काळीं होऊन गेले. या पैकीं कित्येकांचीं गाणीं मीं स्वतः ऐकिलीं होतीं. त्यांच्या तोडीचे गवय्ये आज अलाबंदे, जाकुद्दिन खां, अल्लादिये खां वगैरे फार थोडे राहिले आहेत. या सर्व गवय्यांची गायकी पुस्तकांत लिहून ठेवणें अशक्य आहे. या सर्व मागच्या पिढीच्या गवय्यांच्या कौश-ल्याची तुलना सांप्रतच्या गायनाबरोबर केली म्हणजे आमची गायनकला योग्य उत्तेजन नसल्यामुळें ऱ्हास पावत आहे असें कष्टानें म्हणावें लागतें.

सन १८६० सालापासून इंग्रजी शिक्षणाचा प्रसार आमच्या येथें अधिक प्रमाणानें होऊं लागला. त्या-पासून मोठा लाभ झाला. परंतु इंग्रजी शिक्षणाबरोबर

इंग्रजी शिकलेल्या आमच्या विद्वानांला आमच्या गायन इत्यादि कलांकडे लक्ष देण्यास फुरसत मिळेना. त्यांना सर्व कांहीं इंग्रजी आहे तें चांगलें, आमच्या लोकांच्या गायनाला लिपी (नोटेशन) नाहीं म्हणून तें सशास्त्र नाहीं, वगैरे कल्पना या विद्वानांच्या डोक्यांत शिरल्यामुळें त्यांनीं या कलेकडे अलक्ष्य केलें. इतकेंच नव्हे, कित्येकांनीं तर या कलेचें आपलें अज्ञान आपणास भूषणच आहे असा समज करून घेतला. याप्रमाणें जिकडे तिकडे नवीन विद्वानांनीं गायनकलेकडे दुर्लक्ष केल्यामुळें गायन शिकणें म्हणजे हलक्या दर्जाचें आहे अशी लोकांची समजूत झाली. गवय्यांला कोणी विचारीनासा झाला. मुंबईसारख्या शहरांत सुद्धां एखादा चांगला गवय्या आला तर त्याला कलावतींशिवाय गृहस्थ लोकांकडून मुळींच आश्रय मिळेनासा झाला. अशा प्रकारची स्थिति संस्थानांतही झाली. ज्या संस्थानांत पांच सहा प्रसिद्ध गवय्ये नौकर होते तेथें एखादा मिळणेंही कठीण झालें. राजे लोकही इंग्रजी शिकून नवीन नवीन तऱ्हेचे ऐषआराम भोगण्याच्या नादांत गायनाकडे दुर्लक्ष करूं लागले. त्यामुळें त्यांला गवय्या गाऊं लागला म्हणजे राग वगैरे समजेनातसे होऊन गायनानें त्यांची करमणूक होईना. अशा प्रकारें ही श्रेष्ठ कला हीनद शेला पोहोंचली.

इतक्यांत सुमारें १८७९–८० सालांत संगीत नाटकाची सुरवात झाली. अर्थात् नाटकांत गायन शिरलें. गवय्याचें गाणें कष्टसाध्य होतें. तें शिकण्याला व ऐकण्याला पैसे बरेच खर्च करावे लागत. परंतु संगीत नाटकांत केवळ गाणेंच नव्हे तर नाटकांतलें कथानक, अभिनय व भाषण, देखाव्यांचा थाटमाट, वगैरे चमत्कार साधारण दर्जाच्या मनुष्यास सुद्धां आठ आण्याच्या पैशांत सहा सात तासपर्यंत निवांत पाहावयास मिळूं लागले. त्यामुळें गवय्यांच्या गाण्याला श्रीमंतापासून दरिद्र्यापर्यंत कोणीच विचारीना. पोराटोरांच्या तोंडांत रस्त्यानें फिरतांना सुद्धां संगीत पदें खेळूं लागलीं. परंतु नाटकांतील पदें उत्तम गवय्यी चिजांच्या धर्तीवर बांधलेलीं नसून साध्या चालीचीं होतीं. कारण नाटकें लिहिणाऱ्या ग्रन्थकारांस गवय्यांचें शास्त्रीय गाणें येत नसून साध्या चालींच्या पदांच्या धरतीवर त्यांनीं पदें रचिलीं. यापासून कमी दर्जाच्या गाण्याची अभिरुचि लोकांत पसरली.

संगीत नाटकें उत्पन्न होण्यापूर्वी हरिदासबुवा ध्रुवपद, तराणा, चतुरंग वगैरे गवयी पद्धतीच्या चिजा शिकून कीर्तनांत रसिकरंजनाकरितां त्या मधून मधून म्हणत. कांहीं हरिदासांना गाणें चांगलें येत असे, व ते ज्याप्रमाणें वेदान्त वगैरे शास्त्रांचा अभ्यास करीत त्याचप्रमाणें एखाद्या गवय्याकडे गाण्याचाही अभ्यास करीत. परंतु संगीत नाटकांतलीं पदें लोकप्रिय झालीं तेव्हांपासून या मंडळींतही ध्रुवपद वगैरे चिजांचा अभ्यास करणारे कमी होऊन त्यांनीं संगीत पदांच्या चालींवर पदें रचून कीर्तनें करण्यास सुरवात केली. कीर्तनकारांकडून जो कांहीं शास्त्रीय गाण्याचा थोडासा प्रसार लोकांत होत होता तोही अर्थात् बंद पडला.

इतक्यांत प्रथम संगीत नाटकांत पदांच्या ज्या चाली रागरागिणींत बांधलेल्या होत्या त्या मागें पडल्या. पारसी व ऊर्दू नाटककारांनीं रागाकडे लक्ष न देतां कांहीं तरी उडत्या चालीचीं पदें आपल्या प्रयोगांत गाण्यास सुरवात केली. त्याची नक्कल आमच्या कित्येक महाराष्ट्रीय नाटककर्त्यांनीं केली, आणि त्यामुळें सामान्य जनतेची अभिरुचि अत्यंत हलक्या प्रतीच्या गायनाकडे वळली. याप्रकारें शास्त्रीय गाणें मागें पडून छिछोर गाणें पुढें येऊन लोकप्रिय झालें. पुढें वाटेल त्या भलत्याच रागाच्या ताना मिसळून तानबाजीची पद्धत सुरू होऊन तीही अज्ञ लोकांच्या आदरास पात्र झाली. जो नट स्वाभाविक मधुर कंठानें भराभर असंबद्ध ताना मारूं लागला तो अधिक लोकप्रिय होऊन मोठा गवय्या म्हणून त्याची प्रशंसा होऊं लागली. या नाटकाच्या आवडीनें उच्च वर्गांतील लोकांच्या बुद्धीला सुद्धां भूल पडून ते शास्त्रीय गाण्याचा अनादर करूं लागले. आपल्या कानास गोड लागलेल्या कमी दर्जाच्या गाण्याची महती करून हे लोक आपल्या सुखवस्तु

स्थितीच्या जोरावर स्वयंमन्य गवय्ये बनले, व त्यांपैकीं कित्येकांनीं जुने पुराणे ग्रंथ धुंडाळून स्वकपोलकल्पनेनें इंग्रजी, मराठी व संस्कृत सुद्धां कांहीं नवीन ग्रंथ लिहिले. त्यांत गवय्ये मूर्ख आहेत, त्यांना शास्त्र येत नाहीं, त्यांना शास्त्र शिकविलें पाहिजे, गायनशास्त्र सुधारलें पाहिजे, वगैरे मनसोक्त विधानें केलीं. परंतु आपल्याला या कलेचें परंपरागत ज्ञान नसून गवय्यांची विनाकारण निंदा करणें मूर्खपणाचें आहे, असें यांच्या लक्षांत आलें नाहीं. 'एकां लज्जां परित्यज्य सर्वत्र विजयी भवेत्.'

असो. इतक्यांत फोनोग्राफ, ग्रामोफोन वगैरे यंत्रें आलीं. या यंत्रांतून प्लेटीच्या द्वारा जीं गाणीं प्रसिद्ध झालीं तीं तर अवर्णनीयच आहेत. प्लेटींतल्या गाण्यांत हंसण्यापासून रडण्यापर्यंतचे सर्व प्रकार येऊन गेले. जोंपर्यंत कोणत्याही कलेचा अभ्यास पैशाची आशा न करितां केवळ तिच्यांतल्या आनंदाकरितां केला जातो, तोंपर्यंत ती कला ऊर्जितावस्थेंत राहण्याचा संभव असतो. परंतु एकदां धनप्राप्तीची लालसा जागृत झाली म्हणजे त्या कलेचा अपकर्ष होतो. व्यापाऱ्यांना फोनोग्राफ विकून पैसे मिळविण्याचा अभिलाष झाला. हे व्यापारी गायनकलेच्या दृष्टीनें निरक्षरच म्हटल्यास अपराध होणार नाहीं. यांना कोणतें गाणें चांगलें याची निवड करण्याची प्राज्ञाच नव्हती. जे मनुष्य गाण्याची निवड करण्याकरितां यांनीं योजिले तेही मर्मज्ञ रसिक नसल्यामुळें त्यांनीं अगदीं स्वस्तांत मिळणारीं कमी प्रतीच्या गायकांचीं गाणीं प्लेटींत घेतलीं व तींच सर्वत्र पसरलीं. जर यांणीं भरपूर पैसे देऊन उत्तम गवय्यांच्या चिजा घेऊन त्यांचा प्रसार केला असता तर गांवांत शास्त्रीय गाण्याचा प्रसार होऊन तें सामान्य जनतेसही समजलें असतें. परंतु व्यापाऱ्यांला केवळ पैसा मिळवावयाचा होता. संगीतकलेचा उत्कर्ष व्हावा हा त्यांचा मुख्य उद्देश नव्हता. संगीतकलेचा ऱ्हास झाला तर त्यांचें काय गेलें? एकंदरींत फोनोग्राफानें हलकें गाणें फार स्वस्त केलें हे त्याचे उपकार कोण विसरेल? आमचें शास्त्रीय गाणें लिहितां येत नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. अशा स्थितींत आमच्या उत्तम घराणेदार गवय्यांच्या चिजा जशाच्या तशा पुढच्या पिढीला पोंहोचविण्याला फोनोग्राफ हें उत्तम साधन आहे. तरी राजे, जहागिरदार वगैरे श्रीमंतांनीं निदान आज हयात असलेल्या उत्तम गवय्यांच्या असाधारण व दुर्मिळ अशा निरनिराळ्या चिजा, राग व ताल यांच्या नांवासहित, फोनाग्राफांत घेऊन ठेविल्यास तो संग्रह संगीतशास्त्राच्या विद्यार्थ्यांस अमूल्य व उपयोगी होईल.

एथपर्यंत गायनाचीं स्थिति पन्नास वर्षांमागें कशी होती व तींत कसकसे फेरफार झाले, हें थोडक्यांत सांगितलें. आतां वाद्यांविषयीं चर्चा करूं. पन्नास वर्षांपूर्वी बीन, सारंगी, सतार, स्वरमंडल ऊर्फ सारमंडल, दिलपसंत, ताऊज वगैरे निरनिराळीं देशी तंतुवाद्यें प्रचारांत होतीं व त्यांचा सतत अभ्यास करून प्रावीण्य मिळविलेले लोकही ठिकठिकाणीं आढळत. गवय्यांच्या बरोबर तंबुरा हें सौम्य वाद्य वाजत असे. कीर्तनांत हरिदासांबरोबरही या वाद्याचा उपयोग होत असे. त्याचप्रमाणें साथ करण्याचे कामीं सारंगी हें मुख्य वाद्य होतें. परंतु परदेशी हार्मोनियम पेटीनें तंबुरा, सारंगी यांला 'परदेशी' करून सोडिलें. हल्लीं कीर्तन तर' पेटीशिवाय रसाळ होत नाहीं. पेटींत मींड निघत नाहीं, किंवा तिचें अनुकरणही कोणत्याच प्रकारें करितां येत नाहीं, हें कोणीही गायनपटु गृहस्थ कबूल करील. ही बाजाची पेटी गायनाचा 'बाजा' उडविते. असें असूनही ती आज लोकप्रिय झाली आहे. याचें कारण इतकेंच कीं ती सारंगी, सतार या वाद्यांपेक्षां शिकण्यास सोपी व आवाज भक्कम. शें पाचशें मनुष्यांची सभा जमली तरी तेथें तिचा आवाज सनईप्रमाणें सर्वांला ऐकूं येतो, व नवीन शिकणारानें किंवा पटाईत वादकानें वाजविली तरी तिचा आवाज सारखाच असतो. सारंगी, सतार यांच्यामध्यें तितकी समदृष्टि नाहीं. हीं वाद्यें नवशिक्याच्या हातांत कधीं गोड वाजत नाहींत. याकरितां पेटी जास्त लोकप्रिय झाली असावी. कसेंही असो, पेटी हें वाद्य आमच्या हिंदुस्थानी गाण्याची साथ करण्याला अगदीं निरुप-

योगी आहे व कलेच्या दृष्टीनें कुचकामाचें आहे. या वाद्यांत सारंग, कानडा, अडाणा वगैरे राग जातिव्यक्तिभेद विसरून अद्वैतांत शिरून ताबडतोब मोक्ष पावतात !

' बीन ' हें वाद्य आमच्या सर्व तंतुवाद्यांत उत्तम गणिलें आहे. याला 'बाजोंका राजा' असें हिंदुस्थानी गवय्ये म्हणतात. हें साथ करण्याचें वाद्य नसून स्वतंत्र आहे. यांत विशेषेंकरून रागांचे आलाप ऊर्फ जोडकाम करण्याची वहिवाट आहे. यांतून रागांचे मधुर, सूक्ष्म व हृदय हालविणारे जे आलाप उठतात ते गळ्यांत किंवा इतर कोणत्याही वाद्यांत निष्पन्न होत नाहींत. या वाद्याचा आवाज मोठा नाहीं हीच यांतली उणीव आहे. तीस वर्षांमागें जे बंदेअल्लीखां, अल्ली हुसेनखां वगैरे उत्तम बीनकार होऊन गेले, त्यांच्या इतके प्रवीण बीनकार आज नाहींत हें या कलेच्या भोक्त्यांचें दुर्भाग्य होय. मुंबईत विश्वनाथबुवा काळे हेही चांगले बीनकार होऊन गेले. हे सुमारें १८८८ सालांत वारले असावे. यापुढें तरी या विद्येस उत्तेजन मिळाल्यास कदाचित् बीनवाद्याचें पुनरुज्जीवन होण्याचा संभव आहे. अलीकडे अलवर संस्थानांत जयपूरचा मुषरफखां नांवाचा चांगला बीनकार नौकर होता. परंतु तो २ वर्षांमागें वारला असें समजतें. हल्लीं इंदुरांत मज्जीदखां व त्याचा भाऊ लतीफखां, बडोद्यास जमालुद्दिनखां व जावऱ्यास मुरादखां असे बीनकार आहेत. बंदेअल्लीखां व अल्लीहुसेनखां यांजसारखे बीनकार आज नाहींत. या वाद्याचा प्रचार कमी झाला आहे.

'सतार' हें बीनाप्रमाणें स्वतंत्र वाद्य आहे. यांत जोडकाम व गत-काम करितात. हें वाद्य हार्मोनियम पेटीचा प्रवेश होण्यापूर्वी शोकीन लोकांला फार प्रिय होतें. या वाद्यांतही प्रवीण धंदेवाले होऊन गेले. शोकीन मंडळींत मुंबईत जीवनलाल महाराज गोस्वामी हे प्रसिद्ध सतार वाजविणारे होऊन गेले. हे सुमारें १८७८-७९ सालांत वारले. विश्वनाथ बुवा काळे हे यांजकडेच जोडकाम शिकले होते. सुमारें सन १८८४ पर्यंत मुंबईत गृहस्थ मंडळींत सतार वाजविण्याचा शोक होता, त्यावेळीं यशवंतराव दळवी हे सारस्वत ब्राह्मण गृहस्थ सतार वाजविण्याबद्दल प्रसिद्ध होते. परंतु पुढें पेटी प्रचारांत आल्यामुळें सतार मागें पडली. कच्छवा, सुरबहार हे सतारीचेच प्रकार आहेत. त्यांचा सतारींतच समावेश होतो म्हणून त्यांजबद्दल येथें निराळें वर्णन केलें नाहीं. तुंबा उभा कापून दांडीला जोडला असतां सतार होते. तुंबा आडवा कापून दांडीला जोडला म्हणजे त्या वाद्याला कच्छवा म्हणतात. संस्कृत ग्रन्थांतली कच्छपी वीणा ती हीच असावी. सतारीला लहान दोन तुंबे बीनाप्रमामाणें लावले म्हणजे तिला सुरबहार म्हणतात.

सतारीप्रमाणें ताऊज हें वाद्य देखील बरेंच प्रचारांत होतें. परंतु तेंही आतां सतारीप्रमाणें मागें पडलें व त्याच्या ठिकाणीं दिलरुबा हें वाद्य पुढें आलें. हें वाद्य विशेषेंकरून, शोकीन पारसी लोकांत जास्त प्रचारांत आलें होतें, व अद्यापिही तें क्वचित् चालू आहे. सुमारें १५ वर्षांमागें मुंबईत भीमजी नांवाचा भाटया गृहस्थ हें वाद्य चांगलें वाजवीत होता. परंतु त्याच्या मागें दुसरा कोणी ताऊज-वादनांत तसा प्रसिद्धीस आलेला ऐकण्यांत नाहीं.

सारंगी हें वाद्य गळ्याबरोबर साथ करण्याला फार उत्तम होय. आमच्या गवय्यांचें गाणें या वाद्यांत जितकें हुबेहुब उतरतें तितकें दुसऱ्या कोणत्याही वाद्यांत उतरत नाहीं. विलायती तंतुवाद्यांत फिडल हें उत्तम वाद्य आहे. परंतु सारंगींत जें काम होतें तें फिडलांत सुद्धां होत नाहीं. तथापि बाजाच्या पेटीपुढें ही मागें पडली. हल्लीं हें वाद्य विशेषेंकरून कलावंतीच्या गायनाबरोबर साथ करणाऱ्यांकडे दृष्टीस पडतें. या वाद्यांत प्रवीण असे पुष्कळ लोक होऊन गेले. मुंबईत ३५ वर्षांच्या मागें मिरच नांवाचा प्रसिद्ध मुसलमान सारंगिया आला होता. त्याच सुमारास मुम्बईत दुलाराम गोविंदजी हे उत्तम सारंगिये होऊन गेले. आतां त्यांच्या योग्यतेचे या वाद्यांतले प्रवीण कारागीर राहिले नाहींत. कदाचित् कांहीं सारंगिये मिळतील, परंतु ते नांव घेण्यासारखे नाहींत.

' सारमंडल ' हें वाद्यही पूर्वी थोडेंबहुत प्रचारांत होतें. याचा आवाज बीनासारखा मधुर असे. यांत डाव्या हातांत एक कडें घेऊन तें तारांवर फिरवून मेंड वगैरे काढितां येते. परंतु हें वाद्य आतां नामशेष झालें आहे. मंबईत स. १८७७ सालांत अंतूबुवा नांवाचा एक ब्राह्मण हें वाद्य वाजवीत असे.

दिलपसंत हें लहान वाद्य सारंगीच्या पद्धतीचें असून सारंगीपेक्षां याचा आवाज सूक्ष्म व मधुर आहे. हेंही थोडेंबहुत प्रचारांत होतें. पीतांबर मिश्र नांवाचा ग्वाल्हेरकडचा हिंदुस्थानी ब्राह्मण हें वाद्य फारच गोड वाजवीत असे. तो १५ वर्षांमागें वारला. त्याच्या मागें हें वाद्य वाजविणारा कोणी प्रसिद्ध नाहीं.

' सूरशृंगार ' हें वाद्य सरोदासारखें असून याला तांतीच्या ऐवजीं तारा घालतात. सुमारें ४० वर्षांमागें सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध होऊन गेलेला रामपुरचा बहादूर हुसेन नांवाचा गवय्या या वाद्यांत अत्यंत कुशल होता. त्याच्या मागें हें वाद्य त्याच्या इतकें उत्तम वाजविणारा कोणी झाला नाहीं. हा थोर गवय्या सुमारें १८८० च्या पूर्वी वारला. अलीकडचे मुसलमान गवय्ये याला गाण्याचा नायक म्हणतात. मुंबईत मुरारबा पेडणेकर हें वाद्य वाजवीत असे. हेंही वाद्य आतां नामशेष झालें आहे. उत्तर हिंदुस्थानांत कोणी एखादा वाजवीत असल्यास तो प्रसिद्ध नाहीं.

' सरोद ' हें वाद्य सूरशृंगाराप्रमाणेंच मागें पडलें आहे. हें वाजविणारे गुलाम अली वगैरे उत्तम वादक होऊन गेले. याचा प्रचार उत्तरहिंदुस्थानांत क्वचित् आहे.

'सुरसागर' हें वाद्य बीनासारखें असतें. परंतु याला बीनाप्रमाणें पडदे नसतात. उंच नीच स्वर उत्पन्न करण्याकरितां तारांवर एक कांचेचा गोळा खालीं वर फिरवून या वाद्यांत राग वगैरे वाजवितात. हें वाद्य वाजविणारा राधाकृष्ण नांवाचा हिंदुस्थानी ब्राह्मण ८।१० वर्षांमागें मुंबईत होता. या वाद्याला तंजावर, म्हैसूर वगैरे दक्षिण देशांत 'महानाटकवीणा' ऊर्फ गोटवाद्य म्हणतात. हें वाद्य वाजविणारेही अलीकडे दृष्टीस पडत नाहींत.

याप्रमाणें मुख्य तंतुवाद्यांची हकीकत वर दिली आहे. तिजवरून असें स्पष्ट दिसतें कीं, गाण्याप्रमाणें स्वदेशी तंतुवाद्यांचीही पिच्छेहाट झाली आहे. कित्येक वाद्यें नामशेष झालीं तीं पाहावयास सुद्धां दुर्मिळ झालीं आहेत.

आतां पखवाज व तबला यांजविषयीं अल्प विचार करूं. पखवाज हें वाद्य ध्रुवपद, धम्मार वगैरे चिजांबरोबर वाजविण्याकरितां उपयोगांत आणलेलें फार प्राचीन वाद्य आहे. ध्रुवपदाचें गाणें व पखवाज वाजविणें हीं वीररसप्रधान आहेत. परन्तु ध्रुवपदाचें गाणें मागें पडल्यामुळें पखवाजही मागें पडला. अलीकडच्या कालांत कुदौसिंग ( दतिया ), नानासाहेब पानसे (इंदूर), नासरखां ( बडोदा ), हे प्रसिद्ध पखवाजी होऊन गेले. यांच्या योग्यतेचे पखवाजी हल्लीं नाहींत. तबला हें वाद्य पखवाजापेक्षां मधुर वाजतें. हें ख्याल, टप्पा, ठुम्री वगैर चिजांबरोबर वाजवितात. हें वाजविणारे अमनखां वगैरे तबलजी होऊन गेले. मुंबईत पूर्वी विजयी वगैर तबलजी होते. सखाराम मांजरेकर हा तबला चांगला वाजवीत असे. तो सुमारें १५ वर्षांमागें वारला.

एकंदरींत उच्च दर्जाची गायनकला ५० वर्षांपूर्वी होती त्यापेक्षां बरीच कमी झाली आहे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. संगीत नाटकामुळें जरी गाण्याची अभिरुचि लोकांत वाढली आहे तरी ती शास्त्रीय गाण्याची नव्हे, कमी प्रतीच्या गाण्याची आहे.

आतां सनई व चौघडा वगैरे वाद्यें वाजविणारे सुद्धां पूर्वीसारखे प्रवीण राहिले नाहींत, ही गोष्टही शोचनीय होय.

याप्रकारें या कलेची हेळसांड होऊन तिचीं सर्व अंगें लुलीं पडूं लागलीं आहेत, हें त्या कलेंत खोल जाऊन बरींच वर्षे परिश्रम करणाऱ्यांच्या अनुभवास आल्याशिवाय राहणार नाहीं.

आतां गेल्या पन्नास वर्षांत मराठी,हिंदी व ऊर्दू या भाषांत हिंदुस्थानी गायनावर लहान मोठे कित्येक ग्रंथ

लिहिले गेले आहेत. या सर्व ग्रन्थांचीं नांवें देऊन त्यांच्या गुणदोषांचें विवेचन करणें स्थलसंकोचामुळें अशक्य आहे. यांपैकीं पुष्कळ ग्रंथ, ज्यांनीं गायनशास्त्राचा गुरुपरंपरेनें अभ्यास केला नाहीं, व जे गवय्ये किंवा तंतकार म्हणून लोकांत प्रसिद्ध झाले नाहींत, अशांनींच लिहिले आहेत. या ग्रन्थांत श्रुति, स्वर, ग्राम, मूर्छना, कांहीं रागांचे वर्ज्यावर्ज्य स्वर, वगैरेंविषयीं जुन्या ग्रन्थांत सांपडणारी व इकडून तिकडून कशाही प्रकारें मिळविलेली ऐकीव माहिती दिली आहे. त्यापैकीं पुष्कळ गोष्टी हल्लींच्या संगीतपद्धतींत मुळींच चालू नाहींत. आज उत्तम गवय्ये जे रागाचे आलाप गातात, त्यांचीं मूलतत्वें काय आहेत, ध्रुवपद, ख्याल, टप्पा, ठुम्री वगैरे चिजा कोणत्या पद्धतीवर रचल्या आहेत, चिजांचे विविध अवयव म्हणजे अस्ताई, अंतरा; आभोग, संचारी वगैरे—कोणत्या प्रमाणानें ठरविले आहेत, रागांचे विस्तार करण्याचे नियम काय, चिजेंत तानउपज कशी करावी, प्रतिभाशाली गवय्यांकडून परंपरेनें आलेल्या व रागांचें स्वरूप व्यक्त करून अंतःकरणाला तल्लीन करणाऱ्या मेंडा कोणत्या, वगैरे गायनकलेच्या परम रहस्याचें उद्घाटन या ग्रन्थांत मुळींच केलेलें नाहीं. वरील प्रकारच्या माहितीनें पूर्ण असा ग्रन्थ लिहिला तरच तो वर्तमानकालीन विद्यार्थ्यांच्या कांहीं अंशीं उपयोगी होईल. आणि तसा ग्रंथ उत्तम घराणेदार गवय्यानें किंवा अशा गवय्याच्या साहाय्यानें लिहिला पाहिजे. अलीकडे अनधिकारी लोकांनीं बरेच ग्रंथ लिहिले आहेत. परंतु हे ग्रंथ विद्यार्थ्याला खरा मार्ग न दाखवितां त्यांच्या डोक्यांत वर्तमानकालीन गवय्यांविषयीं व त्यांच्या गायनाविषयीं भलतीच समजूत घालून लक्ष्य व लक्षण यांचा अनुगम होत नसल्यामुळें त्यांना घोटाळ्यांत पाडतात. आपले प्रसिद्ध गवय्ये रा. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर व बीनकार रा. विश्वनाथबुवा काळे यांनीं सुमारें ३५ वर्षांमागें चालविलेलें संगीत "पारिजात" हें मासिक पुस्तक खरोखर माहितीनें पूर्ण होतें. पुढें तें बंद पडलें ही खेदाची गोष्ट होय. रा. विश्वनाथबुवा यांनीं लिहिलेलें सतारीचें पुस्तकही चांगलें होतें. त्यांत विषय जरी थोडा होता तरी त्यांतली माहिती विश्वसनीय म्हणजे लक्ष्याला अनुसरून आहे. दिल्लीचे गोस्वामी पन्नालालजी यांनीं सुमारें ४० वर्षांमागें 'नादविनोद' हा ग्रंथ हिंदींत लिहिला. त्यांतही राग वगैरेविषयीं गुरुपरंपरागत माहिती दिली आहे. ऊर्दूमध्यें 'सरमाये अस्रत्' हा ग्रन्थ आहे. त्यांतही गवय्यांकडून मिळविलेली विश्वसनीय माहिती दिली आहे. सन १८८० सालांत रा. विश्वनाथबुवा काळे यांनीं मृदंगवादनाविषयीं "मृदंगवादन, भाग १ ला" हें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें. रा. रा. पुरुषोत्तम गणेश ऊर्फ अण्णा घारपुरे यांनीं सन १८८३ व १८८८ सालीं 'सतारीचें पहिलें व दुसरें पुस्तक' याप्रमाणें दोन भाग सतार-वाद्यावर लिहिले. सन १८८७ सालीं प्रसिद्ध वस्ताद मुरारबा गोवेकर यांनीं 'संगीतसंजीवनी' नांवाचा ग्रन्थ तयार करून प्रसिद्ध केला. यांत प्रथम कांहीं स्वरमालिका देऊन नंतर निरनिराळ्या रागांत ध्रुवपद, धम्मार वगैरे चिजा रागांच्या स्वरांसहित सोप्या गीतलेखनपद्धतीनें लिहिल्या होत्या. याच वस्तादांनीं सन १८९३ सालीं सतार-वाद्यावर सुद्धां एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें. यांतही कांहीं वस्तादी गती प्रसिद्ध केल्या होत्या. सन १८९४ सालीं पुण्याचे भवानिराव पिंगळे यांनीं इंग्रजी वगैरे ग्रंथांतून माहिती गोळा करून इंग्रजींत 'इंडियन म्युझिक' या नांवाचा ग्रंथ लिहून प्रकाशित केला. सन १९१० सालीं रा. रा. विष्णु नारायण भातखंडे यांनीं 'लक्ष्यसंगीत' नांवाचा ग्रन्थ स्वतः संस्कृत श्लोकांत लिहून ग्रन्थकाराचें नांव 'भरतखंडपूर्वनिवासी चतुर पंडित' असें देऊन प्रसिद्ध केला. यांतील संस्कृत भाषा पुष्कळ ठिकाणीं अशुद्ध आहे. यांत रागांच्या वर्ज्यावर्ज्य स्वरांपेक्षां अधिक माहिती नाहीं. याच गृहस्थांनीं सन १९१०–१९१४ सालांत 'हिंदुस्थानी संगीत पद्धति' नांवाचा ग्रन्थ मराठींत लिहून त्याचे तीन भाग प्रसिद्ध केले. प्रत्येक भागाचीं पृष्ठें सुमारें ४०० पासून ५००

पर्यंत आहेत. यांत इंग्रजी ग्रंथांतून तसेंच वर्तमानकालीन गायनाला लागू नाहींत अशा प्राचीन संस्कृत ग्रन्थांतून भरपूर उतारे दिले आहेत. शिवाय वाचकांस समजूं नये अशी खबरदारी घेऊन आपण स्वतः रचिलेल्या 'लक्ष्यसंगीत' ग्रंथाचा आधार पदोपदीं घेतला आहे. कित्येक विद्वानांची व गवय्यांची टर उडविण्याचा प्रयत्नही यांत केला आहे. इतका विस्तृत ग्रन्थ लिहून सुद्धां याजपासून कांहीं रागांच्या वर्ज्यावर्ज्य स्वरांपेक्षां अधिक माहिती दिली नाहीं. यानंतर अलीकडे एखादा संगीत शास्त्रावर नवीन ग्रन्थ झाला असल्यास तो माझ्या पाहण्यांत नाहीं.

परंतु हा किंवा अशासारखे अनेक ग्रन्थ लिहिले आणि प्रसिद्ध केले तरी गायनकलेचें आनुभविक ज्ञान गुरूकडूनच करून घेतलें पाहिजे. कारण आमच्या गायनांत किंवा तंतुवादनांत प्रधान मानलेल्या मेंड वगैरे सूक्ष्म प्रकारांचें यथार्थ स्वरूप शाब्दिक वर्णनानें किंवा सांकेतिक लिपीनें कधींही समजण्यासारखें नाहीं. जो ज्या इंद्रियाचा विषय आहे तो त्या इंद्रियाशिवाय इतर इंद्रियद्वारा कधींही प्रत्यक्ष होणें शक्य नाहीं. उदाहरणार्थ, सुगंधाचा अनुभव घ्राणेंद्रियानेंच घेतला पाहिजे. निरनिराळ्या फुलांचे सुगंध समजण्याकरितां कांहीं चिन्हें करून लिहिलीं तरी नेत्रद्वारा त्या विविधप्रकारच्या सूक्ष्म सुगंधांचा अनुभव कधींही येणार नाहीं, आणि ज्याला पूर्वीं त्या फुलांचे सुगंध अनुभवानें मुळींच माहीत नाहींत त्याला तर अशा चिन्हांनीं कांहींच समजणार नाहीं. हीच स्थिति स्वरांच्या मेंड वगैरे नाजूक प्रकारांची आहे. ते प्रकार गुरुमुखांतून वारंवार ऐकून सुद्धां त्यांचें अनुकरण करणें कित्येकांना साध्य होत नाहीं. मग केवळ लिपीच्या किंवा चिन्हांच्या द्वारें तें कसें साध्य होईल? आमच्या गायनांतल्या सूक्ष्म व नाजूक मेंडा वगैरे प्रकार लिपींत उतरतां येत नाहींत म्हणूनच आमच्या गवय्यांनीं गायनलेखनपद्धतीकडे दुर्लक्ष केलें असावें. प्राथमिक गाणें, म्हणजे ज्यांत सूक्ष्म अलंकार व कठिण ताना नाहींत असें गाणें, आमच्या सा रि ग म इत्यादि स्वराक्षरांनीं सुलभ रीतीनें लिहितां येतें हें उघड आहे. व अशा प्रकारच्या गीतलेखनपद्धति पुष्कळांनीं रचिल्या आहेत. परंतु वर सांगितलेल्याप्रमाणें प्रौढ गवय्यांचें गाणें लिहिण्याला त्यांचा उपयोग होत नाहीं.

वर दाखविलेल्या वस्तुस्थितीवरून इतकें निश्चित होतें कीं, आमचें साधें गाणें लिहिणें कठिण नाहीं; परंतु प्रौढ शास्त्रीय गाणें लिहिणें अशक्य आहे. आणि उच्च दर्जाच्या गायनाचा अभ्यास गुरुपरंपरेनें केलेला कोणीही चाणाक्ष पुरुष वरील विधान कबूल करील.

अलीकडे कित्येकांची तक्रार अशी आहे कीं, आमच्या निरनिराळ्या गवय्यांत एकच रागाच्या वर्ज्यावर्ज्य स्वरांबद्दल मतभेद आहे. याकरितां तो मतभेद काढून टाकून एक राग एकच प्रकारें गाण्याविषयीं निर्बंध असावा. परंतु यांच्या सूचनेप्रमाणें एकाच रागांत असणारे भेद काढून टाकून गाण्याचें स्वाभाविक वैचित्र्य कमी करण्यापेक्षां तीं त्या रागाचीं वैकल्पिक रूपें आहेत, असेंच मानणें अधिक चांगलें होय. जर एकच स्वरूप कायम मानावयाचें तर तें कोणत्या गवय्यानें गाइलेलें रूप सप्रमाण ठरवावें, हा प्रश्न उपस्थित होतो. चांगले गवय्ये सारख्याच योग्यतेचे असून त्यांच्या गाण्याच्या पद्धतिही किंचित् भिन्न असल्या तरी उत्तम दर्जाच्या आहेत. त्यांतून कोणती पद्धत उत्तम व कोणती कनिष्ठ म्हणून कोणत्या आधारावर व कोणीं ठरवावी? त्यांच्यापैकीं प्रत्येकांत कांहीं विशेष गुण असून त्या सर्व अभिज्ञ रसिकांला प्रिय झाल्या आहेत. निरनिराळ्या गवय्यांच्या घराण्यांत निरनिराळे प्रतिभाशाली गवय्ये होऊन गेले. त्यांनीं नैसर्गिक स्फुर्तीनें नवीन राग व नवीन चिजांचे प्रकार निर्माण केले. त्यांच्या प्रतिभावैचित्र्यानें गायनांत जें वैचित्र्य उत्पन्न झालें आहे तें काढून टाकून कृत्रिम ऐक्य आणण्याचा प्रयत्न केला असतां गायनकलेचें स्वरूप वैचित्र्यानें मनोहर झालें आहे तें निर्विशेष होऊन त्रासदायक होईल. याकरितां वरील मताप्रमाणें एकाच रागाचे जे अनेक भेद आहेत ते काढून टाकणें असमंजसपणाचें होय.

असो. एथपर्यंत संगीत कलेची अवनति कशी होत आली आहे हें थोडक्यांत सांगितलें. आतां संगीत-कलेचें पुनरुज्जीवन करण्याकरितां कोणीं कसे प्रयत्न केले याची थोडी हकीकत देणें योग्य आहे.

कलकत्त्यांत राजा शौर्येंद्रमोहन टागोर यांनीं कांहीं संगीतविषयक प्राचीन संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध केले; व इंग्रजींत व बंगालींत श्रुति, निरनिराळीं वाद्यें, नृत्य वगैरे विषयीं माहिती देणारे ग्रंथ लिहिले. पुण्यांत १८७४ सालीं रा. बळवंत त्रिंबक सहस्रबुद्धे या गृहस्थांनीं 'पुणें गायनसमाज' नांवाची संस्था स्थापन केली. मुंबईत रा. महादेव चिमणाजी आपटे वकील, यांनीं रा. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर व रा. विश्वनाथबुवा काळे यांच्या साहाय्यानें सुमारें सन १८८० सालांत एक गायनसमाज स्थापिला होता. परंतु तो एक दोन वर्षांत बंद पडला. मुंबईत पारसी लोकांनीं एक गायन-समाज त्याच सुमारास चालू केला; व तो हल्लीं चालू आहे. हे समाज अस्तित्वांत आले तरी त्यांजपासून शास्त्रीय गायनकलेला म्हणण्यासारखें उत्तेजन मिळालें नाहीं असें म्हणावें लागतें. कारण या समाजांत शिकून गवय्या या नात्यानें कोणी प्रसिद्ध झाला नाहीं.

बडोद्यांत श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या आश्रयानें सुमारें १८९० सालीं प्रो. मौलाबक्ष यांनीं एक व प्रसिद्ध गवय्ये फैज महंमदखां यांनीं एक, याप्रमाणें दोन गायनशाळा स्थापन केल्या. परंतु या शाळांतून कोणी गवय्या किंवा तंतकार तयार होऊन प्रसिद्धीस आल्याचें अद्याप ऐकण्यांत आलें नाहीं.

अलीकडे १०–१५ वर्षांत मुंबई, पुणें वगैरे ठिकाणीं रा. भास्करराव बखले, अबदुल करीमखां, अंतूबुवा मनोहर वगैरे लोकप्रिय गवय्यांनीं गायनसमाज ऊर्फ शाळा स्थापन करून होतकरू विद्यार्थ्यांला परंपरागत गाणें शिकण्याची संधि आणून दिली आहे. त्याच-प्रमाणें पंडित विष्णुबुवा पलुसकर यांनींही **गांधर्व-महाविद्यालय** नांवाची गायनशाळा श्रीमंत लोकांच्या साहाय्यानें निर्माण केली आहे. यामुळें मध्यम स्थितींतल्या विद्यार्थ्यांला सुद्धां आपलें परंपरागत उच्च दर्जाचें हिंदुस्थानी गाणें व तंतुवाद्यें शिकण्याची सोय झाली आहे. आतां या शाळांतून विद्यार्थी तयार होऊन आमचे आजचे प्रसिद्ध गवय्ये अल्लादिये खां, बाळकृष्ण बुवा इचलकरंजीकर, रामकृष्णबुवा वझे, भास्करराव बखले, अबदुलकरीम खां यांच्या तोडीचे नवीन गवय्ये व बंदे अलीखां व अली हुसेनखां यांच्यासारखे बीन-कार, अमीरखांसारखे सतारिये, उत्पन्न होऊन जेव्हां लोकरंजन करितील तो सुदिन म्हणावयाचा.

यानंतर सन १९१६ सालीं श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनीं लोकांत संगीतशास्त्राची चर्चा होऊन प्रसार व्हावा व त्या कलेला उत्तेजन मिळावें या उदार हेतूनें सुमारें ५००० रुपये खर्च करून 'निखिलभारतवर्षीय संगीतज्ञांची परिषद्' जम-विली, याबद्दल श्रीमंत सयाजीराव महाराजांचे सर्वांनीं आभार मानिले पाहिजेत. परंतु या परिषदेच्या कार्य-कारी मंडळाच्या योजनेप्रमाणें या परिषदेंत केवळ गायनाचे रसिक अशा आधुनिक इंग्रजी पढलेल्या विद्वानांनींच आपआपल्या आवडीला अनुसरून निवड-लेल्या विषयांवर निबंध लिहून वाचले. वर्तमानकालीं प्रसिद्ध असलेल्या श्रेष्ठ गवय्यांला पुढें आणून त्यांज-कडून चर्चा करवून, त्यांच्या कलेचा उत्कर्ष होण्याकरितां काय उपाय योजिले पाहिजेत, याविषयीं त्यांची सल्ला घेतली नाहीं. यामुळें या परिषदेपासून गायनकलेला आजच्या परिस्थितींत आवश्यक असें उत्तेजन मिळालें नाहीं असें कष्टानें म्हणावें लागतें. याच प्रकारची दुसरी परिषद् सन १९१८ सालीं दिल्ली शहरांत तिक-डील श्रीमंत धनिक लोकांच्या साहाय्यानें भरली. परंतु तिचें पर्यवसान कशांत झालें, हें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें नाहीं. अशा प्रकारच्या परिषदा भरणें अवश्य आहे. तथापि त्यांत केवळ इंग्रजी व संस्कृत पढलेल्या, परंतु संगीतकलेचें मर्म न जाणणाऱ्या एकदेशीय विद्वानांनीं स्वकपोलकल्पित निबंध वाचल्या-पासून या कलेला म्हणण्यासारखें उत्तेजन मिळणार नाहीं. अशा प्रकारच्या परिषदेंत वर्तमानकालीन उत्तम गवय्ये, तंतकार, बजवय्ये वगैरे कलाप्रवीण

लोकांला मुद्दाम आमंत्रण देऊन, त्यांचें गाणें वगैरे करवून, त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्याला बक्षिसें, पदव्या इत्यादि दिल्यास मात्र संगीतकलेचें पुनरुज्जीवन होण्याचा संभव आहे. आधुनिक एकदेशीय विद्वानांनीं फार परिश्रम करून प्राचीन ग्रंथांतील संगीतशास्त्रावर कितीही ग्रंथ लिहिले तरी वर्तमानकालीन संगीतशास्त्राला किंवा कलेला विशेष उत्तेजन मिळणें संभवनीय वाटत नाहीं. गायन ही कला लक्ष्यप्रधान आहे असें मागें सांगितलें आहे. लक्ष्याच्या अनुभवावांचून केवळ लक्षणज्ञान व्यर्थ आहे. " क्रियेवीण वाचालता व्यर्थ आहे." ज्यांनीं अलीकडे संगीतशास्त्रावर संस्कृत किंवा इंग्रजी ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले आहेत त्यांपैकीं एकही ग्रंथकार गवय्या म्हणून प्रसिद्ध झाला नाहीं किंवा गवय्यांप्रमाणे गाण्यालाही समर्थ नाहीं. मग अशा लोकांनीं लिहिलेल्या ग्रंथांनीं गवय्यांस व्यावहारिक दृष्टीनें काय फायदा होणार ? प्रत्येक विद्येचा किंवा कलेचा अभ्यास स्वतंत्र आहे. इंग्रजी किंवा संस्कृत साहित्यशास्त्रांत एखादा गृहस्थ प्रवीण झाला म्हणून त्याला संगीतशास्त्रांत प्रावीण्य मिळेल असा नियम नाहीं. त्यानें साहित्यशास्त्राप्रमाणेंच संगीतशास्त्राचा मार्मिक रीतीने अभ्यास केला पाहिजे. याशिवाय प्रत्येक विद्येंत किंवा कलेंत प्रावीण्य प्राप्त करून घेण्याला नैसर्गिक प्रतिभेची अत्यंत आवश्यकता असते. प्रतिभा नसेल तर एखादा पुरुष अभ्यासाचे जोरावर एखाद्या विद्येंत किंवा कलेंत फार म्हटलें तर साधारण नैपुण्य मिळवील. प्रतिभेचा अभाव असेल तर तो त्या कलेंत आचार्यपदास कधींही पोंहचणार नाहीं.

आतां कोणाच्या अंगीं वरील प्रकारची प्रतिभा आहे हें समजणें फारसें कठिण नाहीं. ज्याला प्रतिभा आहे तो उत्तम गाणें ऐकिलें म्हणजे सहज त्याचें अनुकरण करूं शकतो. त्याला विशेष घोकंपट्टी करावी लागत नाहीं. तो संगीतकलेचें मर्म लौकर समजतो. उत्तम गायकांच्या चिजा ऐकल्याबरोबर तो ताबडतोब त्यांचें ग्रहण करितो. त्यांतील स्वररचनेची खुबी त्याच्या सहज लक्षांत येते. त्याचा आवाज कसाही फेंकला गेला तर तो कधींही बेसूर होत नाहीं. त्याच्या कंठांतून मोहक मींडा वगैरे अलंकार आपोआप उत्पन्न होतात. अशा प्रतिभाशाली विद्यार्थ्यांनीं विद्वान् गवय्यांकडे चांगला अभ्यास केला असतां ते थोर गवय्ये होऊं शकतात.

कांहीं लोक गवय्ये आपलें गाणें खुल्या मनानें शिकवीत नाहींत म्हणून आरोप करितात. इतर विद्येंत किंवा कलेंत प्रवीण असून ती विद्या चोरून ठेवणाऱ्या कांहीं लोकांप्रमाणें कांहीं गवय्येही आपली कला चोरून ठेवणारे सांपडणें शक्य आहे. परंतु अशा गवय्यांची संख्या फार थोडी आहे. शिष्याला विद्या न येणें हा केवळ गुरूचाच अपराध असतो असा नियम नाहीं. पुष्कळ अंशीं स्वतःच्या मठ्ठपणामुळें किंव अनभ्यासामुळें विद्यार्थ्यास विद्या येत नाहीं. गायनकलेचें स्वरूप फार सूक्ष्म आहे. ती शिकतांना गुरूच्या शिक्षणपटुत्वापेक्षां शिष्याच्या मतिवैशद्याची अपेक्षा अधिक असते. ज्या विद्यार्थ्याच्या अंगीं ग्रहणधारणशक्ति फार कमी असते, त्याला ही कला शिकणें फार कठिण होतें. अशा प्रकारचे जडबुद्धि विद्यार्थी गुरु शिकवीत नाहीं अशी ओरड करून आपला दोष गुरूवर लोटण्याचा प्रयत्न करितात. दुसरी गोष्ट अशी आहे कीं, गवय्याला योग्य मोबदला दिल्याशिवाय त्यांनीं आपल्याला फुकट गाणें शिकवावें अशी कित्येकांची इच्छा असते. परंतु अशा लोकांला फुकट शिकवीत राहिलें म्हणजे गवय्यांचा उदरनिर्वाह चालणें शक्य नाहीं. वास्तव गवय्ये अशा विद्यार्थ्यांला आपली कला शिकविण्याला नाखूष असतात हें स्वाभाविक आहे. अशा प्रसंगीं त्यांजवर दोषारोप करणें असमंजस होय. " गुरुशुश्रूषया विद्या पुष्कलेन धनेन वा । अथवा विद्यया विद्या चतुर्थं नोप लभ्यते ॥ " हा प्राचीन श्लोक यथार्थ आहे. राजाश्रय मिळून सुस्थितींत असलेल्या हद्दूखां, तानरसखां, वगैरे प्रसिद्ध गवय्यांनीं अनेक विद्यार्थ्यांला मोफत विद्यादान केल्याचें सर्वत्र मशहूर आहे.

बहुतेक गवय्यांला आपल्या कलेविषयीं स्तुत्य अभिमान असतो आणि तो असणें योग्यही आहे. आपल्या कलेचा बुद्धिपूर्वक कोणीं तिरस्कार केला तर त्यांला संताप यावा हें स्वाभाविक आहे. परंतु जो मर्मज्ञ रसिक त्यांच्या गुणाचें गौरव करितो त्याला ते मित्राप्रमाणें वागवून आपली विद्या खुली करून दाखवितात, कधीं गुप्त ठेवीत नाहींत. गवय्यांनीं नाना प्रकारच्या अडचणी सोसून व कित्येत वर्षें सतत परिश्रम करून विद्या संपादन केली असते. अशा प्रवीण लोकांचें गायन सभेंत चालू असतांना कांहीं नवशिके पंडितंमन्य भलतेच अप्रासंगिक प्रश्न करून त्यांची अब्रू घेण्याचा प्रयत्न करितात. अशा प्रसंगीं गवय्यानीं आपल्या बचावाकरितां प्रश्नकर्त्यांची खरी योग्यता लोकांस समजण्यासारखें उत्तर दिलें म्हणजे हे प्रश्नकर्ते आपली चूक लपवून गवय्याच्या स्वभावाबद्दल निष्कारण ओरड करितात. ज्यांला गवय्याकडून कांहीं माहिती मिळवावयाची असेल त्यांनीं त्यांच्याशीं आदरपूर्वक स्नेहभावानें वागून, त्यांच्या घरीं जाऊन किंवा त्यांला आपल्या घरीं बोलावून गौरव करून माहिती विचारावी, म्हणजे ते ती मोठ्या प्रेमानें देतात. ही गोष्ट मी माझ्या बरेच वर्षांच्या अनुभवानें सांगतों. कदाचित् कांहीं गवय्यांत वैयक्तिक दोष असतील; परंतु ते दोष सामान्यतः सर्व गवय्यांला लावणें न्याय्य नव्हे.

संगीतकलेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांला येथें कांहीं सूचना देणें अप्रासंगिक होणार नाहीं. उत्तम गवय्याचें गाणें किंवा तंतकाराचें वादन वगैरे ऐकण्याची संधि आली तर विद्यार्थ्यानें ती व्यर्थ घालवूं नये. अशा प्रवीण गुणिजनांचें गाणें किंवा वादन चाललें असतां श्रोत्यांपैकीं जो उत्तम समजूतदार असेल त्याच्या जवळ बसावें. गवय्यानें एखादी चीज सुरू केली म्हणजे आपल्या जवळ बसलेल्या समजूतदार गृहस्थाकडून गवय्या गात असलेल्या रागाचें, चिजेचें व तालाचें नांव हळूच विचारून घ्यावें. चिजेची मम कोणत्या ठिकाणीं म्हणजे कोणत्या अक्षरावर ठेविली आहे तेंही विचारून घ्यावें. जमल्यास त्या रागाचे वर्ज्यावर्ज्य स्वर सुद्धां समजून घ्यावे. ही सर्व माहिती लक्षपूर्वक स्मरणांत ठेवून वारंवार मनन करावें. याप्रकारें प्रत्येक बैठकींत माहिती मिळवून मनन करीत राहिल्यास विविध राग, चिजा व ताल यांच्या रूपाची ओळख होऊन त्यांतले भेद लक्षांत येऊन सुलभ रीतीनें ज्ञान होतें. गाणें चाललें असतां असंबद्ध गप्पा मारून वेळ घालवूं नये. गवय्याच्या अंगीं कदाचित् दोष दिसला तरी त्याची चर्चा गाणें चालू असतांना करूं नये. गवय्या व श्रोतृमंडळ यांच्या चित्ताची एकतानता बिघडेल अशी कोणत्याही प्रकारची गडबड मैफलींत करूं नये. गवय्याच्या गाण्यासंबंधानें आपणास कांहीं शंका आल्यास ती गाणें आटोपल्यावर गवय्याला आदरपूर्वक विचारून समाधान करून घ्यावें. गाणें चालू असतां कधींही आपली शंका पुढें आणून गायनाचा रसभंग करूं नये. अमुक गवय्या वाईट गातो वगैरे प्रकारांनीं इतर गवय्यांची स्तुति किंवा निंदा प्रस्तुत गवय्यासमोर प्रसंगाशिवाय करूं नये. गवय्यानें उत्तम तान मींड वगैरे घेतली किंवा फारच खुबीदार रीतीनें सम दाखविली असतां ती खुबी खरोखर आपल्याला समजली असल्यास वाहवा द्यावी. ती न समजतां भलत्याच ठिकाणीं वाहवा देऊन उपहास करून घेऊं नये. योग्य जागीं वाहवा दिली म्हणजे गवय्याला उत्तेजन मिळून गावयास स्फूर्ति येते.

शेवटीं सांगीतकलेस सांप्रत काळीं प्राप्त झालेली निकृष्ट दशा दूर होऊन तिचा उत्कर्ष होण्याकरितां काय उपाय योजिले पाहिजेत याविषयीं कांहीं सूचना उपयोगी पडतील, अशा समजूतीनें त्या येथें देतों:—

१. आज ज्या सुप्रसिद्ध गवय्यांकडे परंपरागत उत्तम चिजा व गायकीचा संग्रह आहे अशा गवय्यांला योग्य उत्तेजन द्यावें, आणि कांहीं बुद्धिमान् होतकरू विद्यार्थ्यांस शिष्यवृत्त्या देऊन सदर्हू गवय्यांच्या तालिमेंतून परंपरागत उत्तम गाण्याचें रक्षण करण्याकरितां नवीन

गवय्ये तयार करवावे. असें न केल्यास आज जी उत्तम गायकी थोडीशी शिल्लक राहिली आहे तिचा लौकरच लोप होण्याचा संभव आहे. ज्याप्रमाणें प्राचीन पद्धतीनें शिकून तयार झालेले संस्कृत शास्त्री व पंडित यांची संख्या कमी होत जाऊन संस्कृत भाषेंतील व्याकरण, न्याय, मीमांसा, वेदांत वगैरे शास्त्रविषयक उच्च दर्जाचे ग्रन्थ समजणारे लोक विरळ झाले आहेत त्याचप्रमाणें ध्रुवपद, धमार, वगैरे चिजा उत्तम प्रकारें गाणाऱ्या गवय्यांची संख्या कमी होत चालली आहे. तरी या श्रेष्ठ गायकीचें पुनरुज्जीवन करण्याला वर सुचविलेला उपाय उत्तम आहे असें मला वाटतें.

२. प्रत्येक शाळेंत, निदान प्रत्येक हायस्कूलांत तरी, ड्राईंग मास्तराप्रमाणेंच एक चांगला गवय्या मुलांला गायन शिकविण्याकरितां नेमला जावा. असें केल्यानें मुलांला शास्त्रीय गाण्याचा परिचय होऊन आवड उत्पन्न होईल व कित्येक गवय्ये आज निराश्रित होऊन बसतात त्यांला योग्य आश्रय मिळेल.

३. हयात असलेल्या श्रेष्ठ गवय्यांची दरसाल परिषद् भरवून त्यांच्या गायनवादनाचे जलसे करून त्यांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें बक्षिसें व पदव्या देण्याची व्यवस्था व्हावी.

४. प्रसिद्ध गवय्यांची व कांहीं संगीतप्रवीण विद्वानांची एक सभा स्थापून तिच्या द्वारें चालू संगीतपद्धतींत असणारे राग, चिजा, ताळ व निरनिराळ्या वाद्यांचे प्रकार, व वादन वगैरेची परंपरागत यथार्थ माहिती एकत्र करून ती ग्रन्थरूपानें छापून प्रसिद्ध करावी.

५. आज हयात असलेल्या प्रसिद्ध घराणेदार गवय्यांस योग्य मोबदला देऊन त्यांच्या परंपरागत उत्तम चिजा फोनोग्राफांत घेऊन संग्रह करून ठेवाव्या व तो होतकरू विद्यार्थ्यांस ऐकण्यास मिळावा.

६. संगीतकलेंत जे जे प्रसिद्ध गवय्ये, तंतकार, पखवाजी वगैरे प्राचीन काळीं किंवा अलीकडे होऊन गेले त्यांची गायकी वगैरेविषयीं जी माहिती मिळेल ती सर्व एकत्र करून त्यांच्या चरित्ररूपानें स्वतंत्र किंवा मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध करावी.

७. संगीत कलेची चर्चा करण्याकरितां एक मासिकपुस्तक प्रसिद्ध गवय्यांच्या व विद्वानांच्या साहाय्यानें चालू करावें.

८. संगीतशास्त्राचे प्राचीन ग्रंथ, वाद्यें, प्रसिद्ध गवय्ये वगैरेंचे फोटोग्राफ, इत्यादिकांचें एक संग्रहस्थान करावें.

वरील सूचना लिहून पुढें मांडणें फार सोपें आहे. परंतु त्याला मूर्त स्वरूप देणें साधारण लोकांच्या शक्तीबाहेर आहे. आमचें सरकार, राजेरजवाडे व श्रीमंत लोकांनीं मनांत आणलें तर मात्र वरील प्रकारच्या सूचनांप्रमाणें उपायांची योजना होऊन फार थोडया अवधींत गायनकलेचें पुनरुज्जीवन होईल. राजाश्रय किंवा लोकाश्रय याशिवाय कोणतीही कला किंवा विद्या ऊर्जित दशेस येणें शक्य नाहीं. तथापि सांप्रत आपल्या भरतभूमींत चालू असलेल्या बहुमुखी जागृतीनें संगीतकलेचें सुद्धां पुनरुज्जीवन लौकर होईल अशी आशा करून वाचकांची रजा घेतों.



# अर्वाचीन मराठी कवि व काव्यें.

[ रा. रा. नारायण महादेव भिडे, बी. ए. ]

Peace, Peace ! he (poet) is not dead he does not sleep.—*Keats* IN 'ADONAIS.'

राष्ट्राची उन्नति मापावयाचें जर एखादें बिनचूक यंत्र असेल तर तें तेथील वाङ्मय होय. त्याची ज्या मानानें जोपासना व अभिवृद्धि झाली असेल त्या मानानें त्या राष्ट्राची उन्नतावस्था ठरविली जाते, ही गोष्ट कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं. वाङ्मयाचे गद्य व पद्य असे जे दोन विभाग पडतात त्यांपैकीं कोणत्याही भाषेंत गद्य वाङ्मयापेक्षां पद्य वाङ्मयाचा उदय अगोदर झालेला असतो. त्यामुळें कोठेंही पाहिलें तरी प्रथम वृद्धिंगत पावलेलें पद्य वाङ्मय असतें असेंच दिसून येईल. वाङ्मयामध्यें काव्याला इतका प्रतिष्ठितपणा आला आहे कीं त्याविषयीं विचार करतांना अग्रपूजेचा मान नेहमीं प्रथम कवींना द्यावा लागतो. याचें कारणही उघड आहे. व्यवहारामध्यें जे नेहमीं प्रसंग येतात ते नीरस व खडतर असतात. त्या योगानें मनुष्याच्या मुळच्या शुद्ध मनावर मळ चढून त्याला एक प्रकारचा हिणकसापणा प्राप्त होतो. तो हिणकसपणा घालवून तें मन पूर्ववत् शुद्ध व उन्नत करणें हें काम काव्याचें आहे. जी गोष्ट व्यक्तीला तीच राष्ट्रालाही लागू आहे; व म्हणूनच, सर नारायण चंदावरकर यांनीं नुकतेंच एका प्रसंगीं म्हटल्याप्रमाणें राष्ट्राचा मोठेपणा नेहमीं तेथील कवींमुळें पारखला जातो. व्यक्तिशः मनुष्यांच्या आत्म्यावर राष्ट्राचा खरा मोठेपणा अवलंबून आहे ही गोष्ट कवीपासूनच जगाला विदित होते. राष्ट्राच्या जीवनामध्यें काव्याला जें विशेष महत्त्वाचें पद प्राप्त झालें आहे त्याचें बीज हेंच होय. व त्याच दृष्टीनें इंग्रजी वाङ्मयाचीं जीं खंडें पडलीं आहेत तीं गद्य ग्रंथकारांच्या नांवानें नसून कवींच्या नांवानें प्रसिद्ध आहेत. मराठी सारस्वतांतही काव्याचा दर्जा उच्च प्रतीचा ठरला गेला आहे. मराठी पुराणवाङ्मयासंबंधानें ही गोष्ट खरी आहे तितकी जरी अर्वाचीन वाङ्मयासंबंधानें नसली तरी एवढें खास म्हणतां येईल कीं, अर्वाचीन कवींची ओळख समाजांत नुकतीच होऊं लागली आहे; व त्यांना त्यांचें योग्य पद मिळालें म्हणजे त्यांच्याच नांवानें काळाची प्रख्याति होत जाईल, हें निर्विवाद होय. युगायुगांची गणती कवींच्या नांवावर होत जावी याचें कारण इतकेंच कीं, भाषेला सुस्थिति प्राप्त झाल्यावांचून तिचा काव्यक्षेत्रांत प्रवेश होत नाहीं. ती स्थिरता पावल्यावरच तिच्यांत उच्च प्रकारचें वाङ्मय निपजूं लागतें. ही निपज होण्याला विशेषतः प्रतिभेची जरूरी लागते. काव्यप्रेरणा व प्रतिभा यांचा परस्परांशीं निकट संबंध आहे. त्यामुळें कोणत्याही काळांत अगर युगांत वाङ्मयाचें मापन काव्यानें केलें जातें. मोरोपंताचें युग संपून रामजोशी यांच्या काळास प्रारंभ झाला. त्याला 'शाहीरयुग' असें म्हणावयास हरकत नाहीं. सन १८१२ सालीं जोशीबोवा यांचा अंत झाला, तथापि त्यांची परंपरा मात्र कांहीं वर्षें पुढें तशीच चालू होती. शेवटचा शाहीर कवि परशराम सन १८४४ या वर्षीं निवर्तला. येथपर्यंत म्हणजे १९ व्या शतकार्धापर्यंत शाहीरयुग चालू होतें, असें सामान्यपणें म्हणावयास हरकत नाहीं.

कित्येकांच्या मतें मोरोपंताच्याच निधनाबरोबर मराठी पुराणकाव्यवाङ्मयाचा काळ संपून अर्वाचीन काव्यवाङ्मयकाळास सुरुवात झाली. रामजोशी, अनंतफंदी, प्रभाकर, होनाजी बाळ, परशुराम, सगनभाऊ वगैरे शाहीर-कवींना प्राचीन कविपरंपरेंतील अखेरचे कवि म्हणून न लेखतां अर्वाचीन काळांतील प्रथमचे कवि म्हणून संबोधिलें पाहिजे. शाहीर-काळाबरोबरच नवशतकाचा उदय होत आहे; तेव्हां औचित्याच्या दृष्टीनें पाहूं जातां कालभागानुसार ते अर्वाचीन ठरतात. शिवाय सांप्रतच्या कवींना शाहिरी पेशाही धारण करावा लागत आहे. या समानवृत्तित्वाच्या नात्यानेंही शाहीर कवींचा काळ 'आधुनिक मराठी काव्याची प्रभात' होय असें त्यांचें म्हणणें आहे. परन्तु त्याबरोबर हेंही लक्षांत घेतलें पाहिजे

* 'ऐक ! ऐक ! कवि नाहीं मेला, मुळें तो झोंपत नाहीं !'

कीं, वर सांगितल्याप्रमाणें शाहीर कवींचा पेशा अर्वाचीन कवींनीं पतकरला असला तरी तेवढयानेंच दोघांमधील विषमता नाहींशी होणारी नाहीं. वाङ्मयाचे खंड पाडतांना कालमानाचा विचार बाजूस ठेवून विचारसंक्रमणाचा हेतु पुढें ठेवला पाहिजे. शाहीरकवि व आधुनिक कवि यांचे विचार पाहिले तर त्यांत महदंतर दिसून येतें. 'ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई' ही वीररसाची जोशीबोवांची लावणी, किंवा 'जुने कायदे अगदिं मोडले जधिपुन झाली इंग्रजी' ही मुक्तकंठानें शाहिरांतील उर्वरित कवि जो परशराम त्यानें गाइलेली दुःखाची कहाणी, हीं व अशासारखी दुसरीं कवनें सोडून दिलीं तर बाकीच्या त्यांच्या विचारांत व प्राचीनांच्या विचारांत कांहीं तरी अंतर आहे काय? हें जें अंतर पडलें तें शाहीर—काळांत नसून पुढील काळांतच पडलें. या शाहीर कवींच्या काळानंतर कवितेला नवीन प्रकारचें वळण लागलें. तेव्हां तो काळ अर्वाचीन काव्याचा उदयकाळ नसून प्राचीन काव्याचा अस्तकाळच होय, असें म्हणणें युक्तीस धरून होईल.

मराठी काव्याच्या अर्वाचीन काळास जरी १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून सुरवात झाली असली तरी त्या काळाचीं पूर्व चिन्हें पेशवाई बुडून नवीन इंग्रजी संसार स्थापल्यानंतर आठ दहा वर्षांतच म्हणजे सन १८२६ सालापासून ठळकपणें दिसूं लागलीं. हिंदी लोकांत नवीन विचार उत्पन्न करण्याचें श्रेय जस इंग्रज लोकांस दिलें पाहिजे तसेंच अभिनव मराठी वाङ्मयाचा पाया घालण्याचें कामही त्यांच्याच हातून झालें. सुरवातीला व्याकरण, बायबल व इतर ख्रिस्ती धर्मपुस्तकांचीं भाषांतरें वगैरे जीं लहान लहान चोपडीं प्रसिद्ध झालीं तीं मिशनरींसारख्या परकीयांनींच लिहिलेलीं आहेत. हीं चोपडीं कितीही क्षुल्लक किंवा गचाळ भाषेंत लिहिलेलीं असलीं तरी नवीन पिढींत याच पुस्तकांनीं अग्रेसरत्वाचा मान पटकाविला आहे. वाङ्मयाच्या दृष्टीनें अर्थात् त्या पुस्तकांचें विशेष महत्त्व नाहीं. त्या वेळचे हिंदी ग्रंथकार म्हणजे बाळशास्त्री जांभेकर, हरी केशवजी, नारायण दिनानाथ माडगांवकर, दादोबा पांडुरंग हे होत. या ग्रंथकारांत कोणीही पद्यलेखक नव्हता. सगळे जण गद्यलेखक होते, हें जरी खरें आहे तथापि त्यांचे गद्यलेखही वाङ्मयाच्या सदरांत पडणारे नव्हते. जांभेकरांचे १८३१ च्या सुमारास प्रसिद्ध झालेले संक्षिप्त इतिहास घेतले, किंवा त्यापुढें दहा वर्षांनीं बनिअनच्या 'पिल्ग्रिम् प्रोग्रेस' या ग्रंथावरून लिहिलेलें 'यात्रिक—क्रमण' हरी केशवजी यांचें पुस्तक घेतलें, किंवा मांडगांवकरांचें 'मुंबईचें वर्णन' घेतलें, तरी वाङ्मयाच्या अर्वाचीन दृष्टीनें त्यांचें विशेष महत्त्व नाहीं, हें कोणीही कबूल करील. गद्य वाङ्मय तयार होत होतें, त्यावेळीं पद्यवाङ्मयाचा दिवसानुदिवस ऱ्हास होत चालला होता. रामजोशी यांची शाहीरपरंपरा कां होईना पण ती अव्याहतपणें सुस्थितींत चालली नव्हती. या वेळचे खंदे कविवीर अनंत फंदी, होनाजी बाळ वगैरे शाहीर एका मागून एक इहलोक सोडून गेल्यानें परशराम शाहीराच्या अखेरीपर्यंत ही परंपरा जरी चाललेली दिसली तरी मुळचा तिच्यांतील जोम गेला. 'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला' ही होनाजी बाळाची भूपाळी फार गोड असून प्रेमळ आहे खरें; पण अशा कवितांची संख्या केवळ बोटावर मोजतां येण्यासारखी आहे. त्या जर सोडून दिल्या तर बहुतेक साऱ्या कविता परोपजीवी व एकमार्गी होत्या. निःस्वार्थतेनें स्फूर्तिदायक कवनें गाऊन राष्ट्रीय जागृति करण्याचें मुळचें काम जाऊन केवळ श्रीमंत व राजेरजवाडे यांच्याशीं गोंडा घोळण्याचें आत्मघातकी काम कपाळीं आल्यावर त्यांच्या हातून मराठी काव्यांत कितीशी भर पडणार? शाहीरयुगाच्या शेवटच्या काळची स्थिति किती हीन व करुणाजनक झाली होती, याचें चित्र परशराम शाहीराच्या नंतर उदयास आलेला बाकेराव व त्याचा तमाशा यांविषयींचो जो कोणी हकीकत वाचील त्यास स्पष्टपणें दिसून येईल. ही झाली शाहिरांची गोष्ट. त्यांच्या खालोखाल काव्याचा व्यवसाय चालविलेले दुसरे कवि म्हणजे संतपरंपरेंतील पुरुष होत. कोल्हापूर प्रांतांतील जोतिषी कवि दाजिबा जोशीबराव यांनीं मोरोपंताच्या कवितेचें पूर्ण अनुकरण किंबहुना त्याहूनही जरा

ताणच केली आहे. मोरोपंताची कविता संस्कृत-प्राकृताची कंथा, तर दाजीबाच्या आर्या बहुतेक संस्कृतच.परशुराम ढवळे यांनीं तर पंतांच्या खालोखाल म्हणजे ३७ शेंच्या वर आर्या लिहून गुरुचरित्र रचिलें. आध्यात्मिक वेदान्तविषयावर लिहिणारे कवि म्हणजे मोगलाईतील हंसराज स्वामी, पूर्णदास, व अवचितसुत काशी, किंवा अगदीं अलीकडचे सर्वांना परिचित असे विठोबा अण्णा दप्तरदार, ही मंडळी होत. एवढेंच काय पण बापू गोखल्यांच्या पथकांत शिपाईगिरी करून नांवारूपास चढलेले रामचंद्र भोजराव देशपांडे यांनींही गणेशचरित्र नामक काव्यग्रंथ रचला आहे. १८३३ च्या सुमारास नागेश महादेव मटंगे हेही कवि प्रसिद्धीस आले होते. वरील सर्व कवि संत असून त्यांपैकीं बरेच जण पहिल्या शतकार्धांतील होत. त्यांची काव्यरचना, विषयप्रतिपादन, वगैरे गोष्टी पाहिल्या तर ते प्राचीन परंपरेंतील आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांच्यापैकीं कांहीं कवींचीं काव्यें, उदाहरणार्थ मटंगे यांचें नंदिकेश्वरजननकाव्य, बरींच सरस वठलीं आहेत. तसेंच विठोबा अण्णांचें 'हरि हा आनंदाचा कंद' हें पदही हृदयंगम असून पदलालित्य, अर्थगौरव व अभियुक्त यमकें या गुणांनीं युक्त असें आहे. तथापि असलीं काव्यें व कविता हीं केवळ अपवादात्मक होत, हें विसरतां कामा नये. शाहिरपरंपरेप्रमाणें संत-कवींची परंपरा नष्टप्राय होत असली तरी पहिल्या-प्रमाणें दुसरीला हीनदशा मात्र प्राप्त झाली नाहीं. हें केवळ तिच्या उच्च ध्येयाचें दर्शक होय.

वर सांगितल्याप्रमाणें १८५० सालापूर्वीच मराठी गद्यवाङ्मयांत जरी फरक पडत चालला होता,तरी पद्य-वाङ्मयाला नवीन वळण मिळालें नाहीं. तें जुन्या-पुराण्या मार्गावरूनच चाललें होतें.परकीय सत्ता आल्यानें शाहिरांचें काम आपोआपच बंद झालें, व काव्याचा उद्देश केवळ परमार्थप्राप्ति अगर ईशगुणानुवर्णन आहे अशी समजूत झाल्यानें, जुनीं पौराणिक कथानकें रचावीत किंवा काव्यद्वारा विद्वत्तापूर्ण आध्यात्मिक उद्घाटन करीत बसावें, असा क्रम चालला होता. पौरा-णिक कवितांत मोरोपंत, रघुनाथपंडित व आध्यात्मिक कवितांत ज्ञानदेव, वामनपंडित यांचे नमुने पुढें धरलेले असत. याशिवाय कवितेला दुसरें कोणतेंही नवीन क्षेत्र उघडें नव्हतें. अशा कुचंबणीच्या स्थितींत पद-लालित्य, प्रास, अनुप्रास, यमकें या बाह्य गोष्टींकडे चित्त वेधावें व या गोष्टी काव्याचें सर्वस्व समजल्या जाव्यात हें साहजिक आहे. आज काव्यविषयक कल्पनांत किती तरी बदल झाला आहे. पण प्राचीन परंपरेनें शिकलेले सध्यांचे पुराणिक व कीर्तनकार यांचें पुराण व कीर्तन जो ऐकेल त्याची शब्दार्थालंकार हेच काव्यांतील मुख्य गुण आहेत अशी समजूत झाल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां गद्य नवीनच तयार होत होतें म्हणून, व पद्य जुनें म्हणून, १९ व्या शतकाच्या पूर्वभागांत वाङ्मयाचीं दोन्हीही अंगें महत्त्वाच्या दृष्टीनें विचार करण्यासारखीं नव्हतीं.

अर्वाचीन वाङ्मयकाळास जी सुरुवात झाली ती यानंतरच्या काळांत, म्हणजे उत्तरशतकार्धा-पासून होय, असें वरील विवेचनावरून स्पष्ट होत आहे. वाङ्मय नवीन बनण्याच्या स्थितींत असतांना, प्रथम त्यास भाषांतरापासून आरंभ होतो. हा नियम येथेंही लागू पडतो. मराठी काव्यवाङ्मयास या वेळीं भाषांतरापासूनच सुरवात झाली, व नंतर कविता निपजूं लागली.या कारणास्तव अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे सामान्यतः दोन विभाग पडूं शकतात. प्रथम भागांतील बहुतेक कवि पंडितशास्त्रिवर्गांतील होत. हा काळ १८५० पासून तों १८९० पर्यंत, म्हणजे सुमारें ४० वर्षे टिकला. त्या वेळच्या नवीन पद्धतीनें तयार झालेल्या पंडितवर्गांत कृष्णशास्त्री चिपळूणकर हे अग्रगण्य असल्यानें त्या काळास 'चिप-ळूणकरी' ऊर्फ पंडिती युग असें म्हटलें पाहिजे. सन १८९० पासून काव्यवाङ्मयाला पूर्वींहून निराळें असें पुन्हां नवें वळण मिळालें. पंडितीयुग जर संस्कृ-ताच्या आधारावर उभें राहिलें आहे, तर त्यापुढचें युग इंग्रजीच्या कडेवरील होय. या नवीन काळांतील काव्यवाङ्मयांत महत्त्वाची उत्क्रांति करून सोडणारा कवि म्हटला म्हणजे केशवसुत. अर्थात् त्या काळास 'केशवसुतीय युग' म्हणणें रास्त आहे. हेंच युग अद्या-पिही चालू आहे.

अशा रीतीनें मराठी काव्याच्या नवीन युगास प्रारंभ झाला खरा; पण मागें सांगितलेल्या नियमानु-

सार तो स्वतंत्रपणानें न होतां भाषांतरानें झाला. तथापि हें खरें आहे कीं तें वाङ्मय भाषांतरित म्हणून परोपजीवि दिसलें ,तरी तें उपेक्षणीय आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. परशुराम तात्या गोडबोले यांचीं उत्तररामचरित आणि वेणीसंहार या संस्कृत नाटकांचीं भाषांतरें १८५७ सालीं प्रसिद्ध झालीं. त्यांपैकीं उत्तररामचरित नाटक सरस व रमणीय झालें आहे. पंडिती युगाच्या पहिल्या दशकांत एवढयाच दोन महत्त्वाच्या पुस्तकांची भर पडली. पुढें चारच वर्षांनीं परशुरामतात्यांचें मराठी शांकुतलही जन्मास आलें. त्याच्या पाठीमागून चिपळूणकरांचें नागानंद, कृष्णशास्त्री राजवाडे यांचें मालतीमाधव, मुद्राराक्षस, विक्रमोर्वशी, हींही नाटकें तयार झालीं. अशा रीतीनें संस्कृतांतून जी कविता भाषांतर होऊन आली ती नाटयरूपानेंच होय. थोरल्या चिपळूणकरांचें ' मेघदूत ' आधुनिक मराठी कवितेंत पहिलें काव्य होय. तें सन १८६५ त प्रसिद्ध झालें. हें भाषांतर साकी छंदांत केलें आहे. त्यांतील भाषाशैली साधी, सोपी व गोड आहे. त्यांतील स्वाभाविकपणा इतका निरुपम उतरला आहे कीं, ' हें भाषांतर मुळचें, कीं कालीदासाचें काव्य मुळचें' ? अशी रामभाऊ जोशी यांनीं आपल्या ' मराठी भाषेची घटना ' या पुस्तकांत म्हटल्याप्रमाणें भ्रांति उत्पन्न होते. संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें बाहेर पडत असतांना इंग्रजींतील काव्यांच्या भाषांतरासही सुरुवात झाली, ती याच संधीला होय. आथेल्लो नाटकाचे भाषांतरकार प्रसिद्ध लेखक महादेव गोविंद शास्त्री कोल्हटकर यांनीं १८६१ सालांत प्राकृत कवितेचें पहिलें पुस्तक व नंतर लागलींच दुसरें अशीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. हा दोन्ही पुस्तकांत इंग्रजी स्फुट काव्यांचें भाषांतर केलें आहे. ' कज्जे कफावती होऊत रस्त्यांत । असावी घरांत शांती मोठी' हें, व ' एका लहान काळ्या मुंगीला गवसला बहु थोर ' हें आर्याबद्ध उपदेशपर प्रकरण, या जुन्या मराठी क्रमिक पुस्तकांत छापलेल्या कविता पुष्कळांच्या परिचयाच्या आहेत. त्या वरील पुस्तकांतूनच उतरल्या आहेत. या लघु कवितांशिवाय १८६७ सालीं कूपर कवीच्या गिल्पिन नामक विनोदी खंडकाव्याचें भाषांतर व स्कॉट कवीच्या 'Lady of the Lake' काव्याचें 'दैवसेनी' नामक रूपांतर मराठींत उतरलीं. अशा रीतीनें संस्कृत व इंग्रजी काव्यग्रंथांच्या भाषांतरास बहुतेक बरोबरच सुरुवात झाली. तथापि संस्कृत भाषांतरांप्रमाणें इंग्रजी भाषांतरें लोकप्रिय झालेलीं दिसत नाहींत. याचें कारण म्हणजे भाषांतरकाराला संस्कृतांतून शब्द, वाक्यरचना वगैरेची जितकी सोय असते, तितकी इंग्रजीचें भाषांतर करतांना सांपडत नाहीं. तें करतांना त्याला जास्त श्रम पडतात. भाषांतरकारासंबंधी हें कारण पुष्कळ अंशानें जरी खरें असलें तरी इंग्रजी भाषांतरें लोकांना आवडतीं न होण्याचें मुख्य कारण म्हणजे इंग्रजी परकीय विचार मराठी वळणाला अनुरूप नाहींत. ते विचार मराठी भाषेंत-विशेषतः मराठी कवितांत–आणण्याचा प्रयत्न केला तरी ते खास शोभणार नाहींत, अशी त्या वेळीं सर्वांची दृढ भावना झाली होती. नाहीं तर आथेल्लो नाटकाचें गद्य भाषांतर ज्या गृहस्थाचे हातून नांवाजण्यासारखें निघावें, त्यानेंच एखाद्या सरस इंग्रजी काव्याचें भाषांतर न करतां केवळ लहान विद्यार्थ्यांसाठीं निवडलेल्या छोटेखानी सामान्य कवितांच्या भाषांतरावर तृप्त व्हावें हें आश्चर्य नाहीं काय ? चिपळूणकरांनीं तत्त्वज्ञानपर अशा बिकट 'रासेलस' कादंबरीचें भाषांतर करावें, पण त्यांची लेखणी संस्कृताप्रमाणें एकाही इंग्रजी कवितेचें मराठींत रूपांतर करण्यास धजूं नये याचें तरी कारण काय ? दोन्हीही ग्रंथकार इंग्रजी कवितांचें मर्म जाणणारे रसिक होते. तात्पर्य, इंग्रजी व मराठी काव्यांमधून येणारी भाषाविषयक मोडणी व विचारपरंपरा हीं अगदीं भिन्न आहेत; इतकी कीं, एकींतील विचार दुसरीस मानवणार नाहींत, व त्या दिशेनें केलेला प्रयत्न यशस्वी होणार नाहीं, अशीच त्या काळच्या ग्रंथकारांची समजूत होती. सुदैवानें सुरवातीप्रमाणें ही समजूत पुढें टिकली नाहीं. कारण बजाबा रामचंद्र प्रधान यांचें ' दैवसेनी' काव्य इंग्रजीवरून उतरलें असतांना देखील त्यांतील सरसपणामुळें त्याला बरेंच महत्त्वही प्राप्त झालें होतें.

संस्कृत व इंग्रजी काव्यांचा मराठींत जसजसा अंतर्भाव होऊं लागला तसतसा त्यांच्या मूळच्या स्वरूपांत फेरबदल होत गेला. 'हा बदल जरी महत्त्वाचा

होता तरी त्याचा अंगीकार मात्र सररास केला गेला नाहीं. छंदःशास्त्रानें घालून दिलेली वृत्तादिकांचीं कठीण जड बंधनें, व पुराण संस्कृत काव्यांचें अंध अनुकरण, या गोष्टी मागें पडून त्या जागीं विविध प्रकारचीं साधीं व सोपीं वृत्तें जन्मास आलीं' हें जें प्रो. सरकार यांनीं बंगाली अभिनव वाङ्मयासंबंधीं म्हटलें आहे तेंच मराठी वाङ्मयासंबंधानेंही म्हणतां येईल. इतकेंच काय, पण मधुसूदन दत्तापासून रवींद्रनाथ ठाकूरपर्यंत इंग्रजी वीणाकाव्यांची रचना बंगालींत करण्याविषयीं जसा पद्धतशीर नेटाचा प्रयत्न झाला तसाच तो मराठींतही पुढील थोडक्याच वर्षांत होऊन आज बराच यशस्वी ठरला आहे. मराठी कवितेच्या नव्या मनूस सुरवात आली ती वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें संस्कृत व इंग्रजी भाषांतरापासून होय. तथापि त्या काळांत स्वतंत्र ग्रंथरचना झाली नाहीं असें मात्र नाहीं. सन १८६६ त परशुराम तात्या गोडबोले यांचा 'नामार्थदीपिका' ग्रंथ तयार झाला. त्यांत विष्णुसहस्रनामाच्या अर्थाची उत्तम फोड केली आहे. प्रत्येक आर्येंत विष्णूचें क्रमवार एकेक नांव गोवून भाष्याच्या साहाय्यानें त्याचें विवरण केलें आहे. काव्य ह्या दृष्टीनें सदरहू ग्रंथास फारशी किंमत देतां येणार नाहीं. आपल्या मुखांतून परमेश्वराचें नांव निघावें एतदर्थ प्राचीन कवींच्या संप्रदायास अनुसरून हा ग्रंथ तयार करण्याचा कर्त्याचा हेतु असावा असें वाटतें. त्यांतील प्रत्येक नांवाचा स्पष्टार्थ केल्यानें तो ग्रंथ अमरकोषासारखा नीरस भासत नाहीं. पुढल्याच सालीं भास्कर दामोदर पाळंदे यांची 'रत्नमाला' चमकूं लागली. मालेंतील पदें ईश्वरभक्तिपर असून त्यांत वात्सल्य रस ओथंबून गेला आहे. ह्या काव्यांतील विषय नवा नसला तरी त्यांतील रस वाचकांचें मन गुंगविण्याला समर्थ आहे.

येथपर्यंत मराठी काव्यांत नवीन विचारांचा प्रसार होण्याचें काम संथपणें चाललें होतें. परंतु पुढें दोनच वर्षांनीं प्रसिद्ध झालेल्या काव्यानें त्या कामास इतकी जोरानें गति दिली कीं, कांहीं काळपावेतों ती गति जरी वाचकांस सहन झाली नाहीं तरी तिचा परिणाम मात्र चिरस्थायी झाला. हें काव्य म्हणजे १८६९ सालीं प्रसिद्ध झालेलें 'राजा शिवाजी' हें होय. महादेव मोरेश्वर कुंटे यांच्या या ऐतिहासिक महाकाव्यानें त्या वेळीं मराठी भाषेमध्यें इतकी खळबळ करून सोडली कीं, त्या काव्यामुळें मराठी भाषेवर कांहीं तरी गंडांतर कोसळलें आहे कीं काय अशी पुष्कळांना भीति वाटली. या काव्यावर चोंहींकडून टीकेचा भडिमार सुरू झाला. टीकेमुळें काव्याची बरीच प्रसिद्धि झाली हें खरें; पण तिचा त्यावर कुपरिणामही घडून आलाच. कारण या महाकाव्याचे एकंदर १२ सर्ग करण्याविषयीं कर्त्याचा जो पहिला संकल्प होता तो अपूर्ण राहिला. बारांपकीं अवघे सहाच सर्ग लिहून झाले. काव्याला प्रारंभीं एक लांबलचक इंग्रजी प्रस्तावना जोडली आहे. तिच्यांत मराठी भाषेसंबंधानें विवेचन व टीका केली आहे. 'साकी किंवा पद यांमधून दिसणारी मराठी भाषा श्लोक व आर्या ह्या संस्कृत छंदांतून दिसत नाहीं. जेथें सहज मराठी शब्द योजतां येतील तेथेंही संस्कृत शब्द कोंबले असल्यानें मराठी कवितांमधून संस्कृत शब्दांची निरर्थक गर्दी झाली आहे.' कुंटे यांनीं ही पद्धत बदलून श्लोकांतून सुद्धां शुद्ध मराठी भाषा कायम ठेवली. तेणेंकरून त्यांचीं काव्यें निर्भेळ मराठी वळणाचीं झालीं आहेत. प्रस्तुत काव्य वाचतांना एखाद्या पंडिताच्या अलंकारयुक्त लुसलुशीत उद्गारांची प्रचीति येत नाहीं; त्यांतील भाषा खड्या सुरांत काढलेली सडेतोडपणाची आहे, पण बहिर्जी नाइकासारख्या अशिक्षित मराठी गड्याच्या व सोयराबाईसारख्या स्त्रीच्या तोंडून पदलालित्याची अपेक्षा करणें म्हणजे काव्याचें मातेरें करणें होय. हा सडेतोडपणा स्वाभाविक भासून काव्यांतील वीररसाला उलट साहाय्यकच झाला आहे. संभाजीचें बालपण किंवा नूरजानीचें वर्णन या प्रसंगांवरून पाहतां या व्यावहारिक भाषेनें वीररसाप्रमाणें अन्यरसाचाही अपकर्ष होत नाहीं ही गोष्ट स्पष्ट होत आहे. प्रस्तुत काव्यांत कुंटे यांनीं आणखी एक नवा उपक्रम सुरू केला आहे. जसें आपण बोलतों,–म्हणजे बोलतांना जसा शब्दावर विशेष जोर किंवा आघात पडतो, तसाच तो कवितेंतील शब्दावरही पडला पाहिजे. उदाहरणार्थ, 'पुढें छान तर्वार उप्सून राहे' या पंक्तींतील 'तर्वार' व 'उप्सून' हे शब्द उच्चारतांना 'र्'

चा व 'प्' चा उच्चार जसा व्यंजनान्त अपूर्ण असतो, तसाच तो काव्यांतही असला पाहिजे, असें त्यांचें मत होतें. वरील शब्दांतील सर्व अक्षरें जर स्वरान्त उच्चारलीं तर तो उच्चार कर्णकटु होतो, व त्यायोगानें काव्याची हानि होत असल्यानें तो एक काव्यदोषच समजला जातो. " So long as this difference between Marathi written and Marathi spoken is not removed or at least recognised, as long as some innovation founded in the knowledge of this difference is not introduced, the cause of metrical Marathi composition should suffer." स्वतः केलेल्या टीकेला अनुसरूनच कुंटे यांनीं आपल्या महाकाव्याची उभारणी केली आहे. ही व्यावहारिक पद्धत काव्यामध्यें उपयोगांत आणली तर बिनशर्त ती कानाला कठोर लागण्याचा संभव आहे. पण कांहीं विशेष ठिकाणीं तिचा अवलंब केला तर ती उलट अर्थवाहक बनते. वर उद्धृत केलेल्या ओळींतच 'तर्वार' व 'उप्सून' असे शब्द वाचले तर त्यांत जास्त कठोरपणाचा व जोरदारपणाचा अर्थ येतो. हा अर्थ तीं व्यंजनान्त अक्षरें स्वरान्त वाचलीं तर येणार नाहीं. असो. 'राजा शिवाजी' हें मराठींतील पहिलें ऐतिहासिक काव्य होय. केवळ याच दृष्टीनें पाहूं जातां त्याला महत्त्व तर आहेच, पण आंतील गुणांमुळें त्याचा दर्जाही बराच वर लागणारा आहे. काव्यांतील वर्णनशैली उत्तम प्रकारची असून वीररसाचा उठाव प्रगल्भतेनें झाला आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर हें काव्य रचना आणि भाषा या बाबतींत उत्कृष्ट वठलें आहे. ह्याच कवीचें दुसरें राजाराममहाराज, छत्रपति कोल्हापूर, यांच्यावरील काव्य १८७१ मध्यें बाहेर पडलें. त्यांत राजा शिवाजीची योग्यता उतरली नाहीं. 'मन' या विषयावरही त्यांनीं एक तत्त्वज्ञानपर खंडकाव्य लिहिलें आहे. कवीच्या भाषावैशिष्ट्यानें याही काव्यावर 'कविराज तत्त्ववेत्ते बनले' अशी उपहासात्मक टीका सुरू झाली. कवि या दृष्टीनें कुंटे यांचा नंबर तत्कालीनांमध्यें बराच वर लागेल. पण त्यांच्या स्फूर्तीची ज्योत मालविण्याला त्यांची भाषाच कारणीभूत झाली असें म्हणावें लागतें. त्यांचा उपक्रम प्रशंसनीय होता तथापि अकालीन म्हणूनच त्यावेळीं तो कोणाच्या पचनीं पडला नाहीं. या भाषांतरी कालामध्यें स्वतःसिद्ध असा एवढाच काय तो प्रयत्न झाला होता.

या पढील म्हणजे १८७०–८० पर्यंतच्या तिसऱ्या दशकांतील भाषांतरित काव्यें म्हणजे कुमारसंभव, गणेशपुराण व गीतासुधा हीं होत. चिपळूणकरांच्या मेघदूतापासून साकी छंद बराच प्रिय झाला होता, त्यामुळें दातार व पाळंदे यांनीं 'कुमारसंभवां'त बऱ्याच ठिकाणीं व 'गीतासुधे'त सर्वत्र त्याच छंदाची योजना केली आहे. हीं दोन्ही भाषांतरें चांगलीं उतरलीं आहेत. तिसरा ग्रंथ आर्याबद्ध असून त्याचें कर्तृत्व राजकुळांत जन्मलेले कवि गणपतराव हरिहर पटवर्धन ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर यांच्याकडे आहे. गणेशपुराण हा ग्रंथ बराच मोठा आहे. त्याची भाषा प्रौढ आहे. संस्कृत शब्द, यमक व दुसरे शब्दार्थलंकार या बाबतींत राजकवीनें मोरोपंताचें पुरतें वळण गिरविलें आहे. गणेशपुराण या काव्याची उत्पत्ति 'अर्वाचीन कविता'कारांनीं दिल्याप्रमाणें मोठ्या गमतीची आहे. कुंटे यांच्या 'राजा शिवाजी' काव्यावर बापूसाहेबांनीं खरमरीत टीका केली. तेव्हां त्यांचे चलते त्यांना टाकून बोलले कीं, 'केवळ टीका करणें सोपें आहे, पण कृति करणें अवघड आहे.' हें उत्तर कवीला अर्थातच झोंबलें, व तेव्हांपासून त्यांनीं आपलें नांव कवीच्या पटांत दाखल केलें. ह्याच कवीचीं 'गंगावर्णन' आणि 'भट्टवंश' अशीं वर्णनात्मक व ऐतिहासिक दोन स्वतंत्र काव्यें आहेत. भट्टवंशाला मूळ काव्यरत्नावलींतून प्रारंभ झाला व पुढें तें स्वतंत्रपणेंच प्रसिद्ध झालें. त्यांत भटपेशवे यांच्या वंशाचें रघुवंशाच्या धर्तीवर वर्णन केलें आहे. दुसऱ्या काव्यांत गंगानदीचें आर्याछंदांत वर्णन आहे. ह्याच्या अगोदर पांडुरंग व्यंकटेश चिंतामणीपेठकर यांचें सन १८७५सालांत 'गंगावर्णना' म्हणून एक काव्य प्रसिद्ध झालें होतें. दुर्दैवेंकरून चिंतामणीपेठकर यांचें काव्य आज कोठेंही उपलब्ध नाहीं. त्यांतील दोनच उतारे ओकांचें 'काव्यमाधुर्य' या पुस्तकांत आले आहेत, तेवढ्यावरूनही त्याचा सरसपणा चांगलाच प्रत्ययास येतो. राजकवीनें गंगावर्णन आणि चिंतामणीपेठकरांचें गंगावर्णना हीं दोन्हींही यद्यपि एकाच विषयावरील काव्यें आहेत, तथापि

त्यांच्याकडे तौलनिक दृष्टीनें पाहिलें तर दोन्हींत तफावत असलेली दृग्गोचर होते. पहिल्यांतील वर्णनात्मक धार्मिक दृष्टि दुसऱ्यांत नाहीं व दुसऱ्यांतील भावनेची उज्ज्वलता पहिल्यांत उतरली नाहीं. प्रसिद्ध काव्यमर्मज्ञ आणि रसिक टीकाकार बाळकृष्ण हंस बीडकर यांनींही याच विषयावर 'भागीरथी' नामक एक बरेंच विस्तृत सुंदर काव्य लिहिलें असून त्यांत भगीरथापासूनची सर्व हकीकत दिलेली आहे. ह्या दशकांत स्वतंत्र काव्यांचा भरणा बराच झाला आहे. १८७२ सालीं शिवराम रामकृष्ण नित्सुरे यांचें 'विद्याधनप्रसंशा' नामक काव्य बाहेर पडलें. त्यांत एका जुन्या बखरींतील गोष्टीचा आधार घेऊन 'विद्याधन हें सर्व धनांत श्रेष्ठ आहे,'हें तत्त्व त्या गोष्टीच्या रूपानें सिद्ध केलें आहे. हें काव्य स्वतंत्र पण पुराण संस्कृत काव्याच्या नमुन्यावर रचिलें आहे. त्यांतील वर्णनें बहारीचीं व सरस आहेत; विशेषतः वासुकी सर्पानें शंकराच्या आज्ञेवरून विबुध नांवाच्या नगराचा संहार केला, त्या वेळचा प्रसंग वाचनीय आहे. दुसरें स्वतंत्र काव्य म्हणजे रा. सा. गोविंद वासुदेव कानिटकर यांची 'संमोहलहरी' होय. हें मूळ विविधज्ञानविस्तारांत 'देवास अर्जी' या नांवानें प्रसिद्ध झालें होतें. कवीनें हें काव्य आपल्या वयाच्या अठराव्या वर्षी लिहिलें. तथापि त्यानें या अल्पवयांत इंग्रजी तत्त्वज्ञानाच्या उदात्त कल्पना मराठी काव्यांत गुंफण्याचें अवघड काम कसें केलें याचें खरोखर आश्चर्य वाटतें. हें काव्य अगदीं स्वतंत्र असून तत्त्वज्ञानास प्रेरक आहे. भाषासरणी पाहूं जातां ती जरी संस्कृतप्रचुर दिसली तरी काव्यांतील विचार अगदीं नवीन प्रकारचे आहेत. जगांतील अस्थिर स्थिति पाहून धर्मसंमूढ झालेल्या मनामध्यें संशयाचे जे कल्लोळ माजले त्यांचें प्रतिबिंब प्रस्तुत काव्यामध्यें पृथ्वीछंदांत गोविलें आहे. चिंतनपर काव्यामध्यें ह्याचा दर्जा बराच वर लागेल यांत संशय नाहीं. संमोहलहरीनंतर ह्याच कवीचीं दोन ऐतिहासिक काव्यें बाहेर पडलीं. पहिल्यानें 'नारायणराव पेशवे यांचा वध' हें काव्य १८७८ त प्रसिद्ध झालें व 'अकबर काव्य' पुढील सालींच प्रसिद्ध झालें. ऐतिहासिक काव्यें लिहिण्याचें जें प्रशंसनीय उदाहरण कुंटे यांनीं घालून दिलें त्याचेंच हीं काव्यें फल होत.

ह्या दोन्ही काव्यांची रचना स्कॉट कवीच्या 'Marmion', व 'Lay of the Last Minstrel' या काव्यांच्या नमुन्यावर केली आहे. 'नारायणराव पेशवे' काव्यांत आरंभीं साताऱ्याच्या किल्ल्यास उद्देशून केलेलें वर्णन, व तिसऱ्या सर्गांतील पुण्याच्या शनवारवाड्याचें वर्णन हीं काव्यांतील उत्कृष्ट स्थळें म्हणून दाखवितां येतील. ह्या काव्याविषयीं 'दक्षिणा प्राईझ कमेटी'चे मर्मज्ञ सेक्रेटरी रावजी शास्त्री गोडबोले यांच्या शब्दांत सांगावयाचें तर 'ह्यांत निरनिराळ्या प्रसंगींचा रसोत्कर्ष योग्यप्रकारें झाला आहे. भाषा गोड असून सुलभ आहे. स्थलांचीं वर्णनें विविध व स्वाभाविक आहेत.' दुसऱ्या काव्यामध्यें अकबराची जन्मापासून हकीकत दिली असून त्यांत अनुषंगानें जगन्नाथपंडित व बादशहाची कन्या यांच्या प्रेमप्रसंगाची हकीकत गोंविली आहे. याही काव्यांतील वर्णनस्थलें चांगलीं उतरलीं आहेत. कानिटकर यांचें 'कृष्णाकुमारी काव्य' विस्तारांत प्रसिद्ध झालें आहे. वरील चार काव्यांनंतर कवीनें आपला काव्यव्यासंग बहुतेक सोडल्यासारखाच होता. हे १९१८ सालीं आपल्या वयाच्या ६४ व्या वर्षी वारले.पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यांच्या हातून पुढें एकही काव्य असें लिहिलें गेलें नाहीं. शेवटीं शेवटीं त्यांनीं गूढ शृंगारिक व वत्सलरसयुत स्फुट कविता लिहिली आहे.या कविता जरी उच्च दर्जाच्या असल्या तरी पण पहिल्या स्फूर्तीला अनुरूप अशी पुढील काळांत काव्यनिष्पत्ति झाला नाहीं हें खास. 'तुकोजीराव होळकर' हा गणेशशास्त्री लेले यांचा ऐतिहासिक पोवाडा, व कृष्णशास्त्री राजवाडे यांचा 'उत्सवप्रकाश,' हीं दोन काव्यें या वेळींच प्रसिद्ध झालीं. पहिल्यांत तुकोजीरावाचें चरित्र असून दुसऱ्यामध्यें हिंदु लोकांतील प्रत्येक सणाचें सोपपत्तिक पद्यात्मक वर्णन केलें आहे. सणाविषयींच्या ज्या आख्यायिका प्रचलित आहेत त्यांचा प्रकृत काव्यांत उल्लेख केला आहे. काव्यांतील एकंदर वर्णनशैली चांगली साधली आहे. उत्तान शृंगाराचें वर्णन म्हणून खालील श्लोक पाहण्यासारखा आहे.

**नितंबिनी वदे ' किमर्थ कुंभ मस्तिरस्थ हा**
**शिवोनि घेतला? तुम्हां करील दंड भूप हा. '**
**'उरीहि दोन कुंभ, एक मस्तकींहि, भार हा**
**कमी करावयास युक्ति योजिली अम्हीं पहा ! '**

येथें पंडिती युगाचें तृतीय दशक संपून चौथ्या दशकास प्रारंभ होतो. सन १८८० पासून १८९० पर्यंतच्या काळांत काव्यांची मुळींच उणीव पडली नाहीं. लेले शास्त्री यांचा मराठी रघुवंश संस्कृतांतून, तर कीर्तिकरांची 'इंदिरा' इंग्रजीमधून अवतीर्ण झाली. मराठी रघुवंशाची ख्याति चिपळूणकरांच्या मेघदूताच्या खालोखाल आहे. कवि स्वतः शास्त्री असूनही भाषा अगदीं सोपी व गोड योजिली आहे. त्याशिवाय त्यांचीं शिवाजीचरित्र व कृष्णाकुमारी अशीं दोन स्वतंत्र काव्यें आहेत. त्यांतील भाषासरणी रघुवंशासारखीच आहे. परंतु रचनेच्या दृष्टीनें तीं चित्ताकर्षक नाहींत. रघुवंश भाषांतर असूनही सरस ठरतें. इन्दिरा काव्यांतील विषय काल्पनिक स्त्रीराज्य हा आहे. हें सामाजिक स्वरूपाचें काव्य मराठींत अगदी नवीन धर्तीचें आहे. त्याची रचनाही विषयाला अनुरूप अशी केली आहे. मधून मधून गीतें घातलीं असल्यानें गायनाचीही सोय झाली आहे. या काव्याशिवाय 'भक्तिसुधा' व 'विलापलहरी' अशीं त्यांचीं दोन खंडकाव्यें आहेत. पहिलें भक्तिपर, व दुसरें कवीनें आपल्या पत्नीच्या निधनासंबंधीं रचलें आहे. कीर्तिकरांची कविता सामान्यतः शुद्ध असून तिच्यांतील रस संथपणें वाहत असलेला दिसतो. इंग्रजींतील बऱ्याच मोठया काव्याचा 'इंदिरे'च्या रूपानें केलेला अनुवाद हा मराठींतील पहिलाच प्रयत्न होय.

इंग्रजी लघुकवितांचा लाभ करून देण्याचा प्रारंभ रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनि यांच्यापासून झाला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. मागें उल्लेख केलेला कोल्हटकरांचा संग्रह अगदींच प्राथमिक स्वरूपाचा होता. महाजनि यांनीं अनेक कवींच्या उत्कृष्ट कवितांनीं आपली 'कुसुमांजलि' सजविली. मूळच्या कवितांचें स्वारस्य कवीनें आपल्या भाषांतरांत हुबेहुब उतरलें आहे. महाजनि यांचें हें एकच कवितांचें पुस्तक आहे; तथापि त्यानें मराठींत चांगल्या विचारांची भर टाकिली हें निर्विवाद होय. रे. नारायण वामन टिळक यांनीं पूर्वाश्रमीं लिहिलेलें ' माझा ओसाड पडलेला गांव ' हें गोल्डस्मिथ कवीच्या एका खंडकाव्यावरून लिहिलें आहे. मुळांतील सहजतेचा ह्या रूपांतरांत अनुभव येतो. खंडो कृष्ण ऊर्फ बाबा गर्दे यांचेंही ' विजनपुरी ' म्हणून त्याच काव्याचें भाषांतर आहे. बाबांनीं 'गीतामृतशतपदी' व 'गीतापंचदशी' म्हणून जीं भाषांतरकाव्यें पुढें लिहिलीं त्यांची माधुरी विजनपुरीमध्यें उतरलेली नाहीं. इंग्रजी कवितांतील मध्यवर्ती कल्पना पुढें ठेवून तदनुरूप रचलेल्या कविता बऱ्याच प्रगट होऊं लागल्या होत्या. 'स्वग्रामप्रीति,' 'प्रियमातृनिधन' हीं त्यांपैकींच होत. पहिलींत आपल्या गांवांतील नानाविध चमत्कार व त्यावर असलेली आपली अढळ प्रीति यांचें चित्र आहे, तर दुसरीमध्यें मातेचें गुणवर्णन, तिचें आपल्या पुत्रावरील निर्व्याज प्रेम दाखविलें आहे. ह्या कवितेला कूपर कवीच्या ' मातेच्या तजबिरीकडे पाहून' ह्या कवितेचा आधार घेतलेला दिसून येतो.

स्वतंत्र काव्यांमध्यें पांडुरंग शास्त्री पारखी यांच्या शब्दार्थालंकारांनीं युक्त अशा 'षड्ऋतुवर्णन' काव्याचा उल्लेख केला पाहिजे. काव्य स्वतंत्र आहे, तथापि कालिदासाच्या ऋतुसंहारांत व या ऋतुवर्णनांत रचनेच्या दृष्टीनें वस्तुतः मुळींच फरक नाहीं. ऋतुवर्णन काव्य रसाळ आहे. त्याची भाषाही प्रौढ आहे. मधून मधून श्लेषादि अलंकारांनीं त्यास सजविलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे संस्कृत व्याख्येला धरून ह्या काव्याची रचना केली आहे. कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या ह्याच विषयावरील ग्रंथापेक्षां हें काव्य सरस वठलें आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या अकाल–निधनावर हरि नारायण आपटे यांचें खंडकाव्य या काळांतच बाहेर पडलें. त्यांत चरित्रनायकाचें गुणवर्णन तर आहेच, पण शिष्याची आपल्या गुरूचे ठिकाणीं असलेली भक्ति व प्रेम यांचा त्यांत पदोपदीं अनुभव येत आहे. त्याच्या जोडीला 'विष्णुनिधन' म्हणून विठ्ठल भगवंत लेंभे यांचें एक लहानसें काव्य आहे. धाटणी संस्कृत असून पदलालित्य हा त्यांतील विशेष गुण आहे. त्यांत वर्णिलेला पत्नीचा शोक बरा आहे. ह्यापेक्षां लेंभे यांची आठवण ज्या दोन काव्यांमुळें राहील तीं 'सुरतरंगिणी' आणि 'शोकावर्त' हीं होत. पहिलें काव्य कल्पनानिर्मित असून त्याचे सहा सर्ग आहेत.

दुसऱ्या खंडकाव्यांत कवीनें आपल्या प्रिय पत्नीच्या कायमच्या विरहानें होरपळून गेलेल्या हृदयाचें प्रतिबिंब उमटविलें आहे. हें काव्य वाचीत असतांना मनास चटका लागून डोळ्यांतून टिपें गळल्यावांचून राहत नाहींत, इतका त्यांत करुणरस उतरला आहे. 'आनंदकंद' नांवाच्या याच कवीच्या एका अपूर्ण काव्याचे बारा सर्ग 'करमणूकीं'त प्रसिद्ध झाले आहेत. लेंभे यांची भाषा प्रौढ, ठाकठिकीची व कर्णरंजित आहे. वर्णनात्मक अशीं ह्या कवीचीं आणखीही दुसरीं खंडकाव्यें आहेत. गोविंदराव कानिटकरांच्या ऐतिहासिक काव्याप्रमाणें वामन दाजी ओक यांनीं 'थोरले माधवराव पेशवे यांचा मृत्यु' हें काव्य केलें आहे. तें मूळ मुंबईच्या दंभहारक आणि वि. ज्ञा. विस्तार या मासिकांतून प्रसिद्ध झालें होतें. या काव्यांत जीं उत्तम मर्मस्थलें आहेत त्यांपैकीं मृत्युशय्येवर पडले असतांना माधवरावांना आपल्या आईच्या वियोगामुळें झालेला पश्चात्ताप व त्यांचें राघोबाबरोबर झालेलें कळकळीचें भाषण हीं दाखवितां येतील. मिरजेचे वासुदेव वामनशास्त्री खरे यांच्या 'यशवंतराव' काव्याची महत्त्वाची भर यावेळीं मराठी काव्यांत पडली. सुरतरंगिणी काव्याचा विषय काल्पनिक असल्यानें कवीच्या प्रतिभेला उड्डाण करण्याला अवसर सांपडला; परंतु यशवंतराव काव्यांत ऐतिहासिक, निदान इतिहासाभासात्मक प्रसंग गोविलेले असल्यानें त्यांत पहिल्या इतकी स्वतंत्रता नाहीं. पहिल्या काव्यापेक्षां हें काव्य बरेंच मोठें आहे. इतकेंच नाहीं तर आधुनिक काव्यांमध्यें याच काव्याला संख्याधिक्याचा मान मिळू शकेल. त्यांत नानाप्रकारचे प्रसंग वर्णिले असल्यानें त्याला महाकाव्य ही सार्थ पदवी लावितां येईल. विषयभिन्नतेप्रमाणें दोन्ही काव्यांच्या शब्दयोजनेंत फरक दिसतो. सुरतरंगिणीची भाषा संस्कृतप्रचुर आहे. तिच्यामुळें काव्याला गांभीर्य आलें आहे. यशवंतराव काव्यांतील भाषा साधी, पण गोड आणि सुलभार्थवाहक आहे. खरे शास्त्री यांनीं 'समुद्र' म्हणून १८८४ सालीं एक खंडकाव्य लिहिलें आहे. विषयनाविन्याच्या योगानें तें मनोवेधक झालें आहे. वर जें कानिटकरांच्या स्फूर्तिशैथिल्याविषयीं लिहिलें आहे, तेंच याही कवीस लागू होतें. हीं दोन काव्यें व दुसरीं किरकोळ ऐतिहासिक व वर्णनात्मक प्रकरणें एवढीच ह्या कवीची सामुग्री आहे; व ती सगळी गेल्या शतकांतली आहे.

मोठीं काव्यें लिहिणारे त्या काळचे दुसरे दोन कवि म्हणजे रिसबूड व विसाजी रघुनाथ करंदीकर हे होत. रिसबूड यांचें सगळें नांव केशव सदाशिव रिसबूड असल्यानें त्यांची कविता 'के.स.री.' ह्या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. 'व्यवसायपद्यसहस्र' आणि 'सुधारणावारणांकुश' अशीं त्यांचीं दोन मोठीं काव्यप्रकरणें असून 'प्रभुलीलाशती' हें एक खंडप्रकरण आहे. हें खंडकाव्य अत्यंत रसाळ आहे. रचना व रसाविर्भाव या दोन्हीही दृष्टींनीं पाहिलें तर या काव्याला 'आधुनिक केकावली' म्हणणें योग्य होईल. मोठ्या प्रकरणांपैकीं पहिलें काव्य सन १८८४ सालीं प्रसिद्ध झालें. त्यांत व्यवहारास उपयोगी अशा विषयांवर सुभाषितें रचिलीं आहेत. सुधारणावारणांकुशाच्या विषयाचें आकलन त्याच्या नांवावरूनच होतें. 'केसरी'ची रचनापद्धति शुद्ध, सरळ व सुबोध आहे. कवितांतून वरचेवर दृष्टांत दिले असल्यानें त्यांतील तात्पर्य मनावर चांगलें बिंबतें. ह्या कवीचे नेत्र गेल्यावर त्यानें 'केसरीचें अंधत्व' म्हणून एक मार्मिक स्फुट कविता लिहिली आहे. समानभागी मिल्टन कवि व त्यानें आपल्या अंध स्थितीवर लिहिलेली कविता यांची येथें आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. ह्या कवींतील एक मोठा दोष म्हटला म्हणजे नवीनांबद्दलची त्यांची दोषैकदृष्टि हा होय. या दृष्टींतील एकांगीपणाचा कळस तर त्यांच्या सुधारणावारणांकुशामध्यें झाला आहे. मराठी कविता सर्वसंचारप्रवृत्त झाली होती हें यावरून दिसून येतें. ऐतिहासिक व सृष्टवस्तुवर्णनात्मक विषयाप्रमाणें सामाजिक विषयावरही तिची दृष्टि पोंचली. इतकेंच काय पण तिचे राजकीय विषयावरही खेळ सुरू झाले. करंदीकर यांनीं 'क्राफर्ड महाकाव्यां'त क्राफर्ड साहेबांवरील लांच घेतल्याच्या खटल्यानें महाराष्ट्रांत जो सर्वत्र धुमाकूळ माजून राहिला होता, त्याची हकीकत काव्यरूपानें ग्रथित केली आहे. सामाजिक अगर राजकीय विषयांवरील काव्यें जरी रसोत्कर्षक नसतात तरी एकंदरीनें त्यांचा दर्जा कमी प्रतीचाच समजला जातो.

कापडें—महाकाव्यांत कांहीं कांहीं स्थळें मजेचीं आहेत; पण काव्य या दृष्टीनें त्याला फारसें महत्त्व देतां येत नाहीं. अनंत वामन बर्वे यांचें 'सावित्री काव्य' सहा अध्यायांत प्रसिद्ध झालें. त्याची रचना विषयाप्रमाणें पौराणिक आहे. तें साकीबद्ध असून भाषाही बरी आहे. मोठ्या काव्यांप्रमाणें खंडकाव्यांचीही संख्या बरीच आहे. कृष्णाजी नारायण आठले यांनीं आपल्या केरळकोकिळांतून पुष्कळ कविता लिहिली. त्यांत सासरची पाठवणी, माहेरचें मूळ, वगैरे काव्यें लोकप्रिय झालीं आहेत. त्यांमध्यें स्त्रियांच्या भिन्न भिन्न कोमल मनोविकारांचीं चित्रें इतकीं हुबेहुब रंगविलीं आहेत कीं, कवीला 'स्त्रियांचे कवि' असें सार्थ नांव लागू पडतें. आठल्यांची कविता सुगम व चटका लागणारी आहे. याच कवीच्या तोडीचे विनायक कोंडदेव ओक हे कवि होत. ह्यांनींही आपली कविता बालबोधांतून प्रसिद्ध केली आहे. अर्थात् तिच्या शुद्धतेविषयीं निराळें सांगावयास नकोच. त्यांची सगळीच कविता स्फुट आहे. हरि कृष्ण दामले यांनींही 'पार्वतीप्रकोप' म्हणून पार्वती नामक नदीला पूर आल्यामुळें जो अनर्थ ओढवला त्याचें वर्णन वरील खंडकाव्यांत लिहिलें आहे. ओक व दामले हे दोघेही कवि चिपळूणकरी वळणांतले आहेत. नारायण धोंडदेव खांडेकर यांचाही 'प्राकृत कविता' म्हणून नीतिपर कवितांचा संग्रह प्रसिद्ध झालेला आहे. कुरुंदवाडकर राजकवीप्रमाणें ज्या एका प्रधानकवीचा मराठीला लाभ झाला त्या राजा सर टी. माधवराव यांची स्फुट कविता आर्याछंदांत रचलेली आहे. कवि परप्रांतीय असूनही त्यांची भाषा पुष्कळच सुबोध झाली आहे. या मुत्सद्दीकवीनें दि.ब.रघुनाथराव, त्रावणकोरचे मंत्री रामराव वगैरे मुत्सद्द्यांवर जीं कवनें केलीं तीं वाचनीय आहेत. गोडबोले यांचें 'ऋष्यशृंगोपचरित्र' नांवाचें खंडकाव्य आहे. हें व मागें उल्लेखिलेलें 'भट्टवंशकाव्य' हीं दोन चिपळूणकरी ऊर्फ पंडिती युगाचीं अखेरचीं काव्यें होत. पौराणिक विषयावरील आणखी एक काव्य म्हटलें म्हणजे लक्ष्मण जयदेव गोरे यांनीं केलेलें 'आर्यायंत्रशिवलीलामृत' होय. मूळच्या ओवीबद्ध शिवलीलामृताला आर्याबद्ध करतांना मुळांतील स्वारस्याला धक्काच लागलेला भासतो. या ग्रंथाचा विशेष म्हणजे मोरोपंतांच्या आर्याभारताप्रमाणें त्याच्यांत 'नमो भगवते शंकराय' या मंत्राचें एकेक अक्षर प्रत्येक आर्येच्या सुरवातीला घातलें आहे. हे कवि बुंदेलखंडांतील रहिवासी होते; पण भाषेंत मात्र ते पूर्ण महाराष्ट्रीय दिसतात. महाराष्ट्राबाहेर असूनही इतकी भाषाशुद्धि कायम राहिली ही सर टी. माधवराव व गोरे यांच्या कवितेसंबंधीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. तिसरे महाराष्ट्राबाहेरील कवि घंटय्या नायडू हे होत. त्यांचें 'मैना' नामक मेघदूताच्या धर्तीवर लिहिलेलें एक स्वतंत्र खंडकाव्य आहे. या काव्याचा विशेष म्हटला म्हणजे त्यांतील निर्यमक रचना होय. हे कवि मध्यप्रांतांतील हिंदी भाषेच्या क्षेत्रांत राहणारे असून त्यांनीं मराठींत काव्यरचना करावी हेंच अगोदर आश्चर्यकारक व अभिमानास्पद आहे. घंटय्या यांच्या हातून वरील काव्यानंतर पुढें कांहींच कविता निर्माण झाली नाहीं. पण त्याचा दोष मुख्यतः त्या काव्यावर झालेल्या विघातक प्रखर टीकेलाच देतां येईल.

येथें पंडिती युग संपलें. ह्या युगांत मराठी काव्यवाङ्मयाला संस्कृत काव्यांच्या भाषांतरापासून सुरुवात झाली असली तरी त्यांत स्वतंत्र काव्येंही पैदा झालीं आहेत. इंग्रजी काव्यांचीं भाषांतरें तयार झालीं, पण त्यांना हा काळ प्रतिकूल होता असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. भाषा व वळण या बाबतींत कुंटे यांच्या नवीन उपक्रमास त्यांच्यापुरतें जरी अपयश आलें, तरी त्याचा सुपरिणाम झालेला निःसंशय दिसतो. चिंतामणिपेठकर ह्यांच्या गंगावर्णनांत, व कानिटकर, ओक व खरे यांच्या ऐतिहासिक काव्यांतून तो दिसत आहे. तथापि ह्या युगांतील कविता सामान्येंकरून संस्कृताच्या धर्तीवर आहे. मराठी कवितेला आध्यात्मिक व पौराणिक रुळलेल्या मार्गावरून बाजूस काढण्याचें काम या वेळीं झालें. हीच ह्या युगाची महत्त्वाची कामगिरी होय. अशा रीतीनें एकदां तिला नवीन दिशा लागल्यावर व तिच्यांत नवीन चैतन्य संचरल्यावर तिचा विहार निरनिराळ्या दिशांनीं होऊं लागावा हें साहजिक होय.

सन १८९० सालानंतर मराठी कवितेला पुन्हां नवें वळण लागलें. १८७४ सालीं ' निबंधमाला ' जन्मास आली. तेव्हांपासून मराठी गद्याला जें जोरदार नवस्वरूप आलें त्याचा परिणाम पद्यावरही हळू हळू पण खात्रीनें होऊं लागला. इंग्रजी भाषेंतील विचार मराठीला मानवत नाहींत अशी जी पूर्वी समज झाली होती व ज्या समाजामुळेंच इंग्रजी विचारांचा मराठी काव्यांत शिरकाव होण्यास अडचण भासत होती तिचा निरास झालेला गद्यलेखांवरून स्पष्ट दिसत होतें. कोणतेही विचार मराठीच्या द्वारें चांगल्या रीतीनें प्रगट होऊं शकतात इतक्या ती मगदुराची आहे, ही गोष्ट निबंधमालेनेंच जगजाहीर केली. जी गोष्ट गद्यामध्यें शक्य तीच पद्यामध्येंही शक्य आहे. ही कामगिरी ह्या नवीन युगास करावयाची होती. सारांश, पंडिती युगांत मराठीनें संस्कृत ललित वाङ्मय आपलेंसें केलें, तर त्यापुढील युगांत ती इंग्रजी विचार बोलूं लागली. पूर्वीच्या व आतांच्या काळांत ज्या एका गोष्टीमध्यें फरक पडला ती ही कीं, या वेळीं पद्यापेक्षां गद्यवाङ्मयाचा अगोदर उदय झाला. त्यामुळें ' गद्यामागून पद्य ' ह्या तत्त्वाची येथें उलटापालट झालेली दिसते. या बाबतींत मराठींतील ह्या युगाचें व आंग्लसारस्वतांतील राजकवि टेनिसनच्या युगाचें बरेंच साम्य आहे. टेनिसनच्या युगारंभींचा ग्रंथकार थॉमस कार्लाइल होय तो गद्यलेखक होता, इतकेंच नव्हे, तर पद्यलेखनाचा काळ अजीबात गेला—अशा विलक्षण समजुतीचा तो ग्रंथकार होता. ज्याप्रमाणें कार्लाइलचे पाठीमागून टेनिसन पुढें आला, त्याप्रमाणें मराठी नवीन गद्याचे प्रवर्तक विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या मागून केशवसुतांच्या काव्याला प्रारंभ झाला. पाश्चात्य विचार आपलेसे करून घेण्याचें श्रेय पुष्कळ अंशीं 'केशवसुता'लाच आहे, याविषयीं वाद नाहीं. या कवीचें अनुकरण सांप्रत सर्वत्र होऊं लागलें आहे. त्यावरून पाहतां नवीन काळांतील काव्याचा जनक हाच कवि होय, असें म्हटल्यास सत्यापलाप होणार नाहीं. ह्या काळास ' केशवसुतीय युग ' असें उल्लेखिलें जातें याचें कारण वरील दृष्टीच होय.

नवीन उत्क्रांत युगाचा आरंभ जरी १८९० सालापासून झालेला आहे, तरी पहिलीं कांहीं वर्षें मराठी काव्याचें मागील स्वरूप कायम होतें. ह्या युगाच्या पहिल्या दशकांत प्रसिद्ध झालेलीं मोठीं काव्यें म्हणजे 'बाजी प्रभू,' 'सिंहगडची मोहीम,' व 'दैवदुर्विलास' हीं होत. तीं तिन्हीही ऐतिहासिक आहेत. पहिलीं दोन विविधज्ञानविस्तारांतून खंडशः व तिसरें स्वतंत्र अशीं प्रसिद्ध झालीं आहेत. बाजी प्रभू काव्याचे पांच सर्ग असून त्यांत बावनखिंडींत मोगलांना थोपवून धरण्यासाठीं जो भयंकर संग्राम झाला त्याचें वर्णन आहे. हें काव्य मोरो गणेश लोंढे यांनीं लिहिलें. सिंहगडची मोहीम हें काव्य पुरुषोत्तम भास्कर डोंगरे यांचें आहे. त्यांत तान्हाजीनें सिंहगड हस्तगत केल्याची हकीकत वर्णिली आहे. याही काव्याचे पांच सर्ग असून तें वरील काव्यापेक्षां मोठें आहे. 'दैवदुर्विलास' म्हणजे पानपतच्या रणावर मराठ्यांचा समूळ घात होऊन त्यांच्यावर आकाशाची जी कुऱ्हाड पडली त्या प्रसंगाची कारुणिक हकीकत होय. हें काव्य आर्याबद्ध असून बरेंच मोठें आहे. त्यांतील वर्णन सरस असून प्रसंग रेखीव आहेत. बाळकृष्ण लक्ष्मण कुळकर्णी हे त्याचे कर्ते होत. तें काव्य १८९८च्या सुमारास प्रसिद्ध झालें. आणखी एक ऐतिहासिक मोठें काव्य म्हणजे महाडचे केशव अंताजी हर्डीकर यांचें ' शिवविजय' हें होय. हें ओवीबद्ध आहे. त्यांत कवीनें शिवाजीच्या विविध पराक्रमांचें वर्णन केलें आहे. वर्णनाची शैली श्रीधर कवीच्या खालोखाल आहे. भाषा साधी, व छंद साधा असल्यानें काव्य चित्तवेधक झालें आहे. आधुनिक कवितेला प्रकाशांत आणणारी ' काव्यरत्नावली ' १८८७ सालीं सुरू झाल्याकारणानें जी प्रकाशनाची अडचण भासत असे ती पुष्कळ अंशीं दूर झाली. तिच्यामधून मोठीं काव्यें क्रमशः बाहेर पडूं लागलीं. सदाशिव मोरेश्वर भिडे यांचें 'पहिले बाजिराव' व नारायण कृष्ण गद्रे यांचें ' प्रतापसिंह ' नामक ऐतिहासिक काव्य हीं 'रत्नावली'तूनच प्रसिद्ध झालीं. पैकीं पहिलें कवीच्या मृत्यूमुळें व दुसरें लोकाश्रयाभावामुळें अपूर्ण स्थितींत राहिलीं आहेत. वरील काव्यांतून रसाविर्भाव उत्कट साधला आहे. तीं सगळीं वीररसात्मक असून त्या रसाची उठावणी व वर्णनशैली प्रशस्यतर झाली आहे. गद्रे यांचें ' महाराष्ट्रमहोदय ' नांवाचें दहा सर्गांत लिहिलेलें आणखी एक ऐतिहासिक काव्य आहे. हेंही अपूर्णच राहिलें आहे. हे कवि आज

सुदैवानें हयात असतांना त्यांचीं काव्यें अपुरीं राहावींत याचें मोठें आश्चर्य वाटतें. अपुऱ्या काव्यांमध्यें शिरसावकर यांचें ' श्रीमद्रत्नसिंह, " सिंहगडची मोहीम' कर्ते डोंगरे यांचें ' शेतकरी', व पळनिटकरांचें ' ह्या काव्यांचा उल्लेख केला पाहिजे. ' शेतकरी ' हें काव्य अगदीं नवीन धर्तीचें असून त्यांत देशांतील दुःस्थितीचें व शेतकऱ्यांच्या आपत्तीचें चित्र काढण्याचा कवीचा प्रयत्न स्तुत्य होता. महाराष्ट्र नृपवृत्तांतही शिवाजीचें, आणि त्याच्या पूर्वीच्या व पाठीमागील राजांचें वर्णन यावयाचें होतें. वरील दोन्हीं प्रयत्न एका सर्गानंतर थंडावले. हीच स्थिति 'रजपुतकन्या तारा' या काव्याची झाली आहे. ही अपूर्ण काव्यांची मालिका पाहिली म्हणजे मराठी कवितेच्या दुर्दशेपेक्षां आमच्या कवींच्या आरंभशूरत्वाची चांगली साक्ष पटते. केशव नारायण वैद्य यांचें 'तापी नदी' काव्य सरस व रमणीय झालें आहे. ती नदी ज्या ज्या प्रदेशांमधून वाहात आहे, त्यांच्या विविध वर्णनांनीं हें काव्य भरलेलें आहे.

या शतकांत स्वतंत्र काव्याबरोबर भाषांतरेंही चालू होतींच. काव्यरत्नावलीकर्ते नारायण नरसिंह फडणीस यांचें ' शिवाजीचमत्कारकाव्य ' पुरुषोत्तमकृत संस्कृत काव्यावरून रचलें आहे. त्याचे तीन सर्ग असून तें काव्यरत्नावलींतून प्रसिद्ध झालें आहे. मोरोपंतांच्या संस्कृत मुक्तामालेचें भाषांतर सदर कवीनेंच केलें आहे. फडणीस यांची भाषा प्रौढ व ठाकठिकीची आहे. सदाशिव मोरेश्वर भिडे यांचें कविबादशहा लोलिंबराज यांच्या संस्कृत काव्यावरून भाषांतर केलेलें हरिविलास काव्य पंचसर्गात्मक झालें आहे. भर्तृहरि कवीच्या नवीनच उपलब्ध झालेल्या विज्ञानशतकाचें मोरो भिकाजी आगाशे यांनीं, आणि चाणक्याचें 'नीतिशतक' व जगन्नाथ पंडिताचें ' भामिनीविलास' ह्या काव्यांचीं 'दंडी' कवीनें भाषांतरें केलीं आहेत. लँब्स टेल्सच्या एका गोष्टीच्या आधारें रामराव बाळकृष्ण कीर्तिकर यांनीं 'तुफान' काव्य लिहिलें. खरेशास्त्री यांचें मृत्युकाव्य, भांडारे यांची धूमपत्रिका, नेने यांचें जगदीशस्तोत्र, पेठे यांची स्तोत्रमाला, हीं लहानमोठीं खंडकाव्यें विविध असून त्या वेळेपासून मराठी कविता किती बहुभाष झाली याची निदर्शक आहेत. इंग्रजी स्फुट कवितांचीं जीं भाषांतरें 'मणि' व भांडारे यांच्या लेखणींतून उतरत त्यांत विशेषेंकरून स्कॉट, बायरन, वर्ड्स्वर्थ, मार्लो व मूर यांचा भरणा आहे. तेव्हां काव्योत्पत्तीच्या दृष्टीनें हें दशक मागें पडणारें झालें नाहीं हें कबूल केलें पाहिजे. इतकेंच काय, पण आज जीं नांवें लोकांच्या पुढें प्रामुख्यानें झळकत आहेत त्यांच्या कृतींची निपज होण्यास ह्याच वेळेपासून सुरवात झाली. केशवसुत, विनायक, दत्त, माधवानुज, टिळक हे गतकवि व तांबे, रहाळकर, भिडेद्वय, राधारमण, चंद्रशेखर या विद्यमान कवींचा वर्ग आपल्या प्रगल्भ व रसाळ वाणीनें मराठी कवितेचीं गाणीं गात होता.

प्राचीन व अर्वाचीन काळांच्या संधीवर चिपळूणकरी युगाचा अवतार झाला; पण त्याचा सांधा पुढील केशवसुतीय युगाशीं बरोबर तऱ्हेनें जुळवून देणारा कवि गंगाधर रामचंद्र मोगरे होय. मोगऱ्यांची कविता कोणत्या युगांत जाईल हा वादग्रस्त प्रश्न आहे. तींत २० व्या शतकांतील जितके गुण दिसतात, तितकेच १९ व्या शतकांतील सुद्धां दृष्टोत्पत्तीस येतात. अशा रीतीनें सर्व काळांतील पण उत्तम गुणांचा समावेश त्या कवितेंत झालेला आहे. भाषा जुन्या वळणाची व अलंकृत, पण अगदीं सोपी; विचार नव्या मनूंतील. एतावता मोरोपंती, चिपळूणकरी, व केशवसुतीय अशीं निरनिराळीं तीन युगें मोगऱ्यांच्या कवितेंत एकत्र झालेलीं दिसतात. या कवीनें संस्कृत 'अभिनव कांदबरी'चें आपल्या सुगम, डौलदार आणि ठसकेबाज भाषेंत मराठीमध्यें भाषांतर करून या पूर्वींच कवि म्हणून नांव कमाविलें होतें. एवढेंच नाहीं तर 'मोगऱ्यांचीं फुलें' या गुच्छांतून आलेलीं शोकगीतें सुद्धां या वेळीं प्रसिद्ध झालीं होतीं. मोगरे यांची कविता शुद्ध, सुबोध, व भावनात्मक आहे. तिच्यांत ध्वनिमाधुर्य विलक्षण आहे. व त्यामुळें हरिभाऊ आपटे यांनीं सांगितल्याप्रमाणें तीं काव्यें वाचतांना वाचकाला 'नदीच्या संथ प्रवाहांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें वाहत जातोंसा भास होतो.' मोगऱ्यांनीं आपलीं शोकगीतें समाजांतील अनेक दिशेनें कार्यकर्त्या व्यक्तींवर रचलेलीं आहेत. त्यांत एकांगीपणाचा अंश नाहीं. यावरून कवीच्या मनांतील एकराष्ट्रीयत्वाच्या उज्ज्वल भावनेची चांगलीच ओळख पटते. हीं गीतें एकाच

रसाचीं असूनही वैचित्र्यामुळें मुळींच कंटाळवाणीं होत नाहींत. या कवीचीं अपूर्ण काव्यें म्हटलीं म्हणजे, आर्नोल्डच्या ' Light of Asia' या काव्यावरून लिहिलेलें ' बुद्धजन्म,' व 'जगद्देवचरित' आणि हिंदुस्थानांतील अनेक इतिहासप्रसिद्ध स्थलांचें वर्णन करणारें ' आर्यभूपर्यटन' काव्य हीं होत. हीं तिन्ही मोठीं काव्यें लिहिण्याचा कवीचा मूळ संकल्प होता. शेवटल्या काव्यांतील ' शिकंदरची स्वारी ' हें कथानक खरोखर अत्यंत हृदयंगम झालें आहे. आर्यपुत्रानें स्वदेशावरील प्रेमामुळें शिकंदराजवळ केलेलें वीरोचित भाषण व हिंदुस्थान दृष्टीस पडतांक्षणींच त्याची झालेली मनःस्थिति हे प्रसंग स्वाभिमानपूर्ण आहेत. हीं काव्यें कवीच्या हातून पुरतीं झालीं नाहींत, याचा मनाला चटका लागल्यावांचून राहत नाहीं. मोगरे यांच्या अंगीं महाकाव्य लिहिण्याची जरी महाराष्ट्राच्या दुर्दैवानें शक्ति नव्हती, तरी योग्यता मात्र खास वसत होती, हें वरील तिन्ही काव्यांसाठीं वेंचलेलीं चित्ताकर्षक कथानकें, त्यांत योजलेली उठावदार रचना, व वर्णनशैली, यावरून म्हणावयास हरकत नाहीं. 'वृन्दा' म्हणूनही एक सामाजिक अपुरें काव्य आहे. त्यांतील त्रोटक वर्णनावरून त्यांत गृहस्थाश्रमाचीं कर्तव्यें कथानकाच्या द्वारें वर्णन करण्याचा कवीचा उद्देश दिसतो. बापानें आपल्या मुलास केलेला उपदेश हा एक प्रसंग आहे. तसेंच सासरीं जातांना बापानें आपल्या मुलीस केलेला उपदेश लहानसाच पण अप्रतिम वठला आहे. शाकुंतल नाटकांत कण्वानें केलेल्या उपदेशाइतकाच हाही गोड व सरस आहे. शकुंतला राजपत्नी होणार होती, तर वृन्देला गृहिणीपद लाभावयाचें होतें; तेव्हां दोघींच्या स्थितींत अंतर पडावयानें असल्यानें दोघींच्याही उपदेशांतील फरक तात्काळ दिसून येतो. किंबहुना उपयुक्ततेच्या दृष्टीनें पाहिलें तर सामान्य गृहिणीला वृन्देला केलेला उपदेशच जास्त सयुक्तिक व संग्रहणीय होईल. या मोठ्या काव्याशिवाय मोगऱ्यांच्या बऱ्याचशा स्फुट कविताही आहेत. मोगरे यांच्या कवितेचा विशेष हा आहे कीं, त्यांचें कोणतेंही लहान अगर मोठें प्रकरण घेतलें तरी तें परभावनाप्रधान ऊर्फ वस्तुविषयक असतें. त्यामुळें कवीच्या स्वतःच्या भावनेचें दर्शन झालें तरी तें परंपरेनें होतें. परंतु आश्चर्य हें कीं, ही जाणीव राहूनही काव्यौघांत वाचक ती पार विसरून जातो. या कवीचीं उपहासात्मक खंडकाव्येंही प्रसिद्ध आहेत.त्यांतील वर्णनें मोठ्या खुबीनें रेखाटलीं असून मराठींत शोकगीतें लिहिण्याचा उपक्रम जसा मोगऱ्यांनीं केला तसाच उपहासात्मक काव्यें लिहिण्याची नवीन पद्धतिही त्यांनींच सुरू केली. उपहासांतील खोंच ताबडतोब लक्षांत येण्यास भाषाही सुलभ असावी लागते. मोगरे यांच्या कवितेंतील सुलभ स्पष्टार्थवाहकत्वामुळें वरील टीकात्मक काव्यें चित्ताकर्षक झालीं आहेत. ' मराठी ग्रंथकारांस प्रार्थना' या कवितेंत कवीनें प्रगट केलेला त्वेष सात्विक असून परिणामकारक होतो. थोडक्यांत सांगावयाचें तर, ' स्वदेश-स्वधर्म-स्वभाषादिकांचा जगीं मान व्हावा' हा मोगऱ्यांचा बाणा होता. त्यांच्या कविता वाचतांना त्यांतून उत्कट भावनेचे फवारे उडतांना किंवा स्फूर्तीचे मेघ हवेंत तरंगतांना दिसणार नाहींत हें खरें; पण पृथ्वीलाच चिकटून राहून तिच्यांतील ' सुंदर सोज्ज्वल रत्नें दाखविण्याचें काम '(हें काम सुद्धां सोपें आहे असें नाहीं ) त्यांच्या कवितेनें केलें आहे. मागें सांगितल्याप्रमाणें नव्याजुन्याच्या संधीवर ही कविता उभी असल्यानें तिच्यावर नवीनाचा जरी प्रकाश पडला असला तरी या उत्क्रांतीच्या काळांत प्राचीन विचार आणि रचना कायम ठेवण्याचें श्रेय मोगरे यांनाच दिलें पाहिजे.

या वेळच्या आणखी एका कवीचा प्रमुखत्वानें उल्लेख करावयाचा म्हणजे, ज्याच्या ।

प्रदीप जगतावर किंचित्काळ प्रकाशून दुर्दैवानें मालविला गेला असा' दत्त ' ऊर्फ दत्तात्रय कोंडो घाटे हा कवि होय. याची कविता सगळी स्फुट आहे, व तीही बोटांवर मोजतां येण्याइतकी नाहीं. पण तिच्यांत हार्द आहे, सहजस्फूर्तीची लकेर आहे. घाटे यांची सूक्ष्म अवलोकनशक्ति व सृष्टीवरील गाढ प्रेम यांची प्रचीति पदोपदीं येते. 'विश्वामित्रीवर' ही त्यांची हृदयंगम कविता वरील गुणाची साक्ष देईल. घाटे हे आपल्या वयाच्या २४ व्या वर्षीं प्लेगला बळी पडले. या तरुण कवीबरोबरच मोरो गणेश लोंढे या प्रौढ कवीचाही निर्देश करणें जरूरीचें आहे. यांची कविता

बोधपर असून संख्येनेंही मोठी आहे.ती जितकी सुबोध आहे तितकीच परिणामकारक आहे. 'लहान मूल' व 'माझा जन्म' या कवितांतील स्वभाववर्णनें उत्तम प्रकारचीं आहेत. इतकीं कीं रामभाऊ जोशी यांनीं म्हटल्याप्रमाणें ह्या वयानें जीर्ण झालेल्या कवीला 'मुलांचे कवि' असें नांव देणें योग्य होईल. लोंढे यांनीं 'रायगड काय म्हणतो' हें विमर्षात्मक काव्य लिहिलें आहे. त्यांतील वर्णन सुबक असून विचारही उदात्त आहेत. ह्याशिवाय स्फुट कविता लिहिणारे कवि म्हणजे हरि माधव पंडित, पुरुषोत्तम गोपाळ वैद्य, जगन्नाथ धोंडू भांगले व जाधव हे होत.

ज्यांनीं केवळ हौसेखातर, मधून मधून सवडीनें व प्रासंगिक कारणानें कवितेची उपासना केली अशा कवींना अमॅच्यूर ऊर्फ शोकी कवि म्हणून संबोधिलें पाहिजे. अशा कवींमध्यें हरि नारायण आपटे, नरसिंह चिंतामण केळकर, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, श्रीकृष्ण नीळकंठ चाफेकर,अच्युत बळवंत कोल्हटकर, 'मार्गण' ऊर्फ सीताराम केशव दामले, नारायण रंगनाथ अळेकर, निळकंठ बळवंत भवाळकर इत्यादिकांचा समावेश होतो. मागील काळांतील अण्णासाहेब किर्लोस्कर व शंकर मोरो रानडे हे दोघे नाटककारही ह्याच वर्गामध्यें मोडतात. ह्या कवींनीं काव्यें लिहिलीं, आणि तीं चांगलींही उतरलीं आहेत. पण कविता लिहिणें हा यांचा व्यावसायिक हेतु नव्हता. आपटे यांच्या एका खंडकाव्याचा मागें उल्लेख केला आहे, पण तें केवळ विद्यार्थिदशेंत लिहिलेलें होतें. या शोकी कवींची कामगिरी काव्यक्षेत्रापेक्षां इतरत्र जास्त झाली आहे.त्यांची कविता स्फुट व अल्प असली तरी ती सरळ व नवीन विचारांची आहे असा तिच्याविषयीं सामग्र्यानेंच उल्लेख करणें बरें.

सन १८९० ते १९०० पर्यंत वर समालोचन केलेल्या दशकांत मराठी कवितेची संख्येनें बरीच वाढ झालेली दिसते. स्फुट काव्यांबरोबर मोठया काव्यांना प्रारंभ झाला होता. ह्या वाढलेल्या संख्येविषयीं केवळ अनुमान करण्यापेक्षां 'काव्यरत्नावली'च्या १२ व्या वर्षाअखेर त्यांत प्रसिद्ध झालेल्या स्वतंत्र व भाषांतरित कवितांचा जो हिशोब दिला आहे त्यावरून कविता किती प्रसिद्ध झाली याचें जास्त स्पष्टीकरण होण्यासारखें आहे.

| | | |
|---|---|---|
| स्वतंत्र स्फुट कविता | ६९४९ | |
| स्वतंत्र ऐतिहासिक काव्यें | २२९४ | |
| स्वतंत्र काल्पनिक काव्यें | १४२३ | |
| एकूण स्वतंत्र कविता | | १०६६६ |
| संस्कृतावरून स्फुट कविता | १८२० | |
| संस्कृतावरून काव्यें | १४०६ | |
| इंग्रजीवरून स्फुट काव्यें | ९२० | |
| एकूण भाषांतरित कविता | | ४१४६ |
| | | १४८१२ |

ही जवळजवळ पंधरा हजारांची संख्या जर काव्यरत्नावलींत प्रसिद्ध झालेल्या कवितांची आहे तर इतर मासिकांतून व स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध झालेल्या कवितांचा तितकाच आंकडा धरणें गैरवाजवी होणार नाहीं. वरील २८।२९ हजार संख्या १२ वर्षांतील होय. म्हणजे या दहा वर्षांत २५ हजार कविता बाहेर पडली असें ठोकळ मानानें म्हणावयास हरकत नाहीं. ह्या हिशेबानें मराठी भाषेंत दरसाल अडीच हजार कवितांची भर पडलेली आहे, हें निर्विवाद होय.

यानंतर ज्या काळाविषयीं लिहावयाचें तो अगदीं अलीकडचा सर्वांच्या माहितीचा आहे. नवीन शतकाच्या सुरवातीबरोबर मराठी कवितेच्या खऱ्या जीवनाचा आरंभ होत आहे. संस्कृत व इंग्रजी भाषांतराचा काळ जाऊन त्या भाषांच्या मिश्रणानें तयार झालेल्या नवीन पंथाची कामगिरी ह्याच काळांत दृग्गोचर झाली आहे. या वेळीं महाकाव्यांचा तुटवडा पडलेला दिसेल, पण स्फुट कवितांतच खऱ्या स्फुर्तीचें बीज सुदृढतेनें रुजलेलें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. या नवीन पंथाचा पाया अंशतः मागील काळांतल्या केशवसुतादि कवींनीं घातला आहे. त्याचेंच परिणत स्वरूप यावेळीं विलसत आहे. संख्येच्या मानानें हा काळ मागील काळाहून कमी प्रतीचा ठरला तथापि भावनोत्कटतेच्या दृष्टीनें हाच श्रेष्ठ ठरेल. सन१९००ते१९२० पर्यंतच्या काळांत बाळकृष्ण अनंत भिडे यांची मैनलदेवी व पद्मिनी हीं दोन ऐतिहासिक काव्यें काव्यरत्नावलींत प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांतील मांडणी वीररसाला उचित अशी आहे. 'विदुलापुत्रानुशासन' आणि 'अश्व-

त्याम्याचा कट' हीं खंडकाव्येंही उत्तमांतलीं प्रकरणें होत. 'प्रभुप्रसादनां'तील ईश्वरप्राप्तीची उत्कंठा, 'शोकक्षोभां'तील करुणरस हीं परिणामकारक आहेत. शोकक्षोभाच्या तोडीचीं काव्यें मराठींत फारच थोडीं सांपडतील. **श्रीपाद नारायण मुजुमदार** यांचीं दोन महाकाव्यें व बरींच खंडकव्यें प्रसिद्ध आहेत. महाकाव्यांपैकीं 'श्री छत्रपति शिवाजी महाराज' हें काव्य ऐतिहासिक असून दुसरें 'सुभद्राहरण' नामक पौराणिक काव्य आहे. ऐतिहासिक काव्याला शिवाजीचें जरी नांव दिलें असलें तरी तो त्याचा नायक नाहीं. उपनायकाच्या नांवावर काव्य मोडण्याची इंग्रजी पद्धत कवीनें स्वीकारलेली दिसते. दोन्हीं काव्यांत विविध प्रसंग असून स्वभावपरिपाकही चांगला झाला आहे. खंडकाव्यांपैकीं 'प्रियोपलाब्धीं'तील असह्य शोकावस्था, 'वीरमती द्रौपदी' काव्यांतील वीरकरुणरसांचें मिश्रण, व मेघदूताच्या धर्तीचें 'हंसदूतां'तील वर्णनकवीच्या उत्तम गुणांची साक्ष पटवितात. वर्णनविषय व्यापक करण्याकडे कवीचा ओढा आहे. विषय कितीही त्रोटक असला तरी तो विस्तृत करून त्यांत मनोहारिकता आणण्याची कला कवीला चांगली साधली आहे. हे कवि इंग्रजींतील पदवीधर आहेत; तथापि त्यांनीं आपली कविता संस्कृतच्या धर्तीवर रचिली. कवितांत संस्कृत शब्द आणि लांबलांब समास यांची रेलचेल आहे. ह्याच कवीच्या धर्तीवर किंबहुना त्यावरही ताण करणारे कवि वियाधर वामन भिडे होत. यांची काव्यसमृद्धि विपुल आहे. त्यांनीं 'राघवीयपरीवाह' नामक एक पौराणिक काव्य लिहिलें आहे. तें पुष्कळ नांवाजण्यासारखें असून महाकाव्य ह्या उच्च दर्जाला पोहोंचणारेंही आहे. काव्यांतील वर्णनें भरीव व हृदयंगम आहेत. वामनपंडितांचा 'भरतभाव' किती गोड आहे हें निराळें सांगावयास नकोच. ह्या काव्यांतील 'भरत-भेट' तितकीच गोड असून इतर बाबतींत तर त्यापेक्षांही सरस ठरते. 'राघवीयपरीवाहा'वांचून बाकीचीं खंडकाव्यें आहेत. दंडदंडना हें पौराणिक खंडकाव्य होय. त्यांतील विशेष हा कीं, प्रत्येक श्लोक निरनिराळ्या वृतांत अक्षरांच्या संख्याक्रमानें रचला आहे. 'जीवजागृति' हें काव्य नीतिपर असून त्यांत अनेक विषयांवर श्लोकबद्ध निबंध आहेत. वियाधरपंत भिडे यांच्या कवितेंत संस्कृताचें प्राचुर्य इतकें आहे कीं, फारच अल्प परिश्रमानें तिला संस्कृतरूप देतां येईल. राघवीयपरीवाह ह्या काव्यांत कांहीं श्लोक संस्कृतमध्येंच रचले आहेत ! त्यामुळें वाचतांना अर्थासाठीं वाचक वरचेवर अडखळतो. पदलालित्याच्या इच्छातिशयानें काव्याच्या नांवांत सुद्धां क्लिष्टपणा उतरला आहे. हा क्लिष्टपणा पाहिला म्हणजे 'कवितेचा विषय उमदा आहे. पण रचना मी मुद्दामच अवघड करीत आहें; कारण कोणत्याही गोष्टीची कठिणपणांतच फार मजा असते.' असें फ्रेंच कादंबरीकार अलेक्झांडर ड्यूमा यानें आपल्या 'तीन शिलेदार' ह्या कादंबरींतील आरामीच्या तोंडीं जें वाक्य घातलें आहे तें आमच्या कवीसही लागू पडतें. तथापि भिडे ह्यांची भाषा प्रौढ असल्यानें काव्याला गांभीर्य आलें आहे. पहिल्यानें कष्टद भासली तरी पुढें तिच्यांतील रसास्वाद मिळाल्यावांचून राहात नाहीं. गोविंद एकनाथ गोसावी ह्यांनीं अहल्याबाई, मल्हारराव होळकर, परशुराम भाऊ पटवर्धन, अशीं मोठीं सहा काव्यचरित्रें व व्याकरण, गणित वगैरे विविध विषयांवरही बरींच पद्यात्मक पुस्तकें लिहिलीं आहेत. कविता सोपी व विशद असून वर्णनेंही सुबक साधलीं आहेत. 'आर्यभूदेवी-महिमा' काव्य १९०६ सालीं काव्यरत्नावलींत प्रसिद्ध झालें. हा काळ 'वंदे मातरम्'चा असल्यानें ह्या काव्याचा जन्म अगदीं वेळेवर झाला असें म्हटलें पाहिजे. त्याचे चार उद्गार असून त्यांत भारतभूचा वेदपुराणकालापासून महिमा कसा वृद्धिंगत होत आहे याचें साकीछंदांत काव्यपूर्ण वर्णन दिलें आहे. नेने यांच्या 'ईशदर्शन' काव्यांत सृष्टीची भव्य रचना व तिच्यामध्यें प्रत्यहीं चाललेले नानाविध चमत्कार पाहून सृष्टींतील ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं मनुष्याची कशी खात्री पटते हें दाखविलें आहे. एकंदर सगळें काव्य रसाळ आहे. 'चक्रवाक' कवीचें भक्तिस्वयंवर नामक दोन सर्गांचें काव्य आहे. त्यांत भक्तिरूप कुमारिकेनें आफ्रिका, यूरोप, अमेरिका, जपान, चीन वगैरे देशांतील राजांना नाकारून अखेर आर्यभूपतीला वरिलें, असें कथानक आहे. ह्या काव्यांत रघुवंशांतील इंदुमतीच्या स्वयंवराचें बरेंच अनु-

करण केलें आहे. ह्याच कवीनें 'सुरेन्द्र' नामक ऐतिहासिक काव्य लिहिलें आहे. वर्णनाच्या दृष्टीनें दोन्हीही काव्यें बऱ्यांपैकीं आहेत. तीं मूळ काव्य-रत्नावलींतून प्रसिद्ध झालीं. कृष्णाजी पांडुरंग लिमये ऊर्फ 'राधारमण' कवि यांच्या 'फडणीस काव्य' नामक एका स्वतंत्र काव्यास काव्य म्हणण्यापेक्षां पद्यात्मक-चरित्र म्हणणें जास्त शोभेल. कारण त्यांत नाना फडणिसांच्या पूर्वजवर्णनापासून आरंभ करून त्यांच्या अंतापर्यंतचे सगळे प्रसंग दहा सर्गांत गोंविले आहेत. भाषा गोड व प्रौढ असून अलंकारिक आहे. वर्णनशैली जोरदार व प्रसंगाला अनुरूप अशी आहे. ह्या कवीनें ऋतुसंहाराच्या धर्तीवर कालचक्र, लो. टिळक ह्यांना झालेल्या शिक्षेविषयींचा 'आर्यमातृविलाप,' व 'मोरोपंताचा प्रभुद्रोह,' हीं खंडकाव्यें लिहिलीं आहेत. थोड्याच वर्षांपूर्वी संस्कृत किरातार्जुनीय युद्धाच्या आर्याबद्ध भाषांतरास 'राधारमण' यांनीं सुरुवात केली होती. कवितेवर संस्कृताची छाया पडली आहे. मोरोपंताच्या केकावलीसारखें महादेव दामोदर कुळकर्णी ह्यांचें 'आत्मकथन' नांवाचें पृथ्वीवृत्तांत रचलेलें खंडकाव्य बरेंच प्रेमळ झालें आहे. भाषापद्धति आणि शब्दयोजना या बाबतींत यांत मयूरकवीचा पूर्ण कित्ता गिरविला आहे.

ह्या दशकांतील अपूर्ण काव्यें म्हटलीं म्हणजे रामचंद्र कृष्ण वैद्य ऊर्फ 'वनवासी' यांचीं 'हम्मीर' व 'पानिपतचा युद्धप्रसंग' हीं होत. पहिलें संस्कृतावरून लिहिलें असून दुसरें स्वतंत्र ऐतिहासिक आहे. ह्या दोन्ही काव्यांचा नुसता आरंभच झाला होता. तथापि त्यावरून तीं उत्तम वठलीं असतीं एवढेंच त्याविषयीं म्हणावें लागत आहे. तिसरें अपुरें राहिलेलें काव्य 'योगवासिष्ठ' होय. त्याचे कर्ते कृष्णाजी लक्ष्मण देसाई. यांच्या अकालिक मृत्युमुळें २४ सर्गांनंतर हें काव्य अपूर्णच राहिलें. योगवासिष्ठासारख्या अध्यात्मपर ग्रंथाचें रूपांतर करणें किती अवघड आहे हें प्रत्यक्ष अनुभवानें कळण्यासारखें आहे. पण हा अवघड ग्रंथही केवळ शब्दास शब्द न ठेवतां आपल्या रसपूर्ण आर्याछंदानें कवीनें नटविला आहे. मागील दोन्ही ग्रंथांप्रमाणें हा ग्रंथही पूर्ण झाला असता तर मराठी काव्यांत खरोखर चांगली भर पडली असती. खंडकाव्यांत चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे यांचें 'काय हो चमत्कार !,' बळवंत जनार्दन करंदीकर ऊर्फ 'नागांवकर गंधर्व' यांचें प्रेमालेख्य, गणेश जनार्दन आगाशे यांची बिरुदावली, डॉ. गंगाधर गोविंद दामले यांचें चंद्रदूत, शंकर परशुराम जोशी यांचें पौर्णिमा काव्य, दत्तात्रय भिकाजी रणदिवे यांचें गजकुमारचरित व साध्वी नीली, रे. टिळक यांचीं 'वनवासी फूल,' 'बापाचे अश्रु,' 'सुशीला,' 'ब्रिटानिया' हीं काव्यें, विनायकाची कृष्णाकुमारी, ध्यास तो भास, वीरमती, मोहानंतर, सावरकर ह्यांचे सिंहगड व बाजीप्रभु यांवरील पोवाडे, आपटे यांचा मुरारबाजीचा पोवाडा, शंकर पांडुरंग महाजन यांचें कर्झन-काव्य, वगैरे किती तरी काव्यें प्रसिद्ध झालीं आहेत. चंद्रशेखरांच्या कवितांतील शब्दांच्या अनुरूपतेनें आलेली गोडी विशेष आहे. त्यांचीं 'तारातंरग' 'सौहार्द' व 'कुंजकूजन' हीं काव्यें वाचकांची वृत्ति उच्छृंखळ करून सोडतात. 'गंधर्व' कवीनें 'प्रेमालेख्य' ही एकच सुंदर कविता लिहिली असती तरी त्यांचा कवि या नात्याचा दर्जा कमी झाला नसता, इतकी ती सरस आहे. रा. सा. आगाशे यांनीं वरील 'बिरुदावली' खेरीज करून बरींच शोकगीतें रचिलीं आहेत. 'तीन हरिभाऊ' हें शोक-गीत गाइल्यावर ते थोडेच दिवसांत निवर्तले. त्यांनीं १९१२ सालीं 'राज्यारोहण' नामक वर्णनात्मक काव्य लिहिलें; त्यांत पांचवे जार्ज राजे व बादशहा ह्यांच्या राज्यारोहणाची हकीकती गोंविली आहे. पहिल्या तीन सर्गांत इंद्र, रामचंद्र व युधिष्ठिर यांच्या राज्यारोहणाचीं वर्णनें दिलीं आहेत. आगाशे यांचें अत्यंत कारुणिक काव्य म्हणजे त्यांच्या मृत चिरंजीवावर वाहिलेली 'बाष्पाञ्जलि' होय. त्यांत पुत्राचें गुणवर्णन, पत्नीचें सांत्वन, वगैरे विषय असले तरी त्याची एकंदरीनें रचना हृदयास पाझर फोडणारी अशी आहे. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांचें 'अनुभवयोगिराज' नामक दोन सर्गांचें उपदेशपर लघुकाव्य आहे. पांगारकर हे मोरोपंतांचे निस्सीम भक्त असल्यानें त्यांच्या काव्याचा परिणाम प्रकृत कृतीवर झाला असल्यास नवल नाहीं. प्रस्तुत कविता प्रास अनुप्रास यांनीं अलंकृत झाली आहे. 'नेमिदूत,' चंद्रदूत' व नारायण गंगाधर लिमये यांचें पुढें प्रसिद्ध झालेलें 'बलवदूत' हीं सारीं काव्यें मेघदूताचीं भावंडें होत. 'पौर्णिमा' काव्यांत बराच उत्तान शृंगार असला तरी काव्य नवीन

दृष्टीनें लिहिलें आहे. कर्झन-काव्यांत त्या बड्या लाट साहेबांनीं आपल्या कारकीर्दींत केलेल्या अनेक गोष्टींचें वर्णन पोवाड्याच्या रूपानें महाजन यांनीं चटकदार शब्दांत केलें आहे. ' भृंग ' ऊर्फ काशीनाथ बाबाजी पंडित यांचें 'श्रीशंकराचार्यचरित्रसारामृत' म्हणून काव्य आहे. त्यांत त्यांनीं आर्याछंदांत आद्यशंकराचार्यांचें चरित्र थोडक्यांत गोविलें आहे.

ह्या काळचे विशेष प्रामुख्यानें पुढें आलेले कवि म्हणजे केशवसुत, विनायक व टिळक हेच होत. केशवसुतांचें समग्र नांव कृष्णाजी केशव दामले आहे. पहिल्या दोघां कवींची प्रख्याति विशेषेंकरून त्यांच्या पश्चात् झाली. पण टिळक यांचा कवि या नात्यानें त्यांच्या हयातींत बराच गौरव झाला होता. केशवसुत व टिळक हे एका वर्गांतील कवि होत, तर विनायक दुसऱ्या वर्गांतील कवि आहे. केशवसुतांनीं मोठें अगर खंडकाव्य मुळींच लिहिलें नाहीं. त्यांची कविता म्हणजे चतुर्दशपद्या व वीणाकाव्यें अशी स्फुट स्वरूपाची आहे. राष्ट्रीय व सामाजिक सुधारक ह्या नात्यानें त्यांचीं काव्यें जितकीं महत्त्वाचीं आहेत, तितकींच तीं सहानुभूतीनें प्रेरित, सृष्टिविषयक भक्तीनें व प्रेमानें परिपूर्ण आहेत. त्यांनीं शेवटचीं गीतें शून्यसंशोधनात्मक लिहिलीं आहेत. थोडक्यांत सांगावयाचें तर, इंग्रजी वीणाकाव्यांमधून जे स्वर निघत आहेत व ज्या सूक्ष्म भावनांचा परिपोष झालेला आहे तेच सूर व त्याच भावना ह्यांचा उद्भव या कवीच्या गीतांतून झालेला दृग्गोचर होतो. 'केशवसुतां'नीं जगांतील असामान्य विषयांवर गीतें गाइलीं नाहींत. त्यांनीं कवितेसाठीं सामान्य जीवनांतीलच प्रसंग व स्थलें शोधून काढलीं, आणि त्यांचें व्यवहारांतील भाषेंत वास्तविक स्वरूप वर्णिलें. पण या त्यांच्या वर्णनाला स्फूर्तीची उज्ज्वल छटा चढविली असल्यानें त्याच सामान्य भासणाऱ्या वस्तु वाचकांस अद्वितीय स्वरूपांत दिसूं लागल्या आहेत. हाच ह्या कवीचा विशेष गुण होय. कवीनें वर्णिलेली 'म्हातारी' ती वस्तु काय, पण तिच्यांतील क्षुल्लकपणा घालवून त्यानें तिचें दिव्य स्वरूप मोठ्या कौशल्यानें दाखविलें आहे. अशा रीतीनें काव्यशास्त्रानें ठरविलेल्या वर्ण्यावर्ण्य वस्तूंचा विचार झुगारून वर्डस्वर्थप्रमाणें मराठी कवितेला 'शास्त्रीय रूढीच्या झांपडांतून' जागृत करण्याचें श्रेय केशवसुतांनाच दिलें पाहिजे. व वस्तुमात्रांतील सौंदर्य शोधून काढणारी ही अंतर्भेदी दृष्टि आधुनिक कविवर्गामध्यें जोरदारपणें प्रथम ह्याच कवीला आली, व पुढें त्याचेंच अनुकरण करण्यांत आलें आहे. अर्थात् ह्या नवीन कवितेच्या जनकत्वाचाच मान त्यांच्याकडे आला हें सांगावयास नकोच. टिळकांच्याही कवितेंत ह्याच गुणाचा आढळ होत आहे. त्यांनींही मराठी कवितेला ' झांपडांतून ' जागी करण्याची अमोलिक कामगिरी केली आहे, यांत द्विधामत होण्याचें कारण नाहीं; पण ती केशवसुतांच्या इतक्या जोरानें मात्र नाहीं. सृष्टीवरील निरतिशय प्रेम, ईश्वराविषयींची उदात्त कल्पना, मानवी जीविताविषयीं गूढविचार, यांचें येथें साकल्य झालें आहे. फूल आणि मूल ह्यांच्या मधील अकृत्रिमतेमुळें तीं कवीला अत्यंत प्रिय झालीं आहेत. टिळकांच्या स्फुट काव्यांत वरील गुणांची पदोपदीं प्रचीति येते. टिळक हे ख्रिस्तधर्मानुयायी होते. त्यांनीं ' ख्रिस्त माउली'वर लिहिलेलीं भजनसंग्रहांतील गीतें प्रेमळपणा व नितांत श्रद्धा या गुणांनीं भरलेलीं आहेत. भक्तिरसांतील त्यांची एकतानता अवर्णनीय आहे. भक्तिरस मराठी कवितेइतका दुसऱ्या ठिकाणीं क्वचितच सांपडूं शकेल. किंबहुना तिनें त्याचा मक्ताच घेतला आहे. यामुळें मराठी काव्यवाचकांना त्या गुणाचें मोठेंसें कौतुक वाटलें नाहीं तरी तो पैतृक गुण अव्याहतपणें जपून ठेवण्याचें श्रेय त्यांना खास दिलें पाहिजे. 'केशवसुता'प्रमाणें ह्यांचेंही मोठें असें काव्य नाहीं. तथापि खंडकाव्यांची संख्या मात्र बरीच आहे. मनीषाशतक, कुरुक्षेत्र, सुधारणासहस्र वगैरे काव्यें पूर्वकाळीं लिहिलेलीं, व वनवासी फूल, बापाचे अश्रु, सुशीला, ब्रिटानिया, माझी भार्या, हीं काव्यें अलीकडे रचलेलीं आहेत. 'वनवासी फूल' हें तत्त्वज्ञानात्मक काव्य होय. त्यांत निवृत्तीपेक्षां प्रवृत्ति किती श्रेष्ठ आहे हें काव्यपूर्ण भाषेनें सिद्ध केलें आहे. 'ब्रिटानिया'ला राजकीय काव्य असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांत कवीनें हिंदुस्थान ब्रिटानियाची दासी नाहीं, तर बहीण आहे, ही गोष्ट प्रामुख्यानें सांगितली आहे. ह्या दृष्टीमुळें जे कोणी इंग्रजी सुधारणाकडे

दुर्लक्ष करून ती केवळ आभासरूप आहे असें समजतात, त्यांचें म्हणणें कवीला मुळींच मान्य नाहीं. इंग्रजी अमलाखालीं हिंदिस्थानची भरभराट होत आहे, व न्यायदेवताही निःपक्षपातबुद्धीनें न्याय निवडीत आहे, असा शेवटीं काव्याचा उपसंहार केला आहे. वर रेखाटलेल्या वस्तुस्थितीविषयीं जरी एकमत नसलें तरी काव्य ह्या दृष्टीनें ब्रिटानिआ काव्याची माहिती अपूर्व आहे. विषय कसलाही असला तरी तो योग्य कवींच्या हातीं पडला तर किती कुशलपणानें रंगवितां येतो याचें प्रत्यंतर केशवसुत व टिळक ह्यांच्या कवितांवरून सहज कळून येतें. दोघांही कवींनीं महाकाव्यें लिहिलीं नाहींत. पण ह्याचें कारण हेंच देतां येईल कीं, त्यांनीं मराठी कवितेला जी नवीन विचारांची दिशा लावली तिचें स्वरूप पुष्कळ काळपर्यंत निश्चित झालें नव्हतें. ती दिशा परकीय असल्यानें तिचें स्वभाषेंत रूपांतर करणें हें काम बिकट होतें. आतांपावेतों जीं मोठीं काव्यें झालीं त्यांची संस्कृत काव्यांच्या पायावर उभारणी झालेली आहे. अर्थात् ह्या दिशेचें सर्वांगीण साहित्य अगाऊच तयार होतें. पण या ठिकाणीं सर्वच कांहीं नवीन. तेव्हां त्यांना अगोदर तदर्थवाहक भाषाघटनेपासूनच आरंभ करावयाचा होता. अशा स्थितींत महाकाव्यें लिहिण्याचें काम त्यांस हातीं घेतां आलें नाहीं यांत आश्चर्य नाहीं. 'केशवसुतां'च्या हातून महाकाव्य निर्माण झालें नसतें, आणि झालें असतें तरी वर्डस्वर्थ कवीप्रमाणें तो प्रयत्न यशस्वी झाला नसता हें खरें, पण ही गोष्ट टिळकांच्या संबंधानें म्हणतां येत नाहीं. त्यांचा महाकाव्य रचण्याचा निश्चय होता व तदनुरूप 'ख्रिस्तायन' चाललेंही होतें. तरी पण तें काम त्यांना सोपें भासलें नाहीं, व तें अखेर अपुरेंच राहिलें. असो. स्वतंत्र कवितेप्रमाणें दोघांनींही प्रथम भाषांतरापासून सुरुवात केली. केशवसुतांनीं किराताचा पहिला सर्ग लिहिला, तर मागें उल्लेख केलेलें ' माझा ओसाड पडलेला गांव ' हें टिळकांचें प्रथम काव्य होय. 'विनायका'ची कविता ही राष्ट्रीय स्वरूपाची आहे. तिच्यांत ओज आहे, जोरदारपणा आहे, व उद्बोधक शक्तीही पण आहे. त्यांचीं खंडकाव्यें पौराणिक व ऐतिहासिक विषयांवर आहेत. विषय जुना आहे, तथापि कवीनें घोलेल्या शब्दांत लिहिल्याप्रमाणें तो 'नव्या स्फूर्तिदायक आनंदानें ' गाइलेला आहे. आर्यस्त्रीरत्नमालेमध्यें शूर आर्यस्त्रियांचीं चरित्रें थोडक्यांत गाइलीं आहेत. कवीच्या मनांत आर्यस्त्रियांविषयीं स्वाभिमानाची ज्योत उज्ज्वलतेनें तेवत आहे याचें प्रत्यंतर वरील चरित्रांवरून दिसून येतें. खंडकाव्यांपैकीं 'ध्यास तो भास' ह्यामधील मोहनेचें चित्र पहा, किंवा 'वीरमती' काव्यांतील खुद्द वीरमतीचें चित्र पहा. हीं चित्रें कवीनें खऱ्या वीरांगनांचीं रंगविलीं आहेत. 'मोहानंतर' ह्या खंडकाव्यांतही सुधन्व्यासारखा वीर कर्तव्यपालनापासून कसा च्युत होतो याचें हृदयंगम चित्र रेखाटलें आहे. एकंदरीनें राष्ट्रीय गुणांचें पोषण करण्याचें प्रकृत कवीचें ध्येय आहे.

मागें सांगितलेंच आहे कीं केशवसुत, टिळक व विनायक हे नवीन काळांतील पुरोगामी दूत होत. त्यांची कविता नवीन विचारांची द्योतक आहे, तशीच ती 'अंतःस्पर्शी' ही आहे; म्हणजे ती वाचतांनाच वाचकांच्या हृदयापर्यंत जाऊन भिडते, व अशा रीतीनें तिचा मनावर तात्काळ परिणाम होतो. तथापि या तिघां कवींमधील भेदही ठळकपणें लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. 'विनायक' जितका राष्ट्रीय कवि आहे तितके बाकीचे दोघेजण नाहींत. त्यांना बऱ्याच अंशानें 'जगाचे कवि' असें संबोधितां येईल. केशवसुत यांचें ध्येय पहिल्यानें राष्ट्रीय स्वरूपाचें होतें. तें पुढें तसें राहिलें नाहीं. टिळक ह्यांनींही 'माझ्या जन्मभूमीचें नांव' या सारख्या राष्ट्रीय कविता लिहिल्या असल्या तरी त्यांचें मूळपासूनचें ध्येयच तत्त्वसंशोधनाचें होतें. तिघां कवींच्यांतील गुण थोडक्यांत वर्णन करावयाचे तर केशवसुतांच्या कवितेंत 'स्फूर्ति व सहानुभूति,' टिळकांच्या कवितेंत 'प्रसाद व प्रेमळपणा' ( केळकर ), व विनायकाच्या कवितेंत 'ओजस्विता व प्रेमलता' असें करतां येईल. विनायकास शाहिरकवी म्हटलें तर टिळकांस साधुकवि म्हटलें पाहिजे. केशवसुतांचे ठिकाणीं दोन्ही गुणांचें अस्तित्व होतें. ह्या तिघांना इंग्रजी कवींची उपमाच देणें झाली तर विनायकास बायरनची, टिळकास ब्रौनिंगची व केशवसुतास वर्डस्वर्थची, अशी सामान्यतः द्यावी लागेल. ह्या विनायक कवीच्या बरोबरीनें आणखी दुसऱ्या एका विनायकाची गणना करणें जरूर आहे. हा दुसरा विनायक कवि म्हणजे विनायक दामोदर सावरकर हे

होत. त्यांचें नामक एक खंडकाव्य असून 'सिंहगड,' 'बाजीप्रभु' व 'अफझुलखानाचा वध' असे तीन ऐतिहासिक पोवाडे आहेत. पहिलें काव्य आर्याबद्ध आहे. त्यांतील करुणरसाचा परिणाम मनावर चांगला बिंबतो. ऐतिहासिक पोवाड्यांतील भाषा ( आज ते पोवाडे सरकारजमा आहेत ) करंदीकरांच्या भाषेपेक्षां ज्वलज्जहाल आहे.दाजी नागेश आपटे यांचाही 'मुरारबाजी'वरील वीररसाचा पोवाडा बरा झाला आहे. दिनकर नानाजी शिंदे ऊर्फ इंदुकांत यांचीं 'विधुरविलाप,''भारद्वाज' व 'वायुलता' हीं खंडकाव्यें भिन्न रसांच्या दृष्टीनें चांगलीं साधलीं आहेत. शेवटल्या दोहोंतील कल्पना नवीन आहेत.

वरील स्वतंत्र काव्यांबरोबर जीं भाषांतरित काव्यें या वेळीं प्रसिद्ध झालीं, त्यांत पहिलें स्थान 'माधवानुज' ऊर्फ काशिनाथ हरि मोडक यांच्या 'मेघनादवध' काव्यास दिलें पाहिजे. हें पौराणिक काव्य मायकेल मधुसूदन दत्त ह्या बंगाली कर्त्यानें त्या भाषेत लिहिलें आहे. मूळचें काव्य अप्रतिम झालें आहे. कर्त्याला बंगालींतील 'राष्ट्रीय कवि' असें समजण्यांत येतें,तें याच काव्यावरून होय. मधुसूदन कवीच्या 'वीरांगना'नामक काव्यांतील तारा शकुंतला ह्यांच्या प्रेमपत्रिकांचा मराठी अनुवाद माधवानुजांनीं केला आहे. हीं भाषांतरें असून त्यांना स्वतंत्र काव्यांचाच मान दिला पाहिजे. त्यांची भाषासरणी सोपी व शुद्ध आहे.या कवीच्या इतर कवितांतही वरील गुण दृष्टोत्पत्तीस येत आहेत. रवीन्द्रबाबूंच्या गीतांजलींतील कांहीं कविता त्यांनीं मराठींत उतरल्या आहेत. श्रीनिवास नारायण शिंदे यांचें कालिदासाच्या ऋतुसंहारावरून भाषांतर केलेलें 'ऋतुसौंदर्य' काव्य काव्यरत्नावलींतून प्रसिद्ध झालें आहे. लक्ष्मण गणेश शास्त्री लेले यांनीं मेघदूताचें व भामिनीविलासाचें भाषांतर केलें आहे शास्त्रीबोवांची भाषा ठाकठिकीची, प्रौढ व गोड आहे. क्लिष्टतेमुळें वाचतांना विचारभंग कोठेंही होत नाहीं. लेलेशास्त्री यांच्या मेघदूताच्या भाषांतराशिवाय बालकृष्ण लक्ष्मण अंतरकर, भालचंद्र शंकर देवस्थळी व गंगाधर गोविंद दामले यांनीं मेघदूताचीं श्लोकबद्ध भाषांतरें केलीं आहेत.'सुमंतां'चेंही मेघदूताचें एक पद्यबद्ध भाषांतर आहे दामले यांच्या चंद्रदूत काव्याविषयीं मागें आलेंच आहे. देवस्थळी यांचीं पंचमजार्जराज्याधिरोहण व सुरतकलहशतक हीं दोन्हीं वर्णनात्मक खंडकाव्यें आहेत. वरील काव्यें कमी अधिक प्रमाणानें सरस झालीं आहेत. मात्र भाषांतरापेक्षां स्वतंत्र काव्यांतील रचना अधिक मोहक आहे. हे संस्कृतभाषांतरकार होत. इंग्रजीभाषांतरकारांत माधवानुजांचे बंधु माधवराव मोडक यांची गणना होते.त्यांची 'बैरागी' कविता गोल्डस्मिथच्या कादंबरींतील 'हरमिट' या कवितेचें भाषांतर आहे. माधवरावांचें 'सुताविरह' नामक एक स्वतंत्र खंडकाव्य आहे. त्यांत त्यांच्या वत्सलतेचें चित्र उत्तम वठलें आहे. रे. टिळक यांनीं इलिझाबेथ ब्रौनिंग या आंग्ल कवयित्रीच्या प्रणयगीताचें 'फिरंग्याचें संगीत' म्हणून भाषांतर केलें आहे. काव्य अपूर्णच राहिलें. मुळांतील प्रेमकल्पनांचें दाढर्य या साकीबद्ध काव्यांत निःसंशय उतरलें आहे. नागपूरप्रांतीय अच्युत सिताराम साठे व नीळकंठ बळवंत भवाळकर ह्या कविद्वयानें मॅथ्यू अर्नोल्डच्या 'स्विझरलंड' काव्यावरून 'लीलावती'नामक काव्य रचलें आहे. त्याचे लहान लहान सात खंड आहेत. ह्या काव्याचा विशेष म्हटला म्हणजे, त्यांतील कथाभाग एकसूत्रानें न देतां त्रुटित ठेविला आहे. प्रत्येक खंड म्हणजे वेगवेगळ्या भावनांचें रेखाटलेलें चित्र होय. या कविद्वयाची 'द्रौपदीस्तव' म्हणून एक बरीच मोठी गानकविता आहे. कविता सरळ आहे, पण लघुता आणि सुलभता हे गानकाव्यास अवश्य असणारे गुण त्यांत दिसत नाहींत. ह्या काळांत इंग्रजी व संस्कृत काव्यांच्या भाषांतराशिवाय वंगीय काव्यांच्याही भाषांतरास असा प्रारंभ झाला आहे, तसेंच ऊर्दू भाषेंतील प्रख्यात कवि जो फिर्दोसी त्यानें गिझनीच्या महमुदास त्याच्या फसवेगिरीबद्दल उत्तर म्हणून जी कठोर निंदाव्यंजक कविता लिहिली आहे, त्याचें भाषांतर बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं केलें आहे. अशा रीतीनें वंग व ऊर्दू ह्या दोन भाषांतील विचारांची मराठीला जोड मिळूं लागली.

मोठ्या काव्यांबरोबर स्फुट कवितांचेंही प्रमाण ह्या काळांत वाढलेलें दिसून येतें. मुकुंदराय, विष्णु बाबाजी व कृष्णाजी बाबाजी असे कुळकर्णीद्वय, किरात ऊर्फ

कृष्णाजी लक्ष्मण सोमण, विद्यावनविहारी ऊर्फ चिंतामण वासुदेव कानिटकर, फणसे, प्रधान, परळकर, नंदुरबारकर, चित्रे, जोशी, ह्या कवींचीं स्फुट प्रकरणें प्रसिद्ध झालीं आहेत.त्यांच्यावर जरी आधुनिक काळाचा ठसा उमटलेला आहे, तरी त्यांना संस्कृतांतूनच जीवन मिळालेलें दिसतें.वरील कवींपैकीं केशव विश्वास फणसे यांच्या सामाजिक विषयांवरील कवितांचा येथें मुद्दाम उल्लेख करणें जरूर आहे. रचना श्लेषयुक्त असल्यामुळें बरीच मनोवेधक झाली आहे. रणदिवे ह्यांचें ' हरिवंशा'च्या आधारानें लिहिलेलें ' गजकुमारचरित्र ' व साध्वी निळी हीं पौराणिक छोटीं काव्यें, भोसेकर ह्यांचा 'मुरलीविलाप,' अधिकारी यांची निरनिराळ्या विषयांवरील प्रकरणें, टुल्लु यांच्या 'चार कळ्या,' 'विवेकानंद,' व 'सुमनमाला' ह्याही काव्यांचा निर्देश केला पाहिजे. जगन्नाथ रावजी टुल्लु यांच्या कविता स्फुट आहेत. सुमनमालेंत मात्र ऐतिहासिक पुरुषांचें थोडक्यांत चरित्रवर्णन केलें आहे. ह्या कवीची कविता रसाळ असून भाषेंत ऊर्दू शब्दांचा उपयोग केला आहे.

नवीन विचार व आचार यांचा अंगीकार करणारे कवि भास्कर रामचंद्र तांबे व नरहर शंकर रहाळकर हे होत. ह्यांच्या कविता स्फुट असल्यानें त्या पुष्कळांना परिचित नाहींत. पण त्यांतील प्रेरणा सहजस्फुरित आणि अवर्णनीय आहे. तांबे ह्यांच्या 'झरा,' ' बुलबुल पक्ष्याप्रत,' ' वियोगिनी, ' 'पाडवा' ह्या कविता सरस आहेत. रा. तांबे यांच्या स्फुट कविता ऊर्दू वळणावर आहेत.रहाळकर ह्यांच्या 'तान्हुला' कवितेंतील आईची वत्सलता हृदयास मोहविणारी आहे. 'ओं ब्रह्म,' 'नवी सृष्टि,''नवा देह' ह्या कविता कवीच्या उन्मनस्थितीच्या द्योतक आहेत. हे दोघेही कवी आज सुदैवानें विद्यमान असतांना त्यांचा कवितासंग्रह अगदींच अल्पतर असावा ह्याबद्दल कोणासही खेद वाटल्यावांचून राहत नाहीं. प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन ऊर्फ 'वसंत कवि' यांची कविता विलक्षण भावनोत्कट आहे. त्यांची 'कै. हरि माधव पंडित' ही कविता करुणारसात्मक आहे. ती वाचतांना प्रसिद्ध इंग्रज सेनापति ड्यूक आफ वेलिंग्टन ह्यांच्या मृत्यूविषयीं लिहिलेल्या टेनिसनच्या काव्याची स्मृति होते.

येथें आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे कीं, पुरुषांप्रमाणें स्त्रियांनींही मराठी कवितेला नटविण्याचें कार्य स्वीकृत केलें आहे. महाराष्ट्र ह्या बाबतींत पूर्वीपासून नापीक होता असें नाहीं, पण त्याच्या हातून तें कार्य झालें असलें तरी शिक्षणाच्या अभावीं तें फारच तुरळक झालें आहे. देवादिकांचीं सुस्वर गाणीं ऐकावींत व तत्सदृश आपणही करून गावींत असा क्रम महिलासमाजांत अव्याहतपणें पिढ्यानुपिढ्या चालू होता. ह्या अंतःस्फूर्तीला बाह्य संस्कृतीचें पाणी न मिळाल्यानें तो अंकुर बिनजोर वाढत असे. शिक्षणाचा फायदा मिळून ज्यांच्या अंतःस्फूर्तीला चांगलें वळण मिळालें व ज्यांना कवयित्री हें नांव सार्थ लावतां येईल अशांमध्यें सौ. शारदाबाई परांजपे, सौ. शांताबाई फणसे, सौ. सरस्वतीबाई भिडे, सौ. काशीबाई हेर्लेकर, श्री. ताईबाई पंडित व हिराबाई पेडणेकर ह्यांचा उल्लेख केला पाहिजे. वरील कवयित्रींपैकीं सौ. फणसे व सौ. भिडे ह्यांना कविपत्नीत्वाचाही मान आहे. सौ. शारदाबाईनीं लिहिलेल्या ' रणांगणावर गेलेला क्षत्रिय वीर ' ह्या कवितेंतील गांभीर्य परिणामकारक आहे. सौ. शांताबाईच्या ' मैत्रिणीस पत्र ' व ' धांवा ' ह्या कविता बऱ्या आहेत. सौ. सरस्वतीबाई भिडे ह्यांनीं इसाबनीतीच्या गोष्टी पद्यांत गुंफल्या आहेत. हिराबाई पेडणेकर ह्या कवयित्री असून नाटककारही आहेत. त्यांची ' रुष्ट प्रियकरास ' ही कविता उत्तम साधली आहे

नवीन शतकांतील पहिल्या दशकानंतर अद्यापि पूर्ण न झालेलें चालू दशक सुरू होतें.हें पूर्ण नसलें तरी त्याचा अवधि आतां फारसा राहिला नाहीं. त्यामुळें त्याचेंही समालोचन करण्यास हरकत पडणार नाहीं. ह्या दशकांत मोठ्या काव्यांची निपज फारच कमी झाली. काव्यांत नवीन विचारांचा उपक्रम हेंच त्याचें मुख्यतः कारण होय. मागील दशकांत ज्या नव्या काव्यनिर्झरीचा उगम झाला होता, तिचाच ओघ ह्या पुढील वर्षांत मोठ्या जोमानें वाहत आहे. तथापि अजूनही ही कविता लोकप्रिय झाली नाहीं. त्यामुळें असें झालें आहे कीं,कवींची संख्या जरी भरपूर दिसते तरी ज्यांचें काव्य हेंच जीवन आहे, असे कवि फारच थोडे सांपडतील. केवळ ह्या गेल्या आठदहा वर्षांपुरतेंच पाहिलें

तरी लहानमोठीं काव्यें लिहिणारे सुमारें १८ कवी असून लहान चुटके लिहिणारे २४ आहेत. दोन्ही मिळून सरासरीनें ४२ कवी नवीन पिढींतले आहेत. संख्येची दृष्टि सोडून दिली तर याच आजच्या कवितेविषयीं निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं. लहान स्फुट कविता कां होईनात, पण त्यांच्यांत नवीन विचारांचें स्वरूप आतां पूर्णपणें दृग्गोचर होऊं लागलें आहे. इतकेंच काय, पण मोठया काव्यांतही त्यांचा शिरकाव झाला आहे. हरएक प्रसंग वर्णन करण्यापेक्षां, मानवी स्वभाव कसकसा बनत गेला, या गोष्टीकडे आधुनिक काव्यांचा विशेष रोख दिसतो. पूर्वींच्या व आतांच्या महाकाव्यविषयक कल्पनेंतही अंतर पडलेलें आहे. साहित्यशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें काव्यासाठीं मोठें कथात्मक संविधानक घेऊन त्यांत नद्या, पर्वत, वनें, उद्यानें, चंद्रसूर्य ह्यांचे अस्तोदय, ऋतु, राजसभा, स्वयंवर, द्यूत,युद्ध वगैरे विविध प्रसंग वर्णिले पाहिजेत. या मताप्रमाणें आधुनिक काव्यें महाकाव्यें ह्या पदवीस चढणार नाहींत. पण सांप्रत तीं तशीं निर्माण करण्याची कोणी हांवही धरणार नाहीं, इतका आधुनिकांच्या काव्यमतांत फरक पडला आहे. रवींद्र बाबूंनीं सांगितल्याप्रमाणें वाङ्मय कांहीं शास्त्र नाहीं. 'त्यांतील नायक आणि नायिका हीं पात्रें ठराविक मुशींतून घडवून तयार केलीं तर तें वाङ्मय सजीव प्राण्यांची काल्पनिक सृष्टि न होतां, छापील मूर्तीचें एक भलें मोठें दुकान होईल.' प्राचीन काव्यांतील धीरोदात्त नायकनायिका व कथानकाचे शेवटीं झालेला एखाद्या नीतितत्त्वाचा विजय वगैरे अवश्य समजल्या गेलेल्या गोष्टींस आतां महत्त्व दिलें जात नाहीं. ग्रंथकाराचें खरें कौशल्य मनुष्यस्वभावपरिलेखनांत समजलें जात आहे. ह्या दृष्टीनें एकनाथ पांडुरंग रेंदाळकर यांचें मोहिनी काव्य नांवाजण्यासारखें आहे. त्यांतील स्वभावपरिपोषण उत्तम वठलें आहे. काव्यांतील प्रसंग स्कॉटच्या काव्याला अनुसरून उठावदार केले आहेत. भाषाही काव्यौघाबरोबर धावती आहे. या काव्यांतील दोष म्हणजे एकांगी दृष्टि होय. 'आदर्शकाव्या'च्या नादीं भरून खऱ्याखुऱ्या मनुष्याचें वर्णन न करतां देवताप्रकृत पात्रें निर्माण केलीं, व काव्याला केवळ काल्पनिक सृष्टींतील चित्र बनविलें आहे. वास्तविक सृष्टींतील वस्तूंचें यथार्थ स्वरूप रंगविण्यांत चित्रकाराचें जें अपूर्व कौशल्य दिसून येतें, तें कल्पनासृष्टींत दिसत नाहीं. सामान्य मनुष्यांमध्यें गुणोत्कटता नसते असें का कवीचें मत आहे? ह्याच कवीनें लिहिलेलें 'सारजा' नामक दुसरें अपुरें काव्य वस्तुस्थितिदर्शक आहे. तें टेनिसनच्या ' एनाक् आर्डेन' काव्याधारें रचलें आहे. अर्थात् त्यांतील विषय लौकिक असेल हें सांगावयास नकोच. त्या काव्यांतील प्रेमळ, निष्कपटी सारजेची व आपल्या पत्नीच्या सुखासाठीं आपल्या स्वतःच्या सुखावर पाणी सोडणाऱ्या निःस्वार्थी हिंमताची योग्यता असामान्य नाहीं काय ? मग केवळ सद्गुणांची रास होणारीं असंभाव्य पात्रेंच निर्माण करण्याची इच्छा कवीनें कां बाळगावी, हें समजणें कठिण आहे. सारजा काव्याला जरी दुसऱ्याचा आधार आहे तरी तें पूर्ण मराठी झालें आहे. विरहिणी ' राधा ' म्हणून मायकेल दत्ताच्या ' व्रजांगना ' नामक खंडकाव्याचें रेंदाळकरांनीं भाषांतर केलें आहे. त्यांतील कृष्णासाठीं विरहाकुल झालेल्या राधेचीं करुणगीतें रसपूर्ण झालीं आहेत. कवीची भाषा सोपी व रेखीव आहे. या कवीची स्फुट कविता पुष्कळ प्रसिद्ध झाली आहे. एकनाथ यादव निफाडकर ऊर्फ नाथकवि यांचीं 'मधुमालती'व 'तारागड' अशीं दोन मोठीं काव्यें आहेत. ह्या कवीचाही भर मानवी मनोवृत्ति रंगविण्याकडे आहे. 'पात्रांच्या स्वभावाच्या चौथ्या हिश्यानेंही काव्याच्या कथानकाकडे मीं लक्ष पोंचविलें नाहीं' असें कवीनेंच प्रस्तावनेंत म्हटलें आहे. स्वभावपरिपोषणाचे कामीं 'मधुमालती'पेक्षां 'तारागड' काव्यांत कवीला जास्त यश आलें आहे. कथानक अगदीं सामान्य आहे, पण कला या दृष्टीनें काव्याचें खरें मर्म मनोवृत्ति रंगविण्यांतच असल्यामुळें त्यांतील सरसता अवर्णनीय आहे. निफाडकरांनीं बऱ्याच स्फुट कविताही लिहिल्या आहेत. सीताराम वासुदेव पेंडसे यांचीं 'शिशुसंमेलनोत्सव' आणि 'श्रीमज्जयसिंहविवाह' अशीं दोन वर्णनात्मक काव्यें आहेत. रचना गोड व हृदयंगम आहे. भाषाही तशीच प्रौढ व अलंकारिक आहे. वरील धर्तीहून भिन्न किंबहुना मराठी भाषेला अपरिचित असें मुकुंद गणपत पाटील ह्यांचें 'कुळकर्णी-लीलामृत' काव्य होय.

हें समग्र ओवीबद्ध रचलें आहे. राजकीय दृष्ट्या काव्य निर्माण करण्यांत कर्त्याचा कांहींही हेतु असो, तिकडे दुर्लक्ष करून कलेच्या दृष्टीनें पाहिलें तर तें काव्य अप्रतिम साधलें आहे, असेंच कोणाचेंही मत होईल. काव्यांत कुळकर्ण्यांच्या अनेक गमतीच्या लीला वर्णिल्या आहेत.भाषापद्धति जुन्या वळणाची योजिली असून जागोजाग भाविकपणाचा आविर्भाव आणला आहे. काव्यांतील विशेषणें साभिप्राय व सयुक्तिक आहेत. अशा थाटांत प्राचीन श्रीधरकवीच्या काव्याचें विकृतानुकरण अथवा विडंबन या दृष्टीनेंच त्या काव्याचें महत्त्व विशेष आहे. असलीं काव्यें इंग्रजी, बंगाली व संस्कृत ह्या भाषांतूनही आढळून येतात.मिल्टन कवीच्या 'Paradise Lost' काव्याची 'Splendid Shilling' मधील नकल प्रसिद्ध आहेच.पण त्यापेक्षांही जास्त प्रसिद्धीस आलेलें काव्य म्हणजे वुइल्क्सनें लिहिलेलें 'स्त्रियांवरील निबंध'नामक कवितांचें चोपडें होय.त्यांत पोप कवीच्या 'Essay on Man'चें विकृतानुकरण केलें आहे. वंगकवि मधुसूदन दत्त ह्याच्या 'मेघनादवध' काव्याचें 'चुचुंद्रावध' हें विडंबनकाव्य होय. तशींच 'चहागीता' व 'काकदूत' हीं संस्कृत काव्यें 'भगवद्गीता' व 'मेघदूत' ह्यांचीं विडंबनें होत. याच धर्तीचें 'कुळकर्णीलीलामृत' हें काव्य झालें आहे. वामन जनार्दन कुंटे यांचें 'सरला' नामक ऐतिहासिक काव्य लहान परंतु चटकदार आहे. त्यासाठीं शौर्यखनि रजपुतान्याच्या इतिहासांतील एक मनोरम प्रसंग निवडला आहे. काव्यावर स्कॉट कवीची गोड छाया पडली आहे, पण तें अतिशय लहान झाल्यामुळें त्याची वाढ मात्र त्या प्रमाणानें झाली नाहीं.याशिवाय कुंटे यांच्या स्फुट कविताही आहेत. अत्यल्प काव्यनिष्पत्ति होण्याचें कारण कवीचें अन्यव्यवसायित्व होय. 'आनंदीरमण' ऊर्फ जगन्नाथ वामन हर्षे यांचें 'वीरदुहिता' नामक ऐतिहासिक काव्य आहे. हेंही वरील 'सरला' काव्यासारखें लहान असून वीररसाचें पोषक आहे. ह्याच कवीचें 'आधुनिक साहित्यरुक्कुठार' नांवाचें वरेंच मोठें आर्याबद्ध प्रकरण आहे. तें टीकात्मक असून त्यांत वाङ्मयाच्या अनेक प्रश्नांचा ऊहापोह केला आहे. संस्कृत काव्यांच्या धर्तीवर लिहिलेलें काव्य म्हणजे यशोधनाचें 'श्रीहनुमच्चरित' होय. त्या काव्याचे दहा सर्ग असून विषय पौराणिक आहे, व रचनाही पौराणिक थाटाची आहे. छंद आर्या असून भाषा अक्लिष्ट आहे. दुसरीं दोन महाकाव्यें म्हणजे'साधुदास' ऊर्फ गोविंद गोपाळ पाटणकर आणि दत्तात्रय रामचंद्र गदगकर ह्या जोडकर्त्यांचीं वनविहार व रणविहार हीं पौराणिक काव्यें आहेत. काव्यांची मांडणी रघुवंशादि संस्कृत महाकाव्यांच्या धरहुकूम आहे. भाषेंतील संस्कृतमयता, वृत्तांतील वैचित्र्य व शब्दार्थालंकारांतील वैपुल्य यांची त्या काव्यांत पदोपदीं प्रचीति येते.एकांत रामानें वनवासांत जे विहार केले त्यांचें व दुसऱ्यांत त्यानें केलेल्या युद्धाचें वर्णन आहे.पहिल्याचे १७ व दुसऱ्याचे १८ सर्ग आहेत.दोन्हीही काव्यांची भाषा प्रौढ असून, वर्णनेंही मनोवेधक आणि मार्मिक आहेत. काव्यांतील ओघही संथ वाहत आहे. एतावता पुराण संस्कृत काव्यांचाच पुन्हां मराठीच्या पेषांत नवा अवतार झाला आहे असें वाटल्याखेरीज राहत नाहीं. कवीनें मधून मधून चित्रालंकारांची अर्थात् पद्यबंधरचनेची योजना केली आहे. यामुळें कवीचें भाषेवरील प्रभुत्व दिसून येतें. चित्रकाव्याविषयीं विचार करतांना 'ज्यांत विशेष विचार न करतां केवळ दर्शनमात्रानेंच किंवा श्रवणमात्रेंकरूनच तात्कालिक आनंद उत्पन्न होतो अशाच काव्यावर लुब्ध होणारे लोक विशेष आहेत.' (बळवंतराव कमलाकर.) हें जरी खरें आहे तरी त्या रचनेनें भाषेला क्लिष्टता येते.काव्यवाचनापासून जो सहजानंद व्हावयाचा त्याची गति निरुद्ध होते. तथापि हें व्यक्तिगत काव्याबद्दल म्हणतां येईल.परंतु काव्याचा अनेकांगांनीं विचार करावयाचा तर त्यांत अनेकविधता असली पाहिजे असा कोणाचाही अभिप्राय पडेल; व याच दृष्टीनें वरील काव्यांची मराठी काव्यसाहित्यांत चांगलीच भर पडली आहे असें म्हटलें पाहिजे.ह्याच कवींची 'कृष्णालहरी'व नुकताच प्रसिद्ध झालेला 'निर्माल्यसंग्रह' हीं काव्येंही गोड व प्रसन्न आहेत. दुसऱ्या काव्यांत श्रीमत् 'भीमशती,' 'श्रीरामशती' व 'श्रीसीताशती' अशीं तीन भक्तिरसात्मक स्तोत्रें आहेत. जगन्नाथ गणेश गुणे ऊर्फ 'कुवलयानंद' यांचें काव्यरत्नावलींत प्रसिद्ध झालेलें,'सुदामचरित्र' नांवाचें सहा सर्गांचें पौराणिक काव्य आहे. त्यांतील कल्पना मनोरम असून, गुरूपदेश, दारिद्र्यवर्णन हीं प्रकरणें चांगलीं उतरलीं आहेत.

ह्याच कवीचा 'कुवलयानंदाचीं गाणीं' म्हणून स्फुट कवितांचा जो भाग प्रसिद्ध झालेला आहे त्यांतील कल्पना भावनापूर्ण आहेत.या वीणागीतांत किंवा कवीनें म्हटल्याप्रमाणें 'हृद्विलासां'त प्रेम व भक्ति हे गुण उत्कटत्वानें विलसत आहेत.गुणे ह्यांच्या गीतांविषयीं त्या पुस्तकाचे प्रस्तावनाकार प्रो. म. म. जोशी यांच्या शब्दांत सांगावयाचें तर,'कवीचें विमान व विचारनौका हीं उच्च दर्जाचीं व शाबूद आहेत, अवलोकनशक्ति व अंतरंगप्रवेशनिपुणता हीं सूक्ष्म व दूर पल्ल्याचीं आहेत.' 'काव्यकांतार' नांवाचें एकपात्री काव्य बळवंत गणेश खापर्डे यांनीं लिहिलें आहे. काव्य अजून अपुरेंच आहे. खापर्डे यांची कविता गूढतत्त्वविशिष्ट असते; या गोष्टीची प्रचीति वरील काव्यांतही होत आहे.

ज्यांनीं खंडकाव्यें लिहिलीं आहेत असे कवी म्हणजे पाध्ये, अनंततनय,जोशी, बेहरे, रानडे, सुमंत, खेडकर, कारखानीस व महाराष्ट्रीय हे होत. कवितादेवी प्रसन्न होण्यापूर्वींच ज्यांचे काळ्याचे पांढरे झाले अशांमध्ये सच्चिदानंद ऊर्फ साठे ह्यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. रे. टिळकांनीं 'बापाचे अश्रु' म्हणून जें शोकगीत गाइलेलें आहे तें याच कवीसंबंधानें होय. साठे यांची कवितासामग्री मोठी नाहीं किंवा भरारीचीही नाहीं. त्यांच्या कवितेंतील प्रेमळपणा, विशेषतः स्वतः कवीच आपल्या कविता म्हणत असतांना त्यांची होणारी तल्लीन वृत्ति,ही ज्यांनीं पाहिली आहे त्यांस म्हातारपणांतही कवितादेवीनें खेळविल्याचें पाहून कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं. प्रि. दामोदर गणेश पाध्ये ह्यांच्यामध्येंही प्रौढ वयांतच काव्य स्फुरित झालेलें दिसतें. पाध्यांच्या कवितेंतील विषय नव्या तऱ्हेचा असतो. पण भाषेचें वळण जुनें असतें. त्यांची 'सुगृहिणी,' 'स्नेहलता' वगैरे काव्यें चांगल्यांपैकीं आहेत. साठे व पाध्ये यांच्या उदाहरणांवरून स्फूर्ति आणि वयाचें जडत्व यांमध्यें नेहमीं दृष्टीस पडणाऱ्या नियमाचा येथें कसा व्युत्क्रम झाला आहे हें दिसून येतें . अनंततनय ऊर्फ दत्तात्रय अनंत आपटे ह्यांचा कवितासंग्रह बराच मोठा आहे. सुरुवातीला त्यांच्या कवितेचें वळण जुनें होतें; पण पुढें तिला स्पृहणीय असें नवें वळण लागलें आहे. त्यांचें 'शारदादूतिका'नामक खंडकाव्य प्रसिद्ध आहे. 'अंतर्विद्ध कलिका'नामक काव्यांत एका नीतिभ्रष्ट स्त्रीला तिच्या चंचल वृत्तीबद्दल पुढें कसा पश्चात्ताप झाला व त्या मनःशुद्धींतच परमेश्वराचा धांवा करीत तिचा कसा अंत झाला, याचें चित्र रेखाटलें आहे. विषयावरून हें काव्य एक सामाजिक चित्र आहे हें सांगणें नकोच. शीलभ्रष्टतेला पुरुष कारण होतो, कीं स्त्री कारण होते, हा मुद्दा फारसा महत्त्वाचा नाहीं. असल्या प्रकारची अवनति प्राप्त होतांना ज्या गोष्टी कारणीभूत होतात त्यांचा समाजांतून समूळ नायनाट केला पाहिजे. अनंततनय ह्यांच्या काव्यांतील स्त्रीचा कृत कृत्याबद्दल वाटलेला पश्चात्ताप व अंतःकरणशुद्धि या गोष्टी व्यक्तिशः समाधानकारक वाटण्यासारख्या असल्या तरी त्या सामाजिक प्रश्नाच्या दृष्टीनें परिणामकारक नाहींत. स्त्री अविचारवश होऊन एकवार नीतिभ्रष्ट झाली कीं समाजाकडून ती कायमचीच पतित ठरते. तिला त्याचीं फळें इतक्या तीव्रकटुतेनें भोगावीं लागतात कीं ती शेवटीं अशरण होऊन तिला उघड बाजारांत बसल्यावांचून गत्यंतर नसतें. स्त्रियांच्या या अनन्यगतिकत्वाबद्दल जबाबदार कोण? हें समाजांतील भेसुर चित्र कवीनें जर दाखविलें असतें, म्हणजेच 'अंतर्विद्ध कलिके'ऐवजीं 'विकसित कलिका' लिहिली असती तर त्या काव्यापासून पुष्कळ बोध घेतां आला असता. असो. अनंततनय यांनीं ही नवीन दिशा दाखवून विचारास काव्यद्वारा चलन दिलें तें खरोखर प्रशंसनीय होय. शारदादूतिकेंतही जातां जातां कांहीं अनिष्ट चालीरीतींवर कोरडा उडविला आहे. अशा रीतीनें सामाजिक टीकाकार ह्या नात्यानें कवीचा उपक्रम उपयुक्त असून आदरणीय आहे. भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तर ती प्रगल्भ व साधी आहे. गंभीर विचार विशदपणें व सुलभतेनें मांडण्याची कवीची कला अनुकरण करण्यासारखी आहे. संसारांतील लहान लहान प्रसंग वेंचून त्यांवर मनोरम गीतें गाण्याविषयीं इंग्रजी भाषेंत जी वर्डस्वर्थची कीर्ति आहे तीच मराठी भाषेंत अनंततनयांची होय.एकवार रामकथा गाऊनही मनाची तृप्ति झाली नाहीं म्हणून ज्याप्रमाणें मोरोपंतांनीं ती कथा १०८ वेळां गाइली आहे,त्याप्रमाणें महाराष्ट्रगीता लिहून अनंततनय यांची

तृप्ति न झाल्यामुळें त्यांनीं 'झोपाळयावरची गीता' गाइली आहे. दोन्हीही गीता विशेषतः मोरोपंतांच्या 'मुलींचीं गीतें' या पुस्तकाप्रमाणें परंतु त्यापेक्षांही सोप्या भाषेंत 'झोपाळयावरच्या गीते'ची रचना मनोवेधक झाली आहे. सुमंतकवि ऊर्फ अप्पाराव धुंडिराज मुरतुले यांनीं बृहत्कथासागरांतील सुलोचनेच्या प्रसंगावर 'कन्यादानफल काव्य' लिहिलें आहे. काव्य साकीबद्ध असून त्यांतील वर्णनही चरकदार आहे. 'शोकतरंगिणी' व 'विरहगीति' हीं दोन काव्यें गतकन्या व गतपत्नी यांच्यासंबंधीं आहेत. दोहींतील करुणरस मनोवृत्तीला विकलित करणारा आहे. सुमंतांची [illegible] मराठी कवितेला शून्यसंशोधनात्मक करणें ही होय. हें शून्यसंशोधन परिणामक होण्यासाठीं काव्यांतील भाषासरणी मोठ्या खुबीची असावी लागते. गूढात्मकतेचा भावनांशीं संबंध असल्यानें ती वीणाकाव्यांतच प्रकर्षत्वानें जितकी प्रकट होते, तितकी दुसऱ्यांत होत नाहीं. वीणाकाव्यें हीं गानकाव्यें असतात. तेव्हां त्यांना कर्णमधुर शब्दरचनेची आवश्यकता असते. 'Verses are children of the lyre. They must be sung, not read.' ही गोष्ट सुमंतांच्या कवितेला तंतोतंत लागू पडते. कवीनें या बाबतींत मिळविलेलें यश अपूर्व आहे यांत शंका नाहीं. त्यांची 'वीणा' ही एकच कविता वाचली तरी तीवरून वरील विधानाबद्दल खात्री होईल. त्या कवितेंतील झंकाराचा वाचतांना व ऐकतांना अनुभव पटतो. कवीचीं सगळीं गाणीं आत्मभावनाप्रचुर असल्यानें तीं कालानुक्रमानें वाचलीं तर तो एक कवीच्या जीविताचा इतिहासच होईल. 'माझे दुर्दिन' म्हणून सुमंतांचें एक खंडकाव्य आहे; त्यांत त्यांनीं आपल्या लहानपणची हकीकत दिली आहे. नारायण केशव बेहेरे व श्रीधर बाळकृष्ण रानडे यांचीं काव्यें नवीन मनूला साजेशींच आहेत. पहिल्या कवीनें 'स्मरणी' व 'कर्मवीर' आणि दुसऱ्यानें 'काळाच्या दाढेंतून' हीं खंडकाव्यें लिहिलीं आहेत. हीं तिन्ही काव्यें भावनात्मक आहेत. ह्यांतील कल्पना रम्य असून भाषाही साधी व जोरदार आहे. बेहेऱ्यांनीं स्फुट कविताही पुष्कळ लिहिली आहे. राजापुरच्या 'महाराष्ट्रीय' नामक कवीनें संस्कृतांतील 'विश्वगुणादर्श' काव्याच्या धर्तीवर गीतिछंदांत स्वतंत्र काव्य रचिलें आहे. त्यांत महाराष्ट्र वाङ्मयाचें समालोचन केलें असून त्याच्या उत्कर्षाला कोणाकोणाचे श्रम कारणीभूत झाले आहेत, याचें चटकदार वर्णन आहे. विष्णु बाळकृष्ण खेडकर यांची 'सूनबाईची कहाणी' हृदयद्रावक झाली आहे. माधव काशिनाथ कारखानीस यांचें 'सुवर्णा काव्य' ही यन्यापैकीं आहे. शेवटीं ज्याचा अवश्य उल्लेख केला पाहिजे असें बाळकृष्ण लक्ष्मण जोशी यांचें 'शब्दशूर' काव्य होय. हें खंडकाव्य विनोदी असून त्यांत एका शेंदाड शिपायाचें सुलभ आर्यावृत्तांत सुंदर व चित्तवेधक वर्णन केलें आहे.

स्फुट कविता लिहिणाऱ्या कवींमध्यें राम गणेश गडकरी ऊर्फ गोविंदाग्रज व त्र्यंबक बापुजी ठोमरे ऊर्फ 'बालकवि' हे अध्वर्यु होत. ठोमरे यांच्या कांहीं कविता 'कलार्पण' या नांवानें प्रसिद्ध झाल्या आहेत. 'गोविंदाग्रज' व 'बालकवि' हे दोघेही जण विद्यार्थी दशेंतच कविता लिहूं लागले. ठोमरे ह्यांना १९०७ सालीं म्हणजे वयाच्या १६ व्या वर्षीं जळगांवास डॉ. कीर्तिकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं जें कविसंमेलन भरलें होतें त्या वेळीं अध्यक्षांकडून त्यांच्या कवित्वगुणाबद्दल पारितोषिक मिळालें. इतक्या लहान वयांत कविता लिहिणारे कवि बालकवीच होत. गोविंदाग्रजांनीं म्हटल्याप्रमाणें दोघेजण केशवसुतांचे कमी अधिक प्रमाणानें 'सच्चे चेले' होते. दोघांचेंही कवि म्हणून थोडयाच अवधींत नांव गाजलें. दोघांनींही आपल्या गानस्फूर्तीनें सर्वांना मोहून टाकिलें, व अखेर दोघांवरही फार थोडक्या अवधींत व थोडक्या अंतरानें इहलोक सोडण्याची पाळी आली. हें साम्य आणखी एका गोष्टींत लागू पडणारें आहे. दोघांचीही प्रतिभा पुढें क्षीण होत चालली होती; निदान ती पहिल्याइतकी उज्ज्वल तरी नव्हती. गोविंदाग्रजांना तर हें विधान चांगलें लागू पडतें. त्यांची काव्यस्फूर्ति विलक्षण लहरी व अनिश्चित असे, व पहिल्या पहिल्या कविता करून त्यांना जरी यशाची प्राप्ति झाली तरी पुढें काव्यस्फूर्तीनें त्यांस बहुतेक सोडल्यासारखेंच झालें होतें. त्यांच्या पहिल्या कवितांत जी 'प्रतिभेची दिव्य ठिणगी' चमकत

आहे, तितकी ती पुढील कवितांतून दिसत नाहीं.शेवटीं शेवटीं तर नाट्याच्या पायीं त्यांनीं कविता करण्याचें सोडूनच दिलें. त्यामुळें नाटककार या नात्यानेंच गडकरी यांची जितकी ख्याति आहे तितकी कवि या नात्यानें नाहीं. बालकवीच्या पुढील कविता फारशा उपलब्ध नाहींत; तथापि त्यांचा व्यासंग मात्र शेवट-पर्यंत चालू होता. गोविंदाग्रजांची 'राजहंस,' 'मुरली' 'घुंगुरवाळा'व बालकवीच्या 'अरुण,''फुलराणी,''आनंदीआनंद' ह्या कवितांतील माधुर्य निरुपम आहे.भाषा साधी व सरळ असून रसाचा उत्कर्ष करणारी आहे. ह्या कवींच्या मालिकेंत गोविंद पांडुरंग देवधर, आनंदराव कृष्णाजी टेकाडे, केशव महादेव सोनाळकर, महादेव भिमाजी कुळकर्णी, माधव केशव काटदरे, माधव गोविंद भिडे, नागेश गणेश नवरे, सरदार पांडुरंग बाळकृष्ण दडकर, श्रीपाद महादेव माटे, गणपत बाबुराव शिंदे ऊर्फ 'सरस्वतीकंठाभरण,' शंकर केशव कानेटकर ऊर्फ ' गिरीश,' दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी, लक्ष्मण हरि वराडकर, आणि 'Bee ' ह्यांची गणना केली पाहिजे. या कवींच्या कवितांचे मासले 'अभिनवकाव्यमालें'तून पाहावयास मिळतात. ते सर्व नवीन पंथाचे अनुयायी आहेत, एवढें सांगितल्यानें त्यांच्या कवितेचें स्थूल स्वरूप ध्यानांत येईल. विठ्ठल कृष्ण नेरूरकर यांचें 'राधाकृष्णरहस्य'व भास्कर नानाजी शिंदे ऊर्फ 'अरविंद' यांचें 'आत्मोद्धार' हीं भक्तिविशिष्ट काव्यें चांगलीं झालीं आहेत. पहिल्यांत १८ प्रकरणें असून ती सर्व गानकाव्यांत रचलीं आहेत. दुसऱ्यांतील आठही प्रकरणें चतुर्दशपदींत गुंफिलीं आहेत. मराठी कवितेंत चतुर्दशपदीची सुरुवात केशवसुतापासून झाली. अलीकडे रेंदाळकर व नागेश ह्यांनीं त्या पद्धतीचा बराच अंगीकार केला आहे. नागेश यांचें चतुर्दशपदींत लिहिलेलें 'प्रणयगुंफन' नांवाचें खंडकाव्य आहे. कृष्णाजी हरि जोगळेकर यांच्या कविता सद्यःस्थितीवर विनोदपूर्ण भावें लिहिलेल्या आहेत. 'शिवज' या कवीची 'बाळूरायाची काकडआरती' म्हणून एक बीभत्सरसांतील कविता आहे. संस्कृतांतील मालतीमाधव नाटकांत मालतीला बळी देण्याऱ्या वेळच्या प्रसंगीं बीभत्सरस वर्णिला आहे खरा, पण त्यांत रौद्ररसाचें मिश्रण आहे. वरील काकडआरती-मध्यें तो रस थोडक्यांत परंतु शुद्ध स्वरूपांत दिसतो. ह्या कवींविषयीं एक गोष्ट ध्यानांत ठेवावयाची कीं, त्यांतील बरेच जण तरुण व काव्यप्रांगणांत नवीनच उतरले आहेत. तरी पण त्यांपैकीं पुष्कळांच्या कवितांची गति पाहिली म्हणजे त्यांना 'शोकी'कवीचा म्हणणें जास्त शोभेल.

वरील वीणाकाव्यांच्या गायकाबरोबर ऐतिहासिक पोवाडे किंवा गीतें गाणारे शाहीरही या काळांत निपजले. सखाराम गोविंद विरकूड यांचे 'तान्हाजी मालुसरे' व 'बाजी प्रभु' हे पोवाडे प्रसिद्ध झाले. त्यांतील प्रसंगांचा उठाव चांगला झाला आहे. भाषेंतील जोरदारपणामुळें पोवाडे सरस वठले आहेत. केशव सीताराम ठाकरे यांचाही बाजी प्रभूवरील पोवाडा एकंदरीनें बरा आहे. त्यांतील मुख्य दोष म्हणजे बाजीच्या मोठेपणाकरितां त्याची शिवाजी महाराजांवर ताण करण्याचा कवीनें केलेला प्रयत्न होय! हा प्रयत्न पाहिला म्हणजे कथेच्या ओघांत हनुमानाचें महत्त्व वाढविण्यासाठीं त्याची रामचंद्रावर कडी करणाऱ्या बेसुमार हरदासाची आठवण होते. बाजीप्रभू हा स्वाभिमानी शूर योद्धा खरा, पण त्याकरितां दुसऱ्याला—विशेषतः त्याच्या धन्याला—कमी लेखण्याची जरूरी नाहीं; इतकेंच नाहीं, तर तसें करणें उलट त्याच्या स्वामिनिष्ठेला बट्टा आणण्यासारखें होईल. १९११ सालीं जो राज्यारोहणसमारंभ झाला त्या वेळीं गोविंद महादेव भिडे यांचा नवीन स्फूर्तीनें गाइलेला स्वागतपर पोवाडा आहे. 'Bee' 'कवीचा 'प्रभातपोवाडा' व गडकरी यांचा 'पानिपताचा फटका' उत्तम साधले आहेत.गेल्या महायुद्धासंबंधी पोवाडे म्हटले म्हणजे केशवतनयांचें 'युद्धगान' व साधुदासांचा 'महायुद्धाचा पोवाडा ' हे होत. पहिल्यांत प्राचीन मराठा वीरांची स्मृति देऊन हिंदी लोकांना गेल्या महायुद्धांत सैनिक होण्याविषयीं कवीनें प्रोत्साहन दिलें आहे. दुसऱ्या पोवाड्यांत युद्धाची संकलित हकीकत आहे. काटदरे, बेहेरे व माडखोलकर यांनीही मराठ्यांच्या इतिहासांतील वेंचक प्रसंगांवर राष्ट्रीय कवनें लिहिलीं आहेत. अशा रीतीनें पूर्वीची शाहीरपरंपरा जिवंत चालू राहिली आहे.

या दशकांतील श्री. लक्ष्मीबाई टिळक, सौ. लक्ष्मीबाई अभ्यंकर ऊर्फ 'लक्ष्मीतनया,' सौ. मनोरमाबाई

रानडे, सौ. रमाबाई काटदरे, सौ. लक्ष्मीबाई बेहेरे, सौ. गंगुबाई मुरतुले ऊर्फ 'सुमंतकांता,' सौ. भागीरथीबाई बापट, सौ. कमलिनी या कवयित्री होत. मागच्याप्रमाणें येथेंही हा विशेष आहे कीं सौ. बापट, कमलिनी व लक्ष्मीतनया यांवांचून सर्व कवयित्री कविपत्न्या आहेत. श्री. लक्ष्मीबाई टिळक यांनीं 'पतिपत्नी' नामक बरीच मोठी कविता लिहिली आहे. त्यांत पतिपत्नींचा अभेद्य संयोग असतो, हें तत्व काव्यपूर्ण भाषेंत ग्रथित केलें आहे. 'कारंजांतील मोदक' हीही त्यांची एक चटकदार कविता आहे. बाकीच्या कवयित्रींच्या लहान स्फुट कविता आहेत, व त्यासुद्धां बोटांवर मोजतां येतील इतक्या अल्प आहेत. पति कवि असल्यामुळें त्याची छाप कवयित्रींच्या कवितांवर पडावी यांत आश्चर्य नाहीं. इलिझाबेथ ब्रौनिंग इच्याविषयीं असें म्हटलें आहे कीं, 'ती स्त्रीजातींत जन्मास आली ही कांहीं आकस्मिक घडून आलली गोष्ट नाहीं. तिचे विचार व तिच्या भावना या सर्वस्वीं स्त्रीला उचित अशा आहेत. तिच्या उत्कृष्ट कृतींतून हाच गुण दृष्टोत्पत्तीस पडतो.' ही आंग्लकवयित्रीची गोष्ट कितीशा मराठी कवयित्रींना लागू होईल ? त्यांतल्या त्यांत सौ. काटदरे व सौ. बेहेरे यांच्या ज्या थोड्याशा कविता प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांत साध्या व गोड शब्दरचनेचा आणि गृहप्रेमाचा प्रत्यय येत आहे. सुमंतकांतेच्या कवितेमध्यें उच्च दर्जाच्या कवितेस लागणारें विचाराचें गांभीर्य व सूक्ष्मपणा हे गुण नाहींत, किंवा त्यांत माधुर्य व मोहकताही नाहीं. पण त्या कविता खऱ्या स्त्रीच्या हृदयांतून निघालेले उद्गार आहेत. सौ. अभ्यंकर व सौ. रानडे यांच्याही कविता घरगुती प्रेमाच्या विषयावर नसल्या तरी त्यांची भाषा मात्र सुबोध व सरळ आहे. सौ. बापट यांची कै. अण्णासाहेब पटवर्धन यांच्यावरील 'माझी पुष्पमाला' भक्तियुक्त अंतःकरणानें गुंफली आहे. श्री. कृष्णाबाई गाडगीळकृत 'मानसगीतसरोवर'ही आल्हाददायक आहे यांत संशय नाहीं.

वर उल्लेख केलेलीं काव्यें स्वतंत्र होत. तथापि मराठी भाषेंत अन्य भाषेंतील काव्यांची भरही या काळांत पडली नाहीं असें नाहीं. अशा प्रकारची भर पडल्यानें भाषेला हीनपणा येत नाहीं; उलट ती भाषेला आवश्यक असते असें म्हटलें पाहिजे. जगांतील कोणतीही भाषा पाहिली तरी तिला पूर्णावस्थेला आणण्याला ज्याप्रमाणें परकीय विचारांची मदत होते, त्याचप्रमाणें तिच्या पूर्णावस्थेंतही त्या मदतीची जरूरी लागते. नाहीं तर तिची पुढें होणारी वाढ एकांगी म्हणून अपूर्ण होते. परभाषेंतील उत्तम ग्रंथांची भाषांतररूपानें वरचेवर भर पडत गेली, तरच ती नवीन विचारांना पोषक बनते. या दृष्टीनें पाहतां याही वेळीं झालेल्या भाषांतरित काव्यांची किंमत कमी लेखितां येत नाहीं. चालू दहा वर्षांत जीं काव्यें भाषांतररूपानें मराठींत आलीं त्यांत रामकृष्ण गणेश हवालदार ह्यांच्या 'इलिअड' काव्यास अग्रस्थान दिलें पाहिजे. हें काव्य मराठींत उतरण्याचा मोगरे यांचा विचार होता, व तसा थोडासा त्यांनीं प्रयत्नही केला होता. इलिअड काव्य बरेंच मोठें आहे, व त्याचा मराठी अवतारही सुबक झाला आहे. वृत्त बहुतेक आर्याबद्ध असून भाषेची धाटणी मोरोपंती आहे. एकंदरीनें रा. ब. महाजनि म्हणतात त्याप्रमाणें 'इलिअड'सारख्या महाकाव्याचें कविताबद्ध भाषांतर करण्याची इच्छा धारण करणें व ती नेटानें व इतक्या चांगल्या रीतीनें तडीस नेणें हा प्रसंग मराठी वाङ्मयाच्या अलीकडील इतिहासांत अपूर्व आहे." आतां भाषांतरित काव्यांतील परकीय नांवें कर्णकटु लागतात हें जरी खरें आहे तरी तेवढ्यानेंच काव्य निश्चितपणें टाकाऊ ठरत नाहीं, व भाषांतरापेक्षां रूपांतर बरें हीही गोष्ट सिद्ध होत नाहीं. परकीय नांवें भाषेंतील उच्चारांशीं साधारणतः मिळवून घेतलीं तर त्यांतील कर्णकठोरपणा खास नाहींसा होईल. दुसरें मराठी भाषांतरकाव्य म्हणजे गोल्डस्मिथचें 'प्रवासी' काव्य होय. याचे लहान लहान नऊ सर्ग केले असून शेवटला सर्ग हिंदिस्थानविषयक आहे. हेंही काव्य आर्याबद्ध आहे. तिसरें खंडकाव्य बायरन्च्या 'प्रिझनर ऑफ शिलान' काव्याचें दामोदर रामकृष्ण बापट यांनीं केलेलें 'सुवर्णदुर्गांतील कैदी' नामक भाषांतर आहे. यांत मूळ काव्यांतील प्रास्ताविक भाग गाळलेला आहे. काव्य साकीबद्ध असून भाषा शुद्ध व सुबोध आहे. याशिवाय शेलेचीं मेघ व चंडोल, व कालेरिजची प्रेमकहाणी, थामस मूरचा

अनुरागबंध, लाँगफेलोचें जीवितस्तोत्र, कूपरचा एकांतवास व डाकवाला, हूडचें स्त्रीदैन्य, टेनिसनची डोरा व कमलभक्षक, ग्रेचें शवगर्तातील शोकगीत व मनी मांजरीचा मृत्यु, वर्डस्वर्थचा भारद्वाज, फुलपाखरूं, कोकिल, स्कॉटची स्वदेशप्रीति व कुंजविहार, ब्लेकचें हास्यसंगीत, मेरिडिथचा नूतन भागीदार, तसेंच हेमन्स व तिघे ह्या कवयित्रींच्या आणि मांटगोमेरी, लँब, बर्न्स, जोन्स, कीटस्, थॉमसन्, बॅटरबी, गोल्ड, मेसन, कार्लेटन वगैरे कवींच्या लहान मोठ्या कवितांचीं भाषांतरें झालीं आहेत. 'धूर्जटी' ऊर्फ शंकर नारायण महाजन यानीं मराठींत आणलेलीं रामायणांतील ऋतुवर्णनें सरस वठलीं आहेत. याच कवीनें बंगालींतील रवींद्रबाबूंच्या समग्र गीतांजलीचें सुबक भाषांतरही केलें आहे. रवींद्रबाबूंच्या 'माळी' व 'बिजेचा चंद्र' या संग्रहांतील कांहीं स्फुट कविताही मराठींत उतरल्या आहेत. याशिवाय मधुसूदन दत्त, तरुलता दत्त, बंकीमचंद्र वगैरे वंगीय कवींनीं आपल्या कृतींची अनुवादरूपानें मराठी कवितेंत भर घातली आहे. बंगालीपेक्षांही हिंदी, गुर्जरी, व कानडी या भाषा सान्निध्याच्या नात्यानें मराठीला जास्त प्रिय असावयास पाहिजेत. तथापि महाराष्ट्रीयवाङ्मयसूचीवरून पाहतां त्यांतील एकाही कवितेला मराठी भाषांतराचा लाभ मिळूं नये ही खरोखर आश्चर्य करण्यासारखी गोष्ट होय.

नवीन विचारसंक्रमणाच्या काळांत जुन्या कवींची परंपरा मोठ्या आढ्यतेनें टिकली नाहीं हें खरें, तरी ती अगदींच नामशेष झाली असें म्हणतां येत नाहीं. मागें उल्लेख केलेले हंसराज, दाजीबा जोतीबा, त्यानंतर झालेले परशुराम ढवळे, कुडची वीर ही साधुकवींची परंपरा चालूच होती. फार कशाला, विठोबा अण्णा दप्तरदार व दामोदर गणेश जोशी ऊर्फ 'कृष्णदास' यांना निवर्तून अवघीं ३५।४० वर्षें झालीं आहेत. नायब शिरस्तेदारीसारखीं कामें करणारे 'गिरिवासी' काव्याचे कर्ते व्यंकटेश ऊर्फ बापूजी वैजनाथ पतकी हे वऱ्हाडप्रांतीय कवि होत. ते १८७. सालीं वारले. म्हणजे ४० वर्षांमागें प्राचीन कविपरंपरा अखंड चालू होती. त्यांचीं काव्यें पौराणिक आख्यानें किंवा वेदान्त ह्यांनीं भरलेलीं आहेत. ग्रंथ जरी ठरीव नमुन्याचे व ठरीव विचाराचे असले तरी ते एवढाले जंगी आहेत कीं त्यांची पद्यसंख्या हजारांनीं भरूं शकेल. या पुराणपरंपरेंतील अर्वाचीन कवि 'दास गणु' ऊर्फ गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे हे होत. महिपतीचा ज्याप्रमाणें प्राचीन 'भक्तलीलामृत' ग्रंथ आहे त्याप्रमाणें अर्वाचीन भक्तलीलामृत ग्रंथ दास गणूंनीं लिहिला आहे. काव्याची भाषा गोड व रसाळ आहे, व वर्णनेंही मार्मिक आहेत. दास गणूंची परंपरा जुनी आहे, तरी त्यांच्यावरही नवीनपणाचा ठसा उमटला आहे. 'भक्तलीलामृत' या ग्रंथाविषयीं चिंतामणराव वैद्य म्हणतात: 'हा ग्रंथ राष्ट्रीय ग्रंथमालिकेंत बसण्यासारखा असून त्याची योग्यता एकपक्षीं जुन्या वाङ्मयाच्या इमारतींत मोडण्यासारखी आहे. असें जरी आहे तथापि याही ग्रंथावर नूतन मराठी वाङ्मयाच्या निराळ्या स्फूर्तीची झांक पडली आहे.' याच संतकवीचें एक ओवीबद्ध उपनिषत्‌ही आहे. सांप्रतची समाजस्थिति निकृष्टावस्थेला पोंचली आहे, ती सुधारण्याविषयीं 'श्रीरंगाला केलेली ईशप्रार्थना' म्हणून एक याच कवीचें आर्याबद्ध प्रकरण आहे. त्यांत प्रगटलेला जिव्हाळा मनोवेधक आहे. अर्वाचीन वेदान्तपर, स्वतंत्र व भाषांतरित ग्रंथांत मागें उल्लेखिलेल्या बाबा गर्दे यांच्या 'गीतामृतशतपदी' व 'गीतपंचदशी' या ग्रंथांना प्रमुखस्थान दिलें पाहिजे. त्यांचे बंधु डा. गणेश कृष्ण गर्दे यांचें 'शिवमहिम्नस्तोत्र,' आत्माराम मोरेश्वर छत्रे यांचीं, श्रीमत्पंचायतनरहस्यपंचाध्यायी, रघुनाथ गोपाळ किर्लोस्कर यांचा 'सद्बोधपद्‌रत्नहार,' बाळकृष्ण भाऊ जोशी यांचे अपरोक्षानुभूति, साकीबद्ध अमृतानुभव व अध्यात्मरामायण, रावजी बल्लाळ गोडबोले यांचे वेदांतकेसरी व प्रबोधसुधाकर, या ग्रंथांचा उल्लेख करणें जरूर आहे. गोडबोले यांचें 'नवभिक्षुगीत' काव्य सद्यःस्थितीला अनुरूप झालें आहे. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठी भाषेंत लिहिला आहे, तरी त्यांतील भाषा आतां पुराणी झाली आहे; इतकी कीं, तींतील व्याकरणाचीं रूपें व शब्द हीं अपरिचित वाटतात. त्यामुळें या अलौकिक

ग्रंथाकडे फारच थोड्यांचें लक्ष्य जातें. गोविंद रामचंद्र मोघे यांनीं प्रचलित भाषेत त्याचें रूपांतर करून तो ग्रंथ सर्वांच्या आटोक्यांत आणण्याचें श्रेय घेतलें आहे.

इतर विषयांप्रमाणें सामाजिक, धार्मिक, राजकीय व वाङ्मयादिक विषयांवरही काव्यें या दशकांत झालीं आहेत. रे. टिळकांचें 'ब्रिटानिया' राजकीय व हर्षे यांचें 'साहित्यरक्षकुठार' आणि महाराष्ट्रीया'चें 'विश्वगुणादर्श' या वाङ्मयावरील टीकात्मक काव्यांचा मागें उल्लेख केलाच आहे. रामराव मार्तंड भांबूरकर यानींही ' मराठी भाषेचा महिमा ' गाइला आहे. सामाजिक प्रश्नांचा ज्यांत ऊहापोह आहे असें काव्य म्हणजे सदाशिव नारायण ठोसर यांचें ' समाजशासन ' होय. श्रीकृष्ण सदाशिव घारपुरे यांनीं ' सनातनमानवधर्मरहस्य ' काव्य लिहून त्यांत धार्मिक विषय प्रतिपादिला आहे. दोन्हीही काव्यें ओवीबद्ध असल्यानें विवेचन सुगम झालें आहे. काव्यांतील ओवही अस्खलनपर आहे. चंद्रशेखर गोविंद आगाशे यांचें ' स्वराज्यकथा ' नामक ओवींत लिहिलेलें लहानसें काव्य आहे, त्यांत हिंदुस्थानाला स्वराज्य कां पाहिजे याचीं कारणें दिलीं आहेत. काव्य जुन्या पद्धतीवर रचलें आहे.

अर्वाचीन मराठी कवींसंबंधानें वर केलेल्या विवेचनावरून ही गोष्ट लक्ष्यांत येईल कीं, मराठी कविता निरनिराळ्या परिस्थितींतून निरनिराळ्या वेशानें उत्क्रांतदशेस आली आहे वरवर पाहणारास सुद्धां तिचें हल्लींचें स्वरूप आशाजनक दिसेल यांत संशय नाहीं. जर कोणी निराश राहिलें असेल तर त्याचें कारण एवढेंच कीं, मराठी कविता अजून त्रुटित स्वरूपांत दिसत आहे. हारांतील मोत्यें तुटून इतस्ततः पडलीं असतांना त्यांची खरी किंमत व महत्व कळत नाहीं. हाच प्रकार मराठी आधुनिक कवितेसंबंधींही झाला आहे. बहुतेक कविता त्रुटित आहे, व जी थोडीशी संकलित आहे ती फारशी उपलब्ध होत नाहीं. अशा रीतीनें आमच्या किती तरी काव्य-संपत्तीचा प्रत्यहीं नाश होत आहे. गेल्या पिढीतील काव्याविषयीं पाहिलें तर आज कोणास इच्छा झाली तरी ती नुसती पाहावयासही मिळूं शकत नाहीं. या कारणानें मराठी आधुनिक कविता पुष्कळांच्या वाचनांतच नसते. अशा स्थितींत मराठी कवितेची निपज होत नाहीं, व जी होत आहे ती साधारण स्वरूपाची होत आहे, अशी कोणाची समजूत झाल्यास त्यास त्याबद्दल दोष देतां येणार नाहीं. आजपर्यंत चिपळूणकरांची 'पद्यरत्नावली' व महाजनींची 'कुसुमाञ्जलि' असे त्या कवींच्या समग्र कवितांचे भाग उपलब्ध होते. त्यांच्याच जोडीला आतां मोगरे व केशवसुत यांचीही कविता सामग्र्यानें हातीं पडत आहे. टिळक यांना तो मान अर्धवट मिळाला आहे. विनायक कवीचा संग्रहही लवकरच बाहेर पडण्याच्या तयारींत आहे. ज्यांचा कवितासंसार अजून चालूच आहे अशा विद्यमान कवींपैकीं लेलेशास्त्री यांची पद्यमंजिरी, रेंदाळकरांची मंदारमंजिरी, सुमंतांची मौक्तिकमाला, अनंततनयांचे हृदयतरंग, भिडे यांची काव्यकुसुमावलि, पेणशांची पद्यसुमांजलि, तिवारींची काव्यकुसुमांजलि, निफाडकरांची काव्यानंदमंजूषा, नागेशाचीं वन्य फुलें, काटदरे यांचीं ध्रुवावरील फुलें, गजानन गोपाळ जोशी यांचा पद्यपुष्पहार, सौ. बेहरे यांची सुमनमाळ, एवढेच स्वतः कवींनींच पदरमोड करून प्रसिद्ध केलेले स्फुट कवितांचे भाग आज दिसत आहेत. एकंदरीनें अर्वाचीनगत कवींपैकीं अवघ्या तीन चार जणांच्या आणि विद्यमानांपैकीं दहा जणांच्या कविता आज थोड्या फार प्रमाणांत एकत्र वाचावयास मिळत आहेत. बाकीच्या कवींचा पत्ताच नाहीं. अशी स्थिति असतांना मराठी कवितेविषयीं कोणतेंही विधान करणें धाडसाचें आहे. आम्ही सुद्धां या निबंधांत केवळ मोठ्या व आम्हांस उपलब्ध असलेल्या काव्यांचाच विचार केला आहे. याशिवाय अशीं किती तरी काव्यें राहिलीं असतील कीं, त्यांची आम्हांस दादही नाहीं व त्यांचा विचारही करतां आला नाहीं. स्फुट कवितांचा विचार आम्हांस बाजूस ठेवावा लागला आहे, याचें कारण वरील अडचण होय.

सांप्रत मराठी कविता तीन प्रकारांनीं वावरत आहे. त्या प्रकारांचें स्वरूप म्हणजे-पहिलें प्राचीन ऊर्फ अध्या-

त्मविषयक, दुसरें पंडिती ऊर्फ वस्तुविषयक, व तिसरें अर्वाचीन ऊर्फ व्यक्तिविषयक, असें देता येईल. हीं तिन्ही स्वरूपें प्रत्येक युगांत थोड्या फार अंशानें अस्तित्वांत होतींच. तीं आजही दिसत असलीं तरी त्यांच्या-मध्यें पूर्वापरभावसंबंध आहे. पहिलीं दोन स्वरूपें अनुक्रमें १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत व उत्तरार्धांत होतीं. २० व्या शतकाच्या उदयाबरोबर तिचें आधुनिक व्यक्तिविषयक स्वरूप प्रगट होऊं लागलें. शाहीरी युगांतील कांहीं खेरीज करून बाकीच्या कवींचा झोंक पौराणिक व आध्यात्मिक काळाकडे आहे. पंडित-युग जितकें संस्कृतांतील ललित वाङ्मयाकडे वळलें तितकेंच आजचें केशवसुतांचें युग इंग्रजी ललितवाङ्मयाकडे झुकलेलें आहे. वैदग्ध्य हेंच अर्वाचीन कवितेचें ब्रीद होय. पौराणिक कथानकें व वैदान्तिक रहस्यें गाऊन गाऊन कंटाळून गेलेली मराठी कविता संस्कृत काव्यांतील नवरसानें पुन्हा ताजीतवानी झाली, व आंग्ल सारस्वताच्या परिचयानें सृष्टींतील वस्तुजातांमध्यें परमेश्वरी स्वरूप पाहूं लागली. रवींद्रबाबूंनीं आपल्या गीतांजलीमध्यें वर्णिल्याप्रमाणें 'स्वतःच बनलेल्या घरट्यांत आपल्या प्रेमानें नानाप्रकारचे रंग व ध्वनि आणि गंध यांचा प्राकार करून त्याच्या आंत या जीवात्म्यास कोंडून ठेविलें आहेस' अशी कवितेची जी अस्वतंत्र पुराणस्थिति होती ती जाऊन 'हा जो तालासुरांत होणारा नाच किंवा जलसा त्यांतील सुरावर पाउलें टाकीत ऋतु नृत्य करीत येतात व अदृश्य होतात. नानाविध रंग, सूर व मधुर गंध या विश्वाच्या आनंदपूर्ण कारंजांत जलधारांप्रमाणें एकसारखे ओतले जात आहेत' (गीत ७०). हे सृष्टींतील चमत्कृतिमय विलास पाहण्याची शक्ति तिला सांप्रत प्राप्त झाली आहे. मनुष्य व सृष्टि यांच्यामध्यें अविनाशी असा सूक्ष्म संबंध आहे, अशी जाणीव झाल्यानें तिच्यांतील क्षुद्र वस्तूही नवीन रंगांत प्रगट होऊं लागल्या; व त्याबरोबर काव्यविषयांचें क्षेत्रही वाढूं लागलें. मराठी कवितेची एकमार्गी वृत्ति जाऊन ती अनेकविध झाली आहे. या स्वरूपभिन्नत्वामुळें आधुनिक कविता मनोरम व मनोवेधक निपजत आहे. अंतरंगाप्रमाणें तिच्या बाह्यांगांतही सुधारणा झाली आहे. व्यक्तिविषयक काव्यांत आत्मभावनेचीं चित्रें असल्यानें त्यांची वीणाकाव्यांत रचना करावी लागते. अर्थात् श्लोकादि वृत्तांच्या जोडीला सांप्रत गानवृत्तेंही येऊन बसलीं आहेत, किंबहुना त्यापेक्षांही लोकादरास प्राप्त होत आहेत. अशा रीतीनें आंतरबाह्य नवीनपणा हेंच आधुनिक मराठी कवितेचें स्वरूप होय. याच स्वरूपाची वाढ आज मुख्यत्वेंकरून होत असलेली दिसते. हें स्वरूप अभिलषणीय आणि अभिनंदनीय आहे, हें सांगणें नकोच.

या नवस्वरूपाबरोबर मराठी कवितेच्या अंगीं जे दोष शिरले आहेत त्यांचाही येथें थोडक्यांत विचार करणें जरूरीचें आहे. वाङ्मयाची उन्नति होत आहे कीं नाहीं हें पाहण्याचीं, हरिभाऊ आपटे यांनीं एका व्याख्यानांत सांगितल्याप्रमाणें, 'राशीभवन व विकसन' अशीं दोन साधनें आहेत. त्यांपैकीं दुसरें साधन स्पष्ट दिसत आहे. पण पहिल्याविषयीं मात्र बरीच शंका आहे. मराठी कवितेची उत्कर्षप्रवणता जरी निर्विवाद असली तरी पण ती दिवसेंदिवस रोडकी बनत चालली आहे. प्रत्येक दशकांतील कवींची मोजदाद केली तर त्यांची संख्या सारखी वाढत असल्याचें जसें आढळून येईल तसें मात्र कवितांच्या वाढीसंबंधानें म्हणवत नाहीं. पुष्कळ कवींचा संग्रह पाहिला तर तो लाज आणण्यासारखा तुटपुंजा आहे. अति प्राचीन काव्यें राहोत, पण गेल्या शतकांतच जे जुन्या पद्धतीचे कवि होऊन गेले त्यांचा कवितासंग्रह घेतला तरी तो आश्चर्य करण्याजोगा मोठा भरेल. ज्याचें शरीर कृश त्याचें मनही कृश बनतें, या आरोग्यशास्त्रांतील नियमानुसार मराठी कवितेच्या रोडकेपणाबरोबर तिच्या अंगांतील नवोदित स्फूर्ति व जोम या गुणांची वाण पडण्याची भीति वाटते. कवितेचा हा रोडकेपणा जोंपर्यंत बेतांत होता, व तसें होण्याला जोंपर्यंत दुसरीं कारणें होतीं तोंपर्यंत त्याची भीति न वाटणें किंवा त्याकडे दुर्लक्ष्य होणें साहजिक होतें. पण सांप्रत त्याची बेसुमार वाढ झालेली पाहिली म्हणजे हा रोग आहे हें निदान ठरतें. अर्थात् त्याचीं कारणें शोधून त्यावर उपाययोजना

करणें अत्यावश्यक आहे. या रोगाला पहिलें व मोठें कारण म्हणजे कवीचें अल्पजीवित्व होय. हें अल्पजीवित्व दोन प्रकारचें आहे. एक आयुष्यविषयक आणि दुसरें कविताविषयक. कांहीं कवींवर अकालीं मृत्यूचा निर्घृण घाला पडला, तर कांहींनीं कवितेचा व्यासंगच सोडून दिला. कविता हाच ज्यांचा जन्माचा विषय झाला होता, अशांमध्यें फक्त मोगरे व टिळक हे कवि होत. त्यांचा सुद्धां कवितेचा संसार अवघ्या तीन तपांचाच भरेल. तथापि मराठी कवितेला पोक्तपणाचे धडे या दोघांच्याच हातून काय ते मिळाले. कविताविषयक अल्पजीवी कवींची संख्या मात्र मोठी आहे. त्यांनीं आपल्या कवितेच्या संसारास तरुणपणांतच आरंभ केला, त्यांत तरबेजही झाले, व पुढें लवकरच तो संसार मोडूनही टाकला. या गोष्टीचा पुरावा पाहणें असेल तर त्यानें काव्यरत्नावलीचा प्रत्येक वर्षाच्या अखेरचा अंक चाळून पाहवा, म्हणजे रत्नावलीस जुन्या कविमंडळीनीं सोडून दिलें अशी संपादकाची तक्रार आरंभींच दिसून येईल. ही अशी शोचनीय स्थिति कां ? आमच्या प्रौढ कवींचें चित्त कवितेवरून उडालें काय? वर्डस्वर्थ किंवा बंगालच्या रवींद्रांप्रमाणें त्यांनीं आपले पोक्त अनुभव काव्यद्वारानें जगाला कथन करावयास नकोत काय? प्रौढ व अनुभविक कवींची जर ही उदासीन वृत्ति तर एखाद्या बनीच्या [illegible] खेळाप्रमाणें कवितेच्या संसारास एकदमच आरंभ व विसर्जन करणाऱ्या नवाट कवींविषयीं काय बोलावें ! आजकाल पाहावें तर'क्षणीं उगवती, क्षणीं चमकती,क्षणांत होति विलुप्त' अशी पुष्कळांची स्थिति आहे. प्रत्येक मनुष्याचे ठिकाणीं निदान थोडी तरी प्रतिभेची ज्योत असतेच. वाचन, चिंतन व लेखन यांचें तेल पोंचलें नाहीं तर तिची प्रभा वर वर्णन केल्याप्रमाणें एका पळाहूनही जास्त टिकणें शक्य नाहीं; किंवा ती ज्योत जर प्रखर असेल तर तिला प्रकाशूं देण्याला वाव मिळावयाचा नाहीं. ज्याच्या जवळ स्वभावतःच जो गुण असेल तो त्यानें केव्हांही दडपून न टाकतां तो प्रगट करणें हें त्याचें पवित्र कर्तव्य आहे. प्रतिभा स्वतंत्रपणें चालणार नाहीं अशी जर कोणास शंका येत असेल तर ती प्रज्वलित करून तिच्यांत नवीन विचारांचें तेज आणण्यासाठीं तिचा भाषांतर करण्याचे कामीं कांहीं काळ तरी उपयोग करावा. आज इंग्रजी भाषेंत किती तरी काव्यग्रंथ आहेत कीं त्यांतील विचार मराठीनें आपलेसे केले पाहिजेत. काव्यक्षेत्रांत 'मराठीच्या पन्नास वर्षें पुढें असलेल्या' बंगभाषेंतही नवीन धर्तीचीं अनेक ऐतिहासिक व पौराणिक काव्यें आहेत. हिंदी व गुजराथी या भाषाही झपाट्यानें वाढत आहेत. या सर्वांतील ग्रंथांचा परिचय मराठीला झाला पाहिजे. कांहीं काळ जर या दिशेनें प्रयत्न केला तर खुद्द कवींच्या स्फूर्तीला नव्यजीवन प्राप्त होऊन परकीय भाषांत अनभिज्ञ असणाऱ्या माणसांना त्यांच्या ओळखीचा लाभ होईल. रोडकेपणाचें दुसरें कारण म्हणजे मराठी कवितेविषयींची लोकांची अश्रद्धा हें होय. इंग्रजी काव्यांचीं पारायणें करणारे कितीजण तरी असतील; पण आधुनिक मराठी कवितेचा आस्थापूर्वक अभ्यास करणारे कितीसे सांपडतील ? रवींद्रनाथ ठाकूर यांच्या ग्रंथांची ओळख इंग्रजीच्या मुखानें व्हावी यापरती शोचनीय स्थिति कोणती आहे ? मराठी भाषा जाणणारे असेही लोक सांपडतील कीं, ज्यांना रे. टिळक व बालकवि ह्यांच्या कवितांचा परिचय त्यांच्या इंग्रजी भाषांतरांतूनच झाला असेल. ग्रंथकारानें स्वभाषेंत लिहिलेल्या लेखांपेक्षां त्यानें इंग्रजींतून लिहिलेल्या लेखांस वाचकांकडून जास्त मान मिळतो ! ही मराठीची दुःस्थिति परकीय लेखकांनाही कळून चुकली आहे. 'हिंदी गृहस्थाच्या स्वभाषेंतील लेखापेक्षां त्याचे इंग्रजी लेखच पुष्कळ जण वाचतात. सरोजिनी नायडू व रवींद्रनाथ ठाकूर यांचीं काव्यें वाचणारे हिंदुस्थान,इंग्लंड,व अमेरिका या देशांमध्यें जितके लोक सांपडतील त्यापेक्षां किति तरी कमी लोक कै. मोगरे व कर्नल कीर्तिकर या कवींचीं मराठी काव्यें वाचणारे सांपडतील !' * ही टाइम्सपत्रामध्यें

* "Moreover an Indian writing in English commands a much wider field of readers than an Indian writing in the vernacular. The number of persons who have read the

(३०—६—१९) एका इंग्रज गृहस्थानें केलेली टीका यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल ? ही मराठी कवितेविषयींची अश्रद्धा घालविल्यावांचून मराठी काव्याला सुदिन येणार नाहींत. जोंपर्यंत वाचकवर्गाकडून कवितेचा आदर होणार नाहीं तोंपर्यंत मराठी कवींना उमेद येणार नाहीं, तोंपर्यंत त्यांच्या अंगीं मोठमोठीं काव्यें गाण्याचें स्फुरणही चढणार नाहीं. ही अश्रद्धा घालविण्याचा एकच कार्यक्षम उपाय म्हणजे मराठी कविता सर्वांस उपलब्ध होईल असें केलें पाहिजे. प्रत्येक कवीच्या संकलित आवृत्त्या वाचकांच्या दृष्टीसमोर वरचेवर पडल्यानें तिच्याविषयींचा दुराग्रह आपोआपच कमी होत जाईल.वरील दोष परस्पराश्रित आहेत, तेव्हां ते घालविणें अवघड नाहीं. वाचकांकडून तिचा आदर होऊं लागल्याबरोबर मराठी कविता अंगानें सदृढ होऊन मनानेंही जोरकस व तेजस्वी होत जाईल. मराठी कवितेला प्राप्त होणारा हा स्फूर्तिदायक काळ फार दूर नाहीं अशी इतर काव्याभिमान्यांबरोबर प्रकृत लेखकाचीही दृढ खात्री आहे.

Marathi works of the late Mr. Mogre of the R. A. Society in Bombay, or of the late Col. Kirtikar are trivial as compared with the number of persons in India, England, America who have read the works of Mrs. Naidu or Mr. Tagore."

*Times of India, 30-6-19.*

गेल्या पन्नास साठ वर्षांतील काव्यवाङ्मयाच्या क्षेत्राचें समालोचन करण्याचा आम्हीं येथवर प्रयत्न केला आहे. तसेंच सांप्रत ती कोणत्या स्थितींत आहे, तिच्यांत कोणते दोष आहेत, याचेंही दिग्दर्शन करून ते दूर करण्याविषयीं थोडक्यांत उपायही सुचविले आहेत. वरील समालोचनावरून पाहतां हें मराठी काव्याचें क्षेत्र सुवृत्त व विविध प्रसंगांनीं सुशोभित आहे. त्यामध्यें इतिहास आहे, तत्त्वज्ञान आहे, राजकारणही आहे. हें क्षेत्र सृष्टिवर्णनांनीं पूर्ण भरलेलें दिसतें. आजच्या सामाजिक प्रश्नांचीं बीजेंही त्यांत विलसत आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तें क्षेत्र अभिमानास्पद व उत्साहवर्धक आहे यांत शंका नाहीं. नवीन मराठी कवितेचा जन्म होऊन ५०।६० वर्षेंच झालीं आहेत. वाङ्मयाच्या दृष्टीनें हा काळ फारसा मोठा आहे असें नाहीं. तेव्हां त्या अवधींत मराठी कवितेनें चिरकालिक असें काय संपादन केलें व भविष्य काळावर तिचे ठसे कितपत व कसे उमटलेले आढळतील, या गोष्टीचा निर्णय आज होणें शक्य नाहीं ! [भोर, १०. १०. १९]

## [ पुरवणी. ]

सदर निबंध लिहून दोन वर्षें लोटलीं. हीं वर्षें म्हणजे चालू शतकांतील दुसऱ्या दशकाच्या अखेरचीं होत. या अल्पावधींतही 'कवि व काव्यें' या दोन्हींसंबंधीं नमूद करण्यासारख्या गोष्टी घडल्या आहेत. पहिली दुःखकारक गोष्ट म्हणजे त्यावेळीं हयात असलेले कवि रेंदाळकर, लेंभे, लोंढे, भोसेकर व शेवटीं पटवर्धन ऊर्फ 'वसंत कवि' हे आज गत झाले आहेत. नवीन कवींमध्यें अत्रे ऊर्फ 'केशवकुमार,' पेंढारकर ऊर्फ 'यशवंत,' केळकर ऊर्फ 'अज्ञातवासी,' काळे, चंदूरकर, नागपुरचे ताम्हणकर, गद्रे ऊर्फ 'कृष्णतनय,' यांचा समावेश केला पाहिजे. स्फुट कवितांच्या संग्रहामध्यें टेकाडयांचें 'आनंदगीत,' चंदुरकरांचा 'पुष्पपराग,' पेंढारकरांची 'यशवंती,' व काटदऱ्यांचीं 'फेकलेलीं फुलें' यांचा, तर खंडकाव्यांत बेडेकरांचें 'सुखस्वप्न,' गणेश प्रभूचें 'तारका' हीं सामाजिक काव्यें, तिवारींची 'प्रसन्न राधा' व 'मनोहरलीला,' कुंटे यांचें रवींद्रनाथ ठाकूरांच्या शिशु ऊर्फ विजेचा चंद्र या काव्यावरून

लिहिलेलें ' बालक ' काव्य, अनंततनयांचे ' पुण्याची पर्वती ' व ' अरिष्टिका ' हे पोवाडे, हीं काव्यें प्रसिद्ध झालीं आहेत. कै. लो. टिळकांच्या निधनसमयीं तर किती तरी अल्पस्वल्प काव्यें बाहेर पडलीं. त्यांत लेले शास्त्र्यांच्या तिलकांजलीचा विशेष उल्लेख केला पाहिजे. जोशी यांचें ' तिलकमहाकाव्य ' व रे. टिळक यांचें ' ख्रिस्तायन ' हीं दोन्ही मोठीं काव्यें प्रसिद्ध झालीं आहेत. तसेंच या अवधींत विनायक, तांबे, पांगारकर, व गोविंदाग्रज यांच्या समग्र कवितांचे ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. इतकेंच नाहीं तर बाळकृष्ण अनंत भिडे, श्रीपाद नारायण मुझुमदार, बालकवि ठोमरे, माधवानुज, व दत्त यांचे काव्यग्रंथ लवकरच प्रसिद्ध होण्याच्या मार्गांत आहेत. या नुसत्या नामावळीवरून सुद्धां मराठी कवितेचें क्षेत्र व तिजविषयींचें प्रेम वृद्धिंगत होत आहे असें दिसून येईल. 'केशवसुतां'च्या कवितांची दुसरी आवृत्ति निघाली असून ती कवीचे बंधु सीतारामपंत दामले यांनीं सचरित्र संपादन केली आहे.

ना. म. भिडे. ४. ११. २१.

## [ या निबंधाचें शुद्धिपत्रक. ]

| पृष्ठ. | कालम. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ६८ | १ | २७ | जस | जसें |
| ,, | २ | ७ | 'यात्रिकक्रमण' | 'यात्रिकक्रमण' हें |
| ,, | ,, | ३६ | जोशिवराव | जोशिराव |
| ७० | १ | २९ | हा | ह्या |
| ७६ | १ | ३६ | आर्याथंत्र | आर्यामंत्र |
| ७७ | १ | २० | गद्यामागून पद्य | पद्यामागून गद्य |
| ,, | २ | ७ | बावन खिंडींत | पावनखिंडींत |
| ७८ | १ | ३ | शिरसावकर | शिरसाळकर |
| ७८ | १ | ३८ | निदंर्शक | निर्दर्शक |
| ८२ | १ | ३० | खंडकाव्वांत | खंडकाव्यांत |
| ८३ | २ | १४ | साकल्प | साकल्य |
| ,, | ,, | १५ | अकृत्रिमतेमुळें | अकृत्रिमतेमुळें |
| ८४ | २ | ३१ | प्रेमलता | प्रेरकता |
| ९० | १ | ८ | चरकदार | चटकदार |
| ,, | २ | १७ | ' कलार्वण' | 'कलापी' |

# मराठी कथात्मक वाङ्मय.

[ रा. रा. नारायण केशव बेहेरे, M. A. B. sc. ]

## बहुजनसमाजाची परिस्थिति.

कोणत्याही देशांत विद्वानांपेक्षां सामान्य लोकांचाच भरणा अधिक असतो. एखाद्या शास्त्राचें विशेष अध्ययन करून, त्या शास्त्रांतील नवे ग्रंथ वाचण्यांत चूर झालेले, नवीन लागलेल्या शोधांस अनुसरून प्रयोगशाळेंत प्रत्यक्ष शास्त्रीय प्रमेयांची चर्चा करणारे, व अज्ञात असलेली निसर्गाची शक्ति मानवी बुद्धीच्या व कर्तृत्वाच्या आटोक्यांत आणण्यासाठीं अहर्निश झटणारे लोक कोणत्याही देशांत अति अल्प प्रमाणांतच सांपडतील. ज्यांचें वाचन अगाध असल्यामुळें कोणता विषय चांगला व कोणता वाईट, कोणत्या ग्रंथांनीं समाजाचें कल्याण होईल व कोणते ग्रंथ समाजाला हानिकारक आहेत, असें छातीठोकपणें सांगणारे लोक विरळाच असतात. एखाद्या विशिष्ट विषयाचा विशेष ओढा असलेले लोक देखील समाजांत मोजकेच असतात. समाजांतील सर्वसाधारण लोकांना या तीव्र जीवनकलहांत टिकाव धरतां धरतांच नाकीं नव येतात. पोटापाण्याचा प्रश्न सोडविण्यांतच त्यांचा काळ व शक्ति खर्च होतात; आणि पोटोबाशिवाय कोणालाही विठोबा सुचणें शक्य नाहीं. यामुळें या सर्वसाधारण लोकांना आपल्या धंद्याव्यतिरिक्त जगाकडे लक्ष्य द्यावयास फारशी फुरसतच सांपडत नाहीं. मग एखाद्या विषयांत विशेष प्राविण्य ते कसें संपादन करणार ? चरितार्थाचा धंदा हाच त्यांच्या जीवनाचा भाग होऊन बसतो; आणि म्हणूनच बहुजनसमाज वाङ्मयाकडे केव्हांही फुरसतीच्या वेळीं नजर टाकतो, तेव्हां 'करमणुकीचें साधन' याशिवाय इतर कोणत्याही दृष्टीनें तो त्याच्याकडे पाहात नाहीं. ज्यापासून जीवनकलहाच्या प्रखर आगींत होरपळलेला जीव थोडाबहुत विसावा मिळून शांत होत नाहीं, अशा वाङ्मयाकडे तो ढुंकूनही पाहात नाहीं; मग तें वाचण्याची गोष्ट दूरच राहिली ! या लोकांना वाङ्मय हें करमणुकीचें साधन वाटत असतें. आणि म्हणूनच कोणत्याही देशांतील वाङ्मयांत कादंबऱ्या व गोष्टी यांचाच भरणा विशेषेंकरून आढळतो.

## समाजशिक्षणाचें साधन.

समाज या कथात्मक वाङ्मयाकडे करमणुकीचें साधन एवढयाच दृष्टीनें पाहात असला तरी अप्रत्यक्षपणें समाजाच्या विचारसरणीला हा वाङ्मयविभाग निराळें वळण लावूं शकतो. ज्या गोष्टी आपण वाचतों त्यांचा परिणाम आपणांवर न होणें अशक्य आहे. बहुजनसमाजाचें मन वळविण्याचा हा राजरस्ता ठाऊक झाल्यामुळें देशांतील विद्वान् लोक, आपली विचारसरणी लोकांना पटवून देण्याकरितां, कथात्मक वाङ्मयांत भर टाकूं लागतात जें काम जाडयाजुडया निबंधांनीं होऊं शकत नाहीं तें काम अशा नवलकथा सहज रीतीनें घडवून आणतात. विद्वत्ताप्रचुर निबंधांचा समाजाला उपयोग होऊं शकतो; पण तो केव्हां? समाज ते निबंध वाचण्याकरितां हातीं धरील तेव्हां ना ? बहुजनसमाजाला ते निबंध वाचून त्यांतील विचारसरणी ग्रहण करण्याचें सामर्थ्यच नसतें. आणि ज्या कोणाला तसें बुद्धिबल असतें, त्यांना खडतर जीवनकलहामुळें ते वाचण्याला अवश्य लागणारी वेळ व हौस नसते. यामुळें निर्मनुष्य अरण्यांत फुललेल्या सुंदर सुवासिक फुलाप्रमाणें त्या विद्वत्ताप्रचुर ग्रंथाची समाजाकडून साहजिकच अवहेलना होते. या परिस्थितीची पूर्ण जाणीव असल्यामुळें पुष्कळ विद्वान् आपलीं मतें प्रतिपादन करण्याकरितां या राजमार्गाचा आश्रय करतात. बहुजनसमाज लहान मुलांप्रमाणें असतो. त्याला क्विनाईनचा डोस देतांना शर्करावगुंठित गोळी करूनच द्यावा लागतो. बहुजनसमाजापर्यंत आपल्या विचारांचा शिराव व्हावा अशी ज्यांची इच्छा असते त्यांना या कथात्मक विभागाकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. यामुळें या कथात्मक भागाचें वाङ्मयांत महत्त्व आहे, आणि म्हणूनच प्रत्येक देशांतील वाङ्मयांत नऊदशांश भाग कथात्मक असतो.

## दोन भेदः मनोरंजक व ध्येयपर.

कथात्मक वाङ्मयाचे याप्रमाणें साहजिकच दोन भाग पडतात. पहिल्या भागांतील ग्रंथांचें करमणूक

हेंच काय तें ध्येय असतें. दुसऱ्या भागांत पडणारे ग्रंथ कांहीं तरी विशेष उद्देश मनांत धरूनच लिहिलेले असतात. कथात्मक वाङ्मयांतील या दोन पोटभेदांची याप्रमाणें व्याख्या केली खरी, परंतु अचुक एका सदरांत पडतील पण दुसऱ्यांत येणार नाहींत असे ग्रंथ सांपडणें विरळाच. वर्णसप्तकांतील ( Spectrum) भिन्न भिन्न वर्णांच्या सीमा ज्याप्रमाणें नक्की ठरविणें शक्य नसतें, त्याचप्रमाणें ध्येयपर कथांतून मनोरंजक कथांकडे प्रवास करतांना, एक भाग संपून दुसरा कोठें लागला हें निश्चित ठरवितां येत नाहीं. कारण केवळ करमणूक या दृष्टीनें जरी एखाद्या ग्रंथकर्त्यानें एखादी गोष्ट लिहिली, तरी ग्रंथकर्त्याच्या मनांत नसतांना देखील त्या गोष्टीवरून एखादें तत्त्व अचुक उत्पन्न होतें; व ध्येय डोळ्यापुढें ठेवून नवलकथा लिहूं पाहणाऱ्यांना त्या नवलकथा आहेत हें विसरतां येत नाहीं. बहुजनसमाजाला आपलें ध्येय पटावें हाच जर कथा लिहिण्याचा उद्देश, तर त्या कथांत मनोरंजन प्रामुख्यानें राहणारच ! सारांश,हे पोटभेद केवळ कृत्रिम व तुलनात्मक आहेत, निश्चित नाहींत. परंतु व्यावहारिक दृष्टीनें **'आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी'** आपण पहिल्या भागांत ढकलतों, व **'मी'**-ची गणना दुसऱ्या भागांत करतों.

## दुसरा भेदः अद्भुत व वस्तुस्थितिदर्शक.

कांहीं कथांतील कथानक प्रत्यक्ष सृष्टींत कधींच घडून येणार नाहीं असें आपल्याला वाटतें. **सिंदबादच्या सफरींतील** अद्भुत प्रसंग मनाला कितीही मोह पाडीत असले, तरी तसे प्रसंग आपल्याला एखादे वेळीं प्रवासांत अनुभवण्यास सांपडतील असें कोणीच समजत नाहीं. ' **गलिव्हरचा वृत्तांत** ' वाचणारे लोक, मुठीएवढीं माणसें व त्यांचें राज्य शोधून काढण्याकरितां जलपर्यटन करीत नाहींत. त्या कथानकांना आपण अद्भुत म्हणूं. परंतु ' **मायेचा बाजार** ' वाचतांना पद्मेसारख्या सुशील मुली हिंदुसमाजांत वावरत नाहींत असें म्हणण्याचें धार्ष्ट्य कोणीही करणार नाहीं.**'पण लक्ष्यांत कोण घेतो ?'** वाचतांना यमुना हें काल्पनिक पात्र आहे अशी कोणी शपथ घेतली तरी ती पटत नाहीं. हीं कथानकें वस्तुस्थितिदर्शक होत. वर दिलेल्या उदाहरणांनीं हें वर्गीकरण निश्चित आहे असें दिसेल. परंतु अद्भुत कथानकांतही एक प्रकारची वस्तुस्थितिदर्शक सुसंगति ठेवावी लागते, नाहीं तर त्या कथानकांतील अद्भुतरम्यता पार विरघळून जाईल. कोणत्याही अद्भुत कथानकांत मातीच्या तेलानें (राकेल) आग विझविण्याचा प्रयत्न आपल्या पात्रांकडून करवून तो यशस्वी झाला असें कोणताही ग्रंथकार दाखविणार नाहीं. मूठभर उंचीच्या माणसांचे लिलूपट नांवाचें एकाकाळीं एक बेट होतें, एवढा एकदां कल्पनाशक्तीला ताण दिला कीं पुढील सर्व कथा कशी सुसंबद्ध व वस्तुस्थितिदर्शकच वाटते. त्याचप्रमाणें वस्तुस्थितिदर्शक गोष्टी लिहिणारा निरनिराळ्या ठिकाणचीं पात्रें उचलून त्यांचे कधीं न घडलेले संबंध घडवून आणतो, व अनेक काल्पनिक प्रसंगांतून त्यांना संसार करावयास लावतो. ही अद्भुतता जर त्यानें आणली नाहीं तर त्याची कथा तात्काळ चरित्र होईल. असा परस्परसंबंध जरी या दोन पोटभेदांत असला, तरी सामान्यतः कोणती गोष्ट कोणत्या सदरांत लोटावयाची, ही अडचण फारशी पडत नाहीं.

## सामाजिक व ऐतिहासिक.

या दोन्ही प्रकारांची गणना वस्तुस्थितिदर्शक कथांतच होते. सामाजिक गोष्ट त्या त्या काळाची विशिष्ट समाजस्थिति दर्शविते. १९१९ सालीं लिहिलेली सामाजिक गोष्ट १९२० सालीं ऐतिहासिक या सदरांत जाऊन बसेल. ऐतिहासिक गोष्टींतील समाज मागें होऊन गेलेला असतो; त्यांत वर्णन केलेले प्रसंग पूर्वी घडलेले असतात. ऐतिहासिक गोष्टी वाचतांना मनाला त्या काळांत प्रवेश करावा लागतो; त्याशिवाय ऐतिहासिक गोष्टींचें स्वारस्य लक्षांत ठसत नाहीं. सामाजिक म्हणजे प्रचलित, व ऐतिहासिक म्हणजे भूतकालीन, एवढाच काय तो फरक सकृद्दर्शनीं या दोन प्रकारांत दिसतो. कारण दोन्हीही प्रकारच्या गोष्टी त्या त्या काळची वस्तुस्थितीच वर्णन करतात. परंतु सामाजिक गोष्टींतील पात्रें सामान्य जनांतील असतात, व सामाजिक प्रश्नांचा त्यांत कोणत्या तरी रीतीनें

उलगडा करण्याचा प्रयत्न केलेला असतो. ऐतिहासिक गोष्टींतील प्रमुख पात्रें बहुधा इतिहासांत आपल्या कर्तबगारीनें स्थान मिळविणारांच्याच कोंडींतील असतात. १९१९ सालीं लिहिलेली सामाजिक गोष्ट कोणी २०१९ सालीं वाचील, तर त्याला त्या गोष्टींत शंभर वर्षांपूर्वीची समाजस्थिति वर्णन केलेली आढळेल. एका दृष्टीनें त्याला ती गोष्ट ऐतिहासिक या सदरांत ढकलतां येईल. परंतु १९१९ चा विशेष इतिहास त्यांत आढळणें न आढळणें हें त्या गोष्टींत रंगविलेल्या पात्रांवर अवलंबून आहे. समजा, आज लिहिलेल्या सामाजिक गोष्टींत ठराविक तिमाजी नाईक, प्रेमानें वेडावलेला तरुण, कालेजांत शिकत असलेली तरुणी, लग्नाला संमति न देणारा बाप, हींच पात्रें असलीं तर शंभर वर्षांनीं त्या गोष्टीपासून विशेष ऐतिहासिक बोध होऊं शकणार नाहीं. परंतु एखाद्यानें आपल्या आजच्या सामाजिक गोष्टींत लाला हरकिसनलाल, पंडित मालवीय वगैरे पात्रें रंगविलीं, आणि पंजाबांतील सोटेशाहीच्या धामधुमीच्या काळांत कथानकाची उभारणी केली, तर शंभर वर्षांनंतरचा वाचक ती गोष्ट खात्रीनें ऐतिहासिक या सदरांत टाकील. यामुळें सामाजिक व ऐतिहासिक हा भेद आम्हांला केवळ कृत्रिम व तुलनात्मकच वाटतो.

ऐतिहासिक गोष्ट लिहितांना लेखकाला भूतकालांत प्रवेश करावा लागतो. त्यामुळें त्याला कल्पनाशक्तीवर फार भिस्त ठेवावी लागते. सामाजिक गोष्ट केवळ अवलोकनानें लिहितां येईल. परंतु यामुळें लिहिलेल्या गोष्टींत भेद उत्पन्न होत नाहीं. ऐतिहासिक गोष्ट लिहितांना लेखक स्वतःच्या पूर्वीचा काळ वर्णन करतो, आणि सामाजिक गोष्टीचा लेखक स्वतःचा काळ गोष्टींत चित्रित करतो. परंतु वाचकांच्या दृष्टीनें हा फरक महत्त्वाचा नाहीं.

### ऐतिहासिक गोष्टींत सामाजिक प्रश्नांची चर्चा असते काय ?

सामाजिक गोष्टींत सामाजिक प्रश्नांचा ऊहापोह असतो तसा तो ऐतिहासिक गोष्टींत नसतो, असा कोणी आक्षेप घेतील. पण हा आक्षेप आमच्या मतें अगदीं पोंचट आहे. सामाजिक गोष्टींत आजच्या समाजप्रश्नांची चर्चा अगर दिग्दर्शन असेल, तर ऐतिहासिक गोष्टींत त्या त्या काळच्या समाजप्रश्नांचा ऊहापोह आढळून येईल. 'उषःकाल' वाचतांना शिवकालीन समाजस्थितीची कल्पना होत नाहीं हें म्हणणें धाडसाचें आहे. रामदासी संप्रदाय, बलभीम व आखाडे, धर्मश्रद्धा, यांविषयींचें शिवकालीन समाजाचें दिग्दर्शन त्या कादंबरीवरून होत नाहीं असें कोण म्हणेल ? 'चंद्रगुप्त' वाचतांना सहजच अडीच हजार वर्षांपूर्वीच्या हिंदुस्थानांत प्रचलित असलेली बहुपत्नीकत्वाची चाल, तिजमुळें भडकणारा सवतीमत्सर, त्या सवतीमत्सराचा फायदा घेणारे कुटिल, व त्यांच्या कृतीनें होणारा हाहाकार, याचें चित्र वाचकांच्या नजरेसमोर उभें राहतें. यामुळें ऐतिहासिक गोष्टींत सामाजिक प्रश्नांची चर्चा असते काय, या प्रश्नाचें उत्तर अस्तिपक्षीं देणें भाग आहे. ऐतिहासिक गोष्ट म्हणजे इतिहास नव्हे. कल्पनेला आपली प्रतिभा दाखविण्याला तेथें भरपूर अवकाश सांपडतो. त्यामुळें ऐतिहासिक गोष्टींत तत्कालीन समाजचित्र सहजच पाहावयास सांपडतें. किंबहुना असें न पाहावयास सांपडलें तर त्या गोष्टीची किंमत काळाच्या दुकानांत तितकी कमी लागते.

### ऐतिहासिक गोष्टींचें आजला महत्त्व.

सामाजिक व ऐतिहासिक गोष्टींत तादृश भेद नसला तरी आजच्या समाजाला ऐतिहासिक गोष्टीची अत्यंत जरूर आहे. हिंदी समाज कर्तव्यशून्य झाला आहे. पोटासाठीं मिळविणें, आणि कसा तरी संसार करणें यापेक्षां उच्च ध्येय हिंदी लोकांना आज नाहीं. हेंच त्यांचें जीवितसाफल्य! आजच्या परिस्थितींत उत्तेजक असें कांहीं नाहींच ! यामुळें जे वीरपुरुष या देशांत पूर्वी होऊन गेले, ज्या भीषण परिस्थितीशीं घनघोर संग्राम करून त्यांनीं आपला देश स्वतंत्र केला, ज्या निष्ठेनें त्यांनीं दुर्बल बनलेल्या हिंदु धर्माचें रक्षण केलें, जे अमोल स्वार्थत्यागाचे धडे त्या काळीं जनतेला घालून दिले, त्या गोष्टींची माहिती आजच्या समाजाला होणें जरूर आहे. त्या वीरकथा वाचून वाचून हल्लींच्या नेभळया लोकांना थोडेंबहुत तरी स्फुरण येईल, व 'खा, पी, मौज कर' यापेक्षां उच्च आयुष्य म्हणजे काय याची त्यांना अंधूक तरी कल्पना होईल. समा-

जाच्या आजच्या परिस्थितीमुळें ऐतिहासिक गोष्टींची विशेष जरूरी भासत आहे. 'काय नशिबांत असेल तें घडून येईल ' असें म्हणून आळसांत काळ कंठणाऱ्या, संन्यासाच्या फुकट्या वल्गना मारणाऱ्या, आणि कर्तृत्वहीन बनलेल्या,–समाजाला वारंवार पूर्वकालीन वीरकथांचे डोस दिल्याशिवाय त्याची गुंगी उतरणार नाहीं, व डोळ्यांवरची झांपड जाणार नाहीं. **केवळ स्वराज्यासाठींत** वर्णन केलेली संभाजीची अलोट धर्मनिष्ठा कोणाच्या डोळ्यांत चटकन् पाणी आणणार नाहीं ? अनंत यातना होऊन समोर उभा ठाकलेल्या मृत्यूला ज्या वीरानें धैर्यानें तोंड दिलें, त्याचा बाहेरख्यालीपणा व त्याचें मद्यपान डोळ्यांत खुपेनासें होतें. **रूपनगरच्या राजकन्येंतील** दुर्गादासाचें चरित्र वाचतांना कोणाला त्या वेळेपुरती तरी स्फूर्ति चढणार नाहीं ? 'धन्य दुर्गादास !' असें कोण म्हणणार नाहीं ?

## सामाजिक गोष्टी केवळ वस्तुस्थितीच पुढें मांडतात काय ?

ज्याप्रमाणें ऐतिहासिक गोष्टी मनुष्याला स्फूर्ति आणतात, त्याचप्रमाणें सामाजिक गोष्टी समाजांतील दोषस्थळें वाचकांच्या नजरेस आणतात, व समाजसुधारणेकरितां काय केलें पाहिजे या गोष्टीचा विचार करण्यास त्यांना भाग पाडतात. सामाजिक गोष्टी समाजाची वस्तुस्थिति दर्शवितात हें खरें असलें, तरी समाज कोणत्या अवस्थेला पोहोंचला पाहिजे हें ध्येय देखील लेखकांना आपल्या गोष्टींत चित्रित करावें लागतें. यामुळें सामाजिक गोष्टींची उभारणी वर्तमानकाळांत होत असून त्यांचें पर्यवसान ध्येयात्मक भविष्यकाळांत होतें. उलटपक्षीं, ऐतिहासिक गोष्टींची उभारणी भूतकालांत होऊन, त्यांचें पर्यवसान होतांना वर्तमानकाळाची छटा त्यांच्यावर पडत असते. **'हिंदु कोण ?'** या गोष्टींतील कथानक शिवकालीन आहे, परंतु त्याच्या पर्यवसानावर रा. गजानन भास्कर वैद्यांच्या हिंदु मिशनरी सोसायटीची वर्तमानकालीन छाया पडली नाहीं असें कोण म्हणेल ? 'मी' या कादंबरीचा प्रारंभ ज्या काळीं झाला, त्यावेळीं कै. गोखल्यांची 'सर्व्हंट्स ऑफ् इंडिया सोसायटी' अस्तित्वांत नव्हती. परंतु 'मी'चा शेवट होतांना या ध्येयात्मक भविष्यकाळाची छाया तिच्यावर पडलीच ! असें होणें अपरिहार्य आहे. ज्या परिस्थितींत गत गोष्टी रंगविल्या जातात ती परिस्थिति कोणी विसरूं शकत नाहीं. त्या परिस्थितीची छाया गतेतिहासावर पडल्यावांचून राहणें अशक्य आहे. नाहीं तर लेखनाचें विशिष्टत्व उरणारच नाहीं. त्याचप्रमाणें सामाजिक गोष्टी रंगवितांना देखील लेखकाच्या भविष्यकालीन ध्येयाची छाया कथानकांवर पडणें साहजिकच आहे !

## सामाजिक कथा–लेखकांचें स्वातंत्र्य.

ऐतिहासिक कथालेखकांना ठराविक मर्यादेच्या बाहेर जातां येत नाहीं. गतेतिहास ठरीव असतो, म्हणून ऐतिहासिक व्यक्ति, त्यांचा जीवनक्रम, व त्यांचा स्वभाव, त्यांना ठरीव सांचांतच बसवावा लागतो. कालस्थलविपर्यासही त्यांना करतां येणें शक्य नाहीं. इतिहासांत जे प्रसंग घडले म्हणून स्पष्ट नोंद असेल, त्यांच्याकडेही त्यांना कानाडोळा करतां येत नाहीं. चालू परिस्थितीची थोडीबहुत छाया ते ऐतिहासिक कथानकावर पाडूं शकतात. पण ती चालू परिस्थिति देखील रेखलेली असते. अफजुलखानानें १९१९ सालीं माद्रीद येथें शिवाजीचा, तो पुनर्विवाहास संमति देईना म्हणून, खून केला, असें लिहिणाऱ्या लेखकास लोक वेड्याच्या इस्पितळांत ताबडतोब पाठवितील. यापैकीं एक देखील चूक ऐतिहासिक कथानकांत खपणें शक्य नाहीं. परंतु, डेविडनें १९१९ सालीं माद्रीद येथें वसंताचा, तो पुनर्विवाहास संमति देईना म्हणून, खून केला असें लिहिणारा लेखक समाजांत उजळ माथ्यानें वावरूं शकेल. कारण चालू परिस्थितींत त्याच्या कथानकाची उभारणी होत असली तरी भविष्यकालीन कल्पनात्मक ध्येयाचा रंग त्या कथानकावर मनमुराद फासण्याची त्याला मोकळीक असते. सामाजिक कथालेखकाला हें जें स्वातंत्र्य उपभोगावयास सांपडतें त्याचा त्यानें योग्य उपयोग केला तर समाजाला नवीन मार्गावर नेल्याचें श्रेय तो घेऊं शकतो. सामाजिक गोष्टींत आलेलें कथानक वर्तमानसृष्टींत घडून येणें फारसें अशक्य नाहीं, एवढी खबरदारी त्यानें घेतली म्हणजे पुरे. परंतु लेखकांनीं या स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला म्हणजे वर्णिलेल्या गोष्टी

दुसऱ्याच कोणत्या तरी समाजांत व कोणत्या तरी काळीं घडल्या असाव्यात अशी वाचकांची भावना होते, आणि अशा गोष्टींनीं समाजाला वळण लागणें अशक्य होतें.

### कला आणि वस्तुस्थिति.

सामाजिक गोष्टींनीं समाजाची वस्तुस्थिति दाखविली पाहिजे ही गोष्ट खरी, परंतु वस्तुस्थिति दाखवितांना लोकांना किळस येणार नाहीं अशी खबरदारी लेखकांनीं घेणें जरूर आहे. स्त्रीपुरुषांचा परस्परसंबंध समाजांतील प्रत्येक जाणत्या व्यक्तीला अवगत असतो, म्हणून कोणी लाजलज्जा गुंडाळून ठेवली तर तें समाजाला जसें खपणार नाहीं, त्याचप्रमाणें वस्तुस्थितीच्या नांवाखालीं घाणेरडे दुराचार व बीभत्स कृत्यें कोणी आपल्या लेखनांत चित्रित केलीं तर तीं समाजाला खपणार नाहींत. सामाजिक कथालेखकांचें कर्तव्य समाजांतील अनाचारांवरील पांघरूण काढून तें नाहींसें करण्याचा प्रयत्न करणें, हें असल्याचें आम्हांस ठाऊक आहे. परंतु हें नाजूक रीतीनें करतां येण्यासारखें आहे. लेखक हा समाजाचा गुरु आहे, आणि कोणताही सुज्ञ शिक्षक विद्यार्थ्यानें कसलाही अपराध केला तरी त्याला चवाठ्यावर उभें करून त्याच्या × × × वर फटके मारीत नाहीं. खासगी रीतीनें कान उपटण्यानें जो फायदा होतो तो चवाठ्यावर चाबूक मारून होत नाहीं. उलट अशा सार्वजनिक शिक्षेनें मुलगा बेशरम मात्र बनतो. खासगी शिक्षेनें बाकीच्यांना धडा कसा मिळेल, असा कोणी यावर प्रश्न काढतील; परंतु अमक्या मुलाला अमक्या अपराधाबद्दल शिक्षा झाली अशी उडत बातमी मुलांत पसरल्यानें जो नैतिक फायदा होतो, तो शिक्षेचा अमानुष प्रकार मुलांनीं प्रत्यक्ष पाहिल्यानें होत नाहीं. यामुळें समाजांतील दोषाविष्करण करतांना मर्यादा बाळगणें जरूर आहे. शिष्टाचार व [illegible] याच त्या मर्यादा होत. वाचकांची पवित्र अभिरुचि ज्या वाचनानें वाढेल तेंच लेखन समाजाला पथ्यकर होतें. शिवाय लेखन ही एक कला आहे. भांडीं घासत असलेली बाई प्रत्यक्ष पाहिली तर आपल्याला आनंद वाटत नाहीं. परंतु एखाद्या चित्रकारानें तें चित्र रंगविलें तर मन उल्हसित होतें प्रत्यक्ष सृष्टींतील ग्राम्यता पुसून टाकून त्या जागीं ध्येयात्मक कल्पनेची झिलई देणें हें कलेचें काम आहे; आणि कलेचें हें सुंदर स्वरूप लक्षांत ठेवून लिहिलेल्या गोष्टीच समाजावर परिणाम करितात.

### झोला.

ज्यांना समाजांतील कोणताही बीभत्स अनाचार उघडपणें चवाठ्यावर मांडल्यानेंच समाजाची इष्ट ती क्रांति घडून येईल असें वाटतें, ते स्वमताच्या पुष्ट्यर्थ नेहमीं 'झोला' या प्रसिद्ध फ्रेंच कथालेखकाचें नांव पुढें करीत असतात झोलाच्या कादंबऱ्या बीभत्सरसापर्यंत पोहोंचल्या आहेत असें प्रस्तुत लेखकास वाटत नाहीं झोलाच्या कादंबऱ्यांनीं सदभिरुचीची मर्यादा मात्र खात्रीनें उल्लंघन केली आहे. परंतु झोला लिहितो तेव्हां आम्हांला तसें लिहावयास काय हरकत आहे—या विचारसरणींत एक दुवा हवा आहे तो कोणीच पुढें मांडीत नाहीं झोलाच्या कथालेखनानें फ्रेंच समाजांतील अनाचार कमी झाला आहे काय ? झोलाच्या लिहिण्यानें उलट अनाचार वाढला नसेल कशावरून ? जोंपर्यंत फ्रान्सच्या समाजस्थितीचा पूर्णपणें अभ्यास केलेला मनुष्य, झोलाच्या ग्राम्य कथालेखनानें व अनाचारांच्या प्रदर्शनानें फ्रेंच समाज अधिक नीतिमान् झाला असें ठासून सांगणार नाहीं, तोंपर्यंत झोलाचें उदाहरण अप्रस्तुत होय. इंग्लंडमध्यें रेनॉल्डनें ज्या कथा लिहिल्या, त्यांत त्यानें समाजांतील सर्व बिंगें चवाठ्यावर मांडून त्यांचें उघड प्रदर्शन केलें आहे. त्याच्या प्रत्येक कथेंत दुर्गुणांची नालस्ती व सद्गुणांची महती ओतप्रोत वर्णन केली आहे. त्याची भाषा चांगली आहे, कथानकाची जुळणी व मांडणी सुंदर आहे, आणि पात्रांचे स्वभाव रेखाटण्याची हातोटी देखील त्याला बरी साधली आहे. परंतु बीभत्स रसाचा जो गुत्ता त्याच्या प्रत्येक गोष्टींत उघडला गेला आहे, त्यानें त्या सर्व गुणांची माती झाली आहे. रेनॉल्डची कादंबरी समाजाला नीतिमान् करील असें कोणी म्हणेलसें प्रस्तुत लेखकाला वाटत नाहीं. उलट अंग्लसमाजाला थोडेबहुत अनिष्ट वळण लावण्यास रेनॉल्ड कारणीभूत झाला, असेंच प्रत्येकास कबूल करावें लागेल.

### लोकांना या अशा गोष्टी आवडतात.

ज्या गोष्टींत समाजांतील दुराचारांचा खुला बाजार भरविला असतो त्या गोष्टी समाजाला आवडतात, अशी प्रौढी कित्येक लोक स्वमतपुष्ट्यर्थ मारीत असतात. खरें आहे. परंतु या देशांत टाल्स्टॉयपेक्षां रेनॉल्ड्सचेच भोक्ते अधिक आहेत. चार सुशिक्षित सोडून दिले तर गंधर्व मंडळीच्या नाटकापेक्षां तमाशे व मुरळ्यांचा नाचच समाजाला पसंत पडतो. प्रत्येक मनुष्यप्राण्यांत उत्तम अभिरुचीबरोबर जनावरी वासनाही असते. यामुळें कित्येक गलिच्छ व बीभत्स गोष्टींचा पगडा मनुष्यावर बसण्याचा अधिक संभव असतो. परंतु या गोष्टीचा फायदा घेणें अधमपणाचें आहे. जनावरी वासनेची तृप्ति करण्याची आवड समाजांत सुरू झाली की समाज अधोगतीला जाण्याला फारसा वेळ लागत नाहीं. तेव्हां लेखकांचें कर्तव्य नेहमीं सदभिरुचि वाढविण्याचें असावें लागतें. जनावरी वासनेचा पगडा अशिक्षित लोकांवरच असतो असें नाहीं. विद्वान् व बहुश्रुत माणसें सुद्धां त्या पकडींतून प्रसंगविशेषीं सुटत नाहींत. पुष्कळ सुशिक्षित लोक संभाषणांत अति अश्लील विनोद करीत असतात, ही गोष्ट अनेकांच्या लक्षांत येईल. म्हणून 'बहुजनसमाजाला आवडतें' ही कोणत्याही गोष्टीच्या सौंदर्याची कसोटी होऊं शकत नाहीं. '**रागिणी**'पेक्षां '**सौंदर्यलूट**' हें पुस्तक वाचलेले लोक समाजांत अधिक आढळतील.

### अद्भुतकथालेखन.

या प्रांतांत पाऊल टाकतांक्षणींच वस्तुस्थितीचा दाब नाहींसा होतो, व लेखक पूर्ण स्वतंत्र होतो. त्याला आपली कल्पनाशक्ति वाटेल तशी चालवितां येते, आणि खऱ्या प्रतिभासंपन्न लेखकाचें तेज व सामर्थ्य याच प्रांतांत पूर्णपणें दृष्टोत्पत्तीस येतें. कला त्याची दासी बनते, आणि खरें लेखन-कौशल्य याच ठिकाणीं मूर्तिमंत वावरतांना आढळतें. भूत आणि वर्तमान या दोन्ही काळांतील वस्तुस्थितीला खुशाल पायाखालीं दाबून भविष्यकाळांत कल्पनाशक्तीला त्याला हवें तसें वैमान घालावयास लावतां येतें. कोणताही प्रसंग त्याला अशक्य नाहीं. कोणताही चमत्कार त्याच्या सेवेला सहज गोष्ट म्हणून चालत येतो, आणि तो प्रतिभासंपन्न असला तर कोणत्याही काळीं, कोणत्याही देशांतले व कुठल्याही परिस्थितींत सांपडलेले लोक त्याच्या नवलकथा प्रेमानें व आनंदानें वाचीत असतात. '**आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टीं**'चा कोणाला कधीं कंटाळा आला आहे ? **डॉन् क्विक्झो** कोणाला आवडणार नाहीं ? लहान मोठे, मुलें माणसें, स्त्रिया, गरीब श्रीमंत, सुशिक्षित अशिक्षित, अशा सर्वांना सर्व काळीं प्रिय असणारें हेंच वाङ्मय ! किती वेळां वाचली तरी **अल्लाउद्दीना**ची गोष्ट वाचण्याचा कोणाला कंटाळा येत नाहीं. आणि एखाद्या प्रतिभासंपन्न लेखकाच्या अद्भुत कथेचा राष्ट्रावर परिणाम देखील विलक्षण होतो. **रॉबिन्सन क्रूसो** या पुस्तकानें लोकांच्या मनांत असलेली जलपर्यटनाची भीति घालविली, व खेड्यांतील राहणींतही मौज असते हें लोकांना दाखवून दिलें. **जूल्स व्हर्नेस** या प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकाराच्या अद्भुत ग्रंथांनीं शास्त्रीय विषयांसंबंधीं बहुनसमाजांत अतोनात गोडी उत्पन्न केली.

### एक पोटभेदः-अद्भुत नीतिकथा.

अद्भुतकथालेखनांत अनेक नीतिकथांचाही समावेश होतो. कुत्रीं, घोडे, गाढव, मुंग्या, पारवे हीं माणसाशीं कधींही बोलूं शकत नाहींत हें आपणांस पूर्णपणें ठाऊक असतें. परंतु '**इसापनीति**' वाचतांना ही अद्भुतता आपल्या मनांत डोकावते तरी कां ? इसापनीतींत असलेल्या गोष्टी खोट्या, हें लहान मूल देखील सांगूं शकेल. परंतु आज हजारों वर्षें अनेक देशांतील मुलें अत्यंत प्रेमानें या गोष्टी वाचीत आहेत, आज देखील त्या तितक्याच रम्य वाटतात, आणि पुढेंही तशाच वाटतील. दोन हजारांवर वर्षें झालीं, परंतु 'इसापनीती'पेक्षां मुलांना नीतिशिक्षण देणारा अधिक चांगला ग्रन्थ निर्माण झाला नाहीं, ही एकच गोष्ट इसापच्या बुद्धिवैभवाची साक्ष पटविते. **हितोपदेश** व **पंचतंत्र** हे आपल्याकडील संस्कृत ग्रन्थ त्याच तोडीचे आहेत. अद्भुतकथालेखनापासून देशाचा मनोरंजनाशिवाय दुसरा फायदा नाहीं अशी जी सर्वसाधारण भ्रममूलक समजूत आहे, तिच्या निरसनार्थच वरील उदाहरणें दिलीं आहेत.

जाक दि जायंट-किलर या पुस्तकाचा इंग्लिश मुलांच्या मनावर काय परिणाम होतो, हें एखादा इंग्लिश गृहस्थच उत्तम रीतीनें सांगू शकेल. 'दुर्बलांचें रक्षण व जुलमाचा प्रतिकार' ही आंग्ल-वीरता ( Gallantry ) या गोष्टींत मूर्तिमंत पाहावयास सांपडते. या गोष्टीमुळें लहान मुलांना जें वळण लागतें तें अपूर्व होय; आणि असें असूनही ही गोष्ट अद्भुत, असंभाव्य, व अशक्य कोटींतील आहे.

## स्फुट गोष्टी.

वर जें विवरण केलें आहे तें कादंबऱ्यांप्रमाणें लहान लहान स्फुट गोष्टींनाही लागू आहे. मात्र कादंबरीपेक्षां स्फुट गोष्ट फार लहान असल्यामुळें लेखकाचें स्वातंत्र्य अतिशय मर्यादित होतें. तारेवरची कसरत करणाऱ्या मल्लाप्रमाणें त्याची अवस्था होते. निरनिराळीं पात्रें गोष्टींत गुंतवून त्यांच्या साम्यविरोधानें होणारा उठाव त्याला कादंबरीलेखकाप्रमाणें साधतां येत नाहीं. पात्रांना भिन्नभिन्न परिस्थितींतून आपल्या आयुष्याचा गाडा हाकावयास लावून त्यांच्या स्वभावाची छाननी करतां येणें त्याला शक्य नसतें. पात्रांच्या मनांतील विचारांचे धागेदोरे सोडवून त्यांचें मानवी स्वभाववस्त्र विणण्याची तर त्याला मुळींच फुरसत नसते. यामुळें स्फुट गोष्ट लिहिणाऱ्याला चमत्कारिक प्रसंगांमुळें उत्पन्न होणाऱ्या मनोविकारांवरच आपली भिस्त ठेवावी लागते. दोन तास आखाड्यांत उतरून स्वस्थ चित्तानें कुस्ती खेळण्यास सज्ज झालेला मल्ल, आपल्या मल्लविद्येचें कसब प्रेक्षकांना प्रतिपक्ष्याच्या तोडीस तोड करून दाखवूं शकतो. परंतु तारेवरील कसरत करणाऱ्याला मल्लविद्या कितीही उत्तम अवगत असली तरी प्रेक्षकांना रंजवितांना त्याला एखाद्या चमत्कारिक उडीचेंच अवलंबन करावें लागतें. त्याच्या त्या तोल संभाळून घेतलेल्या चित्रविचित्र उड्यांनीं प्रेक्षकाच्या मनांत कुतूहल उत्पन्न झालें कीं त्याचें कार्य संपलें. त्याचप्रमाणें स्फुट गोष्टी लिहिणाऱ्याला, वाचकांचें मनोरंजन करून तेवढ्या विषयापुरता त्यांना क्षणभर चटका लावला कीं आपला कार्यभाग झाला असें वाटतें. लहान गोष्टींनीं मनावर घडलेला परिणाम टिकाऊ नसतो हें उघडच आहे. कारण विषयाची सर्व बाजूंनीं मांडणी करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नसतें. परंतु या तीव्र जीवनकलहांत कादंबऱ्या वाचण्याइतकी फुरसत पुष्कळांना नसते. त्यांना आपली दुधाची तहान ताकावरच भागवून घ्यावी लागते. यामुळें आजकाल अनेक विद्वान् लोकांचें लक्ष लहान गोष्टी लिहिण्याकडे लागलें आहे. कारण ज्यांच्यावर परिणाम करावयाचा ते हातांत धरतील असें वाङ्मय निर्माण करणें श्रेयस्कर असतें. याशिवाय आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हळू मारलेल्या एका टोल्यानें जरी कार्यभाग झाला नाहीं, तरी वरचेवर तसेच टोले मारीत गेल्यानें थोडाबहुत तरी इष्ट परिणाम घडून येतोच.

## जनतेला एकाच विषयाच्या उत्कट ज्ञानाची गरज नसते.

चारशें पानांच्या एखाद्या कादंबरींत पुनर्विवाहासारख्या सामाजिक प्रश्नाचा साधकबाधक प्रमाणें देऊन लेखकाच्या मताप्रमाणें सर्वांगी विचार करतां येईल हें खरें. अर्थात् निष्कर्ष काढतांना लेखक तो आपल्या मताप्रमाणें काढील हें उघड आहे. परंतु त्याला त्या विषयाची चारी बाजूंनीं अप्रत्यक्ष चर्चा आपल्या पुस्तकांत खात्रीनें करतां येते. दहा पानांच्या स्फुट गोष्टींत हें मुळींच शक्य नाहीं. स्फुट गोष्ट लिहिणारा त्या विषयाला चुटपुटता स्पर्श करून एकदम स्वमतानुसार निष्कर्ष काढील. यामुळें स्फुट गोष्टीपासून एखाद्या विषयाची उत्कट माहिती होत नाहीं किंवा निश्चित मतही बनवितां येत नाहीं. स्फुट गोष्टी या बाबतींत कादंबरीपेक्षां हीणकस ठरतात. परंतु पुनर्विवाहाच्या विषयांत खर्च झालेल्या ४०० पृष्ठांत स्फुट गोष्टींचा लेखक दहा दहा पृष्ठांच्या चाळीस गोष्टी लिहून, चाळीस निरनिराळे विषय—आटपसर स्वरूपांत कां होईना (Abruptly)—वाचकांपुढें मांडूं शकेल. यामुळें तेवढींच पृष्ठें वाचून जनतेला चाळीस निरनिराळ्या विषयांची माहिती होऊं शकते. चारशें चारशें पृष्ठांचीं चाळीस निरनिराळीं पुस्तकें वाचून येणाऱ्या संस्कृतीपेक्षां ही संस्कृति तुटपुंजी राहणार हें उघड आहे. परंतु तितका वेळ सामान्य जनतेला कुठें आहे ? आणि म्हणूनच विविधज्ञान देणाऱ्या स्फुट गोष्टी सामाजिक विषयाची सांगोपांग चर्चा

करणाऱ्या कादंबरीपेक्षां वाचकांच्या अधिक लवकर पचनीं पडतात. जनतेला गाढतेपेक्षां (Intensive) विविधतेचीच (Extensive) जरूरी अधिक भासते. युरोपियन देशांत स्फुट गोष्टी लिहिणाऱ्या विद्वानांची संख्या अलीकडे सारखी वाढत चालली आहे, त्याचें हेंच कारण आहे.

### भाषा कशी असावी ?

या प्रश्नाचें सरळ उत्तर म्हणजे—ज्यांच्याकरितां तुम्ही लिहितां त्यांना समजेल अशी ! लोकांना समजणार नाहीं अशा भाषेंत लिहिणाऱ्या लेखकानें आपली ज्ञानाची पुंजी आपल्यापाशींच ठेवावी हें बरें. ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषेंत आज कोणी लेखक लिहूं लागेल तर त्याच्या विद्वत्तेची व ज्ञानेश्वरीवरील व्यासंगाची तारीफच करावी लागेल ! शास्त्रीपंडितांची ठराविक संस्कृत भाषा बाजूस सारून तत्कालीन लोकांना येत असलेल्या मराठींतून उपदेश केल्याबद्दलच ज्ञानेश्वराची आपण थोरवी गातों. आज ज्ञानेश्वर असते, तर हल्लीं रूढ असलेले शब्दप्रयोगच त्यांनीं वापरले असते. **'शापित महाराष्ट्र'** कर्त्यांनीं आपल्या कादंबरीला बखरीची भाषा वापरून अर्थाची हानि करून टाकली. कारण रूढ नसलेल्या भाषेंत पुस्तक लिहिलें गेल्यानें तें दुर्बोध झालें आहे. गोष्टींत वर्णन केलेल्या काळाला अनुरूप अशी भाषा वापरल्याबद्दल कोणी कोणी मागें त्या ग्रंथकाराची तारीफ केली, ती ऐकून आम्हांला हसूं लोटलें ! या लोकांच्या मतानें, **उषःकाल, सूर्योदय** वगैरे मराठी कादंबऱ्या विसाव्या शतकांत लिहिल्या गेल्या, तरी आज सामान्य जनांना न समजणाऱ्या शिवकालीन मराठींत त्या लिहिल्या गेल्या पाहिजेत ! खरोखर पाहिलें तर या न्यायानें **चंद्रगुप्त** ही मराठी कादंबरी प्राकृत भाषेंत लिहावयास हवी होती ! ज्या काळीं आपण ग्रंथ लिहितों त्या काळीं रूढ असलेली भाषा ग्रंथांत वापरणें हेंच सर्वतोपरी इष्ट आहे. हा नियम इतका सरळ व सहज पटण्याजोगा असल्यामुळें त्याचा जास्त ऊहापोह करण्याची अवश्यकता नव्हती. परंतु एका प्रमुख मासिकानें वर लिहिल्याप्रमाणें चमत्कारिक विधान केल्यामुळें या प्रश्नाचा मुद्दाम खुलासा करणें भाग पडलें. लोकांत रूढ नसलेल्या भाषेंत लेखक लिहील तर त्यांच्यासारखा शहाणा तोच! त्याच्या कादंबऱ्या वाचण्याकरितां मेलेल्या पिढ्याच जीवंत झाल्या पाहिजेत, त्याशिवाय त्यांच्या ग्रंथांची काय किंमत ?

### नवलकथांचें क्षेत्र.

या नवलकथांचें क्षेत्र अत्यंत मोठें आहे. समाजांत गोष्टी वाचणाऱ्यांचाच मोठा भरणा असतो हें प्रथमारंभींच सांगितलें; आणि लिहितांना निवळ मनोरंजन हा उद्देश ठेवण्याचे दिवस मागेंच निघून गेले. प्रत्येक लेखकाची कांहीं तरी ध्येयात्मक दृष्टि असते, आणि त्यामुळें कथा हें ज्ञानप्रसाराचें सुलभ व प्रचंड साधन झालें आहे. नवलकथा लिहितांना कल्पनेला स्वातंत्र्य मिळत असल्यामुळें भौतिक शास्त्रासारख्या जड विषयापासून तों आत्म्याच्या अमरत्वापर्यंतचा सर्व प्रांत तिला मोकळा आहे. पृथ्वीवरील सर्व प्रदेश तिला मोकळा आहे एवढेंच नव्हे, तर तारामंडळांत देखील तिचा प्रवेश होऊं शकतो. दगडासारख्या अचेतन सृष्टीपासून तों देवादिकांच्या विचारांचा ठाव घेण्याची तिची शक्ति आहे. योजक मात्र असला पाहिजे.

[ २ ]

### प्राचीन कथात्मक परंपरा.

जुन्या संस्कृत वाङ्मयांत कादंबऱ्या व कथा होत्या यांत संशय नाहीं. बाणभट्टाची 'कादंबरी' आज उपलब्ध आहे, आणि अनेक कादंबऱ्या कदाचित् काळाच्या भक्ष्यस्थानीं पडल्या असतील. इसाबनीतीच्या तोडीचे हितोपदेश पंचतंत्रादि ग्रन्थ संस्कृतांतून आपणास लाधले आहेत. परंतु आज आपणास कथात्मक संस्कृत वाङ्मयाचा विचार करावयाचा नाहीं, मराठी वाङ्मयाच्या कथात्मक भागाचेंच आपणास परीक्षण करावयाचें आहे; व मराठी भाषा संस्कृतापासून पर्यायानें जन्म पावली असली तरी मराठीला स्वतंत्र इतिहास आहे, हें विसरून चालावयाचें नाहीं. ओवी अभंगासारखीं मात्रात्मक स्वतंत्र वृत्तें निर्माण करून मराठीनें संस्कृत छंदःशास्त्राच्या मगरमिठींतून आपणास केव्हांच सोडवून घेतलें. मराठी कवितेला मराठी पेहराव मुकुंदराजाने चढविला, व तेव्हांपासून मराठीची सारखी वाढ होऊं लागली. परंतु कथात्मक वाङ्मय निर्माण

करण्याच्या कामीं मराठीनें एकोणिसाव्या शतकापर्यंत हातपाय हालविले नाहींत, असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे. एकोणिसाव्या शतकापर्यंत मराठी भाषेंत कथात्मक गद्य वाङ्मय नव्हतें ही गोष्ट खरी. त्याला अनेक कारणेंही होतीं. छापखान्यांचा अभाव, अस्वस्थतेचा काळ, आणि धार्मिक परंपरेची पकड, या तीन कारणांनीं ज्याला आपण कादंबऱ्या व गोष्टी म्हणूं असें वाङ्मय मराठी भाषेंत निर्माण झालें नाहीं हें खरें. मग कथात्मक वाङ्मयाकडे लोकांची जी स्वाभाविक प्रवृत्ति असते, तिचें समाधान कसें होत असे? मनुष्यप्राणी स्वभावतः कथाप्रिय आहे. मग महाराष्ट्रांतील लोक तेवढेच या जगांत वरच्या सामान्य नियमाला अपवाद म्हणून होते कीं काय? रामायण, महाभारत व भागवत या तीन संस्कृत महाग्रंथांत असलेला प्रचंड कथांचा संग्रह लोकांना पुरून उरला. हरिदास, शास्त्री, पुराणिक, सर्वच आपापल्यापरीनें निरनिराळ्या श्रोतृसमाजाला त्या ग्रंथांतील कथा समजावून देत, त्याच कथा शिक्षक मुलांना शिकवीत, व त्याच कथा आया आपल्या लहानग्यांना सांगत. एवढ्यानें जनतेची भूक भागेना. त्यांचें ऐकून समाधान होईना. तेव्हां मराठींतच भागवत, पांडवप्रताप, जैमिनीअश्वमेध, रामविजय, हरिविजय, भारत, रामायणें, गुरुचरित्र, भक्तलीलामृत, संतलीलामृत, शिवलीलामृत, वगैरे अनेक कथात्मक ग्रंथ उत्पन्न झाले. त्या काळच्या रूढीप्रमाणें ते ग्रन्थ गद्यांत लिहिले न जातां पद्यांत लिहिले गेले, एवढाच काय तो फरक. रामायण, महाभारत, भागवत यांच्यांत कथांचें अमोल भांडार आहे, आणि तेंच भांडार निवळ मराठी वाचकांकरितां या ग्रन्थांच्या रूपानें उघडण्यांत आलें. मराठी स्वराज्याच्या काळांत या ग्रन्थांची जनतेच्या मनावर चांगलीच छाप बसली असावी. या ग्रन्थांतील कथांचें शास्त्रीयरीत्या पृथक्करण केलें तर अद्भुत, सामाजिक व ऐतिहासिक असे तिन्ही भाग त्या कथांत आढळून येतात. हें मिश्रण अशा बेमालुम प्रमाणांत झालें आहे कीं, या कथांतून अमका इतिहास व अमकी अद्भुतता असा निश्चित भाग पाडणें अशक्य आहे. परंतु हें मिश्रण इतकें सुंदर झालें कीं त्या कथांनीं मराठी समाज पांचशें वर्षें सारखा झुलवीत ठेवला, आणि अजूनही त्या कथांविषयींची बहुजनसमाजाची आवड फारशी कमी झाल्याचें दिसून येत नाहीं. धर्माच्या पडद्यावर या कथा रंगविल्या गेल्यामुळें त्या अधिकच टिकाऊ व परिणामकारक झाल्या आहेत.

### बखरी म्हणजे इतिहास नव्हे.

इंग्रजी राज्य सुरू झालें, छापखान्याची कला अस्तित्वांत आली, आणि पद्धतशीर रीतीचें वर्गीकरण असलेल्या आंग्लवाङ्मयाची इकडील विद्वानांना ओळख झाली. गद्य जोरानें प्रचारांत येऊं लागलें. यापूर्वी थोड्याबहुत बखरी गद्यांत लिहिल्या गेल्या होत्या. या बखरींनीं देखील मराठी स्वराज्याच्या उत्तरकाळांत महाराष्ट्रांत असलेल्या स्वाभाविक कथाप्रिय वृत्तीचें समाधान केलें. बखरी इतिहासास फारशा धरून नसण्याचें कारण आमच्या मतें असें आहे कीं, बखरनिसांनीं इतिहास म्हणून बखरी लिहिल्या नाहींत. जुन्या पौराणिक कथांचा कांहीं लोकांना कंटाळा आल्यामुळें, कांहीं तरी नवीन चालू काळांतील प्रचलित कथा वाचावयास मिळाव्या अशी इच्छा त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. मागणी असली कीं पुरवठा होतोच, या न्यायानें समाजाचीही नवीन उद्भवलेली आवड पुरविण्याकरितांच बखरी लिहिल्या गेल्या. त्या कथात्मक स्वरूपाच्या असल्यामुळें बखरनिसांनीं ऐतिहासिक कादंबरीकारांना जें स्वातंत्र्य असतें त्याचा साहजिकपणें उपयोग करून घेतला. जुन्या काळीं बखरीशिवाय फारसें मराठी गद्य लिहिलें गेलें नाहीं; कारण गद्याचा प्रभाव लोकांना कळला नव्हता. पण इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयानें गद्याचा विस्तार वाढूं लागला. ग्रन्थ निर्माण होऊं लागले. इतर ग्रन्थांबरोबरच कादंबऱ्या व कथा यांचाही जन्म झाला. आंग्लवाङ्मयाच्या परिचयानेंच कादंबरीलेखनाला सुरवात झाली असल्यामुळें, आंग्ल कादंबऱ्यांच्या नमुन्यावरच आपल्याकडील बहुतेक गोष्टी लिहिल्या गेल्या आहेत.

### इ. स. १८६१.

इ. स. १८६१ हें साल मराठी कथात्मक वाङ्मयाच्या इतिहासांत नमूद करून ठेवलें पाहिजे. रा. हळबे यांनीं लिहिलेली अद्भुत कादंबरी ' मुक्तामाला '

याच सालीं प्रसिद्ध झाली, आणि प्रसिद्ध भाषाकोविद कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं मराठींत उतरलेल्या 'आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टीं'चे पहिले दोन भाग याच सालीं वाचकांपुढें मांडण्यांत आले. संस्कृतांतून सिंहासनबत्तिशी व हितोपदेश, गुजरार्थींतून शुकबहात्तरी, व इंग्रजींतून थोड्याशा इसाबनीतींतील गोष्टींचा संग्रह, हीं पुस्तकें यापूर्वी मराठींत प्रसिद्ध झालीं होतीं. परंतु १८६१ सालीं प्रसिद्ध झालेल्या उपरिनिर्दिष्ट दोन पुस्तकांनीं मराठी कथात्मक वाङ्मयाचा पाया घातला असेंच म्हटलें पाहिजे. कारण पूर्वी प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपेक्षां हीं अनेक पटींनीं सरस व व्यवस्थित आहेत. मुकुंदराज हे ज्याप्रमाणें मराठींतील पहिले कवि असूनही अग्रपूजेचा मान ज्ञानेश्वराकडेच जातो, त्याचप्रमाणें रा. हळबे व चिपळूणकर यांनींच मराठी कथात्मक वाङ्मयाला सुरवात केली असें म्हणावें लागेल. हीं दोन्ही पुस्तकें अद्भुत आहेत, हें सांगावयास नकोच. यानंतर नांव घेण्याजोगीं पुस्तकें म्हटलीं म्हणजे मंजुघोषा व विचित्रपुरी हीं होत. यांपैकीं दुसऱ्या पुस्तकांत अद्भुत व वास्तविक यांचें गोड मिश्रण झालें आहे. हें पुस्तक वाचीत असतांना वाचक क्षणांत काल्पनिक जगांत,तर दुसऱ्या क्षणीं भोंवतालच्या रूक्ष परंतु प्रत्यक्ष जगांत वावरूं लागतो. या पुस्तकांतील कथानकाची मांडणी चातुर्यानें केली असल्यामुळें वाचक सहसा भांबावत नाहीं. हीं अद्भुत पुस्तकें वाचतांना, पाश्चात्य देशांतून आणलेलीं रोपें या देशांत लावलीं गेलीं ही कल्पना मात्र कांहीं केल्या मनांतून जात नाहीं. आंग्ल कथांचा मराठी कथात्मक वाङ्मयावर किती परिणाम झाला हें पदोपदीं अनुभवास येतें.

## भाषांतरें.

यानंतर इंग्लिश भाषेंतील कादंबऱ्यांचीं भाषांतरें अगर रूपांतरें मराठींत प्रसिद्ध होऊं लागलीं. यांपैकीं रा. गुंजीकरांचें 'मोचनगड' इतकें सुंदर साधलें आहे कीं, त्याची गणना स्वतंत्र पुस्तकांत सहज करतां येईल. धनुर्धारीकृत 'बाईकर भटजी' हें देखील याच योग्यतेचें पुस्तक आहे. बहुतेक भाषांतरें सामान्य इंग्रजी ग्रन्थकारांच्या कादंबऱ्यांचीं झाली आहेत, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. रेनाल्डस, मिसेस हेन्री वुड, मेरी कॉरेली यांच्या पुस्तकांवरच लेखकांच्या विशेष उड्या पडल्या आहेत. परभाषेंतील उत्तम पुस्तकें स्वभाषेंत आणणें ही गोष्ट श्रेयस्कर आहे. परंतु मराठींत भाषांतर अगर रूपांतर करणाऱ्या लेखकांनीं मूळ पुस्तकाच्या योग्यतेकडे विशेष लक्ष दिलें नाहीं, हें मात्र खरें. पुस्तक हातीं लागलें कीं कसें तरी भाषांतर करून प्रसिद्ध कर, हाच पुष्कळांनीं सपाटा चालविला. जॉर्ज इलियट, जेन आस्टिन, डिकन्स, थ्याकरे, स्कॉट, या प्रसिद्ध आंग्ल ग्रंथकारांच्या कादंबऱ्यांकडे महाराष्ट्र लेखकांचें विशेष लक्ष वेधलें नाहीं; मग टालस्टाय सारख्या आंग्लेतर परस्थ कादंबरीकारांची गोष्ट दूरच राहिली. दुय्यम दर्ज्याच्या आंग्ल लेखकांचीं कांहीं पुस्तकें कसलेल्या लेखकांच्या हातीं पडल्यामुळें मराठी वाङ्मयांत चांगलीच भर पडली, हें मात्र विसरून चालावयाचें नाहीं. रा. आपटे यांचें 'माणिकबाग,' व रा. गोखले यांचें 'स्वर्गीय प्रेम' हीं पुस्तकें आमच्या म्हणण्याची साक्ष पटवतील. ठगाची जबानी, अनाथ पांडुरंग, दुःखाअंतीं सुख, हीं पुस्तकें देखील सुंदर आहेत. याचें कारण हेंच कीं, मूळ इंग्रजी पुस्तकांचीं रूपांतरें करतांना लेखकांनीं कथानकांतील धागेदोरे आपल्या परिस्थितीला जुळतील त्या प्रमाणांत फिरवून घेतले. परंतु सामान्य दर्जाच्या लेखकांना ही कुशलता साधली नाहीं. यामुळें त्यांनीं केलेलीं रूपांतरें वाचतांना वाचक पदोपदीं ठेंचाळतो. ज्याला परभाषेंतील कथानक आपल्या परिस्थितीशीं जुळतें करून घेतां येईल, त्यानेंच रूपांतराच्या भानगडींत पडावें. इतरांनीं सरळ भाषांतर करून आंग्ल कथांची व त्याद्वारें आंग्ल समाजाची वाचकांना माहिती करून दिली तरी पुष्कळ कार्यभाग होणार आहे.

उत्तम उत्तम अशा परभाषेंतील पुस्तकांकडे देखील लेखकांचें लक्ष हल्लीं हळूहळू लागत चाललें आहे. जेन ऑस्टीनच्या एका लोकप्रिय कादंबरीचीं 'दर्पदर्पण' व 'आजपासून पन्नास वर्षांनीं' अशीं दोन रूपांतरें मराठींत प्रसिद्ध झालीं आहेत. 'केवळ स्वार्थापायीं' मात्र फारसें चांगलें साधलें आहे असें वाटत नाहीं. 'आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' पितापुत्र चिपळूणकर व दामले यांनीं मिळून पुरें केलें;व मराठींत

एका अप्रतिम पुस्तकाची भर घातली. बाणाची कादंबरी, हितोपदेश व पंचतंत्र, आणि प्राकृतांतील कर्पूरमंजरी, ललितवत्सराज वगैरे पुस्तकांचीं मराठींत भाषांतरें झाल्यामुळें, उपलब्ध असलेल्या संस्कृत कथालेखनाची मराठी वाचकांना माहिती झाली.

## मालांची लाट.

भाषांतरग्रंथांची रजा घेण्यापूर्वी महाराष्ट्र-वाङ्मयावर आजकाल प्रसिद्ध होत असलेल्या मालांच्या बऱ्या वाईट परिणामाकडे लक्ष दिलें पाहिजे. मराठी वाङ्मयांत भर टाकण्याच्या उदात्त इच्छेनें म्हणून या माला अस्तित्वांत आल्या आहेत. या मालांतील बहुतेक पुस्तकें भाषांतरें किंवा रूपांतरेंच आहेत. महाराष्ट्रांत चालू असलेल्या प्रमुख माला म्हणजे रा. भसे यांची 'भारत-गौरवग्रंथमाला,' रा. कोठारी यांची सुरसग्रंथमाला, व रा. पांगळ यांची 'सरसवाङ्मयरत्नमाला,' या होत. रा. भसे यांची माला सर्वांत जुनी होय. त्या मालेनें आजपर्यंत प्रसिद्ध केलेल्या बहुतेक कादंबऱ्या रूपांतरवजा असल्या तरी त्या वरच्या दर्जाच्या असून सुंदर वठलेल्या आहेत. त्यांची भाषा चित्ताकर्षक आहे, व पुस्तकांचें बाह्यांग देखील आटोपशीर व मोहक आहे. मराठी कथात्मक वाङ्मयांत रा. भसे यांनीं चांगलीच भर टाकली आहे. श्री. इंदिराबाई हरिपूरकर यांची 'दैवलीला' डोळ्यांत टचकन पाणी आणते रा. कोठारी यांच्या मालेंत मोठालीं पुस्तकें प्रसिद्ध होतात. त्यांपैकीं रा. शहा यांचीं 'अशोक' व 'छत्रसाल' फारच चांगलीं साधलीं आहेत. रा. कोठारी यांचें 'इंदिरा' देखील चांगलें आहे.रा. कोठारी यांनीं रेनॉल्डसारख्या कादंबरीकारांचीं रूपांतरें दोन तीन केलीं आहेत. परंतु अशा पुस्तकांनीं समाजाची व वाङ्मयाची हानीच होईल असें आम्हांस वाटतें. रा. पांगळ यांच्या सरसवाङ्मयरत्नमालेंत गुंफिलेलीं 'प्रेमळ सवत' व 'ताजमहाल' आणि 'गुर्जरवीर अनहिल' व 'अस्तनींतील निखारा' हीं पुस्तकें उत्तम आहेत. या मालांच्या द्वारें महाराष्ट्र-वाङ्मयसेवा करावयास तयार झालेले रा. कोठारी व रा. पांगळ यांचें आम्ही अभिनंदन करतों. परंतु या मालांतून प्रसिद्ध होणाऱ्या बहुतेक पुस्तकांची भाषा अगदींच टाकाऊ असते. कदाचित् ठरींव वेळांत पुस्तक लिहिण्याच्या लकड्यामुळें भाषेकडे लक्ष देण्यास लेखकांस फुरसत होत नसेल. पुस्तकांत अशुद्ध फार, आणि बाह्यांग व छपाई गचाळ असते. या गोष्टींकडे लक्ष देऊन वर्षांतून दोन पुस्तकें कमी प्रसिद्ध झालीं तरी चालेल, पण पुस्तकें अधिक चांगलीं निघणें इष्ट आहे. या सूचनेकडे हे दोन प्रसिद्ध प्रकाशक लक्ष देतील अशी आशा आहे. भाषा चांगली नसली तर वाङ्मयांत कोणतेंही पुस्तक महत्त्वाची भर टाकूं शकत नाहीं, ही सरळ गोष्ट आहे.

## मनोरंजकग्रंथप्रसारक मंडळी.

हिंदी भाषांपैकीं बंगाली आजला पहिल्या नंबरावर जाऊन बसली आहे. बंगाली कादंबऱ्यांचीं भाषांतरें करून त्यांचा लाभ मराठी वाचकांना प्रमुखत्वेंकरून मनोरंजनानें करून दिला. मनोरंजनानें पुस्तकांची निवड चांगली केली, व त्यांचीं भाषांतरें सुंदर भाषेंत करविलीं, इतकेंच नव्हे तर तीं पुस्तकें चित्ताकर्षक स्वरूपांतही प्रसिद्ध केलीं. मनोरंजनानें बंगालींतून मराठींत उतरलेलीं पुस्तकें इतकीं सुंदर आहेत व वाचकवर्गावर त्यांचा इतका परिणाम झाला, कीं मराठी भाषेला देखील आजकाल थोडेंसें बंगाली वळण त्यामुळें लागलें आहे. बंगाली पुस्तकांची 'मकरंद कार्यालया'नें व उपरिनिर्दिष्ट सरससुरस मालांनींही भाषांतरें केलीं आहेत. परंतु त्या पुस्तकांची मनोरंजनानें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांशीं तुलना करतां जमीन अस्मानाचें अंतर दिसून येतें. रवींद्रनाथ टागोरांच्या 'गोरा' पुस्तकाला एका मालेनें कसें वेडेंविद्रें रूप दिलें हें पाहिलें, म्हणजे मनोरंजनाची प्रशंसनीय कामगिरी लक्षांत येते. याचें श्रेय मनोरंजनाचे उत्साही संपादक रा. का. र. मित्र यांनाच दिलें पाहिजे. जीवनसंध्या, तोडरमल, संसार-असार, हीच रामाची अयोध्या, प्रियंवदा, धाकट्या सूनबाई, यांपैकीं कोणतेंही पुस्तक वाचलें तरी वाचकांना आमचें म्हणणें पटेल. मनोरंजनाचे अनेक वर्षें सहसंपादक असलेले प्रसिद्ध लेखक रा. वि. सी. गुर्जर यांच्याकडे देखील या श्रेयाचा बराचसा वांटा जातो. यांनीं स्वतंत्र लेखन केलें नाहीं. गुर्जर हे सुंदर मराठी

भाषा लिहितात, आणि बंगाली पुस्तकांचें मराठींत भाषांतर करण्याच्या कामीं महाराष्ट्रांत यांचा कोणी हात धरूं शकेल असें वाटत नाहीं. श्री. गुर्जर हे स्वतंत्र कादंबरीकार नसले तरी त्यांनीं रूपांतर करून लिहिलेल्या गोष्टी महाराष्ट्रवाङ्मयांत बराच वर नंबर पटकावतील. रा. ‘ शारदाश्रमवासी,’ व रणदिवे यांचीं बंगाली भाषांतरें देखील बरीं साधलीं आहेत.

## हरि नारायण आपटे.

आधुनिक मराठीवाङ्मयाचा इतिहास लिहिणाऱ्याला केव्हांही हरिभाऊंसाठीं स्वतंत्र प्रकरण खर्ची घालावें लागेल, इतकी त्यांची योग्यता मोठी आहे. मराठी कथात्मक वाङ्मयांत त्यांच्या तोडीचे तेच ! त्यांच्या-बरोबर ज्याचें नांव घेतां येईल असा कादंबरीलेखक सध्यां तरी महाराष्ट्रांत दुसरा कोणी दिसत नाहीं. ‘पण लक्षांत कोण घेतो?’‘आजकालच्या गोष्टी,’‘जग हें असें आहे,’ ‘मायेचा बाजार’ यांसारख्या सुंदर सामाजिक कादंबऱ्या, व ‘उषःकाल,’ ‘रूपनगरची राजकन्या,’ ‘केवळ स्वराज्यासाठीं’ अशीं अप्रतिम ऐतिहासिक कथानकें लिहून त्यांनीं महाराष्ट्रभाषासुंदरीवर बहुमोल अलंकार चढविले. त्यांची भाषा गोड व साधी आहे. कृत्रिमता तर त्यांच्या पुस्तकांत शोधूनहि सांपडत नाहीं. प्रोफेसर डयाडी, यमुना, सांवळ्या हीं पात्रें मराठी वाचकांच्या पूर्ण परिचयाचीं झालीं आहेत. त्यांनीं प्रारंभ केलेल्या बऱ्याचशा कादंबऱ्या अपूर्ण आहेत, व महाराष्ट्र वाचकांचें दुर्दैव ओढवल्यामुळें त्या पूर्ण होण्याची आतां आशाही उरली नाहीं. विशेषतः त्यांच्या ‘कालकूट’ या अपूर्ण ऐतिहासिक कादंबरीनें तर आम्हांला अतोनात चटका लावला. ही पृथ्वीराजकालीन कादंबरी फारच तेजस्वी आहे, आणि आहे त्या अर्धवट स्थितींत देखील ती वाचकांचें कौतुक पुरवील. त्याचप्रमाणें ‘कर्मयोग’ ही त्यांची शेवटची सामाजिक कादंबरी अपूर्णच राहिली. देशोद्धाराविषयीं कोणते मार्ग फलदायी होतील, यासंबंधीं हरिभाऊंचीं मतें या कादंबरींत वाचकांना वाचावयास मिळालीं असतीं. हरिभाऊंची सर्वांत लहान कादंबरी ‘गड आला पण सिंह गेला’ ही वाचली तरी देखील त्यांची योग्यता वाचकांच्या ध्यानांत येते. बंगाली कथात्मक वाङ्मय मराठीच्या फार पुढें गेलें आहे असें म्हणतात. परंतु हरिभाऊंच्या तोडीचा कादंबरीलेखक बंगालींत नाहीं, असें आमच्या एका विद्वान् व बंगालींत निष्णात असलेल्या मित्रानें आमच्यापाशीं कबूल केलें. जर महाराष्ट्राला बरे दिवस असते व महाराष्ट्रांतील लोकांना बंगालप्रमाणें गाजावाजा करण्याची कला साधली असती, तर जगांतील अत्युत्तम अशा वीस कादंबरीकारांमध्यें हरिभाऊंची गणना झाली असती, अशी ग्वाही आमचें मन आम्हांला देत आहे. हरिभाऊंच्या लेखनांत जर एखादा दोष असेल तर तो क्वचित् प्रसंगीं दिसून येणारा पाल्हाळिकपणा हा होय. हरिभाऊंच्या कादंबऱ्या प्रथम क्रमशः करमणूक पत्रांत प्रसिद्ध झाल्यामुळें हा दोष आला असें वाटतें. हरिभाऊंच्या ‘करमणुकी’नेंच महाराष्ट्रांत प्रथम ललितवाङ्मयाविषयीं विशेष गोडी उत्पन्न केली.

## इतर कांहीं ऐतिहासिक कादंबऱ्या.

‘ नाथमाधव ’ यांनीं मराठ्यांच्या आरमाराची माहिती करून देण्याच्या उद्देशानें ‘सांवळ्या तांडेल’ हें नवीन वळणाचें पुस्तक लिहिलें. प्रस्तुत निबंधलेखकाची ‘ हिंदु कोण ? ’ ही गोष्ट शिवकालीन महाराष्ट्रसमाज पतितोद्धारास कसा अनुकूल होता हें स्पष्ट दाखविण्याच्या हेतूनेंच लिहिली गेली आहे. ‘सहकारी कृष्णा’च्या ‘ शापित महाराष्ट्र ’ व ‘ राजकुंवर ’ या कादंबऱ्या मराठ्यांचें विपत्तिकालीं दृग्गोचर झालेलें तेज दाखवितात.या उत्तम लेखकाचें भाषावैगुण्यच त्याच्या विशेष प्रसिद्धीच्या आड आलें. ‘ दोनशें वर्षांपूर्वी’ ही रा. दामले यांची पेशवाई थाटाची कादंबरी वाचनीय आहे. रा. चिंतामणराव वैद्य यांनीं लिहिलेली ‘ ५७ सालच्या बंडाची हकीगत ’ नाविन्यदर्शक आहे. याच प्रसिद्ध लेखकाची सोनपतपानपतकालीन ‘ दुर्दैवी रंगू ’ ही कादंबरी देखील ऐतिहासिक दृष्टीनें चांगली साधली आहे. परंतु जुन्या ‘ पानपतच्या मोहिमे’पेक्षां ही कमी चित्ताकर्षक आहे हें कोणालाही कबूल करावें लागेल. रा. नारायण हरि आपटे यांनीं नुकतीच लिहिलेली ‘रजपुतांचा भीष्म’ ही कादंबरी उत्तम साधली आहे. हींत चोंडा व अनार, दुर्गावती व जालीमसिंग, आणि राणा व पद्मावती,हीं पात्रें कुशलतेनें रंगविलीं

गेलीं आहेत. उदेपुरावरील मारवाडकरांची राज्यपद्धति निरखून कोणाच्या डोळ्यांला पाणी येणार नाहीं ? ऐतिहासिक कादंबरीची उभारणी भूतकालावर होते,हें खरें. परंतु वर्तमानकाळाची सफेती तिच्यावर चढली नाहीं, तर लेखकाचें व तो ज्या काळांत जन्मला त्याचें विशिष्टत्व पुस्तकांत उतरणार नाहीं, या आमच्या विधानाची सत्यता पटविणारें प्रस्तुत पुस्तक हें एक उत्तम उदाहरण होय. रा. नारायण हरि आपटे हे केवळ नामधारी आपटे नाहींत हें प्रस्तुत पुस्तकानें महाराष्ट्रवाचकांच्या प्रत्ययास आणून दिलें.

## सामाजिक कादंबऱ्या.

रा. कृष्णाजी केशव गोखले यांनीं इंग्रजी पुस्तकांचीं जीं रूपांतरें केलीं, त्यांचा उल्लेख मागें आलाच आहे. सुशिक्षित स्त्रियांत गायनाला कमी दर्जाचें लेखण्यांत येतें.ज्या गायकांच्या हातीं आजपर्यंत ही कला होती, त्यांचें शील चांगलें नसल्यामुळें या कलेला समाजांत देखील कमी लेखण्यांत येऊं लागलें. ही गोष्ट पटविण्याकरितां व गायनकलेची लोकप्रियता वाढविण्याकरितां यांनीं 'तिलोत्तमा' या नांवाची एक कादंबरी लिहिली आहे. यांचीं कथानकें आंग्लसमाजांत शोभतील अशीं असतात. कदाचित् पाश्चत्य ग्रन्थांतून हे तीं उचलून घेत असतील. हे एक चांगले कादंबरीकार आहेत. रा. सी. के. दामले यांनीं लिहिलेल्या 'जग हें त्रिविध आहे ' व ' न्याय कीं अन्याय ?' या कादंबऱ्या संवादरूपी आहेत. या कादंबऱ्यांची वाढ कथानकाची गुंतागुत, किंवा पात्रांचा विविध प्रसंगांतून दाखविलेला स्वभावपरिपोष, यांमुळें झाली नाहीं.या कादंबऱ्यांत पात्रांची भेट झाली कीं एखादा विषय मुद्दाम उकरून काढून तीं त्या विषयाचा पाल्हाळिक काथ्याकूट करीत बसतात. रा. शिवराम महादेव परांजपे यांनीं लिहिलेली ' गोविंदाची गोष्ट ' वरील दोषांत दामल्यांच्या पुस्तकांवर मात करते. राजकीय कलम-बहादुरांची कल्पनासाम्राज्यांत फारशी गति चालत नाहीं असें दिसतें. पूर्वग्रहानें दूषित झालेल्या कांहीं वाचकांना त्या पाल्हाळांत विलक्षण व्यंग्यलेख ( Satire ) कधीं कधीं दिसतो, हें मात्र खरें. आम्हांला मात्र अशा गोष्टी वाचून ओढून ताणून वाढविलेल्या मारुतीच्या शेपटाची आठवण होते. बाकी परांजप्यांची भाषा मात्र फारच सुंदर आहे. रा. नाथमाधव हे एक फार मोठे कादंबरीकार आहेत. त्यांची ' देशमुखवाडी, ' ' वीरधवल ' रूपांतरवजा आहेत. ' विहंगवृंद ' ' श्रीनिवासराव ' रूपांतरासारख्या भासतात. परंतु त्यांतील कथानकें स्वतंत्र आहेत असें आम्ही ऐकतों. इंग्रजी कादंबऱ्यांच्या वाचनाचा हा प्रभाव असावा. 'ग्रहदशेचा फेरा,' 'डॉक्टर कादंबरी,' या त्यांच्या कादंबऱ्याही सरस आहेत. प्रसंगविशेषीं हे आपल्या गोष्टींचें कथानक इंग्लिश कादंबऱ्यांतून उचलीत असले, तरी तें कथानक आत्मसात् करून घेण्याची हातोटी यांना फार चांगली साधली आहे. यामुळें यांच्या कथानकांना रंग चढतो. हे टापटिपीची व सुबोध भाषा वापरीत असल्यामुळें, यांनीं पुस्तकें बरींच लोकप्रिय झालीं आहेत. यांच्या गोष्टी भोंवतालच्या परिस्थितीशीं जुळत्या असल्यामुळें वाचकांना गुदगुल्या करतात. यांच्या लेखणींत जो एक प्रकारचा सहजपणा आहे तो इतरत्र क्वचित्तच पाहावयास मिळतो. रा. ना. ह. आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्याही बऱ्या साधल्या आहेत.त्यांपैकीं 'कर्मगति,' 'कल्पनाचित्र' या विशेष चांगल्या आहेत. यांचीं सामाजिक मतें फारशीं प्रगतिपर नाहींत.

समाजशास्त्राचें उत्तम अध्ययन करणारेच उत्तम सामाजिक कथा लिहूं शकतात, याचें उदाहरण म्हणजे रा.वामन मल्हार जोशी हे होत. यांची 'रागिणी' उच्च दर्ज्याची कादंबरी आहे.यांचीं सामाजिक मतें प्रगतिपर असल्यामुळे, सुशिक्षित समाजाला यांची ही कादंबरी विशेष आवडली आहे. कारण पुष्कळ सामाजिक प्रश्नांची यांत सुंदर रीतीनें चर्चा झाली आहे. परंतु रा. जोशी यांना कादंबरींत मधून मधून वेदांताची चर्चा करून कादंबरी नीरस करण्याचा मोह आवरला नाहीं. उठल्यासुटल्या कर चर्चा, आणि ती मार वाचकांच्या माथीं, असा प्रकार या कादंबरींत बराच झाला आहे. रा. जोशी यांना तत्त्वज्ञान उत्तम प्रकारें अवगत असेल. परंतु त्यामुळें कथावाचकांनीं तत्त्वज्ञानाचे डोस सदा पीत असावेंअशी अपेक्षा करणें चुकीचें आहे. रा. जोशी यांनीं या कादंबरींत एक उपकथानक घालून ती

दाखविण्याचा केलेला प्रयत्न-त्यांत नाविन्य असलें तरी-हास्यास्पद झाला आहे. रा. जोशी यांची भाषा असावी तेवढी सरळ व सुबोध नसल्यामुळें सामान्य जनसमूहाला हें पुस्तक सहजगत्या कळणार नाहीं. हरिभाऊ आपटे यांच्याप्रमाणें मनोहर व घरगुती भाषा लिहिणें जोश्यांना कांहीं केल्या साधलें नाहीं. आम्हांस असें वाटतें कीं, आजच्या सामाजिक कादंबऱ्या शंभर वर्षांनीं ऐतिहासिक ठरणें हीच या सामाजिक कादंबऱ्यांची मुख्य कसोटी होय. म्हणजे त्या काळच्या वाचकाला आजच्या परस्थितीचें व समाजस्थितीचें ज्ञान त्या पुस्तकावरून झालें पाहिजे. प्रस्तुत निबंधलेखकानें 'जीवनरहस्य' व 'युद्धसंसार' या दोन स्वतंत्र समाजिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांपैकीं पहिलींत १९१३ सालीं उडालेल्या ब्यांकांचा घोंटाळा, व दुसरींत युरोपांतील महायुद्ध, या मध्यवर्ती ऐतिहासिक गोष्टी असून याभोंवतीं महाराष्ट्रांतील वरच्या समाजाचा संसार मांडून दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. सामाजिक कादंबऱ्या वाचतांना वाचकांनीं एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवावी: सामाजिक कादंबऱ्यांची उभारणी जरी वस्तुस्थितीवर होत असली, तरी ध्येयात्मक भविष्यकालाची सफेती तिजवर मारली असते. त्याशिवाय कादंबरीलेखकाचें व त्याच्या काळाचें विशिष्टत्व दिसूं शकत नाहीं.

## महाराष्ट्राचे झोला.

रेनाल्ड वगैरे कांहीं पाश्चात्य लेखकांनीं समाजांतील दुष्कृत्यें व अनाचार उघडपणें चवाठ्यावर मांडले आहेत. झोलासारख्या फ्रेंच कादंबरीकारांनीं कर्तव्य म्हणून या अनाचारांचें उघड प्रदर्शन केलें आहे. समाजांतीळ घाण चव्हाटयावर आली म्हणजे ती उपसली जाईल असें त्यांचें प्रामाणिक मत आहे. उलटपक्षीं, अशा बीभत्स प्रदर्शनानें समाजाच्या पशुवृत्ती जागृत मात्र होतील असेंही कित्येकांना वाटतें. आपल्या समाजांत पांढरपेशा वर्ग बाजूस सारला, तर समाजाची स्थिति फारच वाईट असलेली दृष्टीस पडते. विशेषत: ज्यांचा मजूरवर्गाशीं सहवास आहे, त्यांना त्या लोकांची नीतिमत्ता किती खालावलेली असते याची कल्पना असेल. परिस्थितीमुळें त्यांच्या स्त्रीपुरुषसंबंधाच्या मर्यादा जमीनदोस्त झालेल्या असतात. दारिद्र्यामुळें गांजलेल्या स्त्रियांना आपलें पातिव्रत्य रुपया दोन रुपये किंमतीस नाइलाजानें विकावें लागतें. जॉबर, मेट, नाईक, यांना आपल्या कारखान्यांतील तरुण पोरी म्हणजे स्वत:ची मालमत्ता असेंच वाटत असतें. वेश्यांना पतित समजणारे वेश्यांची माडी खुशाल चढतात. त्यांना समाजांत गादीतक्याशीं जागा मिळते, परंतु वेश्येला मात्र उघडें तोंड करण्याचा अधिकार नाहीं. गरिबांच्या पैशावर श्रीमंत यथेच्छ ताव मारीत असतात. फार तर काय, परंतु पोटाला चिमटा घेऊन दिलेल्या पै-पैशाच्या फंडावर अनेक देशभक्त पुढारी विलायतेच्या किंवा सिमल्याच्या फेऱ्या चैनींत करीत असतात. या अशा अनेक सामाजिक अत्याचारांचे जळजळीत निखारे वाचकांच्या अंगावर फेकण्याचें काम अजून महाराष्ट्रांत फारसें कोणीं केलें नाहीं. रा. दातारांच्या 'कालिकामूर्ती'त शाक्तांची घाण उपसली गेली आहे. परंतु कालिकामूर्ती हें रेनाल्डचें मराठी नांवानें लिहिलेलें पुस्तक आहे. प्रचलित महाराष्ट्रसमाजांतील घाणीपासून आपण फार दूर आहों, असेंच हें पुस्तक वाचतांना वाटतें. पण रा. ग. वि. कुळकर्णी यांनी तो विडा उचलला आहे. * ते धडाडीचे लेखक आहेत. त्यांचा उत्साह दांडगा आहे. व त्यांची लेखनशक्ति जबरी आहे. त्यांची कर्मसंन्यास व जन्मठेप हीं पुस्तकें वाचून आम्ही स्तंभितच झालों. ते लवकरच महाराष्ट्राचे झोला म्हणविले जातील असा आम्हांला भरवंसा वाटतो. पहिल्या पुस्तकांत चोरून जन्मलेल्या व रस्त्यावर फेंकलेल्या मुलाच्या भगिनीप्रेमाचें पत्नीप्रेमांत रूपांतर झालेलें आहे. दुसऱ्यांत प्रचलित हिंदु कायद्याप्रमाणें पतीनें कितीही अत्याचार, व गुन्हे केले तरी त्याच्या स्त्रीला नवऱ्यापासून काडी मोडून घेतां येत नाहीं, याचें भडक चित्र रंगविलें आहे.

---

* हा लेख लिहिल्यानंतर लौकरच रा. कुळकर्णी हे प. लो. वा. झाले, ही दुर्दैवाची गोष्ट होय.

## पौराणिक कादंबऱ्या.

या कादंबऱ्यांची गणना सामाजिक कादंबऱ्यांतच केली पाहिजे. आपला बहुजनसमाज अशिक्षित व मागसलेला आहे, आणि लेखकवर्ग सुशिक्षित व पुढारलेला. अशा परिस्थितींत लेखकाचीं सामाजिक मतें वाचकांच्या मतांशीं न जुळलीं तर त्यांत नवल नाहीं. प्रगतिपर सामाजिक मतें ग्रथित केलेल्या गोष्टींनीं मागसलेला वाचकवर्ग बिचकून जाण्याचा संभव असतो.त्यामुळें समाजाला इष्ट वळण लावण्याची लेखकाची स्वाभाविक इच्छा जागच्याजागीं जिरेल कीं काय, अशी भीति वाटूं लागते. अशा परिस्थितींत शोधून काढलेली ही चोरवाट होय. बहुजनसमाजाचा आपल्या पुराण ग्रंथांकडे फार ओढा असतो. पुराणांत वर्णन केलेली प्रत्येक बरी वाईट गोष्ट चांगल्या डोळ्यांनींच पाहाण्याची समाजाची प्रवृत्ति असते.राम, कृष्ण, सावित्री, सीता, गुरु, चंद्र, तारामती या नांवांत अशी कांहीं जादू आहे कीं, त्या व्यक्तींनीं केलेल्या प्रत्येक कृत्याचें समर्थन बहुजनसमाज उघडपणें किंवा निदान आपल्या मनाशीं तरी करीत असतो. तेवढ्यापुरती त्याची दृष्टि अंध बनलेली असते. मनाचें तसें समाधान झालें नाहीं तर 'वेदांतपर रूपक' या कोटींत कोणत्याही शृंगारिक गोष्टी ढकलतां येतात. प्रचलित सामाजिक प्रश्नावरचीं आपलीं मतें बहुजनसमाजावर पौराणिक पात्रांच्या द्वारें बिंबविण्याचा मार्ग यामुळें विशेष परिणामकारक ठरतो. पुराणांतील कथाभागाची त्यामुळें थोडीशी ओढाताण होते, ही गोष्ट खरी ! परंतु उद्देशाकडे नजर दिल्यास ती समर्थनीय ठरेल. पुष्कळ लोकमान्य नाटककारांनीं हा कित्ता चांगलाच गिरविला आहे. कादंबऱ्यांच्या बाबतींत मात्र हे प्रयत्न तुरळकच झाले आहेत. ही मूळ बंगाली टूम आहे, आणि म्हणूनच बंगालीच्या पावलावर पाऊल टाकूनच या बाबतींत आजपर्यंत थोडेसे प्रयत्न झाले आहेत. रा. भसे यांचें 'सावित्री सत्यवान,' रा. परळकरांचें 'वत्सला अभिमन्यु,' रा. वा. गो. आपटे यांचें 'वाल्मिकीचा जय,' प्रस्तुत निबंधलेखकाचें 'सीतावनवास,' रा. वा. म. जोशी यांची 'आश्रमहरिणी,' हीं पांच पुस्तकें या धर्तीच्या कथांचे मासले म्हणून देण्यास हरकत नाहीं.

## स्फुट गोष्टी.

या बाजूकडे मराठी लेखकांचें बरेंच दुर्लक्ष झालें आहे.कादंबऱ्या व नाटकें लिहून जो पैसा किंवा कीर्ति मिळते, त्याचा शतांशही गोष्टी लिहून मिळत नसल्यामुळें चांगले महाराष्ट्रिय लेखक स्फुट गोष्टींच्या बाबतींत साधारणतः उदासीन राहिले. परंतु आजकाल ही स्थिति पालटत आहे. रा. गुर्जर यांचा लहान गोष्टी लिहिण्यांत हातखंडा आहे. परंतु यांच्या गोष्टी बहुधा भाषांतरित असतात. तरी पण आजमितीला या बाबतींत त्यांचा नंबर वरच लागतो. रा. हरि नारायण आपटे यांनीं बऱ्याच सुंदर स्फुट गोष्टी लिहिल्या आहेत. रा. गोखले यांच्याही बऱ्याच गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. या गोष्टींची संख्या फार मोठी असल्यामुळें त्यांचा येथें पूर्णपणें परामर्श घेणें शक्य नाहीं; कारण आम्हांला आंखून दिलेली पृष्ठमर्यादा आम्हीं केव्हांच ओलांडली आहे ! परंतु कै. माळवी यांच्या नांवाचा या बाबतींत उल्लेख केल्यावांचून आम्हांला राहवत नाहीं. यांनीं ज्या थोड्याच गोष्टी लिहिल्या त्या बऱ्याच वरच्या दर्जाच्या आहेत. रा. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या प्रसिद्ध झालेल्या दोन तीन गोष्टी त्यांच्या दर्जाला साजेशाच आहेत. त्यांतल्या यांत 'गरीब बिचारें पाडस' ही त्यांची पुनर्जन्मविषयक गोष्ट मराठींत अगदींच नवीन धर्तीची आहे. ते कथालेखनाकडे आपला मोर्चा वळवितील तर उत्तम कादंबरीकार झाल्यावांचून राहणार नाहींत, असें या गोष्टीवरून वाटतें.'सहकारी कृष्ण'व रा. गुर्जर यांनीं पुष्कळच सुंदर स्फुट गोष्टी लिहिल्या आहेत. रा. देशपांडे, दर्भे, हडप, अत्रे, आनंदीरमण, यांच्या गोष्टी देखील बऱ्या असतात. यांशिवाय अनेक होतकरू तरुणांच्या गोष्टी हल्लीं निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध होत आहेत, त्यांचा उल्लेख येथें करणें शक्य नाहीं. या होतकरू लेखकांपैकीं रा. वा. चिं. भानू यांच्या 'बाळयानें काय केलें ?' 'मनी वसें तें स्वप्नीं दिसे' या गोष्टी फारच सुंदर आहेत. स्त्रीलेखिकांपैकीं श्रीमती काशीबाई कानीटकर, सौ. कमलाबाई किबे, सौ. गिरजाबाई केळकर, सौ. राधाबाई गोखले, सौ. यशोदाबाई भट व सौ. 'वामनसुता' यांच्या गोष्टी

चांगल्याच आहेत. याशिवाय अनेक लेखकांचीं नांवें आमच्या मर्यादित स्मृतींतून गेल्याबद्दल ते आम्हांस माफी देतीलच. त्याचप्रमाणें कांहींचा उल्लेख केवळ जागेच्या अभावामुळें करतां आला नाही. परंतु महाराष्ट्रभाषासुंदरी या सर्वांची ऋणी आहे हें सांगणें नकोच.

## उपसंहार.

लोकजागृतीचें व लोकशिक्षणाचें काम मराठी कथालेखक यथामति कसें करीत आले याचें वर परीक्षण केलें आहे. या साठ वर्षांत मराठी कथालेखनाचें पाऊल चांगलेंच पुढें पडलें आहे. कै० हरि नारायण आपटे यांच्यासारखा श्रेष्ठ कादंबरीकार या काळांत होऊन गेला; आणि अनेक विद्वान् आज महाराष्ट्रांत त्यांचा कित्ता गिरवीत आहेत. शास्त्रीय, तत्त्वबोधक, शिक्षणात्मक, वेदांतपर अशा कादंबऱ्या अजून मराठींत झाल्या नाहींत हें खरें. परंतु महाराष्ट्रांतील विद्वान् व बहुश्रुत पदवीधरांचें लक्ष या दिशेकडे नुकतेंच वेधलें असल्यामुळें आशेला अजून पुष्कळच जागा आहे. एकोणिसाव्या शतकांतील लेखकांपेक्षां विसाव्या शतकांतील कादंबरीलेखक अधिक विद्वान्, बहुश्रुत व प्रगतिपर विचारांचे आहेत ही गोष्ट स्पष्ट आहे; आणि या एकाच गोष्टीवर आम्ही सदर भविष्यकालाची इमारत बांधीत आहों. आजपर्यंतच्या महाराष्ट्र वाङ्मयांतील कथात्मक विभागाची थोरवी वाचकांच्या लक्षांत आली म्हणजे प्रस्तुत लेखकाच्या श्रमांचें चीज झालें; कारण "ऊं-पुरे त या गोष्टी व भिकार कादंबऱ्या !" असले हेटाळणीचे उद्गार तरी त्यामुळें बंद पडतील. *

वर्धा १।११।१९१९.

* प्रस्तुत निबंध लिहून दोन वर्षें झालीं. त्यामुळें अलीकडे प्रसिद्ध झालेल्या कांहीं सुंदर कादंबऱ्या व गोष्टींचा उल्लेख त्यांत करतां आला नाहीं याबद्दल लेखक रुष्ट होणार नाहींत असें वाटतें. विविधज्ञानविस्ताराच्या 'जुबिली'करितां मूळ लेख लिहिला असल्यामुळें तोंपर्यंतच्या काळाचेंच त्यांत पर्यालोचन आहे. पुढील कार्याचा आढावा पुढें केला तरी काढतां येईल. ना. के. बे. १०।११।२१.



# मराठी नाटकें.

[ लेखक रा. रा. बळवंत हरि पंडित, बी. ए., एल्‌एल्. बी. ]

त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।
नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनं ॥

मालविकाग्निमित्र.

## १. विषयोपन्यास.

आपल्या या भरतखंडांत नाट्यकलेचा उदय आणि उत्कर्ष फार प्राचीनकाळींच झालेला आहे. भरतमुनींच्या ग्रंथांत या कलेचा जो इतिहास दिलेला आहे त्यावरून आमच्या देशांत या कलेला फार पुरातन कालापासून महत्त्व आलेलें आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. नाट्य हें ब्रह्मनिर्मित आहे, व याच्या शास्त्रास एक वेदच मानलेलें आहे. आमच्या देशांत कालिदास, भवभूतीसारखे नाटककार होऊन गेल्याला आज अनेक शतकें झालीं, तरी त्यांची कीर्ति आज तागाईत चारी खंडांत दुमदुमत आहे, व त्यांच्या कृति आमच्या अभिमानाच्या विषय झाल्या आहेत. असें आहे तरी गेल्या ७।८ शतकांत आमच्या देशांत या कलेला मालिन्य आलेलें होतें, तें जाऊन या कलेचा पुनरुदय गेल्या ७०।७५ वर्षांपासून झालेला आहे.

आज आपल्यास मराठी नाटकांबद्दलच विचार करावयाचा आहे. आमचीं प्राचीन नाटकें संस्कृत भाषेंत आहेत. त्यांचा आजच्या निबंधांत विचार करावयाचा नाहीं. आमचीं प्राचीन संस्कृत नाटकें व आजचीं मराठी नाटकें यांच्या मध्यंतरींच्या कालांत आमचें या विषयाकडे लक्षच नव्हतें. कारण हा मध्यंतरींचा काल आम्हांस बराच धामधुमीचा होता. यांतील कांहीं काल मुसलमानी सत्तेनें आमच्या देशास व्यापून टाकलें होतें, व पुढील कांहीं काल आमचें राष्ट्र उदयोन्मुख असल्यामुळें त्यांत शांतता नव्हती. नाटकें व इतर ललितकला यांच्या वाढीस शांततेच्या कालाची अनुकूलता अवश्य असते. ती जेव्हां नव्हती त्याकाळीं नाटकादि ललितकलांकडे लोकांचें लक्ष गेलें नाहीं हें साहजिकच होतें.

या कालांत महाराष्ट्रांत बरेच कवि झाले, व त्यांतील बरेच संत कवि असल्यामुळें त्यांनीं आपल्या काव्याचा ओघ नाटकादि ललितकलांकडे वळविला नाहीं. यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. महाराष्ट्राच्या उदयोन्मुख कालांत लोकांत शील व चैतन्य उत्पन्न करून त्यांस वैभवगिर्यारोहणाचा मार्ग दाखविण्याचें काम या आमच्या कवींनीं केलें. पेशव्यांची सत्ता कायम झाल्यावर महाराष्ट्राला जो कांहीं शांततेचा काल गेला तो ललितकलांकडे आमचें लक्ष जाण्यास अनुकूल होता. तरी त्या कालांत प्रसिद्धीस आलेल्या मोरोपंत, रामजोशी वगैरे कवींनीं या विषयाकडे लक्ष दिलें नाहीं. तरी पण मोरोपंतासारख्या कविवर्यांनीं आपल्या " रामरीतीं " त—

धातूत जसें हाटक, नाटकवर सर्व सुप्रबंधांत ।
तें अरसिकांत संप्रति निष्फळसें मुकुर जेंवि अंधांत ॥

इत्यादि शब्दांनीं आपला नाटकांबद्दलचा अनुकूल अभिप्राय व्यक्त केला आहे. या काळचा समाज नाटकास अनुकूल नसावा असें पंतांच्या उल्लेखावरून दिसतें. रामजोश्यांच्या कालीं तमाशे लोकप्रिय झाले होते असें दिसतें. पण त्यावेळीं महाराष्ट्रांत नाटकांचा ऊर्जितकाळ आला नाहीं. एकंदरींत मराठी नाटकांचें पेशवाईचे अखेरपर्यंत अस्तित्व नव्हतें. इंग्रजशाहींतच आमचें या विषयाकडे लक्ष गेलें. मराठी नाटकांचा काल अवघा गेल्या ७५ वर्षांचा आहे.

## २. मराठी नाटकांची सुरुवात.

मराठी नाटकांस सुरुवात करण्याचा मान सांगलीसंस्थानाधिपति कै. श्री. आप्पासाहेब यांजकडे आहे. इ. स. १८४२ सालीं सांगलीस उत्तर कानडा प्रांतांतील एक भागवत नांवाची मंडळी आली होती, व तिचे कांहीं खेळ श्री. आप्पासाहेब यांनीं पाहिले. अशा प्रकारचे खेळ मराठींत झाले तर बरें होईल असें श्रीमंतांस वाटून त्याप्रमाणें करण्याचें अवश्य तें काम त्यांनीं आपले आश्रित रा. विष्णुपंत भावे यांजकडे

सोंपविलें. त्यांनीं बरीच खटपट करून हें काम श्रीमंतांच्या मर्जीप्रमाणें तडीस नेलें, आणि येथूनच मराठी नाटकांस सुरुवात झाली.

रा. भावे यांनीं रचलेलें पहिलें नाटक 'सीतास्वयंवर' हें होय. याचा प्रथम प्रयोग १८४३ सालीं झाला. यानंतर रा. भावे यांनीं बरींच नाटकें पुढें आणलीं, परंतु तीं साहित्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं नसल्यामुळें आज उपलब्ध नाहींत. या वेळचीं नाटकें पुराणांतील कथांवर रचलेलीं असून त्यांत जुन्या कवींच्या कवितांचा बराच उपयोग केलेला असे. जेथें जुन्या कवींच्या कवितेनें काम होण्यासारखें नसेल, किंवा ज्या कथाभागावर जुनी कविता उपलब्ध नसेल, तेथेंच नवीन कविता करून भर घालावी लागे. या नाटकाच्या प्रयोगांचें स्वरूप सद्यःकालीन नाट्यप्रयोगाहून बरेंच भिन्न होतें. त्याकाळीं नाटकांतील पात्रांना कथानकाच्या अनुसंधानानें नाट्य करावयाचें, अवश्य असेल तेथें थोडेंसें भाषण करावयाचें, व बाकीचा कथाभाग व काव्य सूत्रधारानेंच म्हणावयाचें असे. उत्तरहिंदुस्थानांत प्रचारांत असलेल्या 'रामलीला' व 'कृष्णलीला' यांच्या प्रयोगांवरून आमच्या सुरवातीच्या नाटकांच्या प्रयोगांची कल्पना करतां येईल. यावेळच्या आमच्या नाट्यप्रयोगांचें स्वरूप व, वर्णन केल्याप्रमाणें होतें, हें वि. ज्ञा. विस्तार पु.३ अं. ७ मधें नाटक या विषयावर जो लेख आला आहे तो वाचला असतां आपल्या लक्षात येतें. हीं नाटकें त्यांतील राक्षसांच्या प्रवेशाच्या वेळच्या त्यांच्या आरोळ्यांच्या अनुसंधानानें 'अललडुर नाटकें' या नांवानें संबोधिलीं जातात.

या आमच्या मूळच्या नाटकांत स्थित्यंतर होत होत आज आपण पाहत आहोंत या स्थितीला येऊन पोंचलीं आहेत.आमच्या नाटकांतील ही वाढ प्रयोगांत व लेखनांत अशी दोन्हीं प्रकारांनीं झालेली आहे. आमच्या नाटकाच्या प्रयोगांतील क्रांतीचा इतिहास रा. आप्पाजी विष्णु कुळकर्णी यांच्या "मराठी रंगभूमि" या पुस्तकांत ग्रथित केलेला आहे. आज आपल्यास मराठी नाटकाच्या स्वरूपांत झालेल्या क्रांतीचाच विचार करावयाचा आहे.

मराठी नाटकाची सुरुवात जरी १८४३ सालीं झाली, तरी मराठी नाट्यग्रंथांची सुरुवात १८६७ सालीं झाली. मराठींतील प्रथम नाट्यग्रंथ किंवा नाटक कै. परशुरामपंत तात्या गोडबोले यांचें **वेणीसंहार** हें होय; व येथूनच मराठी नाट्यसाहित्याचीं सुरवात झाली.

### ३. मराठी नाटकांची सद्यःस्थिति.*

इ. स. १८५७ सालीं मराठी नाटकांस सुरुवात झाल्यापासून आतांपर्यंतच्या सुमारें ६३ वर्षांच्या अवधींत मराठी वाङ्मयाच्या इतर प्रकारांपेक्षां नाटकांचीच वाढ जास्त झाली आहे असें आपल्यास दिसतें. आजपर्यंत मराठींत सुमारें ९०० नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. आज तीं सर्व उपलब्ध नाहींत ही दुःखाची गोष्ट आहे. तरी अलीकडे ग्रंथसंग्रहालयें स्थापन होऊं लागल्यामुळें यांपैकीं बरींच नाटकें एकत्र सांपडणें शक्य झालें आहे. सध्यां सुमारें ५५० नाटकें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत संग्रहित आहेत. कांहीं थोडींशीं सरकारजमा झालीं आहेत. ही मराठी नाटकांची वाढ एकाच प्रकारची नसून त्यांत बहुविध प्रकार आहेत. गद्यपद्यमिश्र ( संस्कृत नाटकांच्या धर्तीवर ),गद्य, संगीत, प्रहसनें, साररूपसें अशा अनेक प्रकारचे नाट्यग्रन्थ मराठींत झालेले आहेत. शिवाय अलीकडे नाट्यविषयक वाङ्मयासही मराठींत सुरुवात झालली आहे. ही मराठी नाटकांची वाढ एकदम झालेली नसून हळू हळू व प्रसंगाप्रसंगानें झाली आहे. मराठी रंगभूमींत होणाऱ्या क्रांतीच्या अनुरोधानें मराठी नाट्यवाङ्मयांतहि क्रांति होत गेली आहे. इ. स. १८५७ सालीं मराठी नाटकांस सुरुवात झाल्यापासून पुढील तीन वर्षांत दोन नवीन नाटकें प्रसिद्ध झालीं, व तींही संस्कृत नाटकांचीं भाषांतररूपेंच होतीं. तीं 'उत्तररामचरित्र' आणि 'प्रसन्नराघव' हीं होत. १८६१ ते १८७० या दशकांत २२ नाटकें प्रसिद्ध झालीं असून या कालांतील नाटकें संस्कृत नाटकांचीं भाषांतरें, इंग्रजी नाटकाचीं भाषांतरें, पौराणिक, व काल्पनिक, अशीं अनेक प्रकारचीं आहेत.

* ही माहिती 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि' या पुस्तकाच्या आधारें दिली आहे.

या पुढील दशकांत मराठी नाटकांची ही वाढ चालू राहिली. या वेळांत सुमारें ३८ नाटकें लोकांसमोर आलीं. यानंतरचें दशक म्हणजे १८८१–१८९०. हा काल मराठी नाटकांच्या इतिहासांत विशेष महत्त्वाचा आहे. या दशकांत २०० हून जास्त नाटकें जन्मास आलीं. हीं नाटकें अनेक प्रकारचीं होतीं एवढेंच नव्हे, तर, त्यांत प्रहसनांची भर याच वेळीं पडली. तसेंच १८७९ सालीं अवतीर्ण झालेला संगीत नाटकांचा प्रकार १८८० सालीं स्थापन झालेल्या किर्लोस्कर नाटक मंडळीच्या द्वारें लोकप्रसिद्ध व लोकप्रिय झाला. या कालांत मराठींत जितकीं नाटकें झालीं तितकीं यापुढील कोणत्याही दशकांत आजपर्यंत प्रसिद्ध झालीं नाहींत.

### ४. मराठी नाटकांतील क्रांति.

मराठी नाटकांत व नाट्यप्रयोगांत आजपर्यंत जीं अनेक स्थित्यंतरें झालेलीं आहेत, तीं बुद्धिपुरस्सर घडविलेलीं आहेत, किंवा परिस्थित्यनुरूप सहज झालेलीं आहेत, हें ठरविणें बरेंच अवघड आहे. बुद्धिपुरस्सर घडविलेल्या स्थित्यंतरास आपण क्रांति असें म्हणतों. मराठींत नाटकें होऊं लागलीं तेव्हां तीं ललितांचें सुधारलेलें रूप होतीं; व आरंभींचे नाट्यग्रंथ हे नाट्यवाङ्मय तयार करण्याच्या हेतूपेक्षां किंवा संस्कृत ग्रंथ असंस्कृत लोकांच्या आटोक्यांत आणून देण्याच्या उद्देशापेक्षां सरकाराकडून व डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीसारख्या वाङ्मयोत्तेजक संस्थांकडून मिळणाऱ्या आश्रयाच्या आशेनें व उत्तेजनानें लिहिले गेले असें आपल्यास दिसतें. विलायतेंतील पार्लमेंटमध्यें झालेल्या प्रश्नोत्तरांमुळें देशी भाषेंतील ग्रंथांकडे येथील सरकारचें लक्ष कसें गेलें, हें आपल्यास वि. ज्ञा. वि.,पु. ११, अं. ७ मध्यें पाहावयास मिळतें. पुढें पुणें–मुंबई येथील सुशिक्षित मंडळीचें या विषयाकडे लक्ष जाऊन त्या वेळच्या कॉलेजमधील विद्यार्थ्यांनीं नाट्यप्रयोग करून महाराष्ट्र समाजास या विषयाची ओळख करून दिली; व याच सुमारास स्थापन झालेल्या 'आर्योद्धारक' आणि 'इचलकरंजीकर' या नाटकमंडळ्यांनीं या विषयास चालन दिलें, आणि मराठी रंगभूमीस व नाट्यग्रंथांस निराळें वळण लावलें. यांत पुढें संगीताची भर पडून आमच्या नाटकांस सध्यांचें रूप प्राप्त झालें. यावरून मराठी नाटकांच्या सुधारणेच्या बुद्धिपुरस्सर प्रयत्नांच्या सुरवातीचा काल १८७५ ते १८८० हा येतो, व येथूनच मराठी नाटकांच्या खऱ्या इतिहासास व क्रांतीस सुरुवात होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नाटकांचा उगम लोकांच्या मनोरंजनप्रवृत्तींत आहे. पेशवाईच्या अखेरीस प्रचारांत आलेलीं ललितें आणि तमाशे यांच्यांतील ग्राम्य प्रकार सर्वांस सारखेच प्रिय होण्यासारखे नसल्यामुळें नाटकें होऊं लागतांच तीं लोकप्रिय होऊं लागलीं. नाटकें स-रस असल्यामुळें प्रेक्षकांच्या वृत्ति आंदोलित करण्यास जास्त समर्थ असतात. आपल्या वृत्तींच्या लहरींबरोबर हेलकावे खाण्यांत जो आनंद होतो त्यामुळें कोणाही मनुष्यास नाटकें आवडणें साहजिक आहे. केवळच नीरस असेल तोच नाटकांबद्दल तिरस्कार दाखवील. "नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनं' असा कविवर कालिदासाचा नाटकांबद्दलचा अभिप्राय आहे तो चूक आहे असें कोण म्हणेल ?

तसेंच अस्सलापेक्षां त्याची नक्कल आपल्यास जास्त आकर्षक वाटते. जगांत प्रत्येकजण रोज जें नाटक करीत असतो त्यापेक्षां रंगभूमीवरील नाटक आपल्यास जास्त आवडतें. नाटककार आपल्या दृष्टिपथांत येणाऱ्या गोष्टींचें व मनुष्यस्वभावाचें जें चित्र रंगवितो, त्याचा प्रयोग प्रत्यक्ष व्यवहारांतील प्रसंगांपेक्षां आमचें चित्त जास्त आकर्षण करून घेतो जगांत दिसणाऱ्या अनेक गोष्टींतून योग्य त्याच निवडून घेऊन, त्यांत आपल्या कल्पनाशक्तीनें भर घालून, इतस्ततः पसरलेल्या बहुविध प्रसंगांस एकत्र आणून, रसपरिपोषक रीतीनें त्यांची योजना करून व त्यांचा परिपाकही आपल्यापुढें मांडून, नाटककार आपलें नाटक तयार करतो. या व अशाच कारणांमुळें प्रत्यक्ष व्यवहारापेक्षां नाटक जास्त मनोवेधक होतें.

दुसरें, लेखकाच्या कौशल्यानें त्याच्या कृतींत त्याच्या कल्पनेनें रेखाटलेलें चित्र हें त्याच्या विचाराप्रमाणें आदर्शचित्र असतें, व तो ज्या समाजांत असतो त्या समाजांत त्या कालीं खेळत असणाऱ्या विचारांचें प्रतिबिंब त्याच्या लेखांत उतरत असतें, व ती कृति

लोकमान्यतेस पात्र होतें. जें नाटक लोकांच्या विचारांत अस्पष्ट असणाऱ्या विचारांस व ध्येयांस स्पष्ट व मनोरंजक रीतीनें लोकांपुढें मांडतें तें लोकांस प्रिय झाल्याशिवाय कसें राहील ?

‘ अललडुर्र ’ नाटकांतील कथाप्रसंग पौराणिक असत. हीं नाटकें केवळ मनोरंजनाच्या उद्देशानें करीत असल्यामुळें तीं केवळ पौराणिक कथांचें दृश्यरूप असत यामुळें त्यांत अद्भुत प्रसंग व अस्वाभाविक पात्रें असणें साहजिक होतें. अशा नाटकांचा लोकांच्या मनावर ठसा उमटणें कठिण असतें. त्यांनीं लोकांच्या मनांत कौतुक उत्पन्न होतें, पण अनुकरणप्रवृत्ति किंवा आपलेपणा उत्पन्न होत नाहीं. तेव्हां आपल्या परिचयाचे किंवा शक्य कोटींतील प्रसंग व मानवी पात्रें असणारीं नाटकें लिहिण्याकडे आमची प्रवृत्ति झाली. या प्रवृत्तीमुळें कथानक पौराणिक असलें तरी त्यांत शक्याशक्यतेचा विचार करून त्यांतील अद्भुतता कमी करण्यांत येऊं लागली, व पुराणांतील सर्वच प्रसंग नाट्यविषयास योग्य न ठरवितां त्यांतील योग्य ते प्रसंग निवडून त्यांतही पात्रांचे स्वभाव, रस, व कथानकें यांच्या परिपोषाकडे लक्ष देण्यांत येऊं लागलें. नाटकांतील प्रसंग व व्यक्ति यांचा वस्तुस्थितीशीं मेळ घालण्याकडे आमचें लक्ष लागलें, व त्यामुळें त्यांच्यांत व आमच्यांत दिसणारें अंतर कमी होत जाऊन ते प्रसंग व तीं पात्रें आमच्यापैकींच आहेत असें वाटूं लागलें. या आमच्या मानसिक प्रवृत्तीमुळें गद्य किंवा ‘ बुकिश ’ नाटकें प्रचारांत आलीं, व आमचीं नाटकें धांगडधिंग्याच्या स्वरूपांतून व्यवस्थित स्वरूपांत आलीं.

परंतु एवढ्यानें लोकांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. गानप्रियता ही मनुष्यास स्वाभाविक असून गायन हें समाजाच्या कोणत्याही अवस्थेंत त्याच्या मनोरंजनाच्या प्रकारांत अग्रस्थानीं असतें. अशा स्थितींत सर्वप्रिय अशा नाटकासारख्या उच्च प्रकारच्या करमणुकींत त्याची योजना व्हावी अशी आम्हांस इच्छा झाल्यास त्यांत नवल काय ? नाटक व गायन यांचा संयोग झाल्यास गायनाच्या उपयोगाचें क्षेत्र वाढेल, व नाटकाच्या सुधारणेंत भर पडेल,असें वाटून संस्कृत नाटकांच्या धर्तीवर श्लोकांच्या ऐवजीं गाण्यासारखीं पदें घालून नाटकें लिहिण्याची पद्धति अमलांत आली. हीं गद्यपद्यमिश्रित नाटकें ‘ संगीत नाटकें ’ या नांवानें आज आमच्या परिचयाचीं झालीं आहेत. अशा प्रकारें आमच्या मराठी नाटकांत क्रांति होत आली आहे.

## ५. ही क्रांति घडविणारे लेखक.

मराठी नाटकांची संख्या ज्या मानानें उपरिनिर्दिष्ट अल्प कालांत बरीच वाढलेली आहे, त्या मानानें मराठी नाटकें लिहिणारांची संख्याही बरीच मोठी आहे. मराठी नाटककारांत १०।२० लेखकच प्रसिद्ध असले तरी एकंदर लेखकांची संख्या याहून किती तरी जास्त आहे. प्रसिद्ध नाटककारांत अग्रमान कै. परशुरामपंत तात्या गोडबोले यांचा आहे. यांचीं नाटकें संस्कृत नाटकांचीं भाषांतरें आहेत. यांच्यानंतर नट व नाटककार कै. गोविंदराव देवल यांचें नांव आपल्या पुढें येतें. यांचीं नाटकें गद्य, संगीत, स्वतंत्र व रूपांतर अशीं बहुविध प्रकारचीं आहेत. मराठी नाटकांची चर्चा करावयाची झाल्यास कै. देवल यांचें नांव प्रमुखपणानें आपल्यापुढें येतें. तसेंच कै. नारायण बापूजी कानिटकर व कै. शंकर मोरो रानडे या दोघां मराठी नाटककारांनीं मराठी नाट्यवाङ्मयांत महत्त्वाची भर टाकलेली आहे. प्रचलित विषयांवर लोकमत तयार करण्याच्या कामीं नाटकांचा फार उपयोग होतो हें ओळखून त्या दिशेनें प्रयत्न करण्याच्या कामीं हें लेखकद्वय अग्रेसर होतें असें यांची लेखनकृति पाहतां आपल्या लक्षांत सहज येतें. यानंतर कै. सोकर बापूजी त्रिलोकेकर यांचें नांव आपल्यापुढें येतें. यांनीं जरी संगीत नाटकांस सुरुवात केलेली असली तरी मराठी नाटकांत संगीताची भर टाकून हा प्रकार लोकप्रिय करण्याचा मान कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांसच देण्यांत येतो. तसेंच मराठी नाटकांस पदांच्या नवीन चाली, श्लेष आणि विनोद यांची जोड देऊन त्यांस नवीन वळण लावण्याबद्दल रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचा उल्लेख करणें अवश्य आहे. मराठी नाटकांत ओजस्विता उत्पन्न करून आधुनिक विचारांची त्यांच्या द्वारें चर्चा करण्याचा उपक्रम करण्याबद्दल रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांचें नांव नमूद करणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें याच गुणांचा अति-

रेक करून व विनोदाचा प्रकार नाटकांस बंधनकारक होण्याइतकें त्यास महत्त्व देऊन, स्वतःच्या मंत्रसामर्थ्यानें उत्पन्न केलेल्या राक्षसाच्या भक्ष्यस्थानीं स्वतःच पडणाऱ्या यांत्रिकाप्रमाणें त्यांची स्थिति झालेली असल्यामुळें, मराठी नाटकांस इष्टाबरोबर अनिष्ट वळण लावण्याबद्दलही त्यांचा नामनिर्देश करावा लागतो. आपल्या नाटकांचा वाचक व प्रेक्षक यांच्यावर किती व कसा परिणाम होतो याकडे न पाहतां आपलीं नाटकें शास्त्रशुद्ध कशीं होतील या कडेच लक्ष देऊन नाटकें लिहिणारे म्हणून रा. नरसिंह चिंतामण केळकर हे आपल्यापुढें येतात. रा. वासुदेव शास्त्री खरे यांचीं नाटकें वाचून व पाहून तीं सरळ व शुद्ध, पण मनावर कोणताच परिणाम न करणारीं अशीं आहेत, असें म्हणावें लागतें. कै. राम गणेश गडकरी हे अलीकडे प्रसिद्धीस आलेले, पण अल्पावकाशांत लोकप्रिय झालेले नाटककार होत. यांच्या नाटकांत रा. श्री. कृ. कोल्हटकर व रा. खाडिलकर यांच्या गुणावगुणांचा अतिरेक झालेला आहे हें त्यांचें कोणतेंही नाटक पाहून आपल्यास पटेल.

वरील लेखकांशिवाय मराठी नाटकांच्या चर्चेंत ज्यांचें नांव वगळतां येणार नाहीं, पण ज्यांची कृति मराठी नाटकांचा दर्जा वाढविण्यापेक्षां त्यास अनिष्ट वळण लावण्याबद्दलच प्रसिद्ध आहे, असे कांहीं नाट्यलेखक आहेत. त्यांत कै. माधवराव पाटणकर, कै. नेवाळकर, आणि कै. बाबाजी दौलतराव राणे हे प्रमुख होत. यांचीं नाटकें म्हणजे संगीत असून कोणासही म्हणतां येतील अशीं गद्यरूप पद्य असणारीं, ज्यांत विनोदाच्या नांवाखालीं अश्लीलतेला उत्तेजन दिलें आहे, आणि ज्यांचा हेतु वाङ्मयांत भर टाकण्यापेक्षां किंवा नाट्यकलेचा अभ्युदय करण्यापेक्षां सवंग लोकप्रियतेवर भरपूर द्रव्यार्जन करण्याचाच आहे, अशीं आहेत.

यांशिवाय मराठी नाटकांच्या संख्येंत भर टाकण्यास कारणीभूत झालेले अनेक लेखक आहेत. त्यांत कै. वासुदेवराव केळकर, प्रो. शि. म. परांजपे, रा. वा. रं. शिरवळकर, रा. य. ना. टिपणीस, रा. अ. वा. बर्वे, कै. डोंगरे वगैरे लोक प्रमुख होत.

## ६. नाटकाचा उद्देश, स्वरूप, व कार्य.

नाटकाचा मूळ उद्देश मनोरंजन आहे याबद्दल दोन मतें होणार नाहींत. परंतु त्याचा हा एकच हेतु असता तर त्याला आपण जें महत्त्व देतों तें दिलें नसतें, व देण्याचें कारणही नव्हतें. करमणुकीचे जे इतर प्रकार आहेत त्यांपैकींच हा एक जास्त खर्चाचा व श्रमाचा प्रकार आहे एवढेंच आपण त्याबद्दल म्हटलें असतें. परंतु वस्तुस्थिति निराळी आहे, व त्याचें कारण, नाटक हें एक मनोरंजनाचा प्रकार आहे एवढेंच नसून तें शिक्षणाचें एक साधन आहे, हें होय. नाटकांमुळें राजकीय विचारांत क्रांति झालेली दाखवितां येणार नाहीं, सामाजिक चालीरीतींत घडामोड होण्यास नाटकें कारण झालीं असें सिद्ध करतां येणार नाहीं, किंवा धर्मसमजुतींत त्यांच्यामुळें फरक पडला असेंही म्हणतां येणार नाहीं; परंतु नाटकांतील विषयानुरोधानें होणाऱ्या चर्चेमुळें या सर्व विषयांवरील लेखकाचीं मतें लोकांसमोर येऊन त्यांच्याबद्दल लोकांच्या मनावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं, एवढें तरी आपल्यास कबूल करावें लागेल. नाटकें कोणत्याही विषयावरील लोकमतांत एकदम क्रांति घडवून आणीत नसतील; तरी वाङ्मय हें जर लोकमतास वळण लावण्याचें प्रमुख साधन आहे तर त्यांतीलच एक प्रकार जें नाटक तें तरी या बाबतींत कार्यकर झाल्याशिवाय कसें राहील? नाटकांतील विषय हा दृश्यरूपानें लोकसमाजापुढें येत असल्यामुळें तो साक्षर व निरक्षर अशा सर्व लोकांस समजतो, व यामुळें वाङ्मयाच्या इतर प्रकारांपेक्षां नाटक हें लोकशिक्षणाचें जास्त फलदायी साधन आहे असेंच म्हणावें लागतें. निदान नाटक हें बौद्धिक शिक्षणाचें तरी एक उत्तम साधन आहे हें कोणासही नाकबूल करतां यावयाचें नाहीं. नाटक हें काव्याचा एक पूर्णावस्थेस पोंचलेला प्रकार आहे. काव्यांत कल्पना प्रमुखत्वानें खेळत असते. नाटक समजावयासही आपल्यास आपल्या कल्पनाशक्तीचें साह्य घ्यावें लागतें. या योगानें आपली कल्पनाशक्ति वाढते, व याबरोबरच कवीचे विचार समजून घेऊन ते बरे वाईट ठरविण्यास आपल्यास आपली विचारशक्तीही उपयोगांत आणावी

लागते. एवंच नाटकाचा मनोरंजन व शिक्षण असा दुहेरी उद्देश व उपयोग आहे.

नाटक हें एक काव्याचा प्रकार असल्यामुळें काव्याचे गुण त्यांत असले पाहिजेत हें उघड आहे. काव्याचा आत्मा जो रस तोच नाटकाचाही जीव आहे. 'काव्येषु नाटकं रम्यं' तें कां ? तर काव्यापेक्षां नाटकांत कथानक आणि स्वभावदर्शन हे गुण जास्त असतात म्हणून. रघुवंशादि महाकाव्यांतही कथानक असतें, परंतु तें नाटकांतील कथानकासारखें आटोपशीर पण रसपरिपोषक असें नसतें, व तें दृश्यरूपानें आपल्यापुढें येण्यास अनुकूल असें नसतें. वाच्यार्थापेक्षां व्यंग्यार्थ असणारीं काव्यें जास्त सरस वाटतात, आणि नाटकांत तर बराच भाग वाचकांस व प्रेक्षकांस आपल्या कल्पनेनें भरून काढून कवीचें हृद्गत समजून घ्यावें लागतें. यामुळेंही काव्यामध्यें नाटक रम्य आहे असें आपण म्हणतों.

नाटकांतील कथानकास अनुरूप असे विचार त्यांत घालावयाचे असें जरी लेखकास बंधन असतें, तरी त्याची मनोभूमि त्याच्या लेखांत दृग्गोचर झाल्याशिवाय राहत नाहीं. आणि लेखकाचे विचार हे तो ज्या कालांत व परिस्थितींत वाढला असेल त्याप्रमाणें बनलेले असतात. अर्थात् कवीचें नाटक हें त्याच्या मनोभूमीप्रमाणेंच त्याच्या कालाचेंही आदर्श असतें.

असें आहे तरी प्रत्येक नाटक या कसाला उतरतें किंवा उतरलें पाहिजे असें नाहीं. कित्येक नाटकें केवळ मनोरंजनाच्याच उद्देशानें लिहिलेलीं असतील, तर प्रबोधचंद्रोदयासारख्या कित्येक नाटकांचा मुख्य उद्देश शिक्षण हाच असेल. शेक्सपियरचीं ऐतिहासिक नाटकें कवीच्या कालाचीं द्योतक नसून कवीनें स्वतः नाट्यविषयक कालांत प्रवेश केल्याचें दाखवितील, तर रा. खाडिलकरांचीं नाटकें कोणत्याही कथानकावर असलीं तरी त्यांत कवीचे सद्यःकालीन विचार समाजासमोर आणल्याशिवाय राहणार नाहींत. असें असलें तरी उपरिनिर्दिष्ट सामान्य नियमास बाध येत नाहीं.

### ७. मराठी नाटकांचे प्रकार.

मराठींतील नाटकसमूहाकडे पाहिलें असतां, त्यांत इंग्रजी व संस्कृत नाटकांचीं भाषांतरें, ऐतिहासिक, काल्पनिक व सामाजिक असे सर्व प्रकार असल्याचें आपल्यास दिसतें. हीं नाटकें मराठी रंगभूमींतील क्रांतीच्या अनुरोधानें झालेलीं आहेत. प्रथम मराठींत नाटकें सुरू झालीं तेव्हां तीं केवळ प्रयोगाकरतांच होतीं. त्यांना वाङ्मयात्मक महत्त्व मुळींच नव्हतें. पुढें वाङ्मयाच्या दृष्टीनें नाटकें होऊं लागलीं तेव्हां तीं प्रयोगाच्या दृष्टीनें लिहिलीं नाहींत. मराठींतील सुरवातीचीं नाटकें संस्कृत नाटकांचीं यथातथ भाषांतरें असत. तीं भाषेच्या दृष्टीनें निर्दोष व मूळ ग्रन्थ समजण्यास उपयोगी असत. मूळ कवीचें हृद्गत आपल्या भाषेत होईल तितकें मुळाबरहुकूम आणावयाचें हा तत्कालीन लेखकांचा हेतु असे, हें कै. परशुरामपंत तात्या गोडबोले यांच्या कृतीकडे पाहतां आपल्या लक्षांत येतें. हीच दृष्टि त्या कालीं इंग्रजींतून भाषांतर केलेल्या नाटकांसंबंधानें होती; याची साक्ष कै. महादेव शास्त्री कोल्हटकर यांच्या अथेल्लो नाटकाकडे पाहून पटते. पुढें केवळ अललटुर नाटकांपेक्षां वाङ्मयदृष्टीनें सरस अशा नाटकांचे प्रयोग करण्याकडे आमची प्रवृत्ति होऊं लागली. त्यावेळीं 'आर्योद्धारक नाटक मंडळी' स्थापन होऊन त्यांतील प्रमुख नट कै. देवल यांनीं प्रयोगास योग्य अशीं नाटकें निर्माण केलीं, व येथूनच वाङ्मय आणि नाट्य या दोहोंचा आमच्या नाटकांत संगम झाला. आतां आपण आजपर्यंत झालेल्या अनेक प्रकारच्या मराठी नाटकांचें विहंगमदृष्टीनें निरीक्षण करूं.

### (अ.) भाषांतररूप आणि रूपांतरित नाटकें.

मराठी नाटकांतील बराच मोठा भाग परभाषांतील ग्रन्थांच्या आधारानें तयार झालेला आहे, व अशा नाटकांतील बराच मोठा भाग चांगला आहे. या कामीं संस्कृत आणि इंग्रजी या दोन भाषांतील वाङ्मयाचा आम्हीं उपयोग केलेला आहे. याशिवाय कांहीं हिंदी व बंगाली नाटकांचींही मराठींत भाषांतरें झालेलीं आहेत. संस्कृत नाटकाचें भाषांतर करणें हें इंग्रजी नाटकाच्या भाषांतरापेक्षां पुरेंच सोपें आहे. संस्कृत भाषेचा व मराठी भाषेचा जन्यजननीसंबंध असल्यामुळें व संस्कृत नाटकांच्या कथानकांतील व पात्रांच्या स्वभावांतील संस्कृति ही आम्हांस परकी नसल्यामुळें भाषाज्ञान असलें म्हणजे संस्कृत नाटकाचें भाषांतर करण्यास जड जात नाहीं. परंतु इंग्रजी भाषा परकी,

आंग्ल संस्कृति परकी, इंग्रजाच्या चालीरीति व समाजव्यवस्था वेगळी. यांमुळें इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें लोकप्रिय होणें कठीण असतें, व त्यांचें आमच्या चालीरीतींशीं व विचारांशीं जुळेल असें रूपांतर करणेंही कठीण असतें. अशा स्थितींतही मराठी भाषेंत दुर्गा, झुंझारराव, तारा, विकारविलसित, त्राटिका वगैरे नाटकें इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें असूनही भूषणभूत झालीं आहेत. प्रेमध्वज, बायकांचें बंड, चंद्रगुप्त, हीं नाटकें इंग्रजी कादंबऱ्यांचीं नाटकरूपांत रूपातरें असूनही तीं स्वतंत्र नाटकांप्रमाणें भासतात, इतकीं तीं बेमालूम झालीं आहेत. रा. तालचेरकर यांचें 'रावबहादुर पर्वत्या' हें मोलियरच्या एका प्रहसनाचें रूपांतर असूनही त्यांत इतरांप्रमाणें आमच्या समाजाचें चित्र दृष्टीस पडत असल्यामुळें तें आम्हांस परकी वाटत नाहीं. संगीत शांकुतल हें संस्कृत नाटकाचें भाषांतर आहे, पण त्याला स्वतंत्रापेक्षां कोण कमी लेखील?

स्वतंत्र नाटकाचा दर्जा रूपांतरित नाटकापेक्षां जरी वर असला तरी उत्तम प्रकारचें रूपांतर करणें हें कमी योग्यतेचें ठरत नाहीं. बेमालूम रूपांतर करण्यास लेखकाला सामाजिक चालीरीतींच्या माहितीची भाषेच्या ज्ञानाइतकीच जरूरी असते, व त्याची कल्पनाशक्तीही उज्ज्वल असावी लागते. परकीय भाषेंतील नाटकांचें किंवा कादंबऱ्यांचें रूपांतर करतांना लेखक कितीही कुशल असला तरी 'त्राटिकें'तील प्रतापरावाचें आपल्या विचित्र पोषाखांत लग्नास उभे राहणें, व लग्न लागतांच पत्नीचा हात धरून तिला आपल्या घरीं ओढून नेणें, किंवा हॅम्लेटच्या आईनें पतिनिधनानंतर बारा दिवसांनीं स्वतःच्या दिराशीं पाट लावणें, असे आमच्या समाजास अपरिचित प्रकार त्याच्या ग्रंथांत राहाणें अपरिहार्य आहे. तरी अशा अशक्य गोष्टी आपल्या चालीरीतींशीं जुळवितां न आल्या तरी त्या नाटकांची योग्यता कमी होत नाहीं, किंवा या अडचणी टाळतां येत नसल्या तरी अशीं सुंदर रूपांतरें होऊं नयेत असेंही कोणी म्हणणार नाहीं. रूपांतरापेक्षां मूळ नांवें व चालीरीती कायम ठेवून भाषांतरें करावीं, असें कित्येकांस वाटतें. अशा भाषांतरांनीं मूळ कवीचें हृद्गत कळण्यास मदत होते, व रूपांतरांतील चालीरीतींचा गोंधळ राहत नाहीं, हें खरें असलें, तरी त्यामुळें त्या कथानकांत आपलेपणा उत्पन्न होत नसल्यामुळें त्याच्या वाचनापासून व्हावा तसा आनंद होत नाहीं, अगर त्याचा प्रयोगही आपल्यास तेवढा रुचत नाहीं. मात्र ऐतिहासिक नाटकांची मराठी प्रतिकृति करावयाची झाल्यास ती भाषांतररूप करणें श्रेयस्कर आहे. या योगानें त्यांतील कथानकाचा व पात्रांच्या स्वभावाचा ऐतिहासिकपणा कायम राहील. कारण त्यांचें ऐतिहासिकत्व नाहींसें झाल्यास त्यांच्यावर काल्पनिक इतिहासाचा आरोप करावा लागून त्यांच्या महत्त्वास उणेपणा येतो. पाश्चात्य ऐतिहासिक व्यक्ति तद्देशीय पोषाखांत मराठी बोलतांना ऐकून आपल्यास आश्चर्य वाटेल, असा यावर एक आक्षेप येण्यासारखा आहे. परंतु त्यांच्या ऐतिहासिक महत्त्वाकरितां आपण या भाषाविरोधाकडे दुर्लक्ष केलें पाहिजे. रोमचा ज्युलियस सीझर जसा शेक्सपियरच्या कृतींत इंग्रजी बोलतो, तसाच त्याला मराठी भाषेचा आश्रय घेण्यास अडचण असूं नये. पृथ्वीसिंग किंवा महाराणा प्रतापसिंह हे देखील जर आपली भाषा सोडून मराठी बोललेले आपल्यास खपतात, तर तिसऱ्या रिचर्डला किंवा पांचव्या हेन्रीला मराठी कां बोलतां येऊं नये?

मात्र भाषांतर किंवा रूपांतर करावयास घ्यावयाचें पुस्तक निवड करून घेतलें पाहिजे. त्यांत कांहीं विशेष विचार किंवा प्रसंग असावे, व त्याच्या प्रतिकृतीच्या द्वारें एखाद्या थोर लेखकाचा महाराष्ट्र वाचकांस परिचय व्हावा. उगीच कोणत्या तरी पुस्तकाचें रूपांतर करून लेखक होण्याची हांव धरण्यांत लेखकाचे श्रम व्यर्थ जाण्याचाच संभव फार असतो.

या सदरांत येणाऱ्या नाटकांत उपरिनिर्दिष्ट नाटकांशिवाय मानाजीराव, वीरमणि आणि शृंगारसुंदरी, हिंमतबहाद्दर, समजुतीचा घोंटाळा, मोहविलसित वगैरे बरींच नाटकें चांगलीं आहेत. परंतु रूपांतर करतांना रूपांतरकारास मूळांत अवश्य तो फेरफार करावा लागतो; तरी त्यानें मूळ कृतीचें हृद्गत कायम ठेवलें पाहिजे, नाहीं तर 'अतिपीडचरित' नाटक चांगलें असूनही त्याचा शेवट आनंदपर्यवसायी केल्यामुळें किंग लीयरचा परिणाम त्याच्या रूपांतरापासून व्हावयाचा तसा होत नाहीं असें म्हणावें लागतें.

इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें किंवा रूपांतरें करतांना कै. प्रि. आगरकरांसारख्या विद्वानाच्या हातून देखील

कशा चुका होतात, हें त्यांच्या विकारविलसितावरील वि. ज्ञा. विस्तारांतील परिक्षणात्मक लेख वाचले असतां वाचकांस दिसून येईल, व त्यावरून हें काम किती कठिण आहे याचीही कल्पना होईल. आंग्ल कवि एड्वर्ड यंग-कृत 'रिव्हेंज' या नाटकाच्या रा. जयवंतकृत 'भयंकर सूड' या प्रतिकृतीवर वि. ज्ञा. वि., पु. २७, अं. ७।८ मध्यें आलेला अभिप्राय वाचला असतां पाश्चिमात्य नाटकांचें रूपांतर करणें किती कठिण आहे हें स्पष्ट होईल. "मराठी लेखकांस पाश्चत्य कवींचें ज्ञानरत्न आपल्या ग्रंथमालेंत ओंवावयाचें असल्यास हरएक तऱ्हेनें मराठी कोंदण निर्माण करणें भाग आहे. पण त्यांच्या आमच्या रीतिभाती इतक्या कांहीं भिन्न आहेत कीं मूळांत कोणते फेरफार केले असतां मूळ ग्रंथास मराठी पेहराव देण्याचें श्रेय येईल हें आज किती एक वर्षें मुकरर ठरलेंच नव्हतें,..." व अजूनही या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागलेला नाहीं.

## ( आ. ) पौराणिक नाटकें.

संस्कृतमधून भाषांतर होऊन आलेल्या नाटकांतील उत्तररामचरितादि बहुतेक नाटकें पौराणिक कथाभागांवरच रचलेलीं आहेत. अलीकडील लेखकांच्या कृतींतील कृष्णार्जुनयुद्ध, विद्याहरण, सत्त्वपरीक्षा, सौभद्र, कुंजविहारी वगैरे गद्य व संगीत नाटकेंही पौराणिकच होत. आमच्या पुराणांतून नाटकास योग्य अशा कथांचा किती तरी संग्रह आहे. परंतु पुराणांत कथा असतात तरी त्या सर्वच नाट्यविषय होतील असें म्हणतां येणार नाहीं. त्यांतील अद्भुतता व अशक्यता यांचा लोप करतां येत नसल्यामुळें त्यांच्यांतून निवड करणें अवश्य आहे. जुन्या संस्कृत नाटकांतील पौराणिक कथाभागांतून अद्भुतता कायम आहे; व ती होतां होईल तों कमी करावी असा आधुनिक नाटककारांनीं प्रयत्न केला तरी ती अगदीं नाहींशी होत नाहीं. उत्तररामचरितासारखीं नाटकें काव्य या दृष्टीनें उत्तम असलीं तरी प्रयोगास तीं तशीं ठरत नाहींत. तसें 'विद्याहरण' प्रयोगानुकूल असलें तरी काव्य या दृष्टीनें सारस्वतांत तें तितकें सरस ठरणार नाहीं. 'सत्वपरीक्षा' नाटकांत हरिश्चंद्राची सृष्टि आपल्या सारखीच होती असें दाखविण्याचा प्रयत्न करीत असतां शेवटीं श्रीशंकराचें रंगभूमीवर दर्शन होतांच ती सृष्टि आपल्या सृष्टीहून भिन्न होती असें एकदम लक्षांत येऊन पूर्वीपासून झालेला ग्रह एकदम नाहींसा होतो. कृष्णार्जुनयुद्धांत 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' हें तत्त्व कितीही सुंदर तऱ्हेनें मांडलेलें असलें तरी गंधर्वाचें विमान पाहतांच त्याचें वस्तुस्थितिरूप नाश पावतें. सौभद्रांतील घटोत्कचाचा प्रवेश हा अशाच अद्भुत प्रकारांपैकीं होय. तेव्हां पौराणिक कथाभाग घेतला असतां त्यांतील अद्भुतता जरी अगदीं नाहींशी होणार नाहीं तरी होतां होईल तों ती कमी येण्याचा प्रयत्न करतांना तो काल आधुनिक कालाशीं सदृश होता असा त्यांतील उद्गारांवरून वाचकांचा किंवा प्रेक्षकांचा ग्रह होऊं देतां कामा नये. पौराणिक नाटकांत कथाभागावर प्रकाश पाडण्याच्या, प्रयोगाच्या, भाषेच्या व विनोदाच्या दृष्टीनें रा. वरेरकरकृत 'कुंजविहारी' नाटक उत्तम ठरेल असें वाटतें. तेंच, याच कृष्णचरित्राच्या भागावर लिहिलेलें पण ग्राम्य विनोद व सीनसीनरी यांच्या भरीं भरून त्यांत आणलेल्या अद्भुततेच्या योगानें, रा. टिपणीसकृत 'राधामाधव' कसें फिकें पडतें हें पाहण्यासारखें आहे.

## ( इ. ) कल्पनारम्य ( Romantic ) नाटकें.

कल्पनारम्य या सदरांत येणारीं नाटकें मराठींत पुष्कळ आहेत. यांत कवीला जो विषय लोकांसमोर मांडावयाचा असेल त्याला अनुकूल अशी काव्यसृष्टि तो निर्माण करतो. यांत कवीला स्थलकालाचें बंधन असत नाहीं. अशा नाटकांचें परीक्षण करीत असतां त्यांतील कथाभाग सुसंगत आहे किंवा नाहीं, व त्यांतील पात्रांचे स्वभाव कसे रेखाटले आहेत, आणि कवीची काव्यप्रतिभा त्यांत किती दृग्गोचर होते, एवढेंच आपल्यास पाहावयाचें असतें. अशा काल्पनिक नाटकांतील कथानक कवीनें स्वतंत्र रीतीनें निर्माण केलेलें असो, किंवा त्यास एखाद्या अन्य ग्रन्थाचा आधार असो. शापसंभ्रम नाटक हें बाणाच्या 'कादंबरी' च्या आधारें रचलेलें असलें तरी तें काल्पनिक नाटकांच्या सदरांत येतें. अशा नाटकांत अद्भुतता आल्यास त्याचा रसभंग कसा होतो, हें शापसंभ्रम नाटक पाहिलें असतां आपल्या लक्षांत येतें. पहिले चार अंक पाहून आपल्या मनावर होणारा परिणाम पुढील तीन अंक पाहतांना

किंवा वाचतांना कायम टिकत नाहीं. पुंडरीकाच्या पुनर्जन्माबरोबर वाचकांचा पूर्वग्रहही एकदम बदलतो. तसेंच प्रचलित विषयांवरही कथानक रचून नाटक लिहिलें असतां त्यास याच सदरांत घालावें असें कित्येक म्हणतील, व तें एका अर्थी बरोबरही आहे, परंतु विषयानुरोधानें आपण त्यांचा सामाजिक नाटकांच्या सदरांत समावेश करूं. कल्पनारम्य कथानकांत एखाद्या विशिष्ट विषयाचें उद्‌घाटन असलेंच पाहिजे असें नाहीं. रा. कोल्हटकरांचीं वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, किंवा रा. खाडिलकरांचें मानापमान, हीं नाटकें कल्पनारम्य प्रकारांपैकीं होत. मूकनायकांत प्रसंगोपात्त मदिरापाननिषेध आला असला, किंवा गुप्तमंजुषेंत स्त्रीशिक्षणाचा उल्लेख असला तरी त्याच्या कथानकाला विशेष स्थलकाल नसल्यामुळें, किंवा पहिल्याचा राजे लोकांतील मदिरासक्तीवर आणि दुसऱ्याचा स्त्रीशिक्षणावर मुख्य कटाक्ष नसल्यामुळें त्यांना सामाजिक नाटकें म्हणतां येणार नाहीं. वीरतनयांतील पात्रांच्या नांवावरून त्याचा काल रजपूत अमदानींतला असावा असें भासतें; पण तो अमुकच आहे, किंवा ही गोष्ट अमक्या ठिकाणीं घडलेली आहे, असें ठरवितां येत नसल्यामुळें तें कल्पनारम्य नाटक आहे असेंच आपण म्हणूं. तसेंच काल्पनिक नाटकास ऐतिहासिक म्हटल्यानें तें धड ना ऐतिहासिक, धड ना काल्पनिक असें होतें, व मग त्यांत दिसून येणाऱ्या स्थलकालविपर्यासानें त्या नाटकाचा चांगुलपणाही कसा लोप पावतो हें 'राणा भीमदेव' या नाटकाकडे पाहून आपल्यास दिसेल. 'संगीत लीलावती' हें या सदरांत येणारें नाटक, भाषा, काव्य, आणि कथानक या दृष्टीनें चांगल्यांपैकीं एक नाटक आहे.

## ( ई. ) ऐतिहासिक नाटकें.

काल्पनिक नाटकांत ध्येय असलेंच पाहिजे असें नाहीं. केवळ मनोरंजनाचें कार्य जरी त्यानें साधलें तरी त्याचा हेतु पूर्ण झाला असें म्हणतां येईल. पण ऐतिहासिक नाटकांबद्दल असें म्हणतां येत नाहीं. गतकालीन इतिहासाबद्दल व ऐतिहासिक व्यक्तींबद्दल आपल्या मनांत अभिमान उत्पन्न करण्याचा हेतु ऐतिहासिक नाटक लिहिण्यांत असतो, व असला पाहिजे. हा हेतु साध्य होण्याकरतां उदात्त प्रसंगाची निवड करणें अवश्य आहे पहिले बाजीराव पेशवे यांच्या अंगच्या शौर्य–शहाणपणादि गुणांची ओळख होईल, अशा त्यांच्या चरित्रांतील एखाद्या प्रसंगावर नाटक लिहिलें असतां जो या व्यक्तीबद्दल आपल्या मनांत अभिमान उत्पन्न होईल तो त्यांच्या मस्तानीविषयक प्रेमविषयास प्राधान्य देऊन त्याच प्रसंगावर लिहिलेल्या नाटकानें उत्पन्न होणें शक्य नाहीं. कवीनें या प्रसंगावर सुंदर नाटक लिहिलें आणि हा प्रसंग काव्यमय असला तरी उदात्त नसल्यामुळें ऐतिहासिक नाटकांत असाव्या लागणाऱ्या हेतूची पूर्तता होत नाहीं, हें कै. ना. बा. कानिटकरकृत 'बाजीराव मस्तानी' हें नाटक वाचून वाटतें. ऐतिहासिक नाटकांनीं साधावयाचें कार्य योग्य प्रकारें पार पाडण्याकरतां ऐतिहासिक पात्रांचे इतिहासांत नमूद असलेले स्वभाव-विशेष नाटकांत विकृत होतां कामा नयेत याकडेही लक्ष देणें अवश्य आहे. ऐतिहासिक नाटक हें इतिहास नसल्यामुळें मुख्य कथानक व मुख्य पात्रें यांच्या परिपोषाकरतां काल्पनिक उपकथाभाग व उपपात्रें योजण्याची नाटककारास सवड असते. परंतु या सवडीचा योग्य उपयोग केला तरच कार्यभाग होईल. रा. शिरवळकर यांचें ' पानिपतचा मुकाबला ' हें नाटक ऐतिहासिक नाटकांत बऱ्यांपैकीं आहे. रा. केळकरकृत ' तोतयाचें बंड ' हें नाटक ऐतिहासिक नाटकांचा एक उत्तम नमुना आहे. रा. खाडिलकरांचें ' सवाई माधवराव पेशवे ' हें देखील एक चांगलें नाटक आहे. ' पानिपतचा मुकाबला' या नाटकांत बराच भाग उर्दू भाषेंत आहे, तर ' प्रेमध्वज ' नाटकांत अकबरास मराठी बोलावयास लावलें आहे. नाटकांतील भाषा पात्रानुकूल असावी, म्हणजे तिच्या योगानें नाटक उठावदार होतें, याकरितां मुसलमानी पात्रें उर्दू बोलतील तर बरें; परंतु ती भाषा मूळ मराठी भाषेस लोपवून टाकील इतकी नसावी. नाहीं तर मराठी नाटकांत उर्दू घातली आहे, किंवा उर्दू नाटकांत मराठीचा उपयोग केला आहे, याचा निर्णय करणें कठीण पडतें, असें पानिपतचा मुकाबला नाटक वाचून वाटतें. परंतु जेथें उर्दू भाषेचा थोडासा उपयोग करण्याचा प्रसंग असेल तेथेंही मराठीचा उपयोग केल्यास तेंही बरें दिसत नाहीं. तेव्हां अन्यभाषांचा मराठींत उपयोग करावा, पण तो तारतम्यभावानें केला

पाहिजे. मूळ भाषेस लोपवून टाकण्याइतका तो नसावा, तर तिला उठावदार करण्याइतका असावा. तसेंच भाषेच्या अडचणीकरतां इतिहासांतील किती तरी भाग नाट्यरूप पावलेले नाहींत. एखादें मोगली अमलांतलें कथानक असल्यास बरींच किंवा सगळींच पात्रें उर्दू बोलणारीं असल्यास व त्यांच्या तोंडीं ती भाषा घातल्यास तें नाटक मराठी होणार नाहीं. अशा वेळेस या पात्रांस मराठी बोलावयास लावणेंच योग्य होईल. या भाषेच्या अडचणीकरतां अशा कथानकास नाट्यसृष्टींतून हद्दपार करणें योग्य होणार नाहीं. भाषांतरित नाटकांचा विचार करतांना या विषयाचा पूर्वींच उल्लेख झालेला आहे.

तसेंच कित्येक नाटकें ऐतिहासिक कथानकावर रचलेलीं नसूनही ऐतिहासिक काल किंवा प्रसंग यांचीं दर्शक अशीं काल्पनिक पण ऐतिहासिक स्वरूपाचीं आहेत, व त्यांचा उद्देश बऱ्याच अंशीं सफळ झाला असल्याचें आपल्यास दिसतें. 'कांचनगडची मोहना' आणि ' चंद्रगुप्त ' या नाटकांतील पात्रें व कथा ऐतिहासिक नाहींत, पण एकानें विजयनगरच्या अंतकाळची स्थिति व लोकांची मनःस्थिति यांची ओळख होते, तर दुसऱ्यानें नंदवंशाच्या गादीवर मौर्यवंशाची–चंद्रगुप्ताची–स्थापना झाल्यावरच्या देशस्थितीचें कल्पनाचित्र आपल्यापुढें उभें राहतें.

गेल्या १५।२० वर्षांत विशेष प्रचारांत आलेलीं संतचरित्रपर नाटकें यांचा त्यांतील विषयानुरोधानें वेदान्तपर किंवा धार्मिक नाटकांत कोणी समावेश करतील; परंतु वास्तविक पाहतां तीं ऐतिहासिक नाटकें होत. यांत संतवचनाधारें वेदांताची चर्चा होत असली तरी हा भाग गौण असून विषयीभूत संतांच्या चरित्राचा जनतेस परिचय करून देणें हा या नाटकांचा मुख्य उद्देश असल्यामुळें, व हीं चरित्रें गतकाळीन सत् आणि सत्य पुरुषांचीं असल्यामुळें तीं ऐतिहासिकच होत. या संतचरित्रपर नाटकांत महाराष्ट्रांतील बहुतेक व महाराष्ट्रेतर कित्येक संतांचा अंतर्भाव झालेला आहे. यांपैकीं बऱ्याच नाटकांत लेखकांनीं त्या त्या संतांचीं सबंध चरित्रें गोंवण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्यांत कोणत्याच रसाचा किंवा नायकाशिवाय अन्य पात्रांचा परिपोष होऊं शकला नाहीं. शिवाय त्यांत कथानकचातुर्य दाखविण्यास अवसर न सांपडल्यामुळें व बरींच चरित्रें एकसारखींच असल्यामुळें हीं संतपर नाटकमाला एका नमुन्याची झालेली आहे. यापेक्षां या संतांच्या चरित्रांतील त्यांच्या स्वभावावर व कर्तबगारीवर प्रकाश पाडणारा असा एखादा प्रसंग निवडून घेतला तर त्यांच्यांत वैचित्र्य उत्पन्न होईल, रस परिपोष व स्वभावपरिपोष करावयास अवसर सांपडेल, आणि तीं जास्त लोकप्रिय होतील. राजापूरकर मंडळीच्या तुकाराम नाटकांतील अश्लील भाग गाळला तर तें नाटक तुकारामचरित्रावरील एक चांगलें नाटक आहे असें म्हणावें लागेल. कै. ह. ना. आपटे-कृत ' संत सखूबाई ' हेंही एक या सदरांतील चांगलें नाटक आहे.

कित्येकांच्या मतें संतचरित्रें हीं नाटकास योग्य नव्हेत.संतवचनें हीं त्यांचा संदेश जनतेस सांगत असतां त्यांना रंगभूमीवर आणून आपण जास्त काय करतों ? उलट त्यांची भूमिका करणाऱ्या नटांच्या चरित्रामुळें प्रेक्षकांच्या मनांवर त्या संतांबद्दल मात्र अनुदार विचार उत्पन्न होतात. एक नट अनेक भूमिका घेतो म्हणून त्या प्रत्येक भूमिकेंतील गुणावगुण त्याच्या ठिकाणीं असणें संभवनीय नाहीं. अशा स्थितींत बाकीच्या भूमिकांबद्दल जर त्या करणाराच्या गुणावगुणांवरून आपण मत ठरवीत नाहीं, तर संतांच्या भूमिकांबद्दलच हा आक्षेप कां असावा ? आमचे नट संत नाहींत म्हणून जर संतांचीं नाटकें करावयाचीं नाहींत, तर मग आमचे नट राजे नाहींत म्हणून शाकुंतलादि नाटकेंही त्याज्य ठरवावीं लागतील. आपण नटांच्या गुणावगुणांवरून चांगल्या नाटकांस हद्दपारीची शिक्षा न देतां त्यांच्या कृतीचें कलेच्या दृष्टीनें परीक्षण केलें पाहिजे, व त्यांच्या द्वारें संतचरित्रांचा, व ऐतिहासिक व्यक्तींचा, आणि सामाजिक विचारांचा जनतेस परिचय होऊन त्या द्वारें जो परिणाम होतो त्याकडेच लक्ष दिलें पाहिजे.

### ( उ. ) सामाजिक नाटकें.

मराठी भाषेंत सामाजिक विषयांवरील नाटकें फारशीं नाहींत, व जीं थोडींबहुत आहेत त्यांत सामाजिक विचारांत क्रांति घडवून आणण्यास किंवा त्याबद्दल समाजांत खळबळ उडवून देण्यास समर्थ अशीं

फारच थोडीं आहेत. सामाजिक विषयांवरील नाटकें सामाजिक विचारांचीं दर्शक असलीं पाहिजेत. कांहीं दिवसांनीं या नाटकांचें नाटक या दृष्टीनें असणारें महत्त्व कमी झालें तरी त्यांस ऐतिहासिक महत्त्व प्राप्त होतें, व या दृष्टीनें नाटक लिहावयाचें म्हणजे लेखकावर बरीच जबाबदारी येते. बंगाली भाषेंतील ' नीलदर्पण ' हें नाटक तत्कालीन समाजांत जसें लोकप्रिय झालें होतें तसेंच तें तत्कालीन निळीच्या मळेवाल्यांच्या स्वार्थप्रेरित अत्याचारांची आज आपल्यास माहिती देण्यास उपयोगी पडतें. मराठींत सामाजिक विषयांवर जीं नाटकें झालीं आहेत, त्यांत 'संगीत सौभाग्यरमा' हें विधवाविवाहावर लिहिलेलें नाटक पहिलें होय. या पुस्तकावरील वि. ज्ञा. वि., पु. १७, अं. ८ मध्यें आलेली टीका पाहिली असतां हें नाटक चांगल्यापैकीं असावें असें वाटतें. कै. ना. बा. कानिटकरकृत ' तरुणीशिक्षण नाटिका' हें नाटकही कांहीं दिवसांपूर्वीं लोकांसमोर प्रमुखत्वानें आलेलें होतें. यांतील विषय स्त्रीशिक्षण-विरोध हा होता. परंतु अशा नाटकांतील अचरट प्रकारांनीं तीं कांहीं काळ जरी चमकलीं तरी त्यांतील विचारांचा लोक जसजसा विचार करतात तसतशीं हीं नाटकें लोकांच्या दृष्टीआड होतात. यांत असलेला अतिशयोक्तीचा प्रकार समाजांत कधींच रूढ नव्हता. तो केवळ कविकल्पनेचा खेळ होता, व म्हणूनच अशा काल्पनिक परिस्थितीवरचे कवीचे विचार समाजाचें कल्याण करण्यास असमर्थ असतात. या नाटकाचा योग्य परामर्ष वि. ज्ञा. विस्तारांत घेतलेला आहे तो पाहावा, म्हणजे अशा कुत्सित व काल्पनिक सामाजिक नाटकांची योग्यता आपल्या लक्षांत येईल. हाच प्रकार अलीकडे अचरटपणामुळें लोकांची करमणूक करणाऱ्या रा. जोशीकृत 'विनोद' नाटकाचा आहे.

सामाजिक नाटकांत ज्यांचा दर्जा बराच वरचा लागेल अशीं 'शारदा' आणि 'हाच मुलाचा बाप' हीं नाटकें होत. शारदेंत जरठकुमारीविवाह व देशस्थकोंकणस्थविवाह या दोन विषयांचें चित्र काढलेलें आहे; आणि 'हाच मुलाचा बाप' यांत हुंड्याचा दुष्परिणाम दाखवून त्याचा निषेध केलेला आहे. विधवापुनर्विवाहाच्या विषयाची चर्चा 'मतिविकार' आणि 'प्रेमसंन्यास' या नाटकांत केलेली आहे. नाटक या दृष्टीनें 'मतिविकार' वरच्या दर्जाचें आहे. काव्य या दृष्टीनें 'प्रेमसंन्यास' सरस आहे; पण लीलेचा विवाह न लागतांच नाटकाचा शेवट झाला असल्यामुळें लेखकाचा हेतु स्पष्ट होत नाहीं, व यामुळें नाटकास वैगुण्य येतें. शारदेचा कोदंडाशीं विवाह न लागतांच जर त्या नाटकाचा शेवट शोकांत झाला असता तर तें नाटक जास्त परिणामकारक झालें असतें; त्याचप्रमाणें प्रेमसंन्यासाच्या शेवटीं लीलेचा पुनर्विवाह होता तर लेखकाचा हेतु स्पष्ट होऊन कार्यभाग झाला असता. कै. गडकरी यांचें नवीन प्रसिद्ध झालेलें 'एकच प्याला' हें नाटक सामाजिक नाटकांत चांगल्यापैकीं झालें आहे. मदिरासक्तीसारख्या महत्त्वाच्या विषयावर आजपर्यंत मूकनायक, विद्याहरण व संगतिविपाक या अनेक नाटकांत चर्चा झालेली आहे. पण विषयाच्या महत्त्वाच्या मानानें त्याचें योग्य चित्र 'एकच प्याला' यांत रेखाटलें गेलें आहे, व या दृष्टीनें कै. गडकरी यांच्या पूर्वींच्या दोन्ही नाटकांपेक्षां हें नाटक जास्त उपयुक्त व परिणामकारक झालें आहे.

### ( ऊ. ) धार्मिक नाटकें.

केवळ धार्मिक विचारांचीं नाटकें मराठींत नाहींत म्हटलें तरी चालेल. संतचरित्रपर नाटकें, 'कृष्ण कर्मयोगी'सारखीं केवळ वेदान्तपर नाटकें, किंवा 'कुंजविहारी' सारखीं पौराणिक पण धार्मिक विषयावरचीं नाटकें, यांचा जर धार्मिक म्हणून एक वर्ग ठरविला तर तो फारसा मोठा नाहीं. पण अशा प्रकारचीं नाटकें इतर प्रकारच्या नाटकांतील दोषांपासून अलिप्त ठेवून धार्मिक विचारांचा समाजांत प्रसार करण्यास उपयोगी पडतील, अशा प्रकारें, उदात्त विचार, उन्नत शृंगार व गंभीर विनोद यांनीं युक्त अशीं तीं असावींत.

'पुंडलीक' किंवा 'दामाजी' यांसारख्या नाटकांनीं मनोरंजन होईल, पण वरील कार्य होणार नाहीं.

### ( ॠ. ) राजकीय नाटकें.

मराठी भाषेंत सद्यःस्थितिदर्शक अशीं थोडींशीं नाटकें झालेलीं आहेत. ' लोकमतविजय'' 'वंगभंग', ' स्वराज्य सुंदरी ' यांसारखीं कांहीं नाटकें राजकीय–म्हणजे प्रचलितकालदर्शक–या सदरांत दाखल करतां येण्यासारखीं आहेत. परंतु यांनीं कांहीं विशेष कामगिरी केलेली नाहीं, व यांची संख्याही फार अल्प आहे. यामुळें यासंबंधीं जास्त लिहिण्याची गरज नाहीं. प्रचलितराजकारणविषयक नाटकें लिहिणें व त्यांचे प्रयोग करणें हें आमच्या देशांतील सद्यःस्थितींत अत्यंत अवघड काम आहे. शिवाय तीं लोकांना कितपत आवडतील हाही एक प्रश्न आहे. लोकमत विशद करून मनोरंजक तऱ्हेनें लोकांसमोर मांडण्यास आणि राजकीय प्रश्नांवर लोकमतास वळण लावण्यास या विषयाचा अभ्यास केलेला अधिकारी लेखक पाहिजे. नाहीं तर लोकमतास अनिष्ट वळण लागण्यास वेळ लागणार नाहीं.

### ( ऌ. ) प्रहसनें.

मराठींत प्रहसनें बरींच झालेलीं आहेत. प्रहसनें हीं मुख्यत्वें हास्यरसपूर्ण व एखाद्या विषयावर थोडक्यांत टीकारूप अशीं असतात. फ्रेंच कवि मोलियर हा अशा प्रकारच्या नाट्यलेखनाबद्दल प्रसिद्ध आहे. त्याच्या कृतींच्या आधारें मराठींत जीं प्रहसनें झालीं आहेत तीं पाहिलीं असतां मूळ लेखकाच्या विनोदाची व कल्पकतेची आपल्यास ओळख होते. अण्णासाहेबांची धांदल, मारून मुटकून वैद्यबुवा, झोंपी गेलेला जागा झाला, वगैरे वगैरे कांहीं रूपांतरित प्रहसनें चांगल्यापैकीं आहेत. मराठींत कै ना. ह. भागवत हे प्रहसनकार म्हणून प्रसिद्ध आहेत. यांचीं कित्येक प्रहसनें सामाजिक सुधारणेच्या विरुद्ध लिहिलेलीं आहेत. यांचीं ' मोर एल्एल्. बी. ' सारखीं कांहीं प्रहसनें तर ग्राम्यतेचे मासले आहेत. यांचीं प्रहसनें त्यांच्या कालींही फारशीं मान्यतेस पावलीं नाहींत, व आज तर तीं विस्मृतिपंथास लागलीं आहेत. प्रहसनांचा प्रकार हा एखाद्या विषयावर थोडक्यांत पण मर्मभेदी टीका करण्याच्या उपयोगी असतो. पण मराठींत हा प्रकार फारसा यशस्वी झालेला दिसत नाहीं.

## ८. नाट्यपरीक्षण.

नाटकें झालीं म्हणजे त्यांचें परीक्षणही झालें पाहिजे. याचा एक प्रकार रा. लेले यांची संस्कृत नाटकांवरील ' सार व विचार 'माला ही होय. या मालेंत त्यांनीं ७।८ संस्कृत नाटकांचें विस्तृत परीक्षण केलें आहे. यांच्या या लेखमालेस ' सार व विचार ' असें दुहेरी नांव आहे. तरी त्यांत सार जास्त असून विचार तुरळक आहेत. तथापि ही लेखमाला हा मराठी नाट्यविषयक लेखनांत एक नवीन उपक्रम आहे, व तो बराच यशस्वी झाला आहे. संस्कृत नाटकांचा मार्मिकपणें अभ्यास करणारांस त्यांनीं एक दिशा दाखविली आहे. डॉ. श्री. कृ. बेलवलकरकृत 'उत्तररामचरित' नाटकाचें भाषांतर व परीक्षण हें एक अशा विषयावरील नमुनेदार पुस्तक आहे. एखाद्या ग्रंथाचा मार्मिक अभ्यास कसा करावा, हें या पुस्तकावरून चांगलें कळतें.

नाट्यपरीक्षणाचा दुसरा प्रकार म्हणजे वृत्तपत्रें व मासिक पुस्तकें यांत येणाऱ्या नाटकांवरील टीका होत. वृत्तपत्रांतील टीका बहुधा नाटकाच्या पासाऱ्या किमतीच्या–अल्प व गुळमुळित–असतात. मासिकांतून येणाऱ्या टीका बऱ्याच विस्तृत व ग्रंथ---गुणदोषवर्णनपर असतात. वि. ज्ञा. वि. मासिकानें या बाबतींत आजपर्यंत बरीच कामगिरी केली असून यांतील टीकालेख भारदस्त असून लेखकांस मार्गदर्शक असे आहेत. मासिक मनोरंजनांत अलीकडेच प्रसिद्ध झालेलें ' तोतयाचें बंड ' पुस्तकाचें रा. कोल्हटकरकृत परीक्षण हाही एक नमुनेदार लेख आहे. ' नाट्यकलारुक्कुठार ' हें पुस्तक, आणि ' नाटक्याचे तारे ' ही मनोरंजनांतील लेखमाला, नाट्यपरीक्षणात्मक लेखांत वरच्या वर्गांत दाखल होण्यालायक आहेत. अशा प्रकारचे टीकात्मक

लेख हें एक स्वतंत्र महत्त्वाचें वाङ्मय आहे. पण या दिशेकडे आमचे वृत्तपत्रकार व मासिककार यावें तसें लक्ष देत नाहींत असें म्हणावें लागतें. विलायतेंतील नियतकालिकांत इतर ग्रंथपरीक्षणाप्रमाणेंच नाट्यग्रंथ व नाट्यप्रयोग यांच्या परीक्षणाचें एक स्वतंत्र सदर असून याचा या विषयाच्या सुधारणेच्या कामीं व लोकमतास वळण लावण्याच्या कामीं फार उपयोग होतो. त्याचप्रमाणें आमच्याकडे या विषयाला योग्य तें महत्त्व देऊन याचा परामर्ष घेण्यांत येईल तर आमच्या नाटकांचा दर्जा वाढविण्याच्या, योग्य त्या नाटकांस लोकमान्यतेस पात्र करण्याच्या, व लोकाभिरुचीस योग्य वळण लावण्याच्या कामीं या टीकारूप लेखांचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं.

## ९. नाटकांबद्दल सामान्य विचार.

### ( अ ) नाटकांतील हेतु, काव्य आणि भाषा.

नाटकाचा विषय ऐतिहासिक किंवा सामाजिक असेल तर त्यांत लेखकाचा हेतु स्पष्ट असतो. एखाद्या ऐतिहासिक पुरुषाचें किंवा प्रसंगाचें विशदीकरण करून गतकालीन इतिहासाबद्दल अभिमान उत्पन्न करणें, किंवा एखादें इतिहासापासून निघणारें प्रमेय लोकांसमोर मांडणें, हा ऐतिहासिक नाटकांचा हेतु असतो, तर एखाद्या सामाजिक विषयावर आपलें मत मनोरंजक रीतीनें लोकांसमोर मांडून त्यांच्या विचारांस चालन देणें हा हेतु सामाजिक नाटक लिहिण्यांत असतो. पौराणिक प्रसंगांवरील नाटकांत वरील हेतूंपैकीं एखादा, किंवा धार्मिक विषयाचें उद्‌घाटन हा हेतु असावा असें आपण समजतों. पण प्रत्येक वेळीं हा हेतु स्पष्टपणें आपल्या निदर्शनास येत नाहीं. तसेंच काल्पनिक नाटकांत एखादें नैतिक तत्त्व सांगण्याचा लेखकाचा हेतु असावा असें आपण म्हणतों; पण प्रत्येक काल्पनिक कृतींत हा हेतु असलाच पाहिजे असें म्हणतां येत नाहीं. [illegible] नाटक काव्यदृष्ट्या व नाटकदृष्ट्या उत्तम होऊं शकेल. सामाजिक किंवा नैतिक ध्येय नसलेलें नाटक लिहिणें हा नाटककर्त्यांनें आपल्या लेखनशक्तीचा अपव्यय करणें होय असें कित्येक म्हणतात. पण नाटक हें जर संसाराचें चित्र आहे, व रोज घडणाऱ्या प्रत्येक प्रसंगापासून जर आपल्यास नीतीचा धडा मिळतोच असें नाहीं, तर मग विविध प्रसंगांवर लिहिलेल्या नाटकांबद्दलच हा सक्तीचा नियम घालणें योग्य होणार नाहीं. नाटकाचा मुख्य हेतु जो मनोरंजन तो जर उत्तम तऱ्हेनें पार पडत असेल तर त्याचा दुसरा हेतु जो शिक्षण तो जरी त्यापासून साध्य होत नसेल तरी तेवढ्याकरतां त्या नाटकास वाङ्मयक्षेत्रांतून हांकलून देणें योग्य होणार नाहीं. मनोरंजनाचें कार्य योग्य मार्गानें पार पडत असलें म्हणजे झालें. ललितकलांपैकीं गायन किंवा चित्रकला यांच्यापासून दरवेळीं आपल्यास शिक्षणलाभ झाला पाहिजे असें जर आपण म्हणत नाहीं तर नाटकाच्या बाबतींतच हा आग्रह कां असावा? नाटकापासून शिक्षण मिळावें हें योग्य आहे, व तें जर साध्य होत असेल तर उत्तमच;व नाटककारांनीं हा हेतु आपल्या दृष्टिआड करूं नये. तरी नाटकाच्या चांगुलपणास या हेतूची आवश्यकता बंधनकारक असूं नये. 'A thing of beauty is a joy for ever' हें कीट्स कवीचें म्हणणें नाटकासही लागू असलें पाहिजे. मात्र नाटकाच्या द्वारें लोकांसमोर मांडलेलें ध्येय त्यावरील अनेक लेखांनीं व व्याख्यानांनीं होणार नाहीं इतकें लोकमतावर परिणामकारक होतें, व म्हणून प्रतिभाशाली नाटककारांनीं इकडे लक्ष देऊन या साधनाचा उपयोग करावा, असें त्यांस आग्रहपूर्वक सुचविणें अवश्य आहे.

परंतु नाटकाचा असा उपयोग करतांना लोकांसमोर मांडावयाच्या ध्येयाची व तत्पोषक अशा कथाप्रसंगांची योग्य निवड झाली पाहिजे. सामाजिक विषयावर लिहितांना एखाद्या क्षणभंगुर महत्त्वाच्या प्रसंगाचा नाट्यविषयाकडे उपयोग केल्यास तें नाटकही क्षणजीवि होतें, हें कै. कानिटकरकृत 'न्यायविजय' आणि

'अधिकारदानविवेचना' या नाटकांकडे पाहून आपल्यास समजतें.'अधिकारदानविवेचना' या नाटकावरील अभिप्रायांत ( वि. ज्ञा. वि., पु. १५, पा. १५७–१५८ ) रूक्ष विषयावर नाटक लिहिण्यांत लेखकाचे श्रम कसे व्यर्थ होतात हें पाहावयाकरतां लेखकानें जे विचार प्रदर्शित केले आहेत त्यांचाच येथें पुनरुच्चार केला म्हणजे पुरे. ते विचार असेः–"भाषा शुद्ध, गोड, रसाळ आहे. पद्यें सुबोध आहेत. विषयाच्या स्वरूपाचेंही महत्त्व चांगलें दाखविलें आहे. परंतु तें नाहीं. नाटक वाचून मनावर जो कांहीं ठसा उमटावयाचा, चित्तवृत्ति उदार व्हावयाची, मन प्रसन्न व्हावयाचें, उन्नत व्हावयाचें–तें नाहीं. साधारण चार घटका करमणूक होते इतकेंच.............

...प्रकृत विषयच असा आहे कीं, यावर नाटक रचतां येईल कीं नाहीं कोण जाणे, असें आम्हांस वाटतें. शास्त्र आणि काव्य यांचा विरोध जर खरा असेल–आणि खरा आहे असें आमचेंही मत आहे–तर प्रकृत विषयावर नाटकच रचतां येणार नाहीं. मनोवृत्तींचा हा विषय नव्हे. हा पूर्वोत्तरपक्षविवादपटु न्यायबुद्धीचा विषय होय. ग्रंथाच्या निरनिराळ्या प्रकरणांस अंक म्हटल्यानें व त्यांतील पोटभागांस प्रवेश म्हटल्यानें, ग्रंथास नाटकाचें रूप येत नाहीं असें आम्हांस वाटतें."

नाटकांत काव्य अवश्य आहे–म्हणजे प्रतिभा आणि कल्पनाशक्ति नाटकांत उपयोगांत आणल्याशिवाय नाटकांत रस उत्पन्न होत नाहीं, व असें काव्यविहीन नाटक मनोरंजनास असमर्थ होतें. अर्थात् नाटकांत काव्य नसेल तर त्याचा मूळ हेतूच नष्ट होतो. पण काव्यकल्पना व काव्यानुकूल भाषा यांचा नाटकांत उपयोग करण्याच्या कामीं स्पर्धा लागल्याप्रमाणें, अलीकडे कल्पनेच्या उच्च भराऱ्या मारण्याकडे व भाषा सुंदर करण्यांत–ती संस्कृतप्रचुर अर्थात् कठीण करण्याकडे लेखकांची प्रवृत्ति वाढत आहे. रा. कोल्हटकरांचीं पदें कोशाच्या साह्याशिवाय स्पष्ट होण्यासारखीं नाहींत, तर कै. गडकरी यांचें गद्यही त्याचपैकीं झालें आहे. कै. गडकरी यांची काव्यप्रतिभा उच्च दर्जाची खरी, पण तिचा नाटकांत स्वैर उपयोग केल्यामुळें त्यांचीं नाटकें एकदम समजण्यासारखीं नाहींत, मग त्यांचा प्रयोग पाहत असतांना त्यांपासून अर्थबोध कसा व्हावा ? आमचा प्रेक्षकवर्ग कोणत्या प्रकारचा असतो याकडे दुर्लक्ष करून लिहिलेलीं नाटकें कितीजणांस समजत असतील व त्यांचा जनमनांवर कितपत परिणाम होत असेल याचा लेखकांनीं विचार करणें अवश्य नाहीं काय ? भाषा सुंदर पण सहज समजण्यासारखी, आणि पदें काव्यकल्पनामय, ललितभाषाप्रचुर पण सुबोध अशीं असावींत. केवळ भाषेच्या आणि पदांच्या सुबोधत्वाकडे लक्ष देऊन नाटकें लिहून तीं पाटणकरी थाटाचीं,–केवळ गद्यमय पद्यांचीं आणि अलंकारहीन अशा गद्यांचीं–करून उपयोग नाहीं. अशा नाटकांनीं वाङ्मयांत भर पडणार नाहीं.

कोणतीही गोष्ट प्रमाणशीर असली तर ती जितकी मनोहर दिसते तितकी ती प्रमाणाभावीं दिसत नाहीं. सरळ नाक हें सौंदर्यवर्धक असलें, तरी तें फार सरळ व लांब असलें तर सौंदर्यविघातक होतें. एखाद्या त्रैराशिकाचें उत्तर बरोबर येण्याकरतां त्यांतील सम विषम प्रमाणाकडे लक्ष देणें अवश्य असतें. नाहीं तर एका डोळ्यानें एक मैल लांबीची वस्तु दिसते, म्हणून दोन डोळ्यांनीं दोन मैल लांबीची वस्तु दिसेल असें म्हणावें लागेल; व तें वस्तुस्थितीशीं विसंगत होईल. आमच्या नाटकांच्या बाबतींत असेंच प्रमाणाकडे दुर्लक्ष झालेलें दिसतें. नाटकांत साहित्य पाहिजे, रसपरिपोष पाहिजे, गंभीर रसाच्या जोडीस हास्यविनोदाची जोड पाहिजे, संगीतामुळें नाटकें जास्त मनोरंजनसमर्थ होतात, वगैरे गोष्टी खऱ्या असल्या म्हणून त्यांच्या अतिरेकाचाही इष्ट परिणाम होईल अशी अपेक्षा करणें हें वस्तुस्थितीशीं विरोधी आहे, हें आपल्या अनुभवास येतें.

अलीकडे आमच्या नवीन लिहिल्या जाणाऱ्या नाटकांत काव्यकल्पना आणि भाषासौंदर्य या बाबतींत अतिरेक करण्याची प्रवृत्ति वाढत आहे असें दिसतें. भाषासौंदर्याकरितां उपयोगांत आणावयाच्या अलंकारयोजनेच्या भरांत भाषासौष्ठवाकडे दुर्लक्ष होऊं लागलें आहे. अलंकारिक भाषा सुंदर होते असें पाहून अलंकारांची व काव्यकल्पनांची रेलचेल करण्याचा उपक्रम झाला. पण यामुळें मूळ कल्पना कोणती ती शोधावयाची पाळी येऊन पात्रांच्या स्वभावाच्या विकासास व कथानकपूर्तीस त्या भाषेचा कसा काय उपयोग होतो हें ओळखतां येण्याची मारामार पडूं लागली. कवीचें भाषाप्रभुत्व लोकांचे डोळे दिपवूं लागलें, पण त्याबरोबरच आपलीं नाटकें केवळ कांहीं भाषाकोविदांकरतां नाहींत हें कवीच्या दृष्टिआड झालें. आपला विषय सुगम करण्याकरितां, व भाषेला शोभा आणण्याकरितां अलंकारांची योजना करावयाची असते, याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें सोन्यानें मढविलेल्या पुतळीप्रमाणें किंवा फुलांच्या ओझ्याखालीं झांकलेल्या महादेवाच्या पिंडीप्रमाणें कवीची उद्दिष्ट कल्पना अज्ञेय होऊं लागली. कै. गडकरी यांचीं नाटकें आमच्या म्हणण्याची साक्ष पटवितील.

केवळ काव्यकल्पनांमुळें सुंदर भासणारें नाटक प्रयोगास योग्य ठरतेंच असें नाहीं. "Midsummer Night's Dream" या शेक्सपियरच्या नाटकाचें परीक्षण करतांना हें नाटक काव्य या दृष्टीनें जरी उच्च दर्जाचें असलें तरी प्रयोगदृष्ट्या हीन ठरतें, असें हॅझ्लिटनें म्हटलें आहे. "Poetry and stage do not agree well together" या त्याच्या म्हणण्याकडे आमचे नाटककार लक्ष देऊन आपल्या कृतींत काव्यकल्पनांचा योग्य तेवढाच उपयोग करतील तर त्यांचीं नाटकें जास्त परिणामकारक होतील. भाषासौष्ठव व काव्यकल्पनांचा योग्य उपयोग या बाबतींत कै. देवल यांचीं नाटकें नमुन्यादाखल होत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## (आ) शृंगार आणि विनोद.

संसाराप्रमाणेंच नाट्यकथानक हें स्त्रीपुरुषमिश्रित असावयाचें, तेव्हां नाटकांतून शृंगारास अजीबात फांटा देणें शक्य नाहीं, योग्यही नाहीं. शृंगारहीन नाटक नीरस होईल, व मुद्राराक्षस नाटकासारखें एखादेंच नाटक शृंगार नसूनही लोकरंजनक्षम होऊन मान्यता पावेल. परंतु नाटकांत शृंगार हवा म्हणून त्याचा वाटेल तो प्रकार व वाटेल तें प्रमाण योग्य होणार नाहीं. नाटक पाहणारा समाज स्त्रीपुरुषमिश्र असतो हें लक्षांत ठेवून त्यांच्या विनयशील स्वभावास धक्का लागणार नाहीं अशा प्रकारचा शृंगार असल्यास त्यास कोणीही नांवें ठेवणार नाहीं. सौभद्रांतील कृष्णरुक्मिणीचा प्रवेश किंवा प्रेमबंधनांतील बाजीरावमस्तानीचा प्रवेश हे देखील शृंगाराच्या बाबतींत मर्यादातिक्रम करणारे आहेत असें म्हणतां येईल. मग कै. पाटणकर किंवा कै. राणे यांच्या नाटकांतील शृंगाराबद्दल काय म्हणावें हें समजणेंच कठिण आहे. पतिपत्नींच्या एकांतांतील पवित्र मानलेले प्रसंग रंगभूमीवर दाखविल्यानें कित्येक लोकांकडून टाळ्या मिळाल्या, तरी ते लोकांच्या सदभिरुचीस योग्य वळण लावणारे खास नव्हेत.

शृंगाररसाला काव्य-नाटकांतून हांकलून देणें रसिकतेला जरी आवडणार नाहीं, तरी त्याचा मर्यादातिक्रम होणें श्रेयस्कर नाहीं. उत्तान शृंगारापेक्षां तो व्यंग्य असला तर अधिक मधुर आणि अधिक उदात्त होतो. अशा व्यंग्य शृंगाररसाचीं उदाहरणें पाहावयाचीं झाल्यास 'मूकनायकां'तील विक्रांत आणि सरोजिनी यांचा बागेंतल्या भेटीचा प्रवेश, किंवा 'मानापमानां'-तील धैर्यधर आणि भामिनी यांचा चौथ्या अंकांतील प्रवेश हे पाहावे. तसेंच संभोगशृंगारापेक्षां विप्रलंभशृंगार हा जास्त उदात्त आणि परिणामकारक असतो, हें शाकुंतलांतील किंवा 'रोमियो आणि जुलियट' या नाटकांतील अशा शृंगाराचे प्रवेश पाहून आपल्या लक्षांत येतें.

आतां आमच्या नाटकांतील हास्यरसपोषक श्लेष व विनोद यांकडे वळूं.

शृंगाररसाप्रमाणेंच हास्यरसही सर्वांस आवडणारा आहे. संस्कृत नाटकांतून मैत्रेयाची या कामीं योजना करण्याचा प्रघात असे, व त्याचेंच अनुकरण मराठी नाटकांतूनही होत असे. हॅम्लेटसारख्या गंभीर नाटकांतही पोलोनियस या तोंडपुज्या सरदारानें हीच कामगिरी केलेली आहे. प्रसंगानुकूल शब्दांवर कोटया करून हास्यरस उत्पन्न होतो. श्लेष आणि विनोद यांची बरोबर व्याख्या करणें कठीण आहे; तरी एकाच शब्दाच्या भिन्न अर्थामुळें वाक्यार्थांतील चमत्कृति म्हणजे श्लेष, आणि पात्रांच्या विरोधात्मक स्थितीनें वैलक्षण्य उत्पन्न होऊन जी चमत्कृति वाटते तो विनोद, असें स्थूल मानानें म्हणतां येईल.

" श्लेष व विनोद या दोन्ही अलंकारांनीं आमचें नाटयसाहित्य रा. कोल्हटकर, केळकर, खाडिलकर, गडकरी या चौघांनीं चांगल्या प्रकारें नटविलें आहे. रा. कोल्हटकर यांचें श्लेष आणि विनोद या दोहोंवरील स्वामित्व सर्वमान्यच आहे. रा. गडकऱ्यांची श्लेष साधण्याची हातोटी जरी चांगली व कुशल आहे, तरी त्यांच्यापेक्षां रा. केळकर यांना विनोद-व तोही मार्मिक-अधिक चांगला साधतां येतो, हें दोघांच्या कृतींची तुलना करतां स्पष्ट दिसून येतें-" * हें रा. वा. ना. देशपांडे याचें मत आम्हांसही मान्य आहे.

परंतु अलीकडे श्लेष व विनोद यांच्या बाबतींत प्रमाणातिक्रम होत आहे असें म्हणावें लागतें, हें अलीकडे पुढें आलेल्या नाटकांकडे पाहून सहज समजेल. आमच्या अलीकडील नाटकांत मुख्य रस कोणताही असला तरी त्याच्या जोडीस हास्य रस असल्याशिवाय भागेनासें झालें आहे. शृंगार रसास हास्यरस पोषक असतो म्हणून त्याची वीर व करुण रसाबरोबरही योजना होऊं लागली! एका मैत्रेयानें भागेनासें होऊन या कामाकरतां अनेक पात्रांची योजना होऊं लागली, व शब्दांनीं नाहीं तर कृतीनें लोकांस हांसावयास लावण्याकरतां तृतीयप्रकृति पात्राचा रंगभूमीवर नाच करावयाची, किंवा डोक्यावर दारूचें पिंप घेऊन नाचणाऱ्या शिष्यवराची योजना करण्याची पाळी आली, हें रा. खाडिलकरांच्या सवाई माधवराव आणि विद्याहरण नाटकानें आमच्या निदर्शनास आणलें. रा. खाडिलकरांच्या कांचनगडची मोहना, बायकांचें बंड, कीचकवध व मानापमान या नाटकचतुष्टयांतून असलेला विनोद त्यांच्या इतर नाटकांत कसा अप्रस्तुत व बेचव झाला आहे, हें पाहिलें म्हणजे प्रत्येक नाटकांत विनोद असलाच पाहिजे असा स्वतःस निर्बंध घालून घेतल्यामुळें त्यांस तो कसा जाचक झाला आहे हें आपल्या लक्षांत येतें. हास्यरसाशिवाय नाटक असतां कामा नये असें ठरविल्यामुळें या प्रतिभाशाली नाटककारास देखील कथानकाशीं संबंध असणाऱ्या पात्रांकडून काम भागेनासें झाल्यामुळें सर्व पात्रें मानुषी असतां प्रेमध्वज नाटकांत **क्षय** आणि **वृद्धी** यांसारखीं गुणवाचक पात्रें निर्माण करून नाटकांत अस्वाभाविकता आणावी लागली आहे. यांच्याच 'सत्त्वपरीक्षा' आणि 'स्वयंवर' या नाटकांतील विनोद तर एकाच प्रकारचा झाल्यामुळें आनंदाच्या ऐवजीं कंटाळा उत्पन्न करण्यास कारणीभूत झाला आहे. रा. गडकरी यांनीं तर या बाबतींत रा. खाडिलकरांवर ताण केली आहे. प्रेमसंन्यासांतील गोकुळ हें पात्र सुंदर व कल्पकतेचा उत्तम मासला असलें तरी त्याचा कथानकाशीं संबंध नसल्यामुळें त्या पात्रामुळें नाटकाच्या चांगुलपणांत भर पडत नाहीं. 'प्रेमसंन्यासां'त कथानकाशीं संबंध नसणारीं दोन पात्रें तर 'पुण्यप्रभावां'त तसलीं चार पात्रें आणून मुख्य नाटकाबरोबर प्रवेशामागें प्रवेश घालून एक विनोदी उपनाटक—व तेंही मुख्य कथानकाशीं संबंध नसणारें, असें—कै. गडकरी यांनीं तयार केलें आहे. 'एकच प्याला' या

* आठव्या साहित्यसंमेलनाचा अहवाल, पा. ११८.

नाटकांत विनोदाकरतां स्वतंत्र पात्रें न आणतांही कथानकांतील तळीराम या पात्राच्याद्वारेंच लेखकानें विनोदाची कामगिरी करविली आहे, ती त्यांच्या पूर्वीच्या दोन नाटकांतील योजनेपेक्षां चांगली आहे. परंतु यांतही तळीरामाच्या मृत्यूच्या प्रसंगीं वैद्य व डॉक्टर यांचा जो विनोद घातला आहे तो अस्थानीं वाटतो. 'विचित्रलीलें'तील स्वाभाविक विनोदांत 'कन्याराशीवर बसून शुक्राची प्रार्थना कशी करावयाची तें मला शिकवा' असें बाळ्या आपल्या बापास-बगंभटास-म्हणतांना पाहून कवीच्या विनोदाची कींव येते. " Appropriateness anduse comic por. tions" असें हॅझ्लिटनें म्हटलें आहे, त्याप्रमाणें प्रसंगानुकूलतेकडे व कथानकाशीं एकरूप होईल व पात्रांच्या आणि कथासूत्राच्या परिपोषास मदत होईल अशा तऱ्हेनें जर आमच्या नाटकांत विनोद घालण्यांत येईल, तर त्यानें आमच्या काव्यानंदांत व नाटयवाङ्मय सरस करण्यांत उपयोग झाल्यासारखें होईल. अशा प्रकारच्या विनोदाचें उत्तम उदाहरण मृच्छकटिक नाटक व त्यांतील शकार यांचें होय. विनोदाच्या बाबतींत वरच्या दर्जाच्या मराठी नाटकांत बायकांचें बंड, मानापमान, यांच्या जोडीस शारदा, तोतयाचें बंड, अमात्य माधव, व वधूपरीक्षा या नाटकांचा उल्लेख करणें अवश्य आहे.

## ( इ ) संगीत.

अलीकडील लोकप्रिय नाटकांतील संगीत हें एक प्रमुख अंग आहे. कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं संगीत नाटकांस लोकमान्यतेस पात्र केलें तेव्हांपासून आजपर्यंत आमच्या नाटकांतील संगीतांत अनेक प्रकारची क्रांति झालेली आहे. आरंभीं शेंसवाशें पदें असल्याशिवाय आमचें संगीत नाटक होत नसे. किर्लोस्कर मंडळीस आरंभीं मिळालीं तशीं गाणारीं पात्रें सर्व मंडळयांत एकदम असणें दुरापास्त असल्यामुळें व सरसकट सर्व पात्रांस गाण्याचा प्रसंग येत असल्यामुळें दुरवस्था होऊं लागली, व रा. कोल्हटकरांपासून ही पद्यसंख्या कमी होण्यास सुरवात झाली. आतां ही संख्या सरासरी ५० पर्यंत उतरली आहे. पण ती आणखीही थोडी कमी झाल्यास फक्त गाणाऱ्या पात्रांस तीं म्हणावीं लागून व त्यांच्या आवाक्यांबाहेर त्यांची संख्या नसल्यामुळें गायनशास्त्राचा खून होण्याचा प्रसंग ओढवण्याचें भय राहणार नाहीं. तसेंच काव्यानुकूल प्रसंगींच पद्यें येऊन कवीच्या काव्यप्रतिभेला योग्य अवसर मिळेल. तसेंच संगीत नाटक म्हणजे गाण्याकरतां आनंदपर्यवसायीच असलें पाहिजे अशा आज अमलांत असलेल्या अलिखित नियमाची अडचण न होतां संगीताची व शोकपर्यवसानाची गांठ पडण्याची सोय होईल. पूर्वींच नाटकप्रयोगाचा ६।७ तासांपर्यंतचा काल आज ४।४॥ तासांपर्यंत आला आहे, तोही आणखी एखादा तास कमी झाला पाहिजे, व सिनेमाच्या प्रभावानें ही स्थिति येण्याचा बराच संभव आहे. नाटक पाहणें हें सुखाचें झालें पाहिजे, व तें ३।३॥ तासांच्या नाटकानें होण्यासारखें आहे; व एवढ्या अवधींत नाटक होण्यास अडचण पडणार नाहीं. अशा तऱ्हेनें आमच्या नाटकांची सुधारणा झाल्यास केवळ संख्या भरण्याकरतां 'विटाळ्यांची' किंवा 'वड्यांची' कविता करावी न लागतां, किंवा पारशी चालींवर दुडका नाच करण्यास अवसर न सांपडतां आमच्या नाटकांतील पदें काव्यदृष्टीनें सरस होतील. प्रसंगानुकूल चालींचा उपयोग केल्यास त्या जास्त लोकप्रिय होतील, व पदांची संख्या नियमित झाल्यास गाण्याच्या नांवावर नाटयाची होणारी हेळसांड टळेल. या बाबतींत पंडित विष्णु दिगंबर यांनीं सहाव्या नाटयसंमेलनांत सांगितलेले पुढील विचारही तज्ज्ञांनीं विचारांत घेण्यासारखे आहेत:

"गायन हें ध्वनिरूप आहे, व दिवसाच्या निरनिराळ्या वेळीं ज्याप्रमाणें ध्वनींमधें माधुर्य, मृदुता, अथवा

काठिन्य येतें त्याचप्रमाणें गाण्यामध्येंही ध्वनीचे हे विकार आपल्या नजरेस पडत असतात.....कांहीं कांहीं राग ठराविक वेळीं व ठराविक स्थळींच गावयाचे असतात. नाहीं तर त्यांचें माधुर्य कमी होऊन बेरंग होतो. झिंझोटी, जिल्हा, काफी, पिलू वगैरे राग जरी वाटेल तेव्हां म्हटले असतां चालतात, तथापि नाटकाच्या प्रारंभींच नांदीला ते योग्य नाहींत. प्रारंभ गंभीर व उदात्त पदांनीं केला असतां प्रेक्षकांवर छाप पडून नाटकाला रंग येतो. म्हणून अशा वेळीं हंमीर, भूप, कल्याण, पूर्वी, यमन, छायानट असे राग असावे, व ताल चौताल असावा. नाटकांतील मध्यभागीं केदार, कानडा, शंकरा, मालकौंस असे राग आणावे. असावरी किंवा मांड ह्या रागांत शृंगारयुक्त पदें नसावींत. गायनांतील कला, खुब्या, व निरनिराळ्या रागांचे सूर, तान व वेळा यांचें ज्ञान खुद्द नाटककारास नसलें तर नट कितीही संगीत असला तरीही त्याचें संगीतज्ञान तेथें फिक्कें पडणार !.....संगीत नाटकें मर्मज्ञांस बेचव लागण्याचें ...एक कारण असें आहे कीं, त्यांमध्यें अलीकडे पारशी व गुजराथी चालींवर बरीच पदें घालण्यांत येतात."*

आमच्या संगीत नाटकांतील पदांची संख्या कमी होण्यानें नाटकाच्या उद्देशसिद्धीसही साह्य होणार आहे. या विषयावरील वि. ज्ञा. वि. मधील 'संगीत सौभाग्यरमा नाटका'वरील अभिप्रायांत (पु. १७, पा. १७१–१७४ ) आलेले पुढील विचार लक्षांत घेण्यासारखे आहेत:–"आतां या संगीत नाटकांचा उपयोग, नाटकें रचण्याचा व त्याचा प्रयोग करून दाखविण्याचा जो मुख्य उद्देश तो सिद्धीस जाण्यास कितपत होतो, हें पाहूं गेलें असतां, फारसा होत नाहीं, किंवा होण्याचा संभवही कमी, असें म्हणावें लागतें. नाटकें करण्याचा मुख्य उद्देश प्रेक्षकसमुदायाला रंजवून बोध करण्याचा······संगीत नाटकापासूनही बोध होणार नाहीं असें नाहीं. परंतु गाणें बजावण्याकडे प्रेक्षकांचें विशेष लक्ष आकर्षून जाऊन तें त्या नाटकांतील बोध घेण्याकडे फारच थोडें जातें······ संगीत नाटकें पुस्तकरूपानें वाचलीं असतांही वर लिहिलेलाच प्रकार होतो······ नाटक म्हटलें म्हणजे नवरसांचें स्थान; परंतु गायन म्हटलें म्हणजे शृंगार व करुणा या दोनच रसांचें ( व तेंही अंशतः ) पोषक आहे. यामुळें संगीत नाटक शृंगार किंवा करुण यांपैकीं एकरसप्रधान होऊं शकेल."

## १०. समारोप.

नाटकाचा विषय पौराणिक असो, ऐतिहासिक असो, किंवा काल्पनिक असो, त्यांत प्रचलित काळाला व विषयांना अनुलक्षून कोटिक्रम असलाच पाहिजे ही जी आमच्यांत अलीकडे प्रवृत्ति झाली आहे ती योग्य आहे कीं काय, हाही एक विचारणीय प्रश्न आहे.

आमच्या नाटकांची सुधारणा व्हावी म्हणून आम्हीं खबरदारी घेणें अवश्य आहे. याकरतां नाट्यसंमेलनानें किंवा साहित्यसंमेलनानें कांहीं विद्वानांची एक मंडळी नेमून त्यांच्याकडून वार्षिकसंमेलनप्रसंगीं दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या नाटकांचें परीक्षण करून त्यांच्या योग्यायोग्यतेबद्दलचा अधिकारयुक्त अभिप्राय लोकांपुढें मांडण्यांत येऊं लागला तर तो आमच्या नाटकांस योग्य वळण लावण्यास बराच उपयोगी पडेल. तसेंच अशा या संस्थांकडून शक्य असल्यास दरसाल उत्तम ठरणाऱ्या नाटकाच्या कर्त्याचा पारितोषिकद्वारा गौरव झाला तर या कामीं उत्तेजन मिळेल.

नाटककार व नाटक करणाऱ्या मंडळ्या यांनीं मनावर घेतल्यास, व अशा प्रकारें ज्या सूचना पुढें येतील त्यांचा उपयोग केल्यास, आमच्या नाटकांतील क्रांति ही अपक्रांति न होतां उत्क्रांतीच होईल. 'जशी मागणी तसा पुरवठा' हें अर्थशास्त्राचें तत्त्व नाटकांच्या बाबतींत तरी लागू पडत नाहीं. छचोर नाटकें आम्हांस हवीं अशी मागणी कोणत्या लोकांनीं आपले प्रतिनिधि पाठवून कोणत्या नाटक मंडळीस कधीं केली होती ?

*"नाट्यविषयांची सुशिक्षित चर्चा."

रंगभूमीवर येणाऱ्या नाटकांतून मात्र जो तो आपल्या आवडीप्रमाणें निवड करतो. सर्वांच्या मनाची तयारी सारखी नसल्यामुळें, आणि अश्लील हलक्या प्रकारच्या करमणुकीकडे सामान्य मनुष्याच्या मनाचा कल असल्यामुळें, व अशा करमणुकीस आश्रय देणारा वर्ग आमच्या समाजांत जास्त असल्यामुळें, असलीं नाटकें जास्त द्रव्योत्पादक व्हावीं यांत नवल नाहीं. परंतु केवळ अशिक्षितांच्या आवडीस बळी न पडतां तिला योग्य वळण लावणें सर्वस्वीं नाटकमंडळ्यांच्या हातीं आहे. नाटकांत क्रांति घडवून आणणाऱ्या आमच्या नाटकमंडळ्याच होत. लेखकांच्या श्रमांचें चीज करणेंही त्यांच्याच हातीं असल्यामुळें मंडळीच्या मतांकरतां लेखकास आपलीं मतें बाजूस ठेवण्याचे प्रसंग येतात, हें 'वीरतनय' नाटकाच्या इतिहासावरून सगळ्यांस ठाऊक आहेच. तेव्हां आमचीं नाटकें उच्च दर्जाचीं व्हावींत, तीं मनोरंजनाबरोबरच लोकाभिरुचीस व लोकांच्या विचारांस वळण लावण्यास समर्थ व्हावींत, तीं अल्पजीवि न होतां महाराष्ट्रवाङ्मयास भूषणभूत व्हावींत, याकरतां आमच्या नाटकमंडळ्यांनीं व नाटककारांनीं या विषयाकडे लक्ष देणें अवश्य आहे.

---

☞ खालील मजकूर पृ. ११६, कलम २, ओळ ६ पुढें—" येथूनच मराठी नाट्यसाहित्याची सुरवात झाली "—या वाक्यापुढें वाचावा.

कै. विष्णुदास ऊर्फ विष्णु अमृत भावे-कृत " नाट्यकवितासंग्रह " नांवाचें एक कवितात्मक पुस्तक पुण्याच्या " श्री शिवाजी " छापखान्यांत छापून जानेवारी १८८५ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. या पुस्तकाची प्रस्तावना कै. विष्णुदास यांनींच लिहिलेली आहे. यांतील खालील उताऱ्यावरून मराठी नाटकांच्या सुरवातीचा अस्सल इतिहास आपल्यास चांगल्या प्रकारें समजून येईल. वास्तव हा बराच लांब पण महत्त्वाचा उतारा आम्ही वाचकांपुढें ठेवीत आहों.



"......त्याशिवाय पूर्वीपासून जो जैन आणि ब्राह्मण यांमध्यें धर्मसंबंधानें वैमनस्य पडून वाद चालला होता, त्यावेळीं जैनांचे हजारो ग्रंथ ब्राह्मणांनीं व ब्राह्मणांचे जैनांनीं बुडवून टाकिले. त्यांत याही ग्रंथांची ( नाटकें-काव्यें वगैरे ) वाट लागली असावी.

" या पुढील ३।४ शें वर्षें जो काल गेला त्यांत मराठे, पेशवे, व मोंगल यांची धुमाकूळ चालली होती. ......शेवटीं शेवटीं मात्र लखनौच्या एका चैनी नबाबानें '**इंद्रसभा**' या नांवाचें एक संगीत नाटक (जें हल्लीं पारशी लोक करितात) मोठमोठे गवई व कवी ठेवून व लक्षावधि रुपये खर्चून तयार करविलें. त्यांत राजे साहेब आपल्या राण्यांसह स्वतः वेष घेऊन गात व नाचत. त्याचप्रमाणें यात्रा वगैरे प्रसंगीं गुजराथ, मारवाड व हिंदुस्थान येथें कांहीं जण राधा आणि कृष्ण वगैरेंचीं सोंगें घेऊन अभिनययुक्त गात व नाचत. या खेळास ते **रासा** म्हणत. कर्नाटकांतही कांहीं नाटकें करीत; परंतु त्यांत मनोरंजन कांहींच नसे. सोंगांचे वेष तर फारच खराब असत. सर्व पात्रांनीं गाऊन नाचावयाचें, मग त्यांस गातां येवो अगर न येवो. हे खेळ पाहून गांवढळ लोकांचें मन रिझे. परंतु विद्वानांस त्यापासून आनंद न होतां उलटा त्रास मात्र होई. महाराष्ट्र देशांत उत्साहांत ललितप्रसंगीं व तमाशांत मात्र सोंगें घेऊन कांहीं हास्यकारक बीभत्स प्रहसनें होत. परंतु ही नाट्यकला त्यांस माहीत नव्हती.

" वर सांगितलेल्या प्रकारची कर्नाटकी उत्तरकानडा प्रांतांतील **भागवत** या नांवाची मंडळी इ. स. १८४२ मध्यें सांगलीस आली होती. त्यांचे २।३ प्रयोग श्री. कै. चिंतामणराव अप्पासाहेब यांनीं करविले. श्रीमंत हे रसज्ञ, गुणाचे चहाते असल्यानें त्यांचें तसल्या ओबडधोबड व बीभत्स कृतीनें मन रिझलें नाहीं. मग त्यांनीं या कृत्यांत चांगली सुधारणा करून, नवीन मराठी नाटक तयार करण्याविषयीं मला आज्ञा केली; आणि परोपरीनें मी साह्य करीन

असें बोलले. माझें वय जरी त्यावेळीं १८।१९ वर्षांचें होतें तरी दृढ निश्चयानें श्रीमंतांचे आश्वासनावरून मी त्या उद्योगास लागलों. त्यावेळची विद्येची स्थिति फारच वाईट असे......अशा स्थितींत व इतक्या लहान वयांत असें अवघड काम माथीं घेऊन तें तयार करणें किती कठीण आहे, याचा वाचकांनीं विचार करावा. मला लहानपणापासूनच गाण्या-बाजविण्याचा छंद होता. पुढें या कृत्यास लाग-ण्याच्यापूर्वी बरेच महाराष्ट्र ग्रंथ मीं वाचले व पौराणिक इतिहास समजून घेतला. नंतर सर्व साहि-त्याच्या व मंडळीच्या मिळवामिळवीस लागलों.

"...नंतर बरीच मंडळी अनुकूल करून घेऊन, रामायणापैकीं प्रथम **सीतास्वयंवराख्यान** तयार करावें असें मनांत आणलें. त्यास कांहीं संगीत पाहिजे...( पण ) संगीतास उपयोगी पडणारी, व शृंगार, वीर, करुणा इत्यादि त्या त्या रसाला अनुकूल रागांत कविता बिलकूल नाहीं. मग स्वतः तें आख्यान रसाला अनुकूल असें रागांत तयार केलें. तसेंच पात्रें व किरीटकुंडलादि लागणारें सामान तयार करून, इ. स. १८४३ मध्यें प्रथम प्रयोग श्रीमंतां-पुढें केला. तो पाहून ते फार खुष झाले....

"याप्रमाणें आमच्या प्रतिपक्षी वर्गाचे दांत पडून हें कार्य चांगल्या तऱ्हेनें शेवटास गेलें असें पाहून त्यांनीं कांहीं ग्रामकीटकांशीं व कांहीं अरसिक गृहस्थांशीं सामिल होऊन, नटवेष घेणारांस अपंक्त करण्याचें कुभांड काढिलें; व दोन तीन प्रसंगीं भर पंक्तींतूनही आमची मंडळी उठविली; परंतु श्रीमंतांचें साह्य मला चांगलें असल्यामुळें, त्यांनीं सभा केली व तेथें श्रीमं-तांच्या पदरचे वे. शा. गोपीनाथ शास्त्री आगाशे यांनीं मागील पुष्कळ आधार दाखवून नटवेष घेणें हा दोष नाहीं असें प्रतिपादन केलें.

"पुढें एक वर्षामध्यें रामायणापैकींच दहा नाटकें तयार करून, त्यांचे प्रयोग श्रीमंतांस दाखविले......

"त्यावेळीं कीर्तन, तमाशे वगैरे जसे एकानें बिदी-वर करावे, व सर्वांनीं ते पाहावे, त्याप्रमाणेंच आमचे खेळ रस्त्यावर होत. पुण्यांत मी बरेच खेळ केले व तेथें आमची वाहवा झाली......

"......अशा मुंबई, पुणें, नगर वगैरे ठिकाणीं चार पांच खेपा आम्हीं इ. स. १८६१ पर्यंत केल्या, व कीर्ति आणि पैसा पुष्कळ मिळविला.

"पुढें मीं नाटक मोडल्यानंतर माझ्या नाटकांतील मुख्य मुख्य पात्रांनीं नाटकें केलीं............... अशी ही फार दिवसांपासून राष्ट्रीय करमणूक बंद पडली होती. तिचें उज्वलन झालें."



# [illegible] व स्त्रियांचें कार्यक्षेत्र.

[ सौ. सरलाबाई नाईक, एम्. ए. ]

विसावें शतक हें स्त्रियांचें शतक म्हणूनच संबोधिलें जातें. कारण १९ व्या शतकांतील उत्तरार्धापासून स्त्रियांसंबंधींच्या नानाप्रकारच्या चळवळी जन्मास येऊन विसाव्या शतकांत त्या चांगल्या नांवारूपाला येऊं पाहत आहेत. कुटुंबांत व समाजांत स्त्रियांचा दर्जा काय आहे व काय असावा, या संबंधींचे प्रश्न आजकाल विचारी लोकांचा व समाजांतील नेत्यांचा बराच वेळ घेत असतात. एकुणिसाव्या शतकापर्यंत आपली स्थिति व दर्जा यांत कांहीं तरी उणीव आहे व ती भरून काढिली पाहिजे, याची जाणीव स्त्रियांत जवळ जवळ नव्हतीच असें म्हटलें असतां चालेल. रूढि, सामाजिक समजुती, सार्वजनिक मतें, व कायदा, या महा दुष्कर अशा बंधनांनीं तिला पारतंत्र्याच्या अंधारकोठडींत जखडून बांधून ठेवलेलें असल्यामुळें स्त्री ही मनुष्य या नांवाला सुद्धां पारखी झाली होती; इतकेंच नव्हे, तर स्वतःच्या पारतंत्र्याचा ती अभिमान बाळगीत असे! स्त्री–जात ही स्वभावतःच पुरुषांपेक्षां हीन आहे, व हें हीनत्व ईश्वरानेंच जणूं काय दिलेलें असल्यामुळें तें नाहींसें करण्यासाठीं चळवळ करणें म्हणजे बेमर्यादशीलपणा करून स्त्रीजातीचे नांवास कलंक लावणें आहे, असेंच स्त्रीसमाजांत समजलें जात असे. शास्त्रांत कांहींही असो, प्रत्यक्ष व्यवहारांत पाळलेलें जनावर किंवा विकत घेतलेला गुलामापेक्षां स्त्रियांस जास्त मान किंवा अधिकार दिलेला दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. तिची मुख्य कर्तव्यकर्में म्हटलीं म्हणजे धन्याची सेवा करणें, मुलांस जन्म देणें, व घर संभाळणें, हीं असून यांबद्दल तिला पोटाला जेवण व कधीं कधीं गोड ममतेचे शब्द हे मिळत असत.

२. परंतु शतकानुशतकें चालत आलेल्या या स्थितींत एकुणिसाव्या शतकापासून बरीच क्रांति घडून येत असलेली दृष्टीस पडते. या क्रांतीचें कारण काय असावें ? गुलामगिरींत कित्येक शतकें जखडून पडलेल्या स्त्रीजातींत सुद्धां आ[illegible]ल्या हीनत्वाची जाणीव उत्पन्न होऊन तीं बंधनें तोडून बाहेर निघण्याची दृढतर आकांक्षा त्यांच्यामध्यें कशानें उत्पन्न झाली? जीवनकलह जास्त वाढून त्या कलहाच्या तीव्र अंकुशानें तर स्त्रिया जाग्या झाल्या नसतील ? कीं कोणत्याही बंधनास दाद न देणारा पुरुषवर्ग व हरतऱ्हेच्या बंधनानें दिवसेंदिवस अधिकाधिक जखडत जाणारा स्त्रीवर्ग, यांच्या स्थितींतील महदंतरच या क्रांतीचें कारण आहे? रबराप्रमाणेंच, प्रत्येक गोष्ट खेंचण्याला कांहीं तरी मर्यादा असते. त्या मर्यादेचें उल्लंघन झालें असतां रबर जसा ताडकन् तुटून दोन बाजूनें खेचणाऱ्या बोटांवरच येऊन उलट तडाका देतो, त्याप्रमाणें स्त्रिया व पुरुष यांचे स्थितींतील अंतर मर्यादेबाहेर खेंचले गेल्यामुळें मध्येंच तुटून स्त्रियांना व पुरुषांना दोघांनाही इतके जबर धक्के बसले कीं, ते आपल्या निद्रेंतून व धुंदींतून खडबडून जागे झाले कीं काय ? कीं दिवसेंदिवस मनुष्याचे राहणींत व त्याचे आजूबाजूचे परिस्थितींत होत असलेला फरक हेंच या क्रांतीचें कारण आहे ? कीं कांहीं न्यायी व विचारी मंडळीचे विचारांचें व प्रयत्नांचें हें दृश्य फल आहे ? समाजविषयक कोणत्याही गोष्टीची उत्पत्ति व वाढ अतिशय गुंतागुंतीची व गहन असते. त्यांचीं कारणें अनेक असतात, व वर दिलेलीं कारणें त्यांपैकीं कांहीं असूं शकतील. परंतु यापेक्षां अनेक दुसऱ्या गोष्टीही कारणीभूत असल्या पाहिजेत. हीं सर्व कारणें परस्परावलंबी असल्यामुळें त्या सर्वांचा नामनिर्देश करून, हीं जास्त महत्त्वाचीं, हीं कमी महत्त्वाचीं, असें खात्रीनें सांगतां येणें कठीण आहे. कारणें कांहींही असोत, पण स्त्री व पुरुष दोघेंही आतां जागीं होऊन कांहीं तरी घोटाळा झाला आहे व त्यांतून आपणांस निघालें पाहिजे यासंबंधींची जाणीव दोघांनाही झाली आहे; व चुकलेला मार्ग सोडून दुसरा मार्ग शोधून काढण्याकडे दोघांचीही प्रवृत्ति दिसून येत आहे. समाजांत हरघडी दिसून येणाऱ्या या घडामोडीचा सूक्ष्मतेनें विचार करण्याचें येथें अर्थातच प्रयोजन नाहीं. या होणाऱ्या स्थित्यंतरांतील ठळक ठळक गोष्टींचें अवलोकन केलें असतां आपल्या विषयास पुरे आहे.

आपल्या हीन दर्जा विरुद्धस्त्रियांचें हें बंड केव्हांपासून सुरू झालें हें तारीखवार सांगणें दुरापास्त आहे. इतकें मात्र खास कीं, हें बंड अगदीं स्वाभाविक व बहुतांशीं इतर बंडांप्रमाणेंच आहे. जुलमी राजा व त्याची गांजलेली प्रजा, श्रीमंत शेट सावकार व त्यांच्या शेतांतून किंवा गिरण्यांतून अर्धपोटीं काम करणारे मजूर, यांच्यामध्यें कधीं ना कधीं व कोणत्या ना कोणत्या रूपाचें भांडण होणें. व गरीब गांजिलेल्या प्रजेनें बंडें करणें जितकें स्वाभाविक आहे, तितकेंच एकपक्षीय रूढीनें अज्ञानांधकारांत कोंडून ठेविलेल्या स्त्रीजातीनें आपल्या हीन दर्जाविरुद्ध बंड करणें अगदीं स्वाभाविक आहे. हें बंड पुरुषांविरुद्ध नाहीं, तर स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध व स्त्रियांच्या अज्ञानावस्थेविरुद्ध आहे. जे पुरुष किंवा ज्या स्त्रिया या बंडांत सामील होणार नाहींत तीं या बंडाचे विरुद्धपक्षांत गणिलीं जाऊन हें बंड जणुं काय त्यांचे विरुद्ध आहे असें भासण्याचा संभव आहे. हें बंड सत्यासाठीं व असत्याविरुद्ध असल्यामुळें परिणामीं यशस्वी होणार याविषयीं कोणत्याही सुज्ञाला शंका नाहीं. परंतु सत्यसंशोधक ध्रुवाला व सत्यवचनी हरिश्चंद्राला ज्याप्रमाणें नानाप्रकारच्या यातना मानखंडना व हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या त्याप्रमाणेंच या स्त्रियांनाही त्या सोसाव्या लागल्या व लागत आहेत, आणि पुढें कित्येक दिवस लागतीलही. या स्त्रियांचे बंडांत एक मोठी ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे ती ही कीं, इतर बंडखोरांप्रमाणें तोफा बंदुका किंवा भाले तरवारी असल्या परजीवनाशक शस्त्रांचा यांनीं अजूनपावेतों कधींही उपयोग केलेला नाहीं; इतकेंच नव्हे तर येथें आरडाओरड, धांवपळ, मारामारी असले प्रकार दृष्टीस पडत नाहींत. हें बंड आणि महात्मा गांधींचें सत्याग्रहाचें तत्त्व यांत फारसा फरक नाहीं. हें बंड सर्व दर्जाच्या कुटुंबांतील व्यक्तीव्यक्तींमध्यें आहे. गम्मत अशी आहे कीं, या भांडणांत दोनही विरुद्ध पक्ष एकमेकांचे अत्यंत जवळचे आप्त असल्यामुळें यांत इतर भांडणाप्रमाणें निर्दयता कोठेंही निदर्शनास येत नाहीं. घरोघर पतिपत्नींत, भावाबहिणींत, बापलेकींत, ही स्तब्ध पण नेटाची सत्याग्रही चळवळ कित्येक वर्षें चालू आहे. कोणाही इतिहाससंशोधकाला इचा साग्र शोध लागलेला नाहीं, व लागणें शक्यही नाहीं. यांत कित्येक स्त्रियांचे सुखाचा लोप झाला आहे, कितीएकांना सत्याकरितां आपल्या आप्तेष्टांकडून छळणूक व शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून हसूं सहन करावें लागलें आहे. परंतु असे नानातऱ्हेचे घाव सोसूनच त्यांनीं समाजांत स्त्रियांच्या अस्तित्वाबद्दल साक्ष पटवून त्यांच्या शिक्षणाचा व उन्नतीचा पाया घातला आहे.

३. व्यक्तिशः झालेल्या या चळवळीचा परिणाम असा झाला कीं, समाजांत स्त्रिया मनुष्य आहेत, त्यांनाही मनोवृत्ति आहेत, त्यांनाही बुद्धि आहे, व त्या बुद्धीचा विकास पुरुषांचे बुद्धीप्रमाणें होणें शक्य व योग्य आहे, इत्यादि विचार समाजांतील स्त्रीपुरुषांचे मनांत घोळूं लागून स्त्रियांना कित्येक आसुरी बंधनांतून व अज्ञानांतून मुक्त करण्याची कल्पना व जरूरी जास्त जास्त स्पष्ट दिसूं लागली, व हळू हळू या चळवळीचे रोपास पालवी फुटूं लागली. स्त्रियांचा दर्जा हीन आहे तो कोणत्या कारणामुळें, व तो कसा सुधारतां येईल, याचा स्त्रिया व पुरुष हीं विचार करूं लागतांच त्यांस स्पष्ट आढळून आलें कीं, शिक्षणाचा अभाव हेंच स्त्रीच्या हीनत्वाचें मुख्य कारण आहे. असें वाटूं लागतांच स्त्रियांचे शिक्षणास सुरवात झाली, व आजूबाजूची परिस्थिति पोषक घडल्यामुळें स्त्रियांचें शिक्षण हा एक फुरसतीचे वेळीं विचार करण्याचा विषय नसून अत्यंत महत्त्वाचा आहे असेंही समाजधुरीण मंडळीस वाटूं लागलें.

४. स्त्रीशिक्षणाचे व स्त्रियांचे योग्यतेसंबंधाच्या कल्पनेचा जन्म सर्व देशांत असाच झालेला आढळतो. परंतु हिंदुस्थानांतील स्त्रीशिक्षणाचा विचार करतांना इतिहासाकडे दृष्टि देतांच निरनिराळ्या तीन काळांत स्त्रियांची तीन तऱ्हेची अवस्था दृष्टीस पडते. हे तीन काळ म्हणजे प्राचीन काळ, मुसलमानी काळ, व इंग्रजी काळ. या तिहींपैकीं शेवटल्या काळाविषयींच जरा आपणास आज विचार करावयाचा आहे, तरी पूर्वींच्या दोन काळांतील स्त्रियांची स्थितिही प्रथम लक्षांत आणणें जरूर आहे. कारण पूर्वकालीन स्थितीच्या इतिहासाचें ज्ञान आपणांस असलें म्हणजे आपण सद्यःकालीन संकटास तोंड कसें द्यावें, व भविष्यत्कालीन कोणकोणत्या गोष्टींची [illegible] धरावी, हें आपणांस सहज कळून येतें.

५. पूर्वी वेदकाळांत स्त्रियांचा दर्जा समाजांत व राष्ट्रांतही पुरुषांच्या बरोबरीचा असावा असें दिसतें. त्यावेळीं बालविवाहपद्धति, पडदा-पद्धति, सतीची चाल, व पुनर्विवाहास कडक प्रतिबंध असल्याचें आढळत नाहीं. सुशिक्षित स्त्रिया तत्त्वज्ञानासंबंधीं व ईश्वरासंबंधीं कवनें रचीत असत, यज्ञोपवितावर त्यांचा पुरुषांप्रमाणेंच हक्क असे, आणि प्रत्येक स्त्रीनें लग्न केलेंच पाहिजे असेंही त्या वेळेस मानलें जात नसे. ज्यांच्या इच्छेस येईल त्यांनीं अविवाहित राहावें व भावाच्या बरोबरीनें बापाच्या संपत्तीचे वाटेकरी व्हावें, असें चालत असे. एकंदरींत त्यावेळीं स्त्रियांना बराच मान मिळत असे. त्यांची उन्नतिही बरी झाली असून इहपरलोकच्या सर्व धर्मकार्यांत त्या पुरुषांचे बरोबरीनें भाग घेत असत. विद्वानांच्या सभेमध्यें गार्गीनें स्थान मिळविलें होतें, याज्ञवल्क्याची पत्नी मैत्रेयी ही आपल्या पतीशीं ज्ञेय-अज्ञेयासंबंधीं तासानुतास वादविवाद करीत असे. या सर्व गोष्टींवरून त्याकाळीं मिळणाऱ्या उच्च शिक्षणांत स्त्रियांनाही भाग मिळत असे हें स्पष्ट होतें.

६. "या सर्व संस्कृतींचा जर सुविकास होत गेला असता तर स्त्रीशिक्षणाला आज जें महत्त्व आलें आहे तें आलें नसतें." ( डॉ. रा. गो. भांडारकर ). परंतु तो काळ गेला, त्या काळाबरोबरच स्त्रियांचें स्वातंत्र्यही गेलें, त्यांच्या शिक्षणाचे मार्ग बंद होऊं लागले, व अज्ञानाचे दरींत त्या दिवसेंदिवस लोपत जाऊं लागल्या. मनुस्मृतींत स्त्रियांना बरेंच खालच्या दर्जाचें स्थान दिलें गेलें आहे. मुलगा आठव्या वर्षी गुरुगृहीं विद्यार्जनाकरितां जातो; पण 'अष्टवर्षा भवेत कन्या' या नियमानुसार मुलगी आठवे वर्षी पतिगृहीं जाते! अर्थात् मुलीला शिक्षणाचे दरवाजे आठवे वर्षींच बंद झाले. विद्यार्जनाचें स्थान गृहकृत्यांनीं पटकावून सासूसासऱ्याची व पतीची सेवा हाच काय तो स्त्रीचा धर्म उरला. पतिव्यतिरिक्त तिला ईश्वर नाहीं व पति-सेवेशिवाय तिला दुसरा धर्म नाहीं, असें मानलें जाऊं लागलें. मनुस्मृतींत स्त्रियांसंबंधानें बरींच साधकबाधक वचनें आहेत. त्यांतील स्त्रियांच्या तर्फेचें मुख्य वाक्य म्हणजे 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' हें आहे; व खरोखरीनें साधक. परंतु ज्याला चांगलेंच बाधक रूप आलें आहे तें वाक्य म्हणजे–" न स्त्री स्वातंत्र्यमर्हति." एकंदरींत मनूचे काळापासून हिंदु स्त्रियांचे अवनतीस व पारतंत्र्यास सुरवात झाली, व त्यांचे पुढील ज्ञानार्जनाचे, उन्नतीचे व स्वातंत्र्याचे सर्व मार्ग हळू हळू बंद करण्यांत आले. परंतु स्त्रियांचे चला-खीपुढें कायदेकानूंचें सुद्धां केव्हां केव्हां कांहीं चालत नाहीं. मनूनें जरी इतके कडक नियम घातले तरी कित्येक वर्षेंपर्यंत ब्राह्मणस्त्रियांना चांगलें लिहितां वाचतां येत असे. शास्त्रें स्त्रियांनीं वाचूं नयेत असा कायदा झाला तरी घरांतील पुरुष मंडळींचे स्नान-संध्येचे वेळीं लक्ष देऊन ते जें जें म्हणत तें तें या स्त्रियांना पाठ येत असे. एकदां कानांवरून गेलें कीं गोष्ट विसरावयाची नाहीं अशी त्यांना संवय लागल्या-मुळें त्यांची स्मरणशक्ति उत्तम परिपक्व होत असे; इतकी कीं, कोणत्याही प्रकारच्या रोजनिशा किंवा डायऱ्या न ठेवितां पंचवीस तीस वर्षांमागें घडलेल्या क्षुल्लक गोष्टींचेंही वर्णन त्या बिनचूक करूं शकत असत. रामायण, महाभारत यांतील कित्येक सुरस कथा त्यांना मुखोद्गत असत. कित्येक कोरीव लेण्यांमधून, स्त्रिया लिहीत वाचीत बसल्या आहेत, अशीं चित्रें आहेत. कालिदासाचे काव्यांतून शिक्षित स्त्रियांची थट्टा केलेली आढळते; व तुरळक तुरळक कां होईना पण स्त्रियांनीं शिक्षण घेतल्याचे दाखले हिंदूंचे इतिहासांत भरपूर आहेत. नवव्या शतकांत लीलावतीचे दोन ग्रन्थ प्रख्यात आहेत. तामिल लोकांत भृगुवानाच्या मुली अव्यार व तिच्या बहिणी या आपल्या भावापेक्षांही तत्त्वज्ञानांत हुशार होत्या. तामिल रामायणाचा लेखक कंबूर याचे वेळीं अव्यारनें वैद्यक, खगोलविद्या इत्यादि विषयांवर उत्तमोत्तम लेख लिहिलेले आहेत. ती जन्मभर अविवाहित राहिली व तीव्र बुद्धीचे बाबतींत मागें कीर्ति ठेवून परलोकीं गेली.

७. परंतु यापुढें मुसलमानी अंमलाखालीं बदललेल्या परिस्थितीमुळें स्त्रियांत स्वसंरक्षणार्थ पडदा-पद्धति सुरू झाली, व ही पद्धति स्त्रीशिक्षणास अत्यंत बाधक झाली. संरक्षणार्थ म्हणून घालून दिलेली ही पद्धत स्त्रियांचे दुर्बलतेस, पारतंत्र्यास व अवनतीस कारण झाली. याही काळांत कांहीं स्त्रिया आपले तेजानें व पराक्र-मानें लोकांचे डोळे दिपवून गेल्या. परंतु या सर्व हाताचे बोटांवर मोजण्याइतक्याच आहेत. अशा स्त्रिया

हिंदु व मुसलमान लोकांतही निर्माण झाल्या; व त्या अपवाद अशाच समजल्या जातात. तेराव्या शतकांत रेझीया बेगम इनें आपलें राज्य अत्युत्तम रीतीनें चालविलें होतें. रजपुत लोकांचेवेळीं लिहिणें वाचणें हें मुख्य शिक्षण समजलें जात नव्हतें. धैर्य आणि पराक्रम हींच त्यांचीं-पुरुषांचीं व स्त्रियांचीं-मुख्य ध्येयें असल्यामुळें या दोन गुणांतही राणी दुर्गावती, चांदबिबी, पद्मिनी, कृष्णाकुमारी आदि स्त्रियांनीं आपलीं नांवें अजरामर करून ठेविलीं आहेत. त्याचप्रमाणें मराठे राज्यांत मातोश्री जिजाबाई, झांशीच्या लक्ष्मीबाई, शिंद्यांच्या बायजाबाई, ताराबाई, व सर्व भारतभूमीस मातोश्रीप्रमाणें प्रेमानें वागवून होळकर वंशास भूषण झालेली राजकार्यधुरंधर व पुण्यशील अहिल्याबाई, यांचीं नांवें सर्वश्रुतच आहेत. अशीं लहान मोठीं अनेक स्त्रीतेजाचीं उदाहरणें हिंदुस्थानाचे इतिहासांत वारंवार दृष्टीस पडतात. परंतु दिवसेंदिवस यांची संख्या कमी कमी होत चालली होती, व हीं रत्नें तुरळक तुरळक आढळूं लागलीं होतीं. परंतु स्त्रियांस शिक्षणाचें द्वार बंद असतांही त्यांनीं राजकारणांत, युक्तींत, पराक्रमांत, धैर्यांत, पुरुषांचे बरोबरीनें भाग घेऊन आपला नंबर बराच वर आणून सर्व जगतास हेंच सिद्ध करून दाखविलें कीं, ईश्वरानें पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांस बुद्धि, धैर्य इत्यादि गुण दिले आहेत, व त्यांची वाढ जुलमानें बंद न केल्यास राष्ट्रास व समाजास त्या अनेक तऱ्हेनें उपयोगी पडतील. वर उल्लेखिलेल्या व त्यांच्या तोडीच्या दुसऱ्या स्त्रिया या स्वाभाविकच अत्यंत तेजस्वी होत्या, म्हणून प्रतिकूल परिस्थितींत सुद्धां त्यांनीं आपलें तेज चमकावून देशाची, समाजाची व कुटुंबाची सेवा केली. परंतु या भूमींत कित्येक अशा स्त्रिया होऊन गेल्या असतील कीं, ज्यांना थोडेंसें उत्तेजन, थोडेंसें शिक्षण मिळालें असतें, तर समाजाची व राष्ट्राची सेवा त्यांनीं उत्तम प्रकारें करून दाखविली असती.

८. वेदकाळचें अध्यात्मिक विषयांसंबंधींचें ज्ञान, नृत्यगायनादिकांचें ज्ञान, व रजपूत-मुसलमानकाळची धैर्यपराक्रमाची चाड व युद्धकलेची माहिती, हीं नष्ट होत होत शेवटीं सर्व तऱ्हेच्या अज्ञानानें व कोत्या समजुतीनें [illegible] स्त्रियांवर आपली पूर्ण सत्ता बसविली; ती इतकी कीं, १८१८ मध्यें स्त्रीशिक्षणासंबंधींची माहिती काढिली गेली त्यावेळीं असें स्पष्ट आढळून आलें कीं, हिंदुस्थानांत स्त्रियांना शिक्षण देण्यासाठीं एकही संस्था नाहीं, व लिहितां वाचतां येणारी स्त्री लाखांत एक मोठ्या मुष्किलीनें सांपडावयाची! पूर्वकाळीन उच्च ध्येयें विस्मृतीच्या इतक्या खोल दरींत जाऊन पडलीं होतीं कीं, पाश्चिमात्य संस्कृतीच्या आधाराशिवाय आमच्या स्मृतिपटलावर चढण्याची त्यांना मुळींच उमेद नव्हती. परंतु पूर्वीं, एकेकाळीं, आमच्या देशांत उत्तमोत्तम ध्येयें व संस्कृति होती म्हणूनच निद्रेमध्यें इतका काळ गेला असतांही त्यांचें पुनरुज्जीवन होण्यास बरेंच सोपें पडलें. त्यामुळें आम्हांस सध्या नवीन गोष्ट तयार करावयाची जरूर राहिली नाहीं. फक्त जुनीं ध्येयें नवीन परिस्थितीला जुळवून घ्यावयाचीं आहेत. तशीं तीं जुळवून घेण्याची इच्छा व शक्ति ईश्वरी कृपेनें व पाश्चात्यांच्या संगतीनें आम्हांस प्राप्त झाली आहे. हा इंग्रजी सत्तेखालीं गेलेला काळ आपल्या विषयाचा मुख्य काळ असल्यामुळें त्याविषयीं थोडा जास्त खुलासेवार विचार करणें जरूर आहे.

९. या काळाचे मुख्य तीन भाग करितां येतील. पहिला सन १८१९ पासून १८५४ पर्यंत. या काळांत मिशनरी स्त्रियांनीं हिंदुस्थानांतील स्त्रियांचे शिक्षणाचे कामीं बरेच परिश्रम केलेले आहेत. या काळांत नवीन तऱ्हेच्या शिक्षणास जरी आरंभ झाला असला तरी वाढ कांहीं फारशी झालेली नव्हती. १९ व्या शतकांत एका डॅनिश मिशनऱ्यानें काढिलेल्या शाळांतून मुलांबरोबरच मुलीही घेतल्या जात असत. पण मुलींकरितां वेगळी अशी एकही शाळा नव्हती. मिस् कुक नांवाचे बाईनें १८२१मध्यें कलकत्यास काढिलेली व १८२९मध्यें मुंबईस मिसेस वुइल्सन् यांनीं काढिलेली याच या देशांतील मुलींच्या पहिल्या शाळा होत, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. यावेळीं या शाळांतून मुलींना पाठविणाऱ्या आईबापांस सर्व देशबांधवांकडून किती कडक विरोध झाला असेल, त्या विरोधास भीक न घालतां आपलें इच्छित कार्य चालू ठेवण्यास त्यांना किती प्रयास पडला असेल, व अशा खवळलेल्या लोकसमदायांत

शाळा चालविणाऱ्यांना किती धोरणें सांभाळावीं लागलीं असतील,. याची कल्पनाच केलेली बरी. अर्थातच अशा कल्पनातीत कठीण स्थितींतून स्त्रीशिक्षणाचा विस्तार लवकर होणें शक्यच नव्हतें. १८४०-मध्यें मिस कुकनें सबंध बंगालमध्यें फक्त ५०० मुली शिकत असल्याचें लिहून ठेविलें आहे. स्त्रीशिक्षणाची वाढ पुरुषांचे शिक्षणावर बहुतांशीं अवलंबून आहे. जसजसें पुरुषांचें शिक्षण वाढेल तसतसेंच स्त्रीशिक्षणास पुढें पाऊल टाकण्यास वाव मिळेल. १८५४ सालापर्यंत आमच्याकडे सुशिक्षित पुरुषच जर बोटांवर मोजण्याइतके होते, तर सुशिक्षित स्त्रिया दुर्मिळ असल्यास नवल काय ? अक्षर-ओळख झाली म्हणजे स्त्रियांचें शिक्षण बरेंच झालें असा या काळचा समज होता; व लग्नापूर्वी जें एखादें वर्ष शिक्षणासाठीं मिळणार त्यांत अक्षरओळखीपेक्षां त्या बालिका जास्त काय करूं शकणार ? परंतु हें प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शाळा हळू हळू विस्तार पावूं लागल्या. हा त्यांचा विस्तार याहूनही जास्त झाला असता; पण त्या शाळांतून खिस्तीधर्माचा प्रसार केला जातो असें पाहून, प्राणांपेक्षांही धर्माला प्रिय व पूज्य मानणारे अस्मद्देशीय लोक त्या शाळांचा उपयोग करून घेण्यास बिचकूं लागले. हिंदुस्थानांतील धर्मसमजुतींत व रीतीभातींत हात न घालण्याचा सरकारनें निश्चय केलेला असल्यामुळें या मिशनरी शाळांना सरकाराकडून प्रत्यक्ष अशी मदत क्वचितच मिळत असे. व शिक्षणासंबंधीं प्रयत्न आपण केल्यास कदाचित् या लोकांत आपणाविषयीं विनाकारण गैरसमजूत व अनादर उत्पन्न होईल, या भीतीनें सरकारानें या विषयासंबंधी जवळ जवळ १८४९-पर्यंत तटस्थ वृत्तीच स्विकारलेली दिसते. १८४९-मध्यें मात्र लॉर्ड डालहौसीनें बंगालच्या शिक्षणकौन्सिलास, इतःपर तुम्हीं स्त्रियांचे शिक्षणाची जबाबदारीही स्वीकारणें जरूर व इष्ट आहे, असें लिहिलें होतें; व त्याप्रमाणें तत्कालीन कौन्सिलचे कायदेपंडीत ऑनरेबल ड्रिंकवाटर बेथ्यून यांनीं खाजगी रीतीनें सुरू केलेली 'बेथ्यून शाळा' सरकारनें आपल्या अधिकारांत घेतली.

मुंबईकडेही पहिली मुलींची शाळा मिसेस वुइल्सननें काढली व १८१९ ते १८२७ पर्यंत मौंट स्टुअर्ट एल्फिस्टनचे कारकीर्दींत पाश्चात्य शिक्षणास सरकारांतून थोडेंफार उत्तेजन मिळालें; इतकेंच नव्हे, तर नवीन स्त्रीशिक्षणमंदिराचा पाया त्याच कारकीर्दींत खोदला गेला असें म्हणावयास हरकत नाहीं. बंगालपेक्षां मुंबईकडे स्त्रीशिक्षणाची वाढ जास्त जोरानें होत गेली. याचें मुख्य कारण म्हणजे बंगालप्रमाणें पडदा राखण्याची चाल मुंबईस केव्हांही नव्हती. एल्फिस्टन कॉलेजमधील विद्यार्थ्यांचे 'स्टूडन्ट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी'नें या संबंधांत १८४५ मध्यें प्रयत्न सुरू केले. या सोसायटीचे मुख्यतः दादाभाई नवरोजी व दुसरे चार गृहस्थ अशा पाचांनीं आपापल्या घरीं मुलींकरितां शाळा काढण्याचें काम उचलिलें आणि म्हणूनच दादाभाईस व त्यांच्या उपरिनिर्दिष्ट सोसायटीस अखिल हिंदुस्तानांतील स्त्रीशिक्षणाचे नाहीं तरी निदान मुंबईंतील स्त्रीशिक्षणाचे जनक म्हणावयास हरकत नाहीं. १८५० चे सुमारास निरनिराळ्या म्युनिसिपालिट्यांनीं मुलींकरितां शाळा सुरू केल्या होत्या. एकंदरींत १८४५ पर्यंत मिशनरी प्रयत्नानें सरकारचे व सुशिक्षित लोकांचे मनांत स्त्रीशिक्षणासंबंधीं जागृति उत्पन्न केली असें म्हणावयास हरकत नाहीं.

११. इ. स. १८५४ चा सर चार्लस वुडनें पाठविलेला खलिता हिंदुस्थानांतील शिक्षणविषयक इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा आहे. सरकारांनीं लोकशिक्षणासाठीं कसे व किती व्यापक प्रयत्न केले पाहिजेत, हें त्यांत नमूद केलें आहे. त्याच खलीत्याचे आधारें शिक्षणाप्रीत्यर्थ लोकांकडून जे कांहीं थोडे फार प्रयत्न होत असतील त्यांना उत्तेजन देऊन त्यांची वाढ करण्याकरिता 'ग्रँट इन्-एड' शाळांची पद्धति सुरू केली. शाळागृह, विद्यार्थ्यांची संख्या, शिक्षकांची संख्या, हें सर्व सरकारांनीं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें असल्यास सरकाराकडून त्या त्या संस्थांच्या खर्चाकरितां कांहीं नियमित रक्कम मदत म्हणून दिली जात असे. धार्मिक शिक्षणासंबंधीं सरकारांनीं या खलित्यांत आपण जबाबदार नसल्याचें लिहिलें आहे. याच खलित्यामुळें

शिक्षणविषयक खातीं वेगळीं बनवून विद्याखात्यांतील संस्था वारंवार तपासण्यासाठीं तपासनीस नेमले गेले, व परीक्षा-पद्धति सुरू झाली. याच खलित्यांत स्त्रीशिक्षणास सढळ हातानें मदत केली जाईल असें आश्वासन दिलें आहे. "स्त्रीशिक्षण हिंदुस्थानांत अत्यंत महत्त्वाचें आहे, व एकदेशीय लोक आपल्या मुलींना शिक्षण देण्याचे इरायानें दिवसेंदिवस जास्त प्रयत्न करीत आहेत ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. कारण लोकसमुदायांत सर्व साधारण नीति व शिक्षण यांचे विचारांचा फैलाव होण्यास पुरुषशिक्षणापेक्षां स्त्रीशिक्षणच जास्त कारणीभूत होईल " हें तत्त्व त्या खलित्यांत प्रतिपादिलें आहे. पण प्रत्यक्ष रीतीनें सरकारचें वर्तन या तत्त्वाचे विरुद्ध झालेलें जरी आढळत नाहीं तरी या खलित्यांत जितकें स्त्रीशिक्षणाचें महत्त्व गाइलें आहे तितकें तर नव्हेच पण त्याच्या एक-चतुर्थांशही प्रयत्न स्त्रीशिक्षणाकरितां सरकाराकडून झालेले दिसत नाहींत. स्त्रीशिक्षणांत समाजसंबंधी पुष्कळ समजुतींची गुंतागुंत आहे,म्हणून असल्या नाजूक विषयापासून आपण अलिप्त राहणें चांगलें असें सरकारास वाटतें. अर्थात्, पुरुषांचे शिक्षणासाठीं निरनिराळ्या ठिकाणीं शाळागृहें बांधलीं गेलीं; कित्येक शाळांस सरकाराकडून मदत मिळाली; व नमुन्यालायक कांहीं ठिकाणीं उत्तम शाळा चालविण्याचें कामही सरकारानें अंगीकारिलें. परंतु स्त्रीशिक्षणास दिलेला आशीर्वाद मात्र खलित्यांतला खलित्यांतच राहिला. १८६८ मध्यें लॉर्ड लॉरेन्स यांनीं एका सर्क्युलर-ऑर्डरमध्यें स्पष्ट लिहिलें आहे कीं, स्त्रियांचे शाळांकरितां लोकांकडून खरीखुरी सहानुभूति व पैशाची मदत मिळत नसल्यास सरकारनें अशा शाळा मुळीं काढूंच नयेत हें उत्तम. या त्यांच्या धोरणामुळें, १८८१ मधल्या बंगाल ॲड्मिनिस्ट्रेशन रिपोर्टांत, स्त्रियांकरितां सरकारानें काढिलेल्या फक्त दोनच शाळा आहेत, लोकांनीं काढिलेल्या पण सरकारकडून मदत घेणाऱ्या ७१९ शाळा आहेत, व सरकारी मदतीशिवाय लोकांनींच चालविलेल्या १०७ शाळा असल्याचें लिहिलें आहे. यावरून लोकांमध्यें स्त्रीशिक्षणाची आवड दिवसेंदिवस पण हळूहळू वाढत चाललेली स्पष्ट दृष्टीस पडते.

१२ आगऱ्यास गोपाळसिंग नांवाच्या गृहस्थानें मुलांच्या शाळेच्या तपासनिसाचें काम करीत असतां स्त्रियांकरितां बऱ्याच लहान लहान शाळा सुरू केल्या होत्या. सर्वांत मिळून जवळ जवळ चार हजार मुली शिकत होत्या. १८५७ चे बंडांत पुन्हां ही संख्या कमी झाली. परंतु या शाळा न चालण्याचें कारण, योग्य शिक्षकांची व योग्य देखरेखीची उणीव हें होय, असें सरकारचें म्हणणें होतें. पुढें १८६३ चे सुमारास दोन युरोपियन इन्स्पेक्ट्रेसेस नेमल्या व थोड्या फार प्रमाणावर मुलींच्या शाळा सरकारतर्फे सुरू करण्यांत आल्या. पण मुलींच्या शाळांकडे समाजाचें व सरकारचें फारच कमी लक्ष असे. यामुळें त्यांची वाढ खुरटी राहिली इतकेंच नव्हे, तर १८७६ मध्यें एकदम २८० शाळा कमी करण्यांत आल्या व स्त्रीशिक्षणाचे अत्यंत मंदगतीनें वाहणारे ओघास पाट घालण्यांत आला; व यास कारण असें सांगण्यांत आलें कीं, खर्चाचे मानानें शाळेंत मुलींचें मान कमी होऊं लागलें.

मुंबईस स्त्रीशिक्षणाचे वाढीस मिस् मेरी कारपेंटर या इंग्लिश बाईनें बरेंच चालन दिलें.ही बाई १८६७ते १८७७ चे दरम्यान हिंदुस्थानांत आली व तिनें आपलें वजन खर्चून सरकारचें व लोकांचें मन स्त्रीशिक्षणाकडे बरेंचसें वळवून घेतलें. ही बाई अत्यंत धर्मनिष्ठ होती व इंग्लंडांत बाळवयांत असलेल्या गुन्हेगारांचें संरक्षण करणें व त्यांस दुर्मार्गापासून अलिप्त राखणें वगैरे अनेक राष्ट्रीय कामें उत्तम रीतीनें करून या बाईनें नांव मिळविलें होतें. तिनें येथें येतांच स्त्रीशिक्षणाचें काम हातीं घेऊन येथील कांहीं बुद्धिवान स्त्रियांना इंग्लंडांत नेऊन शिक्षण देणें, येथेंच शिक्षकिणी तयार करण्याकरितां नार्मल-स्कूल्स काढणें, जागोजाग स्त्रियांच्या सभा करून, समाज स्थापून स्त्रीशिक्षणाकडे लोकांचीं मनें वळविणें, सरकारांत लोकांच्या अडचणी कळवून योग्य तें साहाय्य सरकारकडून मिळविणें, इत्यादि कार्यें तिनें केलीं. जरी तिचा स्वतःचा ख्रिश्चानिटीवर पूर्ण विश्वास होता तरी जोंपर्यंत मिशनरी लोक ख्रिश्चन धर्म हा शिक्षणाचें मुख्य अंग समजत आहेत तोंपर्यंत ते हिंदुस्थानांत शिक्षणप्रसार करूं शकणार नाहींत, असें तिचें मत

होतें. व लोकांच्या धार्मिक समजुतींस धक्का लावणार नाहींत, अशा प्रकारच्या शाळा ती जागोजाग स्थापन करूं व करवूं लागली, व तिच्याच प्रयत्नानें आज पुणें, अहमदाबाद व मद्रास येथें सरकारांनीं चालू केलेलीं स्त्रियांचीं ट्रेनिंग कालेजें दिसत आहेत. याच सुमारास मिशनरी बायांनीं स्त्रीशिक्षणासंबंधीं अनेक विरुद्ध गोष्टींस तोंड देऊन फार नेटानें काम चालविलें व बरेंचसें श्रेय मिळविलें, व १८७० त लखनौला 'इझाबेला थोबर्न शाळा' काढिली. १८८०त पालम् कोटयाला टक्कर स्कूल निघालें. १८८१ मध्यें कलकत्यास 'फ्री चर्च मिशनस्कूल' मधून एक विद्यार्थीण F. A. च्या परीक्षेंत उत्तीर्ण झाली.

१४. १८८४ पासून सरकारानें स्त्रियांचे शिक्षणांत भाग घेतलेला दिसतो. १८८२ मध्यें हंटर एज्युकेशन कमिटीनें स्त्रीशिक्षणाकरितां सरकारानें म्हणण्यासारखें कांहींच केलेलें नाहीं असें लिहिलें आहे, व या कामांत सरकारानें जास्त लक्ष देण्याची अत्यंत जरूरी आहे असेंही लिहिलें आहे. १९०० मधल्या कमिटीनें, मुलींचे शाळांना जास्त मदत मिळाली पाहिजे व त्यांचेकडून फी घेतली जाऊं नये, असेंही लिहिलें आहे. या सर्व गोष्टींमुळें स्त्रीशिक्षणाला बरेंच चालन मिळालें. याच सुमारास एतद्देशीय पुरुष मंडळी इंग्रजी शिक्षण मिळवून स्वतांच्या समाजस्थितीविषयीं विचार करूं लागली होती. स्त्रीशिक्षणाची जरूरी पाहून तत्संबंधी बरेच प्रयत्न लोकांकडून होऊं लागले होते. आर्यसमाज, ब्राह्मसमाज, लिटररी आणि सायंटिफिक सोसायटी इत्यादि समाजांचे व मंडळींचे या कामांत बरेच स्तुत्य प्रयत्न चालू होते. १९०० मध्यें जो क्विंक्वेनियल रिपोर्ट प्रसिद्ध झाला त्यावरून खालीं दिल्याप्रमाणें मुलींच्या शिक्षणाचें मान कळतें. त्यावरून मुलींचे शिक्षणाची इच्छा, व तत्प्रीत्यर्थ लोकांकडून, सरकाराकडून, व मिशनऱ्यांकडून होणारे प्रयत्न यांच्यांत सारखी वाढ दिसून येते. शाळेंत जाणाऱ्या मुलींचें मान १८८६ मध्यें १. ६, १८९६ मध्यें २.१, १९०१ मध्यें २.२, १९०७ मध्यें ३. ६, आणि १९१० मध्यें ४. ६ असें दृष्टीस पडतें.

१५. गेल्या वीस पंचवीस वर्षांत तर या संबंधांत लोकांकडून बरेच चांगले प्रयत्न झालेले दृष्टीस पडतात. पंडिता रमाबाई यांचे शारदासदनानें स्त्रीशिक्षणास बरेंच चालन दिलें. हिंदुसमाजांतील विधवांचे नैराश्यपूर्ण जीविताला त्या सदनामुळेंच कांहीं उजेडांत येण्याचा मार्ग थोडासा तरी खुला झाला. व रुढीचे नादीं लागून भलत्या मार्गानें जाणाऱ्या महाराष्ट्रांतील लोकसमजुतीस रानडे, चिपळूणकर, आगरकर प्रभृति मंडळींनीं आपल्या वाणीनें व लेखांनीं थोडेंसें योग्य वळणावर आणून ठेविल्यामुळें मुलींना शिक्षण देणें इष्टच नव्हे पण जरूर आहे असें कित्येक पुरुषांना वाटूं लागलें होतें. परंतु त्यांच्या पसंतीस येणाऱ्या अशा शाळा त्या वेळेस फारशा नसल्यामुळें त्यांच्या या शिक्षणविषयक इच्छा त्यांना कित्येक वर्षें मनांतल्या मनांतच ठेवाव्या लागल्या. याच सुमारास पंडिता रमाबाईचें शारदासदन निघाल्यामुळें त्यांना विद्यार्थिनींचा तुटवडा पडला नाहीं. कारण तयार झालेल्या लोकमतास अनुकूल अशीच ती संस्था होती. पंडिताबाईचे विद्वत्ता, तेज, काम करण्याची हातोटी, कार्यासंबंधीं कळकळ, वगैरे अलौकिक गुणांमुळें सदनांत विद्यार्थिनींची संख्या भराभर वाढूं लागली. परंतु पंडिताबाईंनीं ख्रिश्चन-धर्मप्रसाराचें काम जेव्हां तेथें सुरू केलें तेव्हां पुष्कळ लोकांनीं आपल्या लेकी सुना तेथून काढून घेतल्या; व जोरानें वाढूं पाहणाऱ्या या स्त्रीशिक्षणाचे ओघास बराच धक्का बसला. स्त्रीशिक्षणाकडे वळलेलें लोकमत या प्रकारें घाबरून बिचकून गेलें, व स्त्रीशिक्षणाकडे लोक साशंक दृष्टीनें पाहूं लागले. स्त्रीशिक्षणाविरुद्ध असलेली मंडळी या सदनांत आपल्या मुली घालणाऱ्या समाजसुधारकांस हिणवून, आतां तरी असा

मूर्खपणा करूं नका, म्हणून सांगूं लागली होती. परंतु हें फार दिवस चाललें नाहीं. प्रसंग निघून गेल्यावर शांतपणें विचार करूं लागतांच आपला धर्म संभाळून स्त्रियांना शिक्षण देणें मुळींच अशक्य नाहीं असें त्यांना वाटूं लागलें, व अशा संस्थेची त्यांना उणीव भासूं लागली. मागणी योग्य असल्यास पुरवठा तत्काल झालाच पाहिजे, या तत्त्वानुसार प्रो. धोंडो केशव कर्वे यांनीं पुण्यास 'अनाथबालिकाश्रम' स्थापिला, व लोकाश्रयावर हा गेल्या वीस वर्षांत इतका भरभराटीस आला आहे कीं, तेथें आज विधवाश्रम, महिलाविद्यालय, ट्रेनिंग स्कूल व स्त्रियांची युनिव्हर्सिटी, इतक्या संस्था चालविणें शक्य झालें आहे. या नवीन युनिव्हर्सिटीची पहिली ग्रॅज्युएट बाईही तिगस्त सालीं तयार झाली. अनाथबालिकाश्रमानंतर कांहीं वर्षांनीं रा. मलबारी यांनीं सेवासदनाची कल्पना काढून एक सेवासदन मुंबईस स्थापिलें व त्याच धर्तीवर श्री. रमाबाई रानडे यांनीं पुण्यास एक सेवासदन चालू केलें. यांत मुख्यतः प्रौढ स्त्रियांचे शिक्षणाची सोय केलेली आहे. फावल्या वेळीं कांहीं उपयोगी कामधंदा करितां यावा या उद्देशानें शिवणकाम, भरतकाम, रुग्णशुश्रूषा वगैरे कला तेथें शिकविल्या जातात. सर्वसाधारण स्त्रियांत शिक्षणाभिरुचि उत्पन्न करण्याच्या इरादानें विद्वान् स्त्रीपुरुषांचीं व्याख्यानें करविणें, शिक्षकिणी व समाजसेविका तयार करणें, इत्यादि मुख्य उद्देशानुसार तेथें काम मोठ्या कळकळीनें व परिश्रमपूर्वक चाललें आहे. कर्व्यांचे आश्रमाचे धर्तीवर पण पौर्वात्य शिक्षणावर जास्त जोर देणारी अशी एक संस्था लाला देव यांच्या परिश्रमानें जालंदर येथें मोठ्या भरभराटींत चालली आहे. पुण्यासारख्या ठिकाणीं जेथें ३० वर्षांमागें गाड्या पाठवून मुली शाळेस आणाव्या लागत तेथें आज जागा नाहीं म्हणून शेंकडों मुलींचे अर्ज दर वर्षी नाकारावे लागत आहेत. एकट्या मुंबई शहरांत मुलींकरितां उच्च शिक्षण देणाऱ्या दहा खाजगी शाळा चालू आहेत. त्यांखेरीज मिशनरी लोकांनीं चालविलेल्या निराळ्याच आहेत. दिल्लीस 'इंद्रप्रस्थ गर्ल्स् स्कूल' या नांवाचें हायस्कूल असेंच लोकाश्रयावर चालू आहे. अलाहाबाद येथें 'क्रास्थवेट गर्ल्स् स्कूल' चांगलें नांवारूपास आलेलें आहे. याशिवाय ज्याप्रमाणें ब्रह्मसमाजानें शिक्षणाकरितां प्रथमतः बरेच प्रयत्न केलेले आढळतात, त्याचप्रमाणें थिऑसोफिस्ट मंडळीनेंही स्त्रीशिक्षणाकडे लक्ष पुरविलेलें दिसून येतें. मिसेस ॲनि बिझांट यांनीं मद्रास व बनारस येथें मुलींकरितां प्राथमिक व दुय्यम प्रकारचें शिक्षण देणाऱ्या शाळा चालविल्या आहेत; व जागोजाग आपल्या अधिकारपूर्ण वाणीनें भाषणें करून लोकांचीं मनें त्या बाजूला वळविलीं आहेत. लोकमत तयार करण्यांत स्वामी विवेकानंद, सिस्टर निवेदिता, सेंट निहालसिंग वगैरे मंडळींनीं बरेच परिश्रम केले. अर्थात् जेथें जेथें या सुविचारबीजानें मूळ धरलें तेथें तेथें स्त्रीशिक्षणाकरितां लहान मोठ्या शाळा पटापट लोकाश्रयावर किंवा स्वतःचे खर्चानें धनिक मंडळीनें चालू केल्या. कित्येक एतद्देशीय संस्थानांतही स्त्रीशिक्षणाचें पाऊल झपाट्यानें पुढें पडत असल्याचें दिसतें. बडोदें येथें आज स्त्रियांकरितां ट्रेनिंग कॉलेज, हायस्कूल व शेंकडों प्राथमिक शाळा चालू आहेत. इंदुरांतही स्त्रियांकरितां एक विधवाश्रम, एक हायस्कूल व अनेक प्राथमिक शाळा चालू आहेत. म्हैसूर येथें हायस्कूलच नव्हे तर स्त्रियांकरितां कॉलेजही चाललेलें आहे. त्याचप्रमाणें बंगाल, मद्रास, अलाहाबाद, लखनौ येथें स्त्रियांकरितां कॉलेजें चालू आहेत. स्त्रीशिक्षणाचे बाबतींत मागें असलेल्या मुसलमान स्त्रियांतही शिक्षणाची आवड व प्रगति दिसून येत आहे. प्राथमिक शिक्षण पुष्कळ मुसलमान मुलींना दिलें जातें. मधून मधून एकादुसरी हायस्कुलांत शिक्षण घेत असलेली, तर क्वचित् एकादी कालेजांतही दाखल झालेली आढळते. परीक्षेच्या दृष्टीनें

त्यांच्यांत फारशी प्रगति नसली तरी सर्वसाधारण ज्ञान मिळविण्याकडे व सार्वजनिक कामास हातभार लावण्याकडे पुष्कळ मुसलमान स्त्रियांची प्रवृत्ति दिसून येते. भोपाळच्या बेगम साहेब स्वतः सुशिक्षित असून स्त्रिशिक्षणासंबंधीं बरेच परिश्रम करीत असल्याचें ऐकिवांत आहे. पारशी मंडळींनीं तर सर्व गोष्टींप्रमाणें स्त्रीशिक्षणांतही बरीच आघाडी मारिली आहे. प्रतिकूल परिस्थितीस व बालविवाहासारख्या रूढीस भीक न घालतां स्त्रीशिक्षणाचें पाऊल धीर गंभीर रीतीनें दिवसेंदिवस पुढेंच पडत चाललें आहे. हिंदुस्थानांतील कोणत्याही युनिव्हर्सिटींत स्त्रियांना मज्जाव नाहीं, व युनिव्हर्सिटींतील आर्टस्, सायन्स, मेडिसिन, पेडागॉगी वगैरे विषयांत प्रावीण्य मिळवून उच्चतर पदव्याही कित्येक स्त्रियांनीं मिळविल्या आहेत, व सृष्टिकर्त्यानें स्त्रीपुरुषांच्या बुद्धींत अणुरेणुभरही फरक ठेविलेला नाहीं हें सिद्ध करून दाखविलें आहे.

१६. स्त्रियांचें कार्यक्षेत्र पुष्कळांशीं स्त्रियांचे शिक्षणाप्रमाणेंच परिस्थिति व समाजांतील समजुती यांवर अवलंबून आहे. पूर्वी ज्यावेळीं स्त्रिया कुटुंबांतील, समाजांतील, राष्ट्रांतील देवता किंवा माता अशा समजल्या जात असत व त्यांचा आदर होत असे, त्यावेळीं स्त्रिया समाजोपयोगी, राष्ट्रोपयोगी मोठमोठीं कामें करीत असत. रजपूत लोकांतील स्त्रियांनीं केवळ प्रसंगांतून आपल्या शौर्याच्या बळानें कित्येक प्रसंगांतून व अडचणींतून आपल्या पतीला, पित्याला, व त्यांचे पश्चात आपल्या राज्याला व अब्रूला सोडविलें व स्वतांचीं नांवें अजरामर करून ठेविलीं. मराठ्यांमध्येंही जिजाई, अहिल्याबाई, बायजाबाई, लक्ष्मीबाई यांनीं त्या त्या काळच्या राजकारणांत उत्तम नांव संपादिलें होतें. परंतु मुसलमानी सत्तेंत स्त्रियांस स्वतःचें संरक्षण करण्याकरितां पडद्याची पद्धति स्वीकारावी लागली, व हळू हळू त्यांचें कार्यक्षेत्रही पडद्याचे आंत राहील इतकें संकुचित व कोतें झालें; व हळू हळू स्त्री ही केवळ आपल्या पतीच्या वैषयिरिक इच्छा पूर्ण करण्याकरितांच उत्पन्न झालेली आहे, यापलीकडे तिनें कांहीं करतां कामा नये व करूंही नये, असा समज रूढ झाला व अज्ञानावस्थेंत रुतलेल्या स्त्रियांनाही दागिने घालून देह सजविणें व पतीची खुषी व लहरी संभाळणें इतक्याकरितांच आपला जन्म आहे असें वाटूं लागलें. दुबळें शरीर, अशिक्षित बुद्धि, नष्टप्राय विचारशक्ति व परावलंबीपणा, यांच्या जणूं काय त्या मूर्ति बनल्या. स्त्रियांना विवाहाशिवाय व पतीशिवाय तरणोपाय नाहीं, शुद्धता नाहीं, धर्म नाहीं कीं देव नाहीं, पतीनंतर तिचें जीवित व्यर्थ आहे, इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांत विधवेचें तोंड एखाद्या घोर गुन्हेगाराच्या तोंडापेक्षांही काळें व अपशकुनी समजलें जाऊं लागलें. एकंदरींत हिंदु समाजांत स्त्रीचें आजकालचें कार्यक्षेत्र म्हणजे, विवाहानें ज्या अनोळखी पुरुषाशीं तिची गांठ पडेल त्याच्या शारीरिक इच्छा तृप्त करण्याचें साधन बनणें इतकेंच राहिलें आहे. हिंदु समाजांतील आजकालच्या स्त्रियांचे कार्यक्षेत्राची बरोबर कल्पना रा. हरि नारायण आपटे यांच्या कादंबऱ्यांतून-त्यांतल्या त्यांत 'पण लक्षांत कोण घेतो' यामध्यें-पाहावयास मिळते. ईश्वरानें दिलेल्या मनुष्यजन्माचा उपयोग, त्यानें दिलेली तीव्रबुद्धि, सुशील स्वभाव, प्रेमळ हृदय व कर्तबगारी यांची, सासूचे अपशब्द, बनूवन्संचा चुगलखोरपणा, शंकरमामंजीसारख्यांचा कसाईपणा, सापत्न मातेचीं कुटिल भाषणें, व मूर्ख भावजईचे टोमणे, यांच्या पंचरशी अग्नींत त्यांची आहुती देण्यांतच बिचाऱ्या यमूच्या सर्व जन्माचा उपयोग होतो. त्यांतल्या त्यांत नशीबानें पति व भाऊ चांगल्या स्वभावाचे व उदारमतवादी असल्यामुळें तिचेजवळ बुद्धीचें भांडवल किती होतें याचें समाजास थोडें तरी दिग्दर्शन होतें. परंतु बिचाऱ्या दुर्गीला तर तोही मार्ग बंद होता. यमूपेक्षांही हुशार

व धैर्यशील असून तिच्या उत्तमोत्तम गुणांची एका नरपशूशीं गांठ पडल्यामुळें जेथल्या तेथेंच राखरांगोळी होते. यनूची चौकस बुद्धि यमूवहिनीच्या चुका शोधण्यांत व तिच्यावर खोटे आरोप करण्यांत व चुगल्या करण्यांतच खर्ची पडते. ढोंगी लोकांचे ढोंगास बळी पडून व अतिलोभाचे कारणानें स्वतःचे दागदागिने घालवून बसण्यांत यमूचे सापत्न मातेच्या सर्व वेळाचा व्यय होतो. एकंदरींत दुष्टपणा,हेवादावा,मत्सर व लोभ यांस बळी पडून स्वतःचे आसपास असलेल्या निरपराधी स्त्रियांना जीवित नकोसें करावयास लावण्यांत किंवा असल्या स्त्रियांच्या दुष्टपणापासून स्वतःचा शक्य तितका बचाव करण्यांतच हिंदु स्त्रियांचे कार्यक्षेत्राचा समावेश होतो. अर्थात् दुसरीं कार्यें करण्यास वेळ व सामर्थ्यच मुळीं शिल्लक राहत नाहीं. परंतु आमच्या सुदैवानें म्हणा किंवा कधीं खालीं तर कधीं वर अशा फेऱ्या करणाऱ्या कालचक्राच्या गतीमुळें म्हणा, इंग्रजी शिक्षणानें व पाश्चात्य लोकांच्या परिचयानें आम्हांस घोर निद्रेंतून जागें केलें आहे; व पूर्वस्मृति देऊन आम्ही होतों कोठें, आहोंत कोठें, व जावयाचें आहे कोठें, हें पाहावयास लाविलें आहे.

१७. रुढीच्या बंदींत पडलेल्या गुलामाचें किंवा अज्ञानाचे खोल दरींत पडलेल्या प्राण्याचें पहिलें कार्य म्हणजे त्या बंदींतून स्वतःची सुटका करून घेणें हेंच असतें. याचें पुढचें कार्य म्हणजे स्वतः बाहेर निघाल्यावर,जे जे दुसरे बंदिवान असून बंदींत किंवा अज्ञानाचे दरींत पडलेले आहेत त्यांना हात देऊन वर काढणें, हें असतें. हिंदुस्थानांतील स्त्रिया गेल्या पन्नास वर्षांत हींच दोन कार्यें करीत आहेत; व त्यांच्या कार्यक्षेत्राचा समावेश या दोन प्रकारचे कार्यांतच होत आहे. व असें होणें स्वाभाविक व इष्टही आहे. कारण वर दिलेल्या दुसऱ्या प्रकारच्या कार्यांत एका मोठ्या उत्तम गुणाचें बीज आहे. तें हें कीं, कोणचीही चांगली गोष्ट स्वतःस मिळतांच, इतरांस विसरून स्वतःच ती उपभोगण्यांत दंग न होतां, त्याचा उपयोग दुसऱ्या मंडळीस ती उत्तम गोष्ट मिळवून देण्याकडे करणें म्हणजे स्वार्थापलीकडे जगांत कांहीं तरी आहे हें ओळखणें होय. अर्थातच माझा जन्म केवळ माझे सुखाकरितां नाहीं, केवळ पतीची व स्वतःचे मुलांची सेवा करण्याकरितां नाहीं, तर स्वतःचे सामर्थ्याप्रमाणें समाजांतील एकंदर व्यक्तींचे सुखासमाधानाकरितां आहे, हा विचार स्त्रियांचे मनांत येऊं लागला आहे. अशा तऱ्हेचा विचार करणाऱ्या स्त्रिया दुर्दैवानें प्राप्त झालेल्या दारिद्र्यास, किंबहुना वैधव्यदुःखासही, न डगमगतां स्वतःचे जन्माचें सार्थक समाजसेवेंत करूं लागल्या आहेत.याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे पंडिता रमाबाई यांचें होय. त्यांचे जीवनक्रमाकडे पाहिलें असतां हिंदुस्थानांतील स्त्रियांत त्यांचें पूर्वीचें तेज व गुण कायम आहेत याची सत्यता पटते.नानाप्रकारचीं संकटें आलीं असतांही त्यांस न जुमानतां एक अबला स्वतःचे जोराचे व प्रयत्नाचे बळानें मी मी म्हणणाऱ्या समाजसेवेच्या कामांत खालीं पाहावयास कशी लावते हें स्पष्ट दिसतें. तसेंच तिनें केलेलें काम पाहिलें म्हणजे मी एकटी अशा विरुद्ध परिस्थितींत काय करणार ?-असें म्हणून निरुत्साह होणाऱ्यास उत्साह मिळतो. पुढें तिनें धर्मांतर केल्यामुळें तिच्या सत्कृत्यांवर थोडेंसें विरजण पडल्यासारखें झालें. परंतु ही एक गोष्ट बाजूस ठेविली असतां तिचे अंगीं वसत असलेल्या धैर्याची, गुणांची व कार्यतत्परतेची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे. पतीची इहलोकची यात्रा संपतांच पतिव्रता पत्नीनें स्वतःच्या जीवाचा निरुपयोगी म्हणून नाश करून घेणें किंवा नेहमीं भुईस भार होऊन राहाणें हा धर्म तर नाहींच, पण ईश्वरेच्छेची प्रतारणा करणें आहे. वैधव्यस्थितींत समाजाचें व राष्ट्राचें काम करून स्वतःचे जीवनाचें साफल्य करणें यांतच खरा धर्म व खरें शहाणपण आहे. क्षणोक्षणीं वृद्धिंगत पावत जाणारा

स्त्रियांचे कार्यक्षेत्राचा परिघ, त्यास अज्ञानानें घालून दिलेली स्वयंपाकघराचे चार भिंतीची मर्यादा फोडून केव्हांच बाहेर निघाला आहे. भित्यापाठीं ब्रह्मराक्षस म्हणतात त्याप्रमाणें, स्त्रियांच्या पाठीमागें रूढि लागून त्यांना ती भलभलत्या मार्गानें पळावयास लावीत होती. परंतु भीति सोडली, धैर्य धरलें, व सोक्षमोक्ष काय तो एकदांचा होऊन जाऊं दे म्हणून त्या 'भित्र्यानें' जर मागें पाहावें तर ब्रह्मराक्षस वगैरे कोणी नसून त्याच्या भीतीचें कारण त्याचें स्वतःचें अज्ञान होय, हें जसें ज्याचें त्यास समजून येतें, त्याचप्रमाणें रूढि रूढि म्हणून घाबरून स्वतःचे व पोटचे मुलांबाळांचें अमर्याद नुकसान ज्यांनीं करून घेतलें त्याच स्त्रियांनीं रूढीला तोंड देण्याचें मनांत आणतांच पाठीमागें वळून पाहतात तों रूढि म्हणजे केवळ स्वतःचे अज्ञानाच्या व विचारहीनतेच्या सावलीपलीकडे कांहीं नाहीं असें त्यांनाही आढळून आलें; अर्थातच 'जल तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट' तसा अनेक शतकें आंतल्या आंत कोंडून ठेविलेल्या स्त्रियांचे गुण सामर्थ्यानें बाहेर निघण्याकरितां त्यांनीं रूढीचीं बंधनें तडातड तोडून टाकिलीं. पं. रमाबाई व डॉ. आनंदीबाई जोशी यांनीं ज्ञानप्राप्तीसाठीं परदेशांत परधर्मीयांचे येथें वास केला, व त्याकरितां स्वदेशी बंधुभगिनींनीं केलेला उपहास निमूटपणें सहन केला. अशा रीतीनें मनाचा पक्का निश्चय केलेल्या स्त्रीपुरुषांपुढें रूढीनें पळता पाय काढावा यांत नवल नाहीं. स्त्रियांना शिक्षण देणें जरूर व इष्ट आहे असें भासूं लागतांच, मुलींस शिक्षण देण्यास स्त्रीशिक्षक असतील तर अधिक चांगलें, असें पुष्कळांस वाटूं लागलें व स्त्रियांना अध्यापनाचा मार्ग मोकळा झाला. इतकेंच नव्हे, तर स्त्रीशिक्षकांची संख्या दिवसेंदिवस वाढतच आहे. स्त्रियांचे जीविताचा कांहीं तरी उपयोग आहे असें वाटतांच, स्त्रियांना कांहीं शारीरिक पीडा होतांच हयगयीवर न टाकतां औषधोपचार जारीनें सुरू होऊं लागले, व स्त्रिया जर वैद्यकी करतील तर समाजाचा व स्त्रीजनसमूहाचा अत्यंत फायदा होईल असें वाटूं लागलें. हळू हळू गेल्या पन्नास साठ वर्षांत स्त्री-डॉक्टर्स व स्त्रीनर्सिस यांचीही संख्या दिवसेंदिवस वाढूं लागली. त्याचप्रमाणें गव्हर्नेसिस, कंप्यानियन्स, सेक्रेटरी, वगैरे प्रकारचीं कामें करून स्त्रिया आर्थिकदृष्ट्याही स्वतंत्र होऊं लागल्या आहेत. सुशिक्षित स्त्रियांचें कार्यक्षेत्र शुक्लेंदूप्रमाणें वाढत्या प्रमाणावर आहे. कित्येक कुलशीलवान मुसलमान स्त्रियांनीं पडदापद्धति बाजूस ठेवून स्वज्ञातीय भगिनींस ज्ञानामृत पाजण्याकरितां मुंबईस शाळा काढिल्या; कलकत्त्यास व मुंबईस ब्राह्म स्त्रियांनीं स्त्रीशिक्षणाचे कामीं बरेंच साहाय्य केलें. अगदीं जुन्या पद्धतींत वाढलेल्या स्त्रिया स्त्रीशिक्षणासाठीं पैसा व सहानुभूति मिळविण्यास गांवोगांव भाषणें करीत फिरत आहेत. स्त्रीशिक्षणाकरितां मोफत वर्ग काढणें, वाचनालयें चालू करणें, मासिकपत्रें चालविणें, पडद्यांतील स्त्रियांस कायद्यासंबंधीं समजूत देणें, वैद्यकी करणें, यांसारखीं समाजोपयोगी अनेक कामें स्त्रिया उत्तम रीतीनें व दिवसेंदिवस अधिकाधिक प्रमाणावर करीत आहेत. अशा प्रकारचे स्वतंत्रपणें कामधंदे करणाऱ्या स्त्रियांप्रमाणेंच, संसारांत आपला पूर्व दर्जा आपल्या कर्तबगारीनें पुष्कळ स्त्रियांनीं मिळविला आहे. आपल्या पित्याचे, व पतीचे कामांत पूर्ण मन घालून त्यांना सल्ला, मसलत, उत्साह, धैर्य व मदत देण्यास त्या समर्थ व तत्पर राहूं लागल्या आहेत. इतकेंच नव्हे तर आपलें आपल्या पतीवर जें कांहीं वजन असेल तें लोकोपयोगी कामें त्यांच्याकडून करवून घेण्यांत त्या खर्च करूं लागल्या आहेत. भोपाळ, बडोदें, इंदूर, गोंडळ, कुचबिहार, इचलकरंजी, सांगली वगैरेसारख्या संस्थानांतून स्त्रियांकरितां व मुलींकरितां विशेष सवलती मिळवून देण्याकडे तेथील राज्ञीमहाराज्ञींचें सारखें लक्ष व परिश्रम चालू आहेत. बडोद्याची

महाराणी श्री. सौ. चिमणाबाईसाहेब यांनीं इंग्लिश स्त्रियांचे कार्यक्षेत्रासंबंधीं पुस्तक लिहून आपल्याकडील स्त्रियांचें कार्यक्षेत्र वाढविण्याकरितां आपल्या संस्थानांत निरनिराळ्या लहान मोठ्या संस्था व शिष्यवृत्त्या चालू केल्या व करविल्या. इंदूर येथील महाराणी श्री. सौ. चंद्रावतीबाईसाहेब यांनीं आपल्या स्वतःच्या खासगी खर्चातून 'अहिल्याश्रम' नांवाचा विधवाश्रम, आणि 'चंद्रावती महिलाविद्यालय' नांवाचें मुलींचें हायस्कूल व सौ. राणी इंदिराबाईसाहेब यांनीं स्त्रियांना व्यायाम करण्यास व उघड्या खुल्या हवेंतील जुने नवे प्रकारचे व्यायामाचे खेळांस अवसर मिळावा या इरायानें 'लेडीज् क्लब' इत्यादि संस्था काढिल्या आहेत, व स्वतः त्यांत मन घालून त्या चालवीत आहेत. भोपाळच्या बेगमसाहेबांनीं 'ऑल इंडिया वुईमेन्स असोसिएशन,' निरनिराळ्या ठिकाणच्या स्त्रियांना सहकारित्वानें एकमेकांचे उपयोगी पडतां यावें या इरायानें चालविली आहे. गोंडळ, इचलकरंजी व सांगली येथील राण्या स्वतः उत्तम शिक्षण संपादून व स्वतःचे मुलींस उत्तम शिक्षण देऊन, आपापल्या संस्थानांस प्रगतीचे मार्गावर नेण्यांत संस्थानाधिपतींस हातभार लावीत आहेत. त्याचप्रमाणें आर्थिक दृष्ट्या मध्यम स्थितींत असणाऱ्या स्त्रियांमध्यें कार्यक्षेत्राची वाढ व रुढीची पिछेहाट बरीच झालेली दिसते. सामाजिक व राष्ट्रीय कामांत वेळोवेळीं आपल्या पुत्रांस प्रोत्साहन देणाऱ्या माता, महमद अल्ली शोकत अल्लींचे मातेप्रमाणें, अगदीं पड्यांत राहणाऱ्या स्त्रीसमाजांतही आढळूं लागल्या आहेत. आपल्या पतीस सत्याग्रहाचे मार्गांत मदत करून, त्याचे बरोबरीनें दुःखसंकटास धैर्यानें तोंड देणाऱ्या सौ. कस्तूरबाई गांधी व सरलादेवी चौधरी आदि स्त्रिया आपल्या सामर्थ्याप्रमाणें समाजाचें व राष्ट्राचें अप्रत्यक्षरीत्या काम करीत आहेत. श्री. सरोजिनी नायडू, रमाबाई रानडे, काशीबाई कानिटकर, यशोदाबाई भट, सौ. कमलाबाई किबे, सौ. गिरजाबाई केळकर, आदि स्त्रिया कवयित्री, ग्रंथकर्त्री, लेखिका, व व्यक्ति म्हणून आज पंचवीस वर्षांत बऱ्याच प्रसिद्धीस आल्या आहेत, व आपल्या कार्यकुशलतेनें त्यांनीं समाजास थोडें फार ऋणी करून ठेविलें आहे. संघशक्तीचें महत्व कळूं लागून स्त्रियांनीं स्त्रियांकरितां चालविलेल्या निरनिराळ्या संस्था, समाज, क्लब यांची वाढ झपाट्यानें होत आहे. भारतस्त्रीमंडळ, गुजराथीस्त्रीमंडळ, सेवासदन, नॅशनल् इंडियन असोसिएशन, भगिनीसमाज, समाजसेवासंघ, अनाथबालिकाश्रम, महिलासमाज, वनिताविश्राम आदि लहान मोठ्या संस्था आपापलीं कामें उत्तम रीतीनें करीत आहेत. स्त्रियांच्या कलाकौशल्याच्या कामांचीं प्रदर्शनें जागोजाग भरलीं जात आहेत. व शिवण्या-टिपण्याचीं कामें शिकण्या-शिकविण्यासाठीं छोटेखानी वर्गही सामर्थ्याप्रमाणें गांवोगांव स्त्रिया चालवीत आहेत. यांत विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं उपरिनिर्दिष्ट सर्व स्त्रिया स्वतःचें घरदार, मुलें बाळें, पिता, पति आदि स्वकीयांची सेवाशुश्रूषा करून हीं कामें करीत आहेत. अशा प्रकारें स्त्रियांचें कार्यक्षेत्र वाढत्या प्रमाणावर असलें व आपणास अझून किती मजल मारावयाची आहे इकडे नजर फेंकली, तर अजूनपावेतों कार्यक्षेत्र-वाढीसंबंधीं आम्हीं जें कांहीं केलें तें समुद्रकिनाऱ्यावरील वाळूच्या एकादुसऱ्या कणाप्रमाणें भासूं लागतें. सातासमुद्रांचे पलीकडील देशांत जाण्याचा इरादा ठेवणाऱ्यानें स्वतःचे घराचे अंगणाबाहेर पाऊल टाकण्याइतकाच पल्ला आम्हीं उन्नतीच्या मार्गांत अजूनपावेतों झेपला आहे. कठीण तो भाग आम्हीं आक्रमिला आहे; स्त्रीोन्नतीचे मार्गास आरंभ केला आहे. आतां न दमतां, न भांबावतां, किंवा गर्वाखालीं दडपून न जातां जर आम्हीं धीर गंभीर रीतीनें पुढें जाणें चालू ठेविलें तरच आज नाहीं उद्यां इच्छित स्थळीं जाऊन पोहोंचूं, यांत संशय नाहीं. राष्ट्राला

स्त्रियांचा किती उपयोग होण्यासारखा आहे हें सांगण्याची या युद्धानंतर जरूर राहिली नाहीं. अजूनपावेतों पाश्चात्य देशांतील लोकांतसुद्धां स्त्रिया राष्ट्रीयदृष्ट्या निरुपयोगी आहेत. दिवाणखान्यांत ज्याप्रमाणें लहान मोठ्या किंमतीच्या सुंदरशा वस्तु ठेवितात त्याप्रमाणें, किंबहुना त्यांतीलच परंतु सजीव, अशा या बाहुल्या Drawing Room Decorations मानल्या जात असत. मोठमोठीं कामें करून येणाऱ्या पुरुषांचा थकवा दूर करण्यापलीकडे त्यांचा उपयोग नाहीं असें समजलें जात असे, व त्यामुळेंच हिंदुस्थानापेक्षांही युरोपियन राष्ट्रांत स्त्रियांचा दर्जा फारच कमी मानला जात असे. युनिव्हर्सिटीच्या पुष्कळशा भागांत त्यांना मज्जाव होता व अजूनही आहेच. पुष्कळ निरनिराळे स्वतंत्र कामधंदे करण्याची त्यांना कायद्यानें परवानगी नाहीं. सरकारी नोकरींतही, शिक्षण व वैद्यकी या दोन खात्यांशिवाय, त्यांचा शिरकाव नाहीं. ज्या मुलांना जन्म देण्याच्या वेदना त्यांना सोसाव्या लागल्या त्या अर्भकांवर सुद्धां त्यांची मालकी कायद्यानें ठेविलेली नाहीं. पतीवर, पतीचे इस्टेटीवर, त्यांची मालकी तर नाहींच, पण पतीचे अपमानकारक, पशुसमान वर्तनापासून स्वतःची सुटका करून घेण्याचा अधिकारही तिजला त्या (पुढारलेल्या) राष्ट्रांतील कायद्यानें दिलेला नाहीं. परंतु तेथील स्त्रियांनीं या एकतर्फी कायद्यांतून स्वतःची व आपल्या भगिनींची सुटका करून घेण्याचा पक्का निश्चय गेल्या शतकापासून केलेला दिसतो. व स्वभगिनींत शिक्षणाचा प्रसार करून संघशक्तीनें त्यांनीं, ज्यांचे लाखांनीं मेंबर्स मोजतां येतील अशा मोठमोठ्या संस्था व समाज चालविले, व स्वजातीसाठीं स्वतःचे जीवास व जिवापेक्षांही प्रिय असलेल्या अब्रूसही वेळीं प्रसंगीं अत्यंत दुष्कर अशा धोक्यांत टाकण्यास त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. ' सफ्रेज ' मंडळांच्या इतिहासांत आंग्ल स्त्रियांनीं प्राप्त करून घेतलेल्या संघशक्तीचें, सुशिक्षणाचें, सुविचाराचें, सतत प्रयत्नांचें कौतुक वाटल्याशिवाय राहात नाहीं. असें असूनही त्यांना राष्ट्र दृष्ट्या निरुपयोगी व राष्ट्रीय बाबीसंबंधीं विचार करण्यांत व मदत करण्यांत असमर्थच समजल्या जात असत. परंतु या नुकत्याच मिटलेल्या महायुद्धांत जेव्हां अनपेक्षित संकटांस तोंड देण्यास देशांतील बहुतेक कर्ते पुरुष आपापले लहानमोठ सर्व कामधंदे जेथल्या तेथेंच सोडून लढाईवर निघून गेले, व राष्ट्रांतील न्यायखातें, पोलीस खातें, रेल्वे, ट्रॅम्स्, पोस्ट ऑफिसें, शेतें, हॉस्पिटलें व व्यापारधंद्यासंबंधीं सर्व जागा रिकाम्या पडून तेथें काम करण्यास पुरुष दुर्मिळ झाले, त्यावेळीं त्या जागा राष्ट्रांतील स्त्रियांनीं पूर्वीचा कांहीं अनुभव नसतांही इतक्या उत्तम रीतीनें भरून काढिल्या कीं, मूर्तिमंत शत्रूला सुद्धां त्यांच्या कर्तबगारींत चूक किंवा उणीव आढळली नाहीं, व नसती. पोलीस शिपायाचें, कानस्टेबलचें, मोटार ड्रायव्हरचें, रेल्वेवर भयाण स्थळीं एकटेंदुकटें राहून गाड्यांना बावटा दाखविण्याचें, लढाईवर सामानाचा पुरवठा करण्याचें, कैद्यांची योग्य व्यवस्था करण्याचें, आगगाड्या चालविण्याचें, वीस वीस तास पोस्टांत काम करण्याचें, कारखाने चालविण्याचें, मोठमोठीं मशिनें साफसूफ करण्याचें व चालविण्याचें, रणक्षेत्रावर जणूं काय घरींच आहोंत अशा निर्भय रीतीनें रुग्णशुश्रूषेचें व वैद्यकीचें काम करण्याचें, ज्यांना घराबाहेर पडतां येणें शक्य नव्हतें त्यांचेकडून घरबसल्या जीं कामें होण्यासारखीं होतीं तीं करवून घेण्याचें, वगैरे सर्व कामें त्यांनीं उत्तम रीतीनें संभाळलीं. गेल्या शतकांतील पूर्वार्धाचे वेळीं तोंडास पावडर, हातांत दीड इंच लांबीरुंदीचा नाजुकसा रुमाल, मनगटास आरसा व सेंटची बाटली, कमरेस लहानशी फॅशनेबल पर्स लटकावलेली असावयाची, व अत्यंत नाजूक, दुर्बल, परावलंबी, अत्यंत भ्याड व क्षुल्लक गोष्टीस घाबरून दिवसांतून दहादां 'बेसावध' होण्यांत ( Faint ) भूषण समजणाऱ्या स्त्रिया या

युद्धांत बोटींवर माल चढविण्याउतरविण्यासारखीं शक्तीचीं, मजुरीचीं व साहसाचीं कामें उत्तम रीतीनें करूं लागल्या; आणि समाजास व राष्ट्रास आपली किंमत व उपयोग किती असतो हें उदाहरणांनीं सर्व जगास दाखवून दिलें. ही त्यांची योग्यता कळून आल्यामुळेंच राष्ट्रीय कामांत भाग घेण्याची सवलत त्यांना मिळूं लागली, व त्यांस सफ्रेजसंबंधीं अधिकार मिळाले. आतां यापुढें या मिळालेल्या सवलतीचा सदुपयोग करून स्त्रीजातीचें व राष्ट्राचें हित करण्याचें कार्य अजून त्यांना करावयाचें आहे, व कायद्यांत सुधारणा करून घ्यावयाची आहे. परंतु त्यांनीं नुकत्याच दाखविलेल्या त्यांच्या सामर्थ्यावरून त्या हें सर्व करूं शकतील असा भरंवसा वाटत आहे.

आम्हां हिंदुस्थानांतील स्त्रियांना प्रथमतः वर सांगितलेल्या सर्व प्रकारचीं कामें करण्याचें सामर्थ्य आपल्यामध्यें आणावयाचें आहे. दृढ निश्चयानें व संवयीनें सर्व गोष्टी प्राप्त होतात. शारीरिक बल वाढवून स्वतःस पहिल्यानें 'दुबळ्या', 'अबला' वगैरे पदव्यांपासून सोडविलें पाहिजे. ताराबाई यांनीं स्त्रिया प्रयत्न करतील तर किती शारीरिक बळ कमावूं शकतील हें दाखविलेंच आहे. स्वतःचें शारीरिक, मानसिक व बौद्धिक बल वाढवून, कोणत्याही प्रकारचें चांगलें काम करण्यांत कमीपणा न मानतां, हरतऱ्हेच्या राष्ट्रीय कामास कंबर बांधून पुढें झालें पाहिजे. आम्हीं प्रयत्न केल्यास व आमची योग्यता सिद्ध करून दाखविल्यास आम्हांसही जास्त अधिकार व सवलती मिळतील, असें मान्टेग्यु-चेम्सफोर्ड-रिफार्मसवरून दिसून येतें. आमचे पुरुष स्वतःस हक्क व सवलती मिळवितांना आम्हांसही देतील ही अपेक्षा करणें निराधार आहे, हें नुकत्याच पुढारी म्हणविल्या जाणाऱ्या आमच्या पुणेंकर बांधवांनीं मुलींचे प्राथमिक शिक्षणाविरुद्ध केलेल्या ठरावांनीं दाखवून दिलें आहे. Do unto others as you wish to be done to हें तत्त्व शहाणी व विचारी मंडळीसुद्धां केव्हां केव्हां विसरतात. म्हणून आम्ही स्त्रियांनीं स्वतःचीं कामें स्वतः करण्यास तयार झालें पाहिजे. आमचें पुढलें कार्यक्षेत्र अफाट आहे. तें आक्रमण्याच्या प्रयत्नाला आम्हीं लागलें पाहिजे. " नर करणी करे तो नरका नारायण हो जाय." मग आम्हांस यश आल्यावांचून कसें राहील ?



*

# मराठी वाङ्मयांतील चरित्रपर ग्रंथ.

[रा. रा.लक्ष्मण जनार्दन खरे, एम्. ए., एल्एल्. बी.]

कोणत्याही देशाची उन्नति होण्यास त्या देशांत होऊन गेलेल्या थोर पुरुषांच्या महत्कृत्यांची स्मृति व तिच्यामुळें उत्पन्न होणारी स्फूर्ति, या गोष्टी फार उपयोगी पडतात. म्हणूनच एका इंग्रज ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, ज्या देशास पूर्वेतिहास नाहीं, त्याला भवितव्यही नसावयाचें. रामायणमहाभारतांमध्यें वर्णिलेलीं वीरांचीं अचाट कृत्यें ऐकून आपणही त्यांच्यासारखें व्हावें अशी इच्छा शिवाजी महाराजांच्या मनांत जागृत झाली, व शिवाजी महाराजांच्या उदाहरणानें थोरले बाजीराव व चिमणाजी आप्पा यांस स्फुरण चढलें, अशा आख्यायिका आपल्यामध्यें प्रचलित आहेत. तेव्हां राष्ट्रीय दृष्ट्या आपल्यामधील थोर लोकांच्या चरित्रांचें महत्त्व केवढें आहे, हें जास्त विस्तार करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. हिंदुस्थानांत पूर्वजांबद्दल योग्य आदरबुद्धि व अभिमान पहिल्यापासून वसत आहे. परंतु या मनोवृत्तींनीं प्रेरित होऊन प्राचीन काळच्या थोर पुरुषांचीं चरित्रें त्यांच्या कालीं लिहिलेलीं अशीं महाराष्ट्रांत अगर हिंदुस्थानांत फारशीं उपलब्ध नाहींत. याचें एक कारण असें असावें कीं, हिंदु लोकांची धर्मनिष्ठा प्रबळ असल्यामुळें ईश्वरी अंश म्हणून मानलेल्या पौराणिक व्यक्ति व साधुसंत यांजविषयीं त्यांना विशेष आदर वाटे; व यांच्यापुढें व्यावहारिक बाबतींत ज्यांनीं यश संपादन केलें त्यांची त्यांना विशेष मातब्बरी वाटत नसावी. यामुळें पुराणें व साधुसंतांच्या कथा यांस महत्त्व आलें, व ऐतिहासिक व्यक्ति मागें पडल्या. तें कसेंही असो, आपल्या प्राचीन वाङ्मयांत ऐतिहासिक ग्रंथांची व त्यांतल्या त्यांत चरित्रपर ग्रंथांची मोठीच उणीव आहे, ही गोष्ट प्रत्येकास प्रांजलपणें कबूल करावी लागेल. महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन झाल्यावर त्या काळांतील कांहीं नामांकित पुरुषांच्या बखरी तयार झाल्या. परंतु त्यापूर्वी महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या अनेक महत्त्वाच्या व्यक्तींचीं त्रोटक चरित्रें सुद्धां कोणीं लिहून ठेवलेलीं दिसत नाहींत.

इंग्रजसरकारचा अंमल सुरू झाल्यानंतर शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांच्या प्रोत्साहनानें मराठी भाषेंत पूर्वी अपरिचित असलेले गद्यलेखनाचे प्रकार सुरू झाले. परंतु इ. स. १८७० सालापर्यंत चरित्रात्मक ग्रंथांची संख्या फारच कमी होती. महाराष्ट्र-ज्ञानकोशमंडळानें प्रसिद्ध केलेल्या सूचीवरून कळून येतें कीं, त्या सालापूर्वी छापून निघालेल्या चरित्रांची संख्या दहाहून जास्त नव्हती. त्या सालापासून पुढील पन्नास वर्षांत म्हणजे 'विविधज्ञानविस्तारा'च्या आतांपर्यंतच्या आयुष्यकालांत इतर वाङ्मयविभागांप्रमाणें या विभागांतही पुष्कळ रचना झालेली आहे. वरील सूचीवरून तयार केलेल्या चरित्रपर पुस्तकांच्या यादींत लहानमोठ्या पांचशें पुस्तकांचा समावेश झाला आहे व गेल्या दोन वर्षांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची यांत भर घातली म्हणजे आजवर मराठी भाषेंत सुमारें सव्वापांचशें चरित्रपर पुस्तकें प्रसिद्ध झालीं, असें स्थूलमानानें म्हणण्यास हरकत नाहीं.

वरील पुस्तकांची वर्गवारी करून पाहतां त्यांमध्यें हिंदु साधुसंत व धर्मप्रवर्तक यांचीं चरित्रें दिडशेंच्यावर असून ख्रिस्ती साधुसंतांचीं पंचवीस, व जैन, बौद्ध, यहुदी, मुसलमान वगैरे धर्मांतील पुरुषांचीं पंधरावीस आहेत. म्हणजे एकंदर सवापांचशें पुस्तकांपैकीं जवळजवळ दोनशें पुस्तकें धार्मिक पुरुषांचीं चरित्रें वर्णन करण्याकडे लागलीं आहेत. मराठी राज्याच्या अखेरीपर्यंत हिंदुस्थानाच्या राजकीय इतिहासाशीं ज्यांचा संबंध आला अशा व्यक्तींच्या चरित्रांची संख्या जवळ जवळ एकशें दहा भरते. सन १८१८ नंतर आपल्या देशांत होऊन गेलेल्या थोर लोकांच्या चरित्रांचीं पुस्तकें ऐशींपासून नव्वदांपर्यंत असून, परदेशांतील नामांकित व्यक्तींच्या चरित्रांची संख्या पंचावन साठपर्यंत आहे. बाकी राहिलेल्या पुस्तकांत व्हिक्टोरिआ महाराणी, एडवर्ड बादशहा, व जॉर्ज बादशहा यांचीं लहान मोठीं वीस चरित्रें असून इतर किरकोळ पुस्तकें आहेत. तेव्हां संख्येच्या मानानें पाहतां राजकीय इतिहासापेक्षां धर्माचा पगडा

मराठी लेखकांवर व वाचकांवर अजून पुष्कळ अधिक आहे असें म्हणावें लागतें. गेल्या शतकांत आपल्या देशीं होऊन गेलेल्या व्यक्तींचें गुणवर्णन करण्याची प्रवृत्ति थोडी फार दिसते, तर राजनिष्ठा व्यक्त करण्याची हांव तिच्याहून अधिक प्रमाणांत वसत आहे असें स्पष्ट नजरेस येतें. परदेशांतील मोठ्या लोकांच्या चरित्रांची संख्या जरी मोठीशी नाहीं, तरी आपली कूपमंडूकवृत्ति आपण हळू हळू टाकून देत आहोंत या गोष्टीची निदर्शक म्हणून तिचें महत्त्व फार आहे.

पन्नास वर्षांच्या मानानें सवापांचशें ही ग्रंथसंख्या कमी नाहीं. परंतु वाङ्मयाची प्रगति केवळ संख्येवरून अजमावणें योग्य नाहीं. प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांच्या गुणावगुणांचें परीक्षण करून त्यावरून कळून येणारें प्रगतीचें मान समाधानकारक आहे किंवा नाहीं, हें ठरविलें पाहिजे. चरित्र लिहिण्याचा उद्देश, चरित्रनायकाच्या कामगिरीचें व स्वभावाचें चित्र शब्दांच्या साह्यानें वाचकांच्या समोर जितकें हुबेहुब ठेवतां येईल तितकें ठेवावयाचें, असा असला पाहिजे. मुख्य विषयाचें चित्र नीट उठून दिसावें याकरितां ज्याप्रमाणें चित्रकार त्याच्या पाठीमागच्या व आजूबाजूच्या वस्तूंचीं चित्रें जरूर असेल तितकीं रंगवितो, त्याप्रमाणें चरित्रलेखकासही नायकाच्या वेळच्या परिस्थितीचें व त्याचा ज्या ज्या घडामोडींशीं अगर व्यक्तींशीं संबंध आला असेल त्यांचें थोडक्यांत सप्रमाण धरून वर्णन करावें लागतें. त्याचप्रमाणें नायकाच्या कांहीं कृत्यांसंबंधानें मतभेद असल्यास त्याबद्दलचें आपलें मत निर्भीडपणें साधकबाधक प्रमाणें देऊन त्यानें वाचकांसमोर मांडलें पाहिजे. त्याच्या स्वभावाचें वर्णन करितांना नुसता त्याच्या गुणांचा गौरव न करितां त्याच्या दोषांचेंही आविष्करण केलें पाहिजे. नायकाच्या सार्वजनिक आयुष्यक्रमाबरोबरच त्याच्या खाजगी राहणीचें वर्णन व त्याच्या स्वभावांतील गुणदोष दाखविणाऱ्या त्याजविषयींच्या लहान मोठ्या आख्यायिका यांचाही चरित्रांत अंतर्भाव झाला पाहिजे. एखाद्या आधुनिक प्रसिद्ध पुरुषाचे चरित्रांत त्याच्या महत्त्वाच्या पत्रव्यवहारासही स्थान मिळालें पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, पुस्तक संपविल्यानंतर चरित्राचा नायक एखाद्या निकट परिचयाच्या गृहस्थाइतका वाचकांच्या माहितीचा झाला पाहिजे.

वरील कसोटीस उतरणारीं चरित्रें पाहिलीं तर तीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच भरतील. परंतु साधारण चांगलीं ज्यांस म्हणतां येईल अशीं पुस्तकें सुद्धां शंभराच्या वर निघणार नाहींत. बाकीचीं क्षणिक स्फूर्तीनें कशींबशीं लिहिलेलीं लहान लहान चोपडीं आहेत. वाङ्मय म्हणून त्यांना विशेष किंमत नाहीं. सबब त्यांना एवढ्यावरच सोडून देऊन, उल्लेखयोग्य पुस्तकांचा थोडक्यांत परामर्श घेऊं. या विवेचनासाठीं एक एक पुस्तक निरनिराळें परीक्षणास न घेतां चरित्रग्रंथांचे कांहीं ठोकळ विभाग पाडून प्रत्येक विभागांत येणाऱ्या पुस्तकांचा विचार करणें सोईचें होईल.

पहिला व सर्वांत महत्त्वाचा विभाग, हिंदुस्थानच्या इतिहासांतील प्रमुख व्यक्तींचीं चरित्रें, हा होय. या विभागाकडे आपल्या लोकांचें पूर्वी बरेंच दुर्लक्ष होतें, असें वर सांगितलेंच आहे. परंतु आतां ही स्थिति बदलून या विभागांत नांव घेण्याजोगीं पुस्तकें आतांपर्यंत बरींच निर्माण झालीं आहेत. आर्यावर्ताच्या प्राचीन इतिहासांत विख्यात असलेल्या पुरुषांपैकीं अशोक व शिकंदर या दोघांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत. पहिलें रा. वासुदेव गोविंद आपटे यांनीं लिहिलें असून दुसरें कै. वि. कों. ओक यांनीं लिहिलेलें आहे. दोन्ही पुस्तकें अनेक ग्रंथांचा आधार घेऊन परिश्रमपूर्वक लिहिलेलीं असून वाचनीय झालीं आहेत. खिस्ती शकाच्या आरंभापासून तों मुसलमानी सत्ता हिंदुस्थानांत दृढमूल झाली तोंपर्यंतच्या कालाचा इतिहास अद्याप पुष्कळ अंशीं अज्ञात असल्या कारणानें हिंदुस्थानच्या या मध्ययुगांतील ऐतिहासिक व्यक्तींचीं चरित्रें उपलब्ध नाहींत. फक्त पृथ्वीराज चव्हाणाचें 'लोकहितवादीं'नीं एक चरित्र लिहिलें आहे. सदरहू पुस्तक एका गुजराथी ग्रंथाचें भाषांतर असून, मूळ ग्रंथास एका हिंदी काव्याचा आधार आहे. तेव्हां तें कितपत विश्वसनीय मानावें हें सांगवत नाहीं.

मुसलमानांची सत्ता दिल्लींत दृढमूल झाल्यापासून हिंदुस्थानाच्या अर्वाचीन युगाला आरंभ होतो. परंतु

शिवाजीच्या उदयकालापूर्वीचा इतिहास कळण्यास देशी भाषांतून फारशीं साधनें उपलब्ध नाहींत. यामुळें सर्व भिस्त फारशी ग्रंथ अगर त्यांवरून लिहिलेले इंग्रजी ग्रंथ यांवर ठेवावी लागते. शिवाय इ.स.१२००पासून मराठी राज्याची स्थापना होईतोंपर्यंतचा इतिहास हिंदु लोकांस उद्वेगजनक असल्यामुळें त्याकडे लेखकांचें सहजच तितकें लक्ष गेलें नाहीं. शिवाजीच्या अगोदर होऊन गेलेल्या ऐतिहासिक व्यक्तींपैकीं फक्त अकबराचीं दोन चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत, व तीं दोन्हीं कर्नल मॅलेसनच्या इंग्रजी पुस्तकाचीं भाषांतरें आहेत. जहांगीरच्या आत्मचरित्राचें भाषांतर म्हणून एक पुस्तक रा. भसे यांनीं प्रसिद्ध केलें आहे. त्याचें मूळ जहांगीरच्या हातचें आहे कीं नाहीं ही गोष्ट बाजूस ठेविली, तरी त्यांत दिलेली नूरजहानची हकीकत वाचली असतां तें फारसें विश्वसनीय नाहीं, असा मनाचा ग्रह होतो.

मराठी राज्याचा इतिहास महाराष्ट्रीयांस विशेष स्फुर्तिदायक असल्यामुळें शिवाजीमहाराजांपासून दुसऱ्या बाजीरावापर्यंत होऊन गेलेल्या बहुतेक प्रमुख वीरांचीं व मुत्सद्द्यांचीं त्रोटक अगर विस्तृत चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत. या काळांतील घडामोडींसंबंधीं अनेक अस्सल साधनें दरसाल शोधून प्रसिद्ध करण्यांत येत असल्यामुळें हीं चरित्रें लिहिण्यास सामग्रीही बरीच असते. या सामग्रीचा उपयोग करून चिकित्सकबुद्धीनें चरित्र लिहिणारे ग्रंथकार निपजूं लागले आहेत, ही समाधानाची गोष्ट आहे. परंतु महाराष्ट्राच्या इतिहासलेखनांत एक अनिष्ट गोष्ट शिरूं पाहात आहे, तिचा उल्लेख या ठिकाणीं केल्याशिवाय राहवत नाहीं. सध्यां आपल्या समाजांत निरनिराळ्या जातींमध्यें तेढ उत्पन्न झाली आहे, व कांहीं काळपर्यंत तरी ती कमी न होतां बळावत जाणार अशीं दुश्चिन्हें दिसत आहेत. एकमेकांविषयीं मनें जितकीं साफ असावयास पाहिजेत तितकीं नसल्यामुळें स्वजातीयांकडे केवळ गुणांचा व परजातीयांकडे केवळ दोषांचा मक्ता आपण बहुधा देऊन टाकतों. अशा तऱ्हेनें दूषित झालेली मनोवृत्ति इतिहासाच्या पवित्र क्षेत्रांत वावरूं लागेल कीं काय, अशी भीति दोन चार चरित्रें पाहून वाटूं लागते. परंतु अजून हा अनिष्ट प्रकार अगदीं अल्प प्रमाणांत असल्यामुळें, असल्या क्षुद्र भांडणाची छाया सर्वच महाराष्ट्रास प्रिय असलेल्या ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रवर्णनावर पडूं देऊं नका, एवढी भावी इतिहासलेखकांस विनंती केली म्हणजे पुरे.

या काळांतील प्रमुख व्यक्ति अर्थातच **शिवाजीमहाराज** हेच होत. जुन्या बखरी सोडून यांचीं तीन चरित्रें आतांपर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत. कै. राजाराम शास्त्री भागवत यांनीं आपल्या छोटया पुस्तकांत महाराजांच्या कारकीर्दीतील ठळक ठळक गोष्टी देऊन त्यांचें थोडक्यांत चरित्र वर्णन केलें आहे. रा. दातार यांनीं आपलें पुस्तक जुन्या बखरींच्या आधारें लिहिलें असून तें वरील पुस्तकाहून विस्तृत आहे. या दोहोंहून रा. केळुसकरांनीं लिहिलेलें चरित्र पुष्कळ विस्तृत असून बरेंच चांगलें उतरलें आहे. वादग्रस्त मुद्द्यांचा त्यांत योग्य ऊहापोह केला असून तें बऱ्याच समतोल बुद्धीनें लिहिलें आहे. शिवाय महाराजांच्या योग्यतेविषयीं कोणताच वाद नाहीं. परंतु स्वराज्यस्थापनेच्या यशाचें पूर्ण माप त्यांचे पदरांत टाकण्याकरितां त्यांच्या समकालीन इतर व्यक्तींचें महत्त्व कमी करण्याचा रा. केळुसकरांचा प्रयत्न सर्वांस पटण्याजोगा नाहीं. महाराजांचा सर्वांत मोठा प्रतिस्पर्धी जो औरंगजेब बादशहा त्याचें चरित्र रा. गोगटे यांनीं दोन भागांत लिहिलें आहे. पुस्तक लिहिण्याचे वेळीं मराठी व इंग्रजी भाषांतील उपलब्ध असलेल्या पुस्तकांचा व ऐतिहासिक लेखांचा आधार घेऊन चिकित्सक बुद्धीनें हें पुस्तक लिहिलें गेलें आहे. अशाच तऱ्हेनें रा. गोगटयांनीं बाळाजी विश्वनाथ आणि बाळाजी बाजीराव पेशवे यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत, तींही वाचनीय आहेत. पहिल्या बाजीरावाचें चरित्र नागेशपंत बापटांनीं थोडेंसें कादंबरीच्या धर्तीवर मनोरंजक रीतीनें लिहिलें आहे.

पेशवाईच्या उत्तरार्धांत होऊन गेलेल्या प्रसिद्ध व्यक्तींपैकीं मल्हारराव होळकर, महादजी शिंदे, नाना फडनवीस, अहल्याबाई व जिवबादादा बक्षी या पांच जणांवर चांगल्या प्रकारचीं पुस्तकें रचण्यांत आलीं आहेत. रा. वासुदेवशास्त्री खरे यांनीं लिहिलेलें नानाफडनविसाचें चरित्र उत्कृष्ट उतरलें आहे, व मराठी वाङ्मयांत याचा दर्जा पुष्कळ श्रेष्ठ आहे. रा. बाळ-

कृष्ण नारायण ना. देव यांनीं नानांच्या कारकीर्दीवर लिहिलेला टीकापर निबंध समतोलपणाचें विवेचन, चांगली भाषा वगैरे गुणांमुळें अवश्य वाचण्यासारखा झाला आहे. रा. नातूंनीं लिहिलेलें महादजी शिंद्यांचें चरित्र मराठींतील उत्तम ऐतिहासिक ग्रंथांत गणण्याजोगें झालें आहे. साध्वी अहल्याबाईचीं तीन चार लहान मोठीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत; त्यांपैकीं 'पुरुषोत्तम' ( विश्वनाथ नारायण देव ) यांनीं लिहिलेलें ' देवी श्री अहल्याबाई ' हें चरित्र उत्तम झालें आहे. याला आधार मालकमचें पुस्तक व त्या काळचा प्रसिद्ध झालेला पत्रव्यवहार यांचा घेतला असून, सर्व वादग्रस्त मुद्द्यांचा खल लेखकानें विचारपूर्वक केला आहे. जिवबादादा बक्षी, महादजी शिंद्यांचे प्रख्यात सेनापति, यांच्या विस्तृत चरित्रांत मराठेशाहीच्या चाळीस वर्षांची हकीकत आली आहे. पुस्तकांतील विधानांस आधारभूत असलेलीं पत्रें अखेर छापलीं आहेत. यांतील विचार अगर अनुमानें सर्वांसच मान्य होतील असें सांगवत नाहीं-तथापि एकंदरींत पुस्तक बरेंच उच्च दर्जाचें झालें आहे. पाटीलबोवांची कामगिरी व धोरण यांविषयींचें ग्रंथकर्त्याचें विवरण मननीय आहे. रा. नातूंच्या ग्रंथांतील मतें पडताळून पाहण्यास या ग्रंथांत आलेली नवीन माहिती व त्यावरील विवरण यांचा फार उपयोग होईल. रा. अत्रेकृत ' मल्हारराव होळकर ' हेंही ऐतिहासिक साधनांचा योग्य उपयोग करून लिहिलेलें चांगल्यापैकीं पुस्तक आहे.

आतांपर्यंत मराठशाहींतील प्रमुख व्यक्तींच्या चरित्रांपैकीं ठळक ठळक ग्रंथांचा उल्लेख झाला आहे. याशिवाय रा. गणेश रामचंद्र शर्मा-कृत 'सारस्वत-रत्नमाला,' रा. मुजुमदार-कृत 'प्रभुरत्नमाला', व रा. ब. पारसनीसकृत 'अयोध्येचे नबाब', आणि स्वराज्यांतील तेजाची अखेरची चमक जिच्या असामान्य कृत्यांत दिसून आली, त्या झांशीच्या 'राणी लक्ष्मीबाईचें चरित्र' हीं पुस्तकें विशेषपणें निर्देश करण्यासारखीं आहेत. पहिल्या पुस्तकांत प्राचीन कालापासून अगदीं अलीकडल्या काळापर्यंत सारस्वत ज्ञातीमध्यें जे विद्वान्, साधु अगर शूर मुत्सद्दी पुरुष होऊन गेले त्यांपैकीं कांहींचीं चरित्रें आलीं आहेत. दुसऱ्या पुस्तकांत मराठशाहींत नांव गाजविलेल्या प्रभु ज्ञातींतील पुरुषांचीं चरित्रें दिलीं आहेत. यांपैकीं बाजी प्रभु, बाळाजी आवजी चिटणीस, आणि खंडो बल्लाळ चिटणीस यांचीं चरित्रें विशेष वाचनीय आहेत. 'अयोध्येचे नबाब' हें पुस्तक मराठ्यांचें उत्तरहिंदुस्थानांतील राजकारण नीट समजण्याकरितां अवश्य वाचिलें पाहिजे. लक्ष्मीबाईचें चरित्र फारच चटकदार रीतीनें लिहिलें असल्यामुळें एखाद्या कादंबरीइतकें मनोरंजक वाटतें.

हिंदुस्थानाच्या इतिहासाशीं ज्या इंग्रज पुरुषांचा विशेष संबंध आला त्यांपैकीं वेलिंगटन्, मनरो व एलफिन्स्टन् यांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. हीं सर्व इंग्रजी पुस्तकांचे आधारें चरित्रनायकांचें व त्यांच्या राष्ट्राचें वैभव वर्णन करण्याचे हेतूनें लिहिलेलीं दिसतात. वेलिंगटन्‌वरील पुस्तकांत वॉटर्लूच्या लढाईचें वर्णन आहे, त्यांत जर्मनांचें नांव देखील नाहीं ! यावरून लेखकाची दृष्टि कशा प्रकारची होती हें दिसून येतें.

आतांपर्यंत उल्लेख केलेल्या पुस्तकांशिवाय त्रोटक चरित्रें बरींच प्रसिद्ध झालीं आहेत. त्या सर्वांचा येथें उल्लेख करितां येणें शक्य नाहीं. या छोट्या पुस्तकांपैकीं 'धनुर्धारीं'च्या पुस्तकांचा मुद्दाम निर्देश केला पाहिजे. ' धनुर्धारी ' नीं महाराष्ट्रीयांमध्यें स्वाभिमान उत्पन्न करण्याचे उद्देशानें आपली ओजस्वी लेखणी उचलली, व त्यांच्या लेखांतील चटकदार वर्णनांनीं व जोरदार भाषेमुळें ते फार लोकप्रिय होऊन लेखकाचा उद्देश अंशतः तरी सफळ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या सर्व लहान पुस्तकांचा एकत्र संग्रह करून एक निराळें पुस्तक छापल्यास तें लोकप्रिय होईल व ' धनुर्धारीं'ची कृति चिरस्थायी होईल, असें वाटतें. रा. बाळकृष्ण नारायण देव यांनीं अनेक ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रांवर 'विविध-ज्ञान-विस्तारां'त वाचनीय लेख लिहिले आहेत. तेही एकत्र करून छापल्यास एक चांगल्यापैकीं पुस्तक तयार होईल.

महाराष्ट्रीय वीर व मुत्सद्दी यांच्या बरोबरीनें, कित्येकांचे मतें त्यांहून अधिक, महत्त्वाची कामगिरी महाराष्ट्रीय साधुसंतांनीं केली. म्हणून त्यांच्याविषयीं जें वाङ्मय निर्माण झालें आहे त्याचा यानंतर परामर्श घेणें अवश्य आहे. वर सांगितलेंच आहे कीं

एकंदर चरित्रग्रंथांमध्यें साधुसंतांच्या चरित्रांचा फार मोठा भरणा आहे. यांमधून ज्यांनीं आपल्या ग्रंथांच्या अगर शिकवणुकीच्या द्वारें महाराष्ट्रांत विशेष परिणाम घडवून आणिले त्यांच्याच चरित्रांचें येथें थोडक्यांत निरीक्षण करण्याचें योजिलें आहे. असे साधु ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम व ब्रह्मेंद्रस्वामी, हे होत.

यांपैकीं ब्रह्मेंद्रस्वामी सोडून इतरांचीं दोन अगर अधिक चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. या चरित्रांचे दोन प्रकार दिसून येतात. पहिल्या प्रकारच्या पुस्तकांतून साधूंनीं केलेल्या चमत्कारांवर विशेष भर असतो, तर दुसऱ्या प्रकारच्या पुस्तकांमध्यें असे चमत्कार थोडक्यांत दिलेले अगर अजीबाद गाळलेले असतात,व चरित्रनायकाची नेहमींची वागणूक,शिकवण व ग्रंथ यांवरून लेखक त्यांची योग्यता स्पष्ट करून दाखवितात. सध्यांच्या रुचीप्रमाणें हीं दुसऱ्या प्रकारचीं पुस्तकें जास्त लोकप्रिय होत जातील यांत संशय नाहीं. ज्ञानेश्वरांचीं चार पांच चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांपैकीं रा. पारख, ह. भ. प. भिंगारकरबुवा व रा. पांगारकर यांचीं उत्तम आहेत. रा. पांगारकरांचें पुस्तक सर्वांत आलीकडचें आहे. ज्ञानेश्वर एक कीं दोन या मुद्द्यावर पूर्वी पुष्कळ वाद झाला होता. त्यांतील दोन्ही बाजूंचें म्हणणें देऊन रा. पांगाकरांनीं आपलें स्वतःचें मत द्यावयास पाहिजे होतें. परंतु याप्रमाणें त्यांनीं केलें नाहीं, ही त्यांच्या पुस्तकांत उणीव राहून गेली आहे. कदाचित् हा मुद्दा त्यांनीं आपल्या विस्तृत चरित्राकरितां राखून ठेविला असेल. नामदेवांचीं दोन चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. दोन्ही जुन्या पद्धतीवर लिहिलेलीं व अद्भुत प्रकारांनीं भरलेलीं आहेत. चमत्कारांस प्राधान्य न देतां नामदेवांच्या चरित्राचें व उपदेशाचें रहस्य वाचकांपुढें मांडणारें पुस्तक व्हावयास पाहिजे आहे. एकनाथांवर आतांपर्यंत सात आठ पुस्तकें रचण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं रा. सहस्रबुद्धे, रा. पांगारकर व रा. टिपणीस यांनीं लिहिलेलीं चरित्रें, व कै. राजाराम शास्त्री भागवत यांचा नाथांच्या चरित्रांतील महत्त्वाच्या प्रसंगांचा सामाजिक व धार्मिक दृष्ट्या छाननी करणारा निबंध, हीं पुस्तकें वाचनीय आहेत. रामदास स्वामींच्या चरित्रांपैकीं सत्कार्योत्तेजक सभेनें छापलेल्या दासबोधाच्या प्रस्तावनेंत रा. शं. श्री. देव यांनीं ग्रथित केलेलें चरित्र उत्तम आहे. बाकीचीं जुन्या तऱ्हेनें भाविक लोकांसाठीं लिहिलेलीं आहेत. तुकारामबुवा हे महाराष्ट्राच्या अत्यंत आवडीचे साधु असल्यामुळें त्यांच्याबद्दल लहान मोठीं आठ दहा पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. त्यांत रा. केळुसकर, रा. टिपणीस, रा. बा. अ. भिडे यांचीं आधुनिक पद्धतीनें व चिकित्सक बुद्धीनें लिहिलेलीं आहेत. रा. भिडयांचे पुस्तकांत तुकारामबुवांच्या व्यावहारिक चरित्रापेक्षां त्यांच्या मानसिक उन्नतीच्या इतिहासाकडे जास्त लक्ष पोंचविलें आहे,व पुस्तकाचा शेवटचा भाग 'कवित्व, रचनाविशेष, सामाजिक व धार्मिक मतें' हा विशेष महत्वाचा आहे. रा. ब. पारसनिसांनीं लिहिलेलें ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र त्यांच्या इतर ग्रन्थांप्रमाणेंच परिश्रम घेऊन शोधक बुद्धीनें लिहिलेलें आहे.

महाराष्ट्रांत होऊन गेलेले बहुतेक साधुसंत काव्यरचनाही करीत. परंतु त्यांचेशिवाय कित्येक लौकिकवृत्तीनें राहाणारे कवीही आपल्यामध्यें होऊन गेले.यांमध्यें मुक्तेश्वर, वामन पंडित व मोरोपंत हे प्रमुख होत. मोरोपंताचें चरित्र रा. पांगारकरांनीं मोठ्या आस्थेनें व परिश्रमानें माहिती मिळवून आपल्या मोरोपंतावरील ग्रंथांत वर्णिलें आहे. वामन पंडिताचें लहानसें परंतु चांगलें असें चरित्र बाळाजी आणि कंपनीनें सुमारें तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें आहे. शिवाय या कवीवर रा. हंस व रा. भिडे यांनीं लहान लहान वाचनीय निबंध लिहिले आहेत. यांखेरीज जे लहान मोठे कवि महाराष्ट्रांत होऊन गेले, त्यांजबद्दलची माहिती रा. आजगांवकरकृत 'महाराष्ट्र कविचरित्र' नामक ग्रंथांत सांपडेल. सदर्हू ग्रंथाचे आतांपर्यंत चारपांच भाग प्रसिद्ध झाले आहेत. सर्वच प्राचीन कवि व त्यांच्या कृती यांबद्दल रा. आजगांवकर यांस वाटणारें अगत्य व प्रेम सर्वांस वाटणें शक्य नाहीं. परंतु त्यांच्या ग्रंथांत संशोधन करून जी माहिती ग्रथित केली आहे ती केव्हांही महाराष्ट्रीयांस उपयुक्तच वाटेल.

आपल्या देशांत इंग्रजी शिक्षण सुरू झालें तरी त्यामुळें आपल्यामध्यें गेल्या तीन हजार वर्षांपासून जी साधुसंतांची परंपरा सुरू आहे तिच्यांत खंड पडलेला नाहीं. युरोपिअन लोक व युरोपिअन वाङ्मय यांच्याद्वारा जगाच्या इतर भागांशीं संबंध येऊं लागल्यामुळें,

अलीकडे झालेल्या साधुसंतांची दृष्टि जास्त व्यापक होऊन सनातन धर्माचीं तत्त्वें सर्व जगास मान्य होतील अशा रीतीनें व्यक्त करण्याकडे त्यांचें लक्ष लागलें. अशा प्रवृत्तीचे स्वामी दयानंद सरस्वती, श्री रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ हे चार साधु पुरुष गेल्या शतकांत आपल्या देशांत अवतीर्ण झाले, व या चौघांचींही मराठीमध्यें विस्तृत चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. दयानंद सरस्वतीप्रमाणें इतर तिघांनीं साधारण जनसमूहाच्या नेहमींच्या धार्मिक जीवनांत क्रांति घडवून आणण्यापेक्षां तात्त्विक विचारांकडे जास्त लक्ष दिल्यामुळें त्यांचे विचार महाराष्ट्रांत सर्वमान्य झाले, व त्यांचे ग्रंथ आणि त्यांचीं चरित्रें यांचा प्रसार पुष्कळ झाला आहे. स्वामी दयानंद सरस्वतीचें चरित्र रा. तुंगार यांनीं लिहिलेलें असून तें विस्तृत व वाचनीय झालें आहे. श्रीरामकृष्णाचें छोटेंसें चरित्र 'घटकाभर करमणुकी'च्या एका अंकांत आलें असून शिवाय रा. गुणाजी यांनीं यांचें चरित्र व शिष्यांबरोबर झालेलीं संभाषणें यांचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. या संभाषणांवरून रामकृष्णांचा साधा स्वभाव, त्यांची ईश्वरभक्ति व त्यांचीं मतें यांची हुबेहुब कल्पना डोळ्यांपुढें उभी राहते. रा. किनरेकृत 'रामकृष्णवाक्सुधा' हें पुस्तकही फार मनोहर झालें आहे. स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांच्या समग्र ग्रंथांचीं भाषांतरें झालीं आहेत, व त्या पुस्तकमालांतून त्यांचीं विस्तृत चरित्रें आलीं आहेत. रा. गुणाजीकृत 'स्वामी रामतीर्थ' या पुस्तकांत स्वामींचें चरित्र व मतें या दोहोंचा संग्रह केला असल्यामुळें साधारण वाचकांस तें आठ दहा खंडांच्या मालेपेक्षां जास्त उपयोगी वाटेल.

हिंदुस्थान देशाच्या उन्नतीच्या मार्गांत भिन्न धर्मांच्या अनुयायांचा परस्परविरोध हा एक जबरदस्त अडथळा आहे. याची तीव्रता मोडण्यास निरनिराळ्या धर्मांतील खऱ्या तत्त्वांची माहिती सर्वांस होणें आवश्यक आहे. ही गोष्ट साध्य होण्याकरितां हिंदुधर्माखेरीज इतर धर्मांत होऊन गेलेल्या साधुपुरुषांचीं शुद्ध भावनेनें लिहिलेलीं चरित्रें झालीं तर हवींच आहेत. या दृष्टीनें पाहतां गौतमबुद्ध, जैन धर्मांतील तीर्थंकर, शीख, मुसलमानी व ख्रिस्ती धर्मांचे आद्य प्रवर्तक अनुक्रमें नानक, महंमद पैगंबर व येशू ख्रिस्त, आणि ख्रिस्ती-धर्मसुधारक मार्टिन ल्यूथर अशा परधर्मांतील साधुपुरुषांचीं चरित्रें मराठी भाषेंत झालीं आहेत, ही अभिनंदनीय गोष्ट आहे. गौतमबुद्धावर आतांपर्यंत चार पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. पैकीं रा. आठवल्यांचें त्रोटक आहे. रा. गोविंदराव काणे यांचे पुस्तकांत आर्नोल्डकृत Light of Asia नामक पुस्तकाच्या आधारें बुद्धाचें चरित्र व उपदेश वर्णिला आहे. रा. केळुसकरांनीं बुद्धाचें चरित्र चमत्कार वगळून वर्णिलें आहे व त्यांचा उपदेश पुष्कळ विस्तारानें सांगितला आहे. कर्मकांडात्मक वैदिक धर्म व बुद्धाचीं मतें यांमधील फरक दाखवितांना 'जातिभेदाची प्रखरता,' 'उपाध्यायांचा छळ' वगैरे गोष्टींसंबंधाच्या विधानांमध्यें ऐतिहासिक सत्याचें प्रतिबिंब नसून आधुनिक धार्मिक वादांची सावली पडलेली दिसते. परंतु एकंदरींत हें पुस्तक चांगल्यांपैकीं आहे. 'प्रभाकर' कृत 'महात्मा गौतम' या पुस्तकांत बुद्धाचा उपदेश सोप्या शब्दांत साधारण वाचकांस समजेल अशा रीतीनें सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे, व तो बराच सिद्धीस गेला आहे. नानकाचें चरित्र कै. वामन दाजी ओकांनीं लिहिलें आहे, परंतु तें त्रोटकच आहे. रा. पांगळांनीं लिहिलेल्या तीर्थंकर चरित्रांत तीर्थंकरांच्या कथा दिल्या आहेत, परंतु त्यांबरोबर जैनधर्माचीं तत्त्वें न दिल्यामुळें जैनेतर वाचकांस त्यांचा फारसा उपयोग नाहीं. महंमद पैगंबराविषयीं 'ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी' नामक एका ख्रिस्ती संस्थेनें प्रसिद्ध केलेलें पुस्तक विरोधबुद्धीनें लिहिलेलें, अतएव दोषैकदृक् असें दिसतें. यापेक्षां रा. गोविंदराव काणे या ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केलेल्या गृहस्थांनीं लिहिलेलें पैगंबराचें चरित्र फार चांगलें आहे. हें पुस्तक [illegible] व यथातथ वर्णन करण्याचे हेतूनें लिहिलेलें असून त्यामध्यें महंमद व त्याचा धर्म यांविषयींची माहिती आटोपशीर व संगतवार अशी दिली आहे. हें पुस्तक वाचून या गृहस्थांनीं येशू ख्रिस्ताचें एकादें चरित्र मराठींत लिहिलें असतें तर फार बरें झालें असतें असें वाटल्यावांचून राहात नाहीं. कारण ख्रिस्त व ख्रिस्ती धर्म यांसंबंधानें आतांपर्यंत मिशनरी मंडळ्यांमार्फत प्रसिद्ध झालेलीं बहुतेक पुस्तकें भाषेच्या व मजकुराच्या जुळणीच्या दृष्टींनीं अगदीं कनिष्ठ प्रतीचीं आहेत. त्यांतल्या त्यांत बाबा पदमनजी यांनीं लिहिलेलें येशू ख्रिस्ताचें चरित्र व 'ल्यूथराचा इतिहास' नामक एका मिशनरी मंडळीनें प्रसिद्ध केलेलें पुस्तक, हीं एकवार

वाचण्यासारखीं आहेत. याशिवाय रा. शंकरराव देशमुख यांनीं मार्टिन लूथरवर एक वाचनीय पुस्तक लिहिलें आहे. आपल्या सध्यांच्या धार्मिक परिस्थितींत लूथरसारख्या धर्मसुधारकाचें हें चरित्र नव्या व जुन्या दोन्ही विचारांच्या गृहस्थांस मनन करण्याजोगें आहे.

आतां आणखी दोन विभागांबद्दल लिहावयाचें राहिलें आहे:परदेशांतील इतर नामांकित गृहस्थांचीं जीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांच्याविषयीं व गेल्या शंभर वर्षांत आपल्या देशांत जे थोर लोक होऊन गेले त्यांच्या चरित्रांविषयीं. आपला देश म्हणजे सर्व सद्गुणांचें माहेरघर, आपले देशांत जे शूर देशभक्त अगर विद्वान् पुरुष निपजले तसे इतर देशांत निपजणें शक्य नाहीं, अशा तऱ्हेची भावना खोटया देशाभिमानाचें चिन्ह होय. परदेशीय लोकांस आम्ही पूर्वी तुच्छ मानीत होतों त्याचेंच फळ आज आपण खरोखर भोगीत आहोंत. तेव्हां ही वृत्ति टाकून देऊन इतर देशांत होऊन गेलेल्या सन्मान्य व्यक्तींविषयीं आपल्याला योग्य आदर वाटूं लागून त्यांचीं चरित्रें मराठी भाषेंत होऊं लागलीं आहेत, ही गोष्ट आपल्या भावी उन्नतीची सूचक आहे. परकी पुरुषांचीं चरित्रें लिहितांना ज्यांचीं चरित्रें आपल्या देशांतील लोकांस बोधप्रद होतील अशांची निवड करणें अर्थातच अगत्याचें आहे. आतांपर्यंत लेखकांनीं ही निवड योग्य प्रकारें केली आहे असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. परदेशाचा इतिहास व तेथील राजकीय व सामाजिक परिस्थिति यांच्याशीं साधारण वाचकांचा फारसा परिचय नसतो, म्हणून परकीयांचीं चरित्रें निव्वळ मराठी जाणणाऱ्या वाचकांस सुबोध होतील अशा रीतीनें लिहिणें बऱ्याच कौशल्याचें काम आहे. पाल्हाळ नको, परंतु त्रोटक लिहिण्यामुळें येणारी अस्पष्टताही नको; बारीकसारीक गोष्टींस फांटा दिला पाहिजे, परंतु चरित्रनायकाचे विशेष गुण ज्यांवरून उघड होतील अशा गोष्टी सोडतां उपयोगी नाहींत. तेव्हां अशीं पुस्तकें लिहितांना परभाषेंतील एकच पुस्तक घेऊन त्याचें शब्दशः भाषांतर करीत बसणें विशेष कामीं पडत नाहीं; तर बरींच पुस्तकें वाचून आपल्या देशाच्या लोकांस सुबोध, मनोरंजक व बोधप्रद होईल अशा तऱ्हेनें आपल्या पुस्तकाची जुळणी करावयास पाहिजे. याप्रमाणें परीक्षण केल्यास बरींच पुस्तकें त्यांच्या हल्लींच्या स्वरूपाहून निराळ्या तऱ्हेचीं असावयास पाहिजे होतीं, असें म्हणावें लागेल.

आजपर्यंत ज्या परदेशीय व्यक्तींचीं चरित्रें लिहिण्यांत आलीं आहेत, त्यांमध्यें निरनिराळ्या दिशांनीं यश संपादन केलेले लोक आहेत. सॉक्रेटीस, कार्लाइल, हर्बर्ट स्पेन्सर यांच्यासारखे तत्त्वशोधक; खुसरू ऊर्फ प्राचीन इराणचा राजा सायरस; शिकंदर, नेपोलिअन, वेलिंगटन् इत्यादि रणवीर; जॉर्ज वॉशिंगटन्, ग्यारिबाल्डी, मॅझिनी, काव्हूर, डॅनिअल ओकोनेल, वगैरे देशभक्त; पिट्, बर्क, ग्लॅडस्टन्, कॉब्डेन इत्यादि मुत्सद्दी; अचाट धाडसी पुरुष कोलंबस व डॉ. लिव्हिंग्स्टन्; जॉन्सन, बेकन यांसारखे पंडित; स्वतःच्या प्रयत्नांनीं उदयास आलेले लिंकन व गार्फील्ड; शेक्सपिअर, स्विफ्ट, स्कॉट, मेकॉले यांसारखे 'शब्दसृष्टीचे ईश्वर;' ब्रॅडलॉ, ह्यूम, कॉटन यांसारखे हिंदुस्थानाचे कैवारी; आणि स्वतःच्या किंबहुना अखिल मानवजातीच्या कल्याणाकरितां तळमळणारे व जन्मभर खपणारे बुकर टी. वॉशिंगटन् व टॉल्स्टॉय् हे महात्मे; यांचीं लहान अगर मोठीं चरित्रें आपल्या भाषेंत प्रसिद्ध झालीं आहेत. गेल्या महायुद्धामुळें सर्व जगांत महशूर झालेले जर्मनीचे बादशहा कैसर विल्यम यांचेसंबंधानेंही दोनचार पुस्तकें लिहिण्यांत आलीं आहेत. व्यक्तिमाहात्म्यामुळें हीं सर्वच पुस्तकें वाचनीय आहेत. तथापि त्यांमध्यें चिपळूणकर-कृत सॉक्रेटीस, केळकर-कृत ग्यारिबाल्डी, करंदीकर-कृत बेंजामिन् फ्रँकलिन्, मुंडल्याचा काव्हूर, ना. कृ. आगाशे-कृत ओकोनेल, दामल्यांचा कार्लाइल, भावे-कृत नेपोलिअन, आणि गुणाजींनीं लिहिलेलीं 'आत्मोद्धार' व 'माझें व्यापक शिक्षण' हीं बुकर टी. वॉशिंगटन्च्या आत्मचरित्राचीं भाषांतरें, यांचा विशेष रीतीनें उल्लेख केला पाहिजे. कै. वि. कों. ओक यांनीं लिहिलेलें ग्लॅडस्टन साहेबांचें चरित्रही वाचनीय आहे. परंतु ग्लॅडस्टन साहेबांनीं ज्या राजकीय उलाढालींत भाग घेतला, त्याचें त्यांत फारसें वर्णन केलें नसल्यामुळें तें अपुरें झालें आहे. नुकतेच कैलासवासी झालेले रा. मा. ल. फडके यांनीं मेकॉले व स्पेन्सर यांचीं विस्तृत चरित्रें दोन इंग्रजी ग्रंथांवरून मराठींत उतरलीं आहेत. परंतु भाषेच्या बोजडपणामुळें तीं फारशीं चित्ताकर्षक झालेलीं नाहींत. याच कारणामुळें रा. घाणेकरांनीं

लिहिलेलें मॅझिनीचें चरित्रही जसें वठावें तसें वठलेलें नाहीं. शिवाय त्यांनीं आधारभूत घेतलेलें पुस्तक एकतर्फी असल्यामुळें त्यांच्या पुस्तकांतही तो दोष आलेला आहे. काउंट टॉल्स्टॉयचें चरित्र खंडशः 'भारतगौरवमालें'तून प्रसिद्ध होत आहे. त्याचे आतांपर्यंत तीन चार खंड छापून झाले आहेत, तरी तें अपूर्णच आहे. या पुस्तकाची भाषा चांगली आहे, परंतु परक्या देशांतील एखाद्या व्यक्तीचें इतक्या पाल्हाळानें लिहिलेलें चरित्र वाचकांस कितपत रुचेल याची शंका वाटते.

गेल्या शतकांत आपल्या देशांत होऊन गेलेल्या थोर व्यक्तींच्या चरित्रांकडे आपण आतां वळूं. आपल्या पूर्वजांनीं इतिहासलेखनाकडे दुर्लक्ष केलें त्यांची चूक सुधरून घेण्याकरितां आजपर्यंत आपण काय प्रयत्न केले हें पाहूं जातां समाधान मानण्यास बरीच जागा आहे. आपल्या काळांत झालेल्या सन्मान्य व्यक्तींची ... आपल्या पूर्वजांनी केलेली चूक आपल्या हातून होऊं नये याबद्दल शक्य ती खबरदारी आम्ही घेत आहों कीं काय, हें आतां आपणांस पाहावयाचें आहे. निःपक्षपातानें बोलावयाचें तर या प्रश्नाचें उत्तर आपल्याला नकारार्थींच द्यावें लागेल. कारण ज्यांचीं विस्तृत चरित्रें लिहिलीं पाहिजेत असे चाळीस पन्नास तरी सद्गृहस्थ आपल्या देशांत गेल्या शंभर वर्षांत उत्पन्न झाले; परंतु त्यांपैकीं फार थोडक्यांचीं चांगलीं म्हणण्याजोगीं चरित्रें मराठींत प्रसिद्ध झालीं आहेत. इतर प्रांतांतील लोकांची गोष्ट सोडून दिली, तरी मुंबई शहर व महाराष्ट्र यांमध्यें ज्यांनीं नांव गाजविलें असे पंचवीस तीस तरी लोक निघतील; परंतु नांव घेण्याजोगीं चरित्रें फक्त पांच ... झालीं आहेत. मुद्रणकलेचा प्रसार होऊन वर्तमानपत्रें मासिकें पुष्कळ निघाल्यामुळें प्रत्येक नामांकित गृहस्थाचें त्रोटक वृत्त प्रसिद्ध झालेलें आहे, ही गोष्ट खरी; परंतु एखादा गृहस्थ मरण पावल्याबरोबर त्याजविषयीं लिहिल्या जाणाऱ्या अशा त्रोटक वृत्तांतास त्याचें चरित्र म्हणतां येणार नाहीं. या असमाधानकारक स्थितीबद्दल बराचसा दोष सन्मान्य व्यक्तींच्या मित्रमंडळीकडे येतो. एखाद्या थोर गृहस्थाच्या निकट मैत्रीचा अगर सतत सांनिध्याचा लाभ ज्यांना ज्यांना मिळतो त्यांच्यावर त्या थोर पुरुषाचें सांगोपांग चरित्र तयार करण्याची जबाबदारी येते. हा लाभ एक प्रकारचें ऋण आहे असें समजून या ऋणाची फेड त्या थोर पुरुषाचें चरित्र गाऊन केली पाहिजे, अशी दृढ भावना उत्पन्न झाली पाहिजे. दादाभाई, मंडलिक, रानडे, तेलंग, फेरोझशहा, गोखले इत्यादि लोकहिताकरितां जन्मभर खटपट करणाऱ्या गृहस्थांच्या मित्रमंडळींनीं त्यांच्यासंबंधाचें आपलें कर्तव्य बजाविलें नाहीं, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. अशासारख्यांची जर ही दशा तर यांहून लहान पदवीच्या पुरुषांची विचारावयासच नको.

आधुनिक स्त्रियांचीं अगर पुरुषांचीं जीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांमध्यें श्री. काशीबाई कानिटकर यांनीं लिहिलेलें डॉ. आनंदीबाई जोशी यांचें चरित्र व विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें त्यांचे बंधु लक्ष्मणराव यांनीं लिहिलेलें चरित्र, हीं उत्तम आहेत. वर्ण्य व्यक्तींशीं निकट संबंध असलेल्या मनुष्यांनीं त्यांच्या मृत्यूनंतर लवकरच हीं चरित्रें लिहिलीं असल्यामुळें तीं फार चांगलीं झालीं आहेत. मराठी पुस्तकांच्या वाटणीला फारसा न येणारा दुसऱ्या आवृत्तीचा मान श्री. काशीबाईंच्या पुस्तकाला मिळाला आहे, ही गोष्ट त्याच्या चांगुलपणाची साक्ष देते. शास्त्रीबुवांचें चरित्रही विस्तृत रीतीनें लिहिलेलें असून चरित्रास अवश्य असलेल्या सर्व अंगांचा त्यामध्यें समावेश झालेला आहे. याशिवाय रा. बेलसऱ्यांनीं विष्णुशास्त्र्यांचे आयुष्यांतील महत्त्वाचे प्रसंग व त्यांचे ग्रंथ यांजवर लिहिलेला टीकापर मार्मिक निबंध वाचनीय आहे. शास्त्रीबुवांची कामगिरी त्यांच्या काळच्या सर्व लोकांस सारखीच प्रिय झाली असें नाहीं; सबब तिच्यासंबंधानें दुसरी बाजू कळून येण्याकरितां ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेली रा. बा. ना. देव यांची टीका, तिच्यावर रा. मुंडल्यांचें उत्तर, व त्यावर रा. देवांचें प्रत्युत्तर, हीं अवश्य वाचलीं पाहिजेत. रा. बा. ना. देवांनीं लिहिलेलें कै. रा. कीर्तन्यांचें चरित्र, चरित्र या दृष्टीनें संपूर्ण असून चरित्रनायकाशीं असलेल्या प्रत्यक्ष परिचयाच्या आधारावर लिहिलेलें असल्यामुळें वाचनीय झालें आहे मुंबईचे दोन पिढ्यांमागील सुप्रसिद्ध नागरीक कै. जगन्नाथ शंकरशेट यांचें त्यांच्या समकालीन गृहस्थानें लिहिलेलें चरित्र नाहीं, तथापि अलीकडे सामग्री जुळवून रा. पितळे यांनीं लिहिलेलें पुस्तक विस्तृत असून पुष्कळ मनोरंजक झालें आहे. न्यायमूर्ति रानड्यांचें

विस्तृत चरित्र अजून तयार झालेलें नाहींच. तथापि श्री. रमाबाई रानडे यांनीं 'आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी' हें पुस्तक लिहून महाराष्ट्र वाङ्मयांत अपूर्व भर टाकली आहे. या पुस्तकावरून त्या थोर पुरुषाच्या स्वभावाविषयीं व खाजगी वर्तनक्रमाविषयीं पुष्कळ मनोरंजक माहिती मिळते. जी स्थिति न्या. रानड्यांच्या चरित्राची तीच न्या. तेलंगांच्या चरित्राची अजून आहे. तरी 'सारस्वत-रत्न-मालें'त त्यांचें चरित्र बऱ्याच विस्तारानें सांगितलें आहे, व तें वाचनीय उतरलें आहे. महर्षि दादाभाईचें चरित्र लिहून प्रो. फडक्यांनीं मराठी वाङ्मयांत एका चांगल्या पुस्तकाची भर टाकिली आहे. परंतु हें पुस्तक सुद्धां दादाभाईंच्या दीर्घ कारकीर्दीच्या व विविध कामगिरीच्या मानानें त्रोटकच म्हटलें पाहिजे. सर्व आर्यावर्तास दुःखसमुद्रांत लोटून नुकतेच स्वर्गवासी झालेल्या लोकमान्य टिळकांचें विस्तृत चरित्र लिहिण्याचें काम तीन चार निरनिराळ्या गृहस्थांनीं हातीं घेतलें आहे. परंतु त्यांच्या कृती जनतेपुढें येईपर्यंत रा. कुळकर्णी यांनीं लिहिलेलें 'टिळकांचीं गेलीं आठ वर्षे' हें पुस्तक लोकमान्यांच्या आयुष्यक्रमाची थोडीशी कल्पना येण्यास फार उपयोगीं पडेल. कै. नामदार गोखल्यांचें विस्तृत चरित्र त्यांच्या मरणानंतर लवकरच त्यांच्या कट्या अनुयायांपैकीं एकजण प्रसिद्ध करणार म्हणून जाहीर झालें होतें. परंतु चार वर्षे होऊन गेलीं तरी तें अजून गर्भावस्थेंतच आहे. तेव्हां त्याचा जन्म होईपर्यंत रा. अभ्यंकरांनीं लिहिलेल्या लहानशा चरित्रानेंच वाचकांस आपली जिज्ञासा तृप्त करून घेतली पाहिजे. कै. गोविंदराव काणे यांनीं लिहिलेलीं व त्यांच्या इच्छेनुसार त्यांच्या पश्चात् प्रसिद्ध झालेलीं डॉ. काणे—पिता व पुत्र—यांचीं चरित्रेंही वाचनीय आहेत.

कोणत्याही समाजाची उन्नति केवळ पुस्तकी विद्येनें होत नसते. तेव्हां कला किंवा उद्योगधंदे यांमध्यें ज्यांनीं नांव कमाविलें आहे अशा गृहस्थांचीं चरित्रें पुढील पिढ्यांस प्रोत्साहन मिळण्याकरितां लिहिलीं गेलीं पाहिजेत. या दृष्टीनें पाहतां भिषग्वर्य बापूसाहेब मेहेंदळे, छापखान्याच्या धंद्यांत पहिल्या प्रतीचें यश मिळविणारे जावजी दादाजी, संगीत नाट्यकलेचे जनक अण्णा किर्लोसकर, व इंग्रजी तऱ्हेची सर्कस काढण्याचें धाडस करून ती उत्तम रीतीनें चालविणारे विष्णुपंत छत्रे, या सर्वांचीं चरित्रें अभिनंदनीय आहेत; व समाधानाची गोष्ट ही कीं, तीं त्रोटक नसून जरूर तितक्या विस्तारानें सांगितलेलीं आहेत. जावजी दादाजी, छत्रे व किर्लोसकर यांचीं चरित्रें अनुक्रमें वि. कों. ओक, ना. कृ. गद्रे, व शंकरराव मजुमदार या महाराष्ट्रीयांस परिचित असलेल्या लेखकांनीं लिहिलेलीं आहेत, व ते आपआपल्या चरित्रनायकांशीं चिरपरिचित असल्यामुळें तीं वाचनीय झालीं आहेत. हें सांगणें नकोच. मेहेंदळ्यांचें चरित्र रा. गो. कृ. टिळकांनीं लिहिलें आहे, व तेंही वाचनीय झालें आहे.

वरील पुस्तकांशिवाय कित्येक नामांकित महाराष्ट्रीय गृहस्थांचीं छोटेखानी चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. यांपैकीं कांहीं छोटीं असलीं तरी चांगल्या रीतीनें लिहिलेलीं आहेत व त्यांहून विस्तृत चरित्रें अजून लिहिण्यांत आलेलीं नाहींत; सबब त्यांचा येथें नामनिर्देश केला पाहिजे. कै. हरि महादेव पंडित यांनीं आपल्या 'चार चरित्रात्मक लेख' पुस्तकांत कृष्णशास्त्री चिपळूणकर, डॉ. आनंदीबाई जोशी, जनार्दन बाळाजी मोडक, व जावजी दादाजी, या चौघांच्या चरित्रांचा समावेश केला आहे. चरित्रें अर्थातच छोटीं आहेत, परंतु सर्वांगीण असल्यामुळें तीं वाचनीय आहेत. त्यांतल्या त्यांत थोरले शास्त्रीबुवा व मोडक यांचीं चरित्रें दुसरीं उपलब्ध नसल्यामुळें, तीं जास्त महत्त्वाचीं आहेत. याप्रमाणेंच रा. परचुऱ्यांनीं लिहिलेलें कै. आगरकरांचें चरित्र लहान परंतु चांगल्यापैकीं आहे. उपरिनिर्दिष्ट कै. ह. म. पंडित यांचे, त्यांचे चिरंजीव, रा. बळवंत हरि पंडित, बी. ए., एलएल्. बी., यांनीं लिहिलेलें आणि वि. ज्ञा. विस्तारांत प्रसिद्ध झालेलें चरित्र, साधनें थोडकीं असतांही कसें सुंदर सजवितां येतें याचा एक नमुना आहे. अव्वल इंग्रजींतील प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ बाळशास्त्री जांभेकर यांचे चरित्रावर निबंधरूपानें रा. बाळकृष्ण नारायण देव यांनीं एक पुस्तक लिहिलें आहे. सदरहू पुस्तकांत जांभेकरांच्या वेळची धार्मिक व सामाजिक परिस्थिति व त्या बाबतींत त्यांनीं धरलेलें धोरण यांचें मार्मिक वर्णन आहे. डॉ. सर भांडारकर यांचें विस्तृत चरित्र यापूर्वीच व्हावयास पाहिजे होतें, परंतु तसें होईपर्यंत रा. द्वा. गो. वैद्य यांनीं त्यांच्या

'धर्मपर लेख व व्याख्यानां'च्या संग्रहास प्रस्तावनेदाखल जोडलेलें चरित्र अवश्य वाचून पाहण्यासारखें आहे. हें स्वतंत्र पुस्तकरूपानेंही प्रसिद्ध झालें आहे. रा. वैद्य यांनीं डॉक्टर साहबांचें विस्तृत चरित्र लिहिण्याचें काम हातीं घेतल्यास तें ते उत्तम प्रकारें पार पाडतील अशी खात्री वाटते.

महाराष्ट्र सोडून इतर प्रांतांत होऊन गेलेल्या नामांकित व्यक्तींपैकीं रा. केसकरकृत राजा राममोहन राय यांचें चरित्र, व ईश्वरचंद्र विद्यासागर यांचें रा. जोशीकृत ' पुनर्विवाहप्रवर्तकाचा वृत्तांत ' हें चरित्र, हीं लहान लहान पुस्तकें वाचनीय आहेत. पहिल्या पुस्तकाचा लेखक पुराणमताविषयीं अत्यंत असहिष्णु असल्यामुळें त्यासंबंधानें त्यांत मधून मधून आलेले अनुदार उद्गार, व दुसऱ्या पुस्तकांतील कित्येक ठिकाणची चमत्कारिक भाषा, हे दोष वगळले असतां दोन्ही पुस्तकें चांगल्यापैकीं आहेत. प्रचलित राजकारणांत आजकाल अग्रभागीं असलेले महात्मा गांधी यांचीं तीन चार लहान मोठीं चरित्रें झालीं आहेत. त्यांपैकीं सौ. अवंतिकाबाई गोखले यांनीं लिहिलेलें सर्वांत अलीकडचें असून बरेंच विस्तृत आहे; व त्यांत महात्माजींच्या लेखांतून व भाषणांतून उतारेही दिलेले आहेत, म्हणून त्यास पहिलें स्थान दिलें पाहिजे. सुरेंद्रनाथ बानर्जींचेंही एक त्रोटक चरित्र लिहिण्यांत आलें आहे; परंतु तें २५ वर्षांचें जुनें असल्यामुळें त्याविषयीं विशेष लिहावयास नको.

आतां दोन तीन आत्मचरित्रांचा उल्लेख करून हा अजमासाबाहेर लांबलेला निबंध पुरा करूं. आपल्याकडे आत्मचरित्र फार करून कोणी लिहून ठेवीत नाहीं. विविधज्ञानविस्ताराच्या जुलई १९१५ च्या अंकांत 'दादोबांचें आत्मचरित्र' म्हणून रा. पांगारकरांनीं एक लेख लिहिला आहे. त्या लेखामध्यें जी मनोरंजक माहिती आली आहे तिच्यावरून दादोबा पांडुरंगांच्या हातचा समग्र लेख छापून निघाल्यास फार चांगलें होईल असें वाटतें. दादोबांचे एक समकालीन गृहस्थ मि. बाबा पदमनजी यांनीं आपलें चरित्र लिहून 'अरुणोदय' या नांवानें प्रसिद्ध केलें आहे. या आपल्या चरित्रांत मि. बाबा पदमनजींनीं आपल्याला ख्रिस्ती धर्म स्वीकारावयास काय कारणें झालीं, याचें सविस्तर वर्णन दिलें आहे. तें वाचून त्यांच्यासारख्या कळकळीच्या गृहस्थानें भगवद्गीता व उपनिषदें यांजवरून हिंदुधर्माचें रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. व यापुढें बाबा पदमनजींच्या सारखीं उदाहरणें घडून येऊं नयेत म्हणून, वरील ग्रंथांच्या आधारें सोप्या भाषेंत हिंदुधर्माचें रहस्य दाखवून देणारें एकादें पुस्तक लिहिलें जाणें जरूर आहे, अशी खात्री पटते. परंतु त्यावरून हा ग्रंथ निरुपयोगी आहे असें मात्र नाहीं. त्यामध्यें नायकाच्या वेळची सामाजिक स्थिति, त्या वेळच्या सार्वजनिक संस्था, इंग्रजी शिक्षणामुळें समाजांत उडालेली खळबळ, इत्यादि गोष्टींबद्दल आलेली माहिती ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे, तसेंच धर्माच्या नांवाखालीं आपल्या लोकांमध्यें ज्या कित्येक असमर्थनीय गोष्टी शिरल्या आहेत, त्यांचेंही त्यांत स्पष्टपणें आविष्करण केलेलें आहे. सबब एकंदरींत हें पुस्तक वाचनीय आहे असाच मार्मिकांचा त्याबद्दल अभिप्राय पडेल. प्रो. कर्वे यांनीं लिहिलेल्या आत्मचरित्रावरून सुधारणेच्या कामांत किती अडचणी येतात, किती त्रास सोसावा लागतो, किती चिकाटी अंगीं असावी लागते, या गोष्टी स्पष्ट दिसून येतात. सामाजिक सुधारणा करण्यास झटणारे गृहस्थ नुसते खुशालचंद असतात, केवळ स्वैर वर्तन करण्यास मुभा असावी एवढाच त्यांच्या खटपटीचा हेतु असतो, वगैरे पुराणमताभिमानी लोकांचे पूर्वग्रह या पुस्तकाच्या वाचनानें दूर होतील. रा. अंताजी दामोदर काळे यांनीं लिहिलेला पैसा-फंडाचा इतिहास हा एका प्रकारें त्यांचें आत्मचरित्रच आहे; व चिकाटी, कळकळ, निःस्वार्थबुद्धि वगैरे त्यावरून दिसून येणाऱ्या त्यांच्या गुणांबद्दल वाचकांस कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं.

आधुनिक मराठी वाङ्मयाच्या 'चरित्रें' या विभागाचें सिंहावलोकन यथामति येथवर केलें. उल्लेख करण्यास योग्य असें पुस्तक होतां होईल तों नजरेआड होऊं नये असा सदरहु विवेचनांत यत्न केला आहे. इतक्या उपरही कांहीं चांगलीं पुस्तकें दृष्टींतून राहून गेलीं असतील तर त्याबद्दल त्यांच्या कर्त्यांची क्षमा मागून आणि ज्ञानकोशमंडळानें प्रसिद्ध केलेल्या 'वाङ्मयसूची'चा लेखकास जो उत्तम उपयोग झाला त्याबद्दल सूचीकारांचे आभार मानून हा लेख संपवितों.

# प्राचीनसंशोधन आणि संशोधक.

[ रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी. ]

हिंदुस्थानांतील प्राचीन वाङ्मय, इतिहास, लोकस्थिति आणि तदनुषंगिक इतर गोष्टी यांच्या संशोधनाचें काम आज कित्येक वर्षें चालू असून, सांप्रत त्याला चांगलें स्वरूप प्राप्त होत चाललें आहे. हें संशोधन यशस्वी होण्यास तें कसें चालविलें पाहिजे, आणि तें चालविणारांची योग्यता कशी असावी, याविषयींची चर्चा फार महत्त्वाची आहे. आपले सर्वांचे वयोवृद्ध गुरु, डा. सर रामकृष्ण भांडारकर, यांनीं या कामीं सारा जन्म घालविला आहे; आणि त्यांच्यासारखा प्राच्यसंशोधक आमच्या देशांत तर दुसरा कोणी नाहींच, पण पाश्चात्य देशांतही नाहीं, असें स्पष्ट म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. अलीकडे हें संशोधन मराठी भाषेच्या द्वारें आणि मराठीइतिहाससंबंधानेंही होत आहे; मराठींत एतद्विषयक पुष्कळ लेख येतात व चर्चा होते. विविधज्ञानविस्तारांत हा विषय आरंभापासून येत असून, अलीकडे संशोधनपर लेख अधिकाधिक येत आहेत. तसेंच एतद्विषयक दुसरे अनेक प्रयत्न चालू आहेत. तेव्हां या उपयुक्त विषयाची विस्ताराच्या या विशेष ग्रंथांत थोडी चर्चा करणें अगत्याचें आहे असें वाटून, हा अल्प लेख लिहीत आहें. या ठिकाणीं सर्वांगिक मोठासा लेख लिहिण्याची इच्छा करणें अशक्य आहे. यासाठीं हा केवळ या चर्चेचा उपोद्घात समजावा. हा लेख लिहितांना एकंदर प्राचीनसंशोधनाकडे जरी लक्ष दिलें आहे, तरी यामध्यें मुख्यत्वें मराठींत होण्याऱ्या चर्चेकडेसच विशेष दृष्टि ठेविली आहे. ही चर्चा कशी करावी, याविषयीं सर रामकृष्णपंत यांनीं अनेक ठिकाणीं लिहिलें आहे. त्यांच्या सूचनांकडे लक्ष ठेवून हा लेख लिहिला आहे. तथापि यांतील मतांविषयींची जबाबदारी प्रस्तुत लेखकाकडे आहे.

प्रथमतः डा. सर रामकृष्ण यांचे याविषयींचे मुख्य लेख कोणते आहेत हें सांगतों, म्हणजे वाचकांस त्यांचें परिशीलन करितां येईलः—

(१) मुंबईच्या फ्रीचर्च लिटररी सोसायटीपुढें १८८८ सालीं झालेलें व्याख्यान. हें निराळें छापलेलें आहे.

(२) त्याच सोसायटीपुढें १९०५ सालीं झालेलें व्याख्यान. हें ' संस्कृत-रिसर्च ' या त्रैमासिकाच्या पहिल्या अंकांत छापलें आहे.

(३) पुण्याच्या भांडारकर इन्स्टिटयूटमध्यें डिसेंबर १९१८ त झालेलें व्याख्यान. हें त्या संस्थेच्या ' अनाल्स'मध्यें छापलें आहे.

(४) पुण्यास १९१९ च्या ' प्राच्यविद्यासंशोधक सभे'त अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण.

हे लेख इंग्रजींत आहेत. सर रामकृष्ण यांच्या धार्मिक व्याख्यानांच्या पुस्तकांत बौद्धधर्म आणि हिंदुधर्म यांचीं युद्धें झालीं कीं काय, या प्रश्नावर आणि ' धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां ' या वचनावर केसरीबरोबर झालेला वाद आहे. तसेंच आपले वेदपुराणादि प्राचीन ग्रन्थ यांच्या योग्यतेसंबंधानें गो. ह. देशमुख यांच्याबरोबर झालेला वादही या पुस्तकांत समग्र छापला आहे. हे लेखही संशोधनपरच आहेत. शिवाय अनेक ठिकाणीं यासंबंधानें किरकोळ उद्गार आलेले आहेत.

सर रामकृष्ण यांनीं बरेच वेळां असें म्हटलें आहे कीं, या विषयाकडे आपल्या मंडळीचें लक्ष जावें म्हणून आपण वारंवार चर्चा केली; परंतु आपली तरुण विद्वान् मंडळी या भानगडींत पडत नाहीं. तथापि त्यांचें यासंबंधाचें मत अलीकडे बदलून, त्यांनीं शेवटच्या दोन लेखांत आमची मंडळी या संबंधाचा ऊहापोह करूं लागली आहे, असें म्हणून समाधान व्यक्त केलें आहे.

प्राचीनप्राच्यसंशोधनाचा आरंभ प्रथमतः युरोपियन पंडितांनीं केला. हा आरंभ अठराव्या शतकाच्या शेवटच्या काळांत झाला आहे. हें संशोधन करण्यासाठीं कित्येक इंग्रज, फ्रेंच, पोर्टुगीज, जर्मन आणि डच विद्वान् त्या धामधुमीच्या काळांतही मुद्दाम इकडे आले, आणि इकडल्या लोक-भाषा आणि जुन्या संस्कृतादि भाषा मुद्दाम शिकून त्यांनीं शोध केले व अनेक ग्रंथ लिहिले. या परकी लोकांना आमच्या इकडल्या गोष्टींचें यथार्थ ज्ञान न झाल्या-

मुळें त्यांचें सर्वच काम उत्तम झालेलें नाहीं, पण त्यांचा दीर्घउद्योग आणि संशोधनाची आस्था आणि संशोधन करण्याचे मार्ग प्रशंसनीय आणि अनुकरणीय आहेत. पाश्चात्य लोकांनीं यासंबंधानें अपरंपार शोध करून पुष्कळच ग्रंथ लिहिले आहेत. त्यांचे शोध अजून चाललेच आहेत, आणि आजमितीस पाश्चात्य संशोधक अनेक आहेत. हा प्राच्यसंशोधनाचा नाद अमेरिकन विद्वानांनाही असून, तिकडेही या संबंधाचे ग्रंथ आणि वाङ्मय पुष्कळ झालें आहे आणि होत आहे.

आमच्या देशांत सुमारें साठ वर्षांपासून युनिव्हर्सिटया स्थापन होऊन उच्च संस्कृताचा अभ्यासही पुष्कळ चालू आहे. तथापि प्राचीनसंशोधनाचा उद्योग देशी मंडळीच्या हातून जसा व्हावयास पाहिजे तसा झाला नाहीं. आमची तरुण मंडळी शिक्षणांतून सुटल्यावर पोटाच्या पाठीस लागते हें खरें. पण खरें पाहिलें तर आम्हांस असल्या गोष्टींची आस्थाच कमी आहे. सत्यशोधनाची फारशी परवा आम्ही करीत नाहीं. आमचें गप्पांवर आणि ठरीव समजुतींवर बहुधा भागतें. युरोपियन सिव्हिलियन हिंदुस्थानांत येतात, ते पोटाच्या पाठीस लागूनच येतात. पण त्यांतील पुष्कळांना अशा एखाद्या तरी विषयाची आवड असते. अलीकडील युरोपियन संशोधकांपैकीं पुष्कळजण या सिव्हिल सर्व्हिसच्या कामगारांपैकींच आहेत.

आमच्या इकडे प्रथमतः बंगाल्यांत संशोधन सुरू झालें. तें अद्यापि चालू असून वाढत्या प्रमाणावर आहे. मुंबईस, प्रथमारंभीं, युनिव्हर्सिटींत शिकलेले नाहींत अशाच कित्येक विद्वानांनीं संशोधन सुरू केलें. त्याला मध्यंतरीं अगदींच खंड पडला होता, पण आतां तें पुन्हां विशेष जोरानें सुरू झालें आहे. जुन्या संशोधनकार्याचा नवीन कार्याशीं समेट जुळवून देण्यास आपले वयोवृद्ध गुरु ईशकृपेनें अद्याप आपणांमध्यें कायम आहेत, ही देखील मोठी सुदैवाची गोष्ट आहे ! मद्रासेस हें संशोधनकार्य अगदीं अलीकडे सुरू झालें. तें चांगलें आस्थापूर्वक चाललें आहे, असें आपले गुरुवर्य सांगत आहेत. या कामासाठीं कलकत्ता आणि मुंबई येथें ' रॉयल एसियाटिक सोसायटया ' स्थापन होऊन त्यांनीं पुष्कळ कार्य केलें आहे. आपल्या प्रांतांत सांप्रत पुण्यास ' भांडारकर इन्स्टिटयूट ' आणि 'इतिहाससंशोधक मंडळ' या संस्था असून आणखीही बारीक सारीक प्रयत्न सुरू आहेत. म्हैसूर आणि बडोदें या संस्थानांतूनही हें काम बरेंच आस्थेनें चालू आहे. वास्तविक या कामाकडे विद्यापीठांचें लक्ष पाहिजे; परंतु आमच्या युनिव्हर्सिटयांचें इकडे फारसें लक्ष नाहीं. अलीकडे कलकत्ता युनिव्हर्सिटीनें मात्र हें काम विशेष आस्थेनें सुरू केलें आहे.

संशोधनाचीं मुख्य अंगें तीन होत; (१) चिकित्सात्मक विचार ( Criticism ); ( २ ) ऐतिहासिक चर्चा (Historical research); आणि (३) तुलना (Comparative research). आणखी बारीकसारीक गोष्टी पुष्कळ आहेत, पण त्या या तिहींच्या अंगभूत होत.

चिकित्सा म्हणजे आपल्यासमोर आलेल्या गोष्टींच्या तथ्यातथ्यतेविषयीं तपासणी करणें; ऐतिहासिक चर्चा म्हणजे एकेका गोष्टीला आधारभूत असें जुनें काय सांपडतें तें पाहणें; आणि तुलना म्हणजे निरनिराळया गोष्टी कशा जुळतात आणि कशा भिन्न आहेत, हें पाहणें. हें तुलना-दृष्टीचें परीक्षण करितांना आपल्या देशांतील गोष्टी आणि अन्य देशांतील सदृश गोष्टी दृष्टीसमोर ठेवून सर्वांगपरीक्षण केलें पाहिजे.

हें कार्य नीटपणें कसें करावें, हें थोडक्यांत सांगण्यापूर्वीं या संशोधनाचा उपयोग काय, हें सांगितलें पाहिजे. एरव्हीं या विद्येचें महत्त्व लक्षांत येणार नाहीं. आपणास तर या संशोधनविद्येचा फार उपयोग आहे. कारण आपलें राष्ट्र अत्यंत प्राचीन आहे. पृथ्वीच्या पाठीवर अनेक राष्ट्रें उदय पावून, भरभराटीस येऊन, लयास गेलीं; त्यांचा आतां मागमूसही नाहीं. आजमितीस कित्येक राष्ट्रें नवीं उपस्थित होऊन भरभराटींत आहेत. परंतु आपलें हिंदु राष्ट्र स्थित्यंतरें पावत जाऊनही आपलें प्राचीनत्व राखून आहे. अलीकडे हें स्थित्यंतर फार झालें असूनही अनेक प्राचीन गोष्टी कायम आहेत. एकादा वेदकालीन ऋषि आतां आपल्यामध्यें अवतीर्ण झाला तर, आपल्या वेळच्या अनेक गोष्टी जशाच्या तशाच चाललेल्या पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटेल. अशा या आपल्या प्राचीन राष्ट्राचा पुरातन कालापासूनचा खरा खरा

इतिहास कसा आहे, त्यानें आजपर्यंत कोणतीं कार्यें केलीं आहेत, आणि त्याला सध्यांच्या परिस्थितींत जगाच्या इतर प्रमुख राष्ट्रांच्या बरोबरीचें होण्यास आपल्यामध्यें काय काय सुधारणा केल्या पाहिजेत, हें ठरविण्यास आपल्या सर्व जुन्या गोष्टींची आणि स्थित्यंतरांची नीट पाहणी करून संगती लावण्याची जरूर आहे. हें काम इतके दिवस इतरांनीं केलें; परंतु आतां तें, त्यांचा कित्ता घेऊन, आपल्यासच पुढें चालविलें पाहिजे. या कामाचीं साधनें कोणीं मुद्दाम जुळवून ठेविलेलीं नाहींत. तीं जुन्या गोष्टींच्या संशोधनानें मोठ्या चातुर्यानें आणि प्रयत्नानें जुळविलीं पाहिजेत.

मागें सांगितलें आहे कीं, प्रथमारंभीं हें संशोधनाचें काम पाश्चात्य पंडितांनीं सुरू केलें, आणि त्यांनीं तें अद्यापि जारीनें चालविलें आहे. या कामांत त्यांनीं आघाडी मारल्यामुळें त्यांचे विचार ग्राह्य वाटतात, आणि घ्यावे लागतात. पाश्चात्यांचे विचार चुकीचे असल्यास त्यांचें सप्रमाण खंडण करून सत्यासत्याचा उलगडा करणें आपणास जरूरीचें आहे. तसें करण्यास आपणास चांगले आस्थेचे प्रयत्न केले पाहिजेत. सर रामकृष्णपंत यांना अनेक युरोपीय पंडितांबरोबर या कामांत युद्धें करावीं लागलीं आहेत. त्यांनीं आपले विचार कसे स्थापित केले, याचा अभ्यास आपल्यास अत्यावश्यक आहे.

प्रथमतः पाश्चात्यांच्या या संबंधाच्या समजुतींत आणि मतांमध्यें मुख्य प्रकार कोणते आहेत, हें आपण पाहूं. या लोकांचा प्रथमचा प्रयत्न असा असतो कीं, ते हिंदू-आर्यांच्या संस्कृतीचा काळ फार कमी समजतात. पुष्कळ पाश्चात्य पंडितांच्या मतें ऋग्वेदाचा काळ इसवी सनाच्यापूर्वीं पंधरा शतकांहून अधिक नाहीं. हा काळ पुष्कळ जास्त असला पाहिजे, हें वेद-ग्रंथ आणि ब्राह्मणें यांच्या जुन्या स्वरूपावरून उघड दिसून येत आहे. या संबंधाचें कित्येक युरोपीय पंडितांचें मत अलीकडे फिरून तें आपल्यास अनुकूल झालें आहे. त्याच प्रमाणें हें मत स्थापित करण्याचे आपले प्रयत्नही आग्रहाचे असतात; आमचे पंडित ही संस्कृती पुष्कळ मागें न्यावयास पाहतात, यामुळें अजून मेळ बसत नाहीं.

हिंदुस्थानांतील लोक अमेरिकेंतील किंवा आफ्रिकेंतील मूळच्या लोकांप्रमाणेंच रानटी असावे, असें पाश्चात्य पंडितांचें मत आरंभीं झालें होतें. आमच्या इकडले ग्रंथ वगैरे पाहून पुढें त्यांचें मतांतर बनलें कीं, हे लोक आर्यलोकांपैकीं असून यांच्यामध्यें एक जुनी सुधारणा होऊन गेलेली असून चालूही आहे. तथापि या संशोधकांचा पूर्वग्रह अजून नीटसा बदलला नाहीं. यामुळें आमच्यामध्यें अपूर्व वाटणाऱ्या अनेक गोष्टी इजिप्त, ग्रीक, रोमन, खाल्डियन, असीरियन लोकांमधून आल्या, चांगलीं चांगलीं धर्ममतें आणि नीतिविषयक गोष्टी ख्रिस्ती, यहुदी धर्मापासून घेतल्या, असें सिद्ध करण्याचा ते प्रयत्न करितात. चिनी लोकांची प्राचीन संस्कृती आमच्यापेक्षां फारशी जुनी अथवा श्रेष्ठ नसतां तिकडूनही आमच्याकडे गोष्टी आल्या, असें दाखविण्याचा पाश्चात्यांचा प्रयत्न असतो. हें मत खोडून टाकण्याचा साधार प्रयत्न आपणास करावयाचा आहे.

संशोधनसंबंधाचे पाश्चात्य पंडितांच्या अंगचे गुण म्हटले म्हणजे दीर्घ उद्योग, अभ्यासाची हौस, आणि एकाद्या मताबद्दलची चिकाटी, हे आहेत. या शेवटच्या गुणाला मात्र पुष्कळदां दुराग्रहाचें स्वरूप येतें. पण तसें होणें हें मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. आपल्या लोकांत मात्र चिकाटी फारशी नसून दुराग्रह तेवढा भरपूर असतो. पाश्चात्यांचे गुण आपणास घेतले पाहिजेत; त्याशिवाय त्यांनीं दुराग्रहानें ठरविलेल्या गोष्टींचें निराकरण होणार नाहींच, पण खरेंखुरें संशोधनही होणार नाहीं. वास्तविक पाहिलें तर पाश्चात्यांना आमच्या इकडल्या शोधांमध्यें गढून जाण्यापासून काय फायदा आहे ? पण त्यांनीं केवळ विद्याव्यासंगाच्या हौसेनें आणि उद्योगीपणानें आपणास कित्ता घालून दिला आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या शोध लावण्याच्या कामांत व्यवस्थितपणा, सर्वांगनिरीक्षण आणि क्रमशीलता या गोष्टी असतात. संशोधनकारानें आपण सत्यासत्य पाहून निकाल करणारा न्यायाधीश आहों, हें लक्षांत बाळगिलें पाहिजे. पाश्चात्य पंडित हे वास्तविक अगदीं तीरस्थ असल्यामुळें आरंभीं न्यायाधीशाच्या बाण्यानें उद्योगाला लागतात; परंतु त्यांतले पुष्कळ संशोधक पुढें मताभिमानानें अथवा अन्य कारणांनीं पक्षपाती बनतात. संशोधक म्हटला

कीं त्यानें आपली स्थिति अशी होऊं न देण्याची सावधगिरी राखिली पाहिजे. आपणास तर जुन्या दुर्ग्रहाचें निर्मूलन करावयाचें असल्यामुळें ही सावधगिरी जास्तच राखिली पाहिजे.

पाश्चात्य संशोधकांच्या अंगचा आणखी मोठा महत्त्वाचा गुण असा आहे कीं, ते कोणत्याही गोष्टीचा अगदीं सर्व अंगांनीं परिपूर्ण शोध करितात, आणि तत्संबंधी जेवढी माहिती मिळणें शक्य असेल तेवढी मिळविण्याचा प्रयत्न करीत असतात. यामुळें पुष्कळदां त्यांचे संशोधनात्मक लेख पाल्हाळिक झालेले असतात. परंतु त्यामुळें शोध करण्याच्या सर्व दिशा आणि शोध लागण्याचा संभव असलेलीं सर्व स्थळें समजतात, हा फायदाही मोठा आहे.

पाश्चात्य संशोधकांस आमच्या जुन्या गोष्टी, जुने ग्रंथ, जुने पुरुष यांच्याबद्दलची आमची पूज्यबुद्धि आणि तद्विषयक दृढ समजुती यांची माहिती नसते. त्याविषयींचा त्यांना तर्कही नसतो.तसेंच त्यांना आमच्या लोकांच्या सध्यांच्या समजुती, विचार आणि रीतीभाती यांचाही तर्क नसतो; यामुळें अनेक गोष्टींच्या संबंधानें त्यांचे ग्रह चुकीचे होतात. यासाठीं त्यांचा शोध चुकीचा असल्यास आपण त्यांचेवर जहाल न जातां त्यांची योग्य समजूत होईल असें केलें पाहिजे. पाश्चात्य संशोधकांची नीट समजूत पटल्यावर ते बहुधा योग्य गोष्टींचा स्वीकार करितात. कारण ते स्वभावतः सरळ मनाचे असतात; आणि शिवाय ते तिऱ्हाईत असल्यामुळें त्यांचा कोणत्याही गोष्टीच्या संबंधानें आग्रह नसतो.

एकदां सर रामकृष्णपंत हे प्रख्यात पाश्चात्य संशोधक डा. बुल्हर यांस म्हणाले कीं, उत्तररामचरित्राचा तिसरा अंक वाचतांना नेहमीं आपल्या डोळ्यांतून टिपें येतात. या म्हणण्याचें डा. बुल्हर यांस आश्चर्य वाटलें. कारण आमच्या नाटकांतील प्रसंगांशीं जसें आपलें तादात्म्य होतें, तसा भाव परकी लोकांच्या मनांत उद्भवणें अशक्य आहे. शिवाय एखादा डाक्तर रोग्यावर शस्त्रक्रिया करीत असला, तर त्याचें चित्त जसें केवळ आपल्या कामाकडे असतें, आणि त्याला रोग्याच्या विव्हळण्याचें कांहीं वाटत नाहीं, त्याप्रमाणें खऱ्या संशोधकालाही बाह्य विकारांचें ज्ञान नसतें. आपलीं मनें संशोधनाच्या कामीं अजून तितकीं तल्लीन होऊं लागलीं नाहींत. रामाच्या शोकाचा परिणाम जरी आपल्यावर झाला, तरी शोकाअंतीं राम, सीता हीं आणि त्यांची गोष्ट केवळ कल्पनेची सृष्टि आहे असें जर सिद्ध होत असेल, तर तें मान्य करण्याची खऱ्या संशोधकाच्या मनाची तयारी असली पाहिजे.

आतां आपल्या संशोधकांच्या अंगीं कोणते गुण-दोष असतात हें आपण पाहूं. प्रथमतः खोटा अभिमान आणि त्यामुळें उत्पन्न होणारा दुराग्रह सोडला पाहिजे. आपले लोक, आपला धर्म, आपल्या विद्या झाल्या, म्हणून त्यांचे दोष झांकून ठेवून आपलें मन केवळ अभिमानास वश होऊं देतां नये. राष्ट्रस्थितीच्या गोष्टी मुद्दाम कोणीं केलेल्या नव्हत, त्या परिस्थितीमुळें उत्पन्न झाल्या, हें लक्षांत ठेविलें पाहिजे; आणि त्या बऱ्या वाईट जशा सांपडतील तशा पुढें आणल्या पाहिजेत. तसेंच एकेका संशोधकानें एकेका विषयाची तरी मोठी विद्वत्ता आणि माहितगारी संपादिली पाहिजे. पाश्चात्य लोकांचें संशोधनाचें काम जवळ जवळ दोनशें वर्षे चालू असल्यामुळें पाश्चात्य संशोधकांचे अंगीं विद्वत्ता आणि माहितगारी या गोष्टी परंपरेनें सहज आलेल्या असतात. आम्हांस त्यांनीं जुळवून ठेवलेली माहिती आयती मिळते हें खरें; पण त्या माहितीविषयीं आपण संशयग्रस्त आहों; तिच्या सत्यासत्याचें संशोधन आपल्यास करावयाचें आहे. यासाठीं ती माहिती सर्वस्वीं गृहीत धरून आपलें चालावयाचें नाहीं. या संबंधाची नवीन विद्वत्ता आणि माहिती आपल्या इकडील मूल साधनांनीं आपणास आपली आपणच साध्य करून तपासून घ्यावयास पाहिजे; आणि जुनी माहिती हातीं आली असेल ती तपासली पाहिजे. तत्संबंधीं मार्ग मात्र आपण पाश्चात्यांच्या मार्गाच्या अनुकरणानेंच घ्यावयाचे आहेत. ही विद्वत्ता आणि माहिती कशी मिळवावी, याविषयीं आपण अजून तरवेज झालों नाहीं. याच कारणानें सर रामकृष्णपंत यांनीं मागें अनेक वेळां निराशेचे उद्गार काढले आहेत. अलीकडे या विद्येमध्यें तयार होण्यासाठीं कित्येक संस्कृत पंडित सरकारानें युरोपास पाठविले, आणि ते शिकूनही आले आहेत.आपल्या प्रांतांत ही अशी मंडळी तयार झाली असून त्यांचे उद्योग सुरू आहेत. दोन वर्षांपूर्वीं प्राच्य संशोधकांचें संमेलन झालें त्याला सुमारें तीनशें पंडित सर्व देशांमधून

आले होते, आणि शंभरांवर लेख आणि निबंध प्रविष्ट झाले, यावरून ह्या महत्त्वाच्या उद्योगाची आपली आस्था वाढत आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. तयार होऊन आलेल्या पंडितांपैकीं आपल्याच प्रांतांतले दोन पंडित मृत्युवश झाले, ही आपली मोठीच हानि झाली आहे. आपल्या मंडळीच्या आंगचे दोष जाऊन त्यांनीं या कामांत पडलेल्या युरोपीय पंडितांचे गुण घेतले पाहिजेत. इकडलें तिकडे करून एखादें नवीन भासण्यासारखें मत बनविणें, अथवा एकानें एका युरोपियन पंडिताची बाजू घ्यावी आणि दुसऱ्यानें दुसऱ्याची घ्यावी, आणि मग वाद करीत बसावें, हें कांहीं खऱ्या संशोधनाचें लक्षण नव्हे. युरोपीय पंडितांनीं ठरविलेल्या मताचें सत्यासत्य पाहण्याचें सामर्थ्य आपल्या मंडळीस येत चाललें आहे. तेव्हां आतां निर्भयपणें पुढें सरसावलें पाहिजे. एखादें नवीन मत किंवा नवा शोध धैर्यानें आणि अंतःकरणांतील पूर्ण विश्वासानें पुढें टाकला पाहिजे. अशा प्रकारच्या आत्मविश्वासानें पुढें सरकल्याखेरीज आपली प्रगति होणार नाहीं. अजून आपणास कोणा तरी युरोपीय पंडिताच्या मागें गेलें तर बरें असें वाटतें. विषय आपले, साधनें आपलीं, आणि निर्णयाचें धोरणही आपलें आपणच पाहावयाचें, तर आपल्या शोधकांमध्यें आत्मप्रत्यय जागृत झाला पाहिजे. तो जागृत होईल, तेव्हांच खरें संशोधन होऊं लागेल.

थोडे दिवसांवर विविधज्ञानविस्तारामध्यें महाभारताच्या संशोधनाच्या संबंधानें डा. बेलवलकर आणि रा. ब. वैद्य यांमध्यें वाद चालत होता. त्यामध्यें असें लक्षांत आलें कीं, भारतीय युद्धाचा काळ ठरविण्यांत डा. बेलवलकर हे युरोपियन संशोधकांचीं प्रमाणें घेत आहेत, आणि वैद्य आपल्या परंपरेवर विश्वसत आहेत. खरें पाहिलें तर पाश्चात्यांनीं केवळ अनुमानानें काढलेल्या नवीन मताहून फार दिवसांच्या परंपरेनें ठरलेलें आपलें देशी मत अधिक विश्वसनीय आहे. निदान त्याचा त्याग करण्यापूर्वी चांगलाच विचार करावयास पाहिजे.

ह्या गोष्टी किंवा दोष चांगल्या हेतूनें सांगावयाचे आहेत. आपल्यामध्यें उणीव आहे अशी जाणीव असली, म्हणजे आपण आपली सुधारणा करण्याचा सक्त प्रयत्न करूं. असलें गुंतागुंतीचें काम नवीनच सुरू करणारे आमचे विद्वान् लोक पाश्चात्यांचे तोडीला आजच बसतील अशांतला अर्थ नाहीं. खुल्या अंतःकरणानें आणि केवळ सत्यान्वेषणाकडे दृष्टि ठेवून पुढें गेल्यानें आपण पाश्चात्यांप्रमाणें या कामांत तरबेज होऊं, असा भरंवसा असला पाहिजे. असा भरंवसा वाटण्यासारखीं कामें सर रामकृष्णपंतांसारख्यांनीं आणि आणखी कित्येकांनीं करून ठेविलीं आहेत.

आपल्या जुन्या गोष्टींचा आपणास अभिमान अवश्य पाहिजे. पण हा अभिमान कित्येक वेळां अमर्यादित होऊन, त्याला दुराग्रहाचें स्वरूप येतें. सांप्रत काळीं जे अनेक नवीन उपयुक्त शास्त्रीय शोध लागले आहेत, त्यांतील अनेक आपल्या पूर्वजांना ठाऊक होते, असा ग्रह पुष्कळदां दिसून येतो. एकदां एका शोधक गृहस्थानें सर रामकृष्णपंत यांना विचारिलेंः " जुने ग्रंथ आपल्या पाहण्यांत आले आहेत, त्यांत मयसंहिता आपणास माहित आहे काय ? " त्यांनीं " नाहीं " म्हणून सांगितलें. तेव्हां तो म्हणाला कीं, " युरोपियन लोकांना हा ग्रन्थ सांपडलेला असलाच पाहिजे; कारण एरव्हीं त्यांना आजकालचे अद्भुत शोध कसे लागले ? " पंजाबांतील एका शोधक विद्वानानें 'हिंदू लोकांचें श्रेष्ठत्व' या नांवाचा एक ग्रन्थ लिहिला आहे. तो जुन्या माहितीनें परिपूर्ण आहे; परंतु त्यांत हल्लींच्या युगांतल्या शास्त्रीय शोधांनीं मानवांस साध्य झालेल्या सर्व गोष्टी आमच्या जुन्या ग्रन्थांत आहेत असें प्रतिपादन केलें आहे, आणि असें करतांना जुन्या ग्रन्थांतील वचनांचा वाटेल तसा अर्थ केला आहे. हल्लींचे शोध, आणि धर्मसंबंधीं आणि तत्त्वज्ञानसंबंधीं मतें, जुन्या राष्ट्रांतून होऊन गेलेल्या थोर बुद्धिमान लोकांना सुचलेलीं होतीं, असें आढळून येतें. पण तसे शोध त्यांनीं लाविले होते आणि ते उपयोगांत होते, असें म्हणणें अशक्य आहे. आपल्या प्राचीन ज्योतिष्यांना आणि गणिती विद्वानांना गुरुत्वाकर्षणाची अंधुक कल्पना होती, असें त्यांच्या प्राचीन उद्गारांवरून दिसून येतें. परंतु त्या शक्तीचा पूर्ण शोध लावण्याचें श्रेय न्यूटन यासच दिलें पाहिजे. आपल्या प्राचीन ज्योतिषांतील नक्षत्रांवरून गणना करणें ही गोष्ट आपली आहे. परंतु राशींच्या साह्यानें गणना करणें हें

आपण पाश्चात्यांपासून घेतलें हें उघड असतां ही गोष्ट देखील आपलीच आहे असा आग्रह धरणारे पुष्कळ आहेत. तसेंच महाभारत हा खराखुरा इतिहासग्रंथ आहे, त्याची थ्युसिडायडीसच्या ग्रन्थासारखी योग्यता आहे, असें पुष्कळ लोक समजतात.

आपल्या लोकांची अशी समजूत आहे कीं, व्यास नांवाचा मोठा ऋषि होऊन गेला, त्यानें वेदांची व्यवस्था लाविली; व महाभारत आणि सर्व पुराणें लिहिलीं. एका माणसाच्या हातून असें काम होणें अगदीं अशक्य आहे. आणि ही ग्रन्थरचना कित्येक शतकांचें ज्यांत अंतर आहे, अशा निरनिराळ्या काळीं झालेली असली पाहिजे, हें आम्ही लक्षांत घेत नाहीं. तसेंच या पुराणांतून एकमेकांहून भिन्न अशीं शेंकडों मतें आहेत. तीं एका माणसानें प्रदर्शित केलीं, असें कोणासही म्हणतां येणार नाहीं. 'व्यास' हें कोणाचें विशेषनाम नसून, त्या शब्दाचा अर्थ ग्रन्थाची अथवा शास्त्राची-वाङ्मयाच्या दृष्टीनें-संगतवार व्यवस्था लावणारा, असा आहे. वेदांचे भाग, अध्याय वगैरे जुळविणारा तो वेदव्यास; पुराणांतल्या गोष्टी लोकांत अगोदर प्रचलित होत्या, त्या व्यवस्थेनें जुळविणरा, तो पुराणें रचणारा व्यास. तोही पुन्हां प्रत्येक पुराणाचा निरनिराळा व्यास असला पाहिजे. वेदांचीं सूक्तें रचणारे आणि उपनिषदांमध्यें आलेले ऋषी यांचे नांवानें ब्राह्मणमंडळी अद्यापि रोज तर्पण करीत असते, त्यांत या कल्पित 'व्यास' ऋषीचें नांव नाहीं.

संशोधन अथवा तत्संबंधीं टीका करतांना मन समतोल राखिलें पाहिजे; आणि खरें सांगण्यांत कोणाचें मन दुखवेल अथवा लोकांचा रोष होईल, हें मनांत बाळगणें रास्त नाहीं. महाभारत व्यासानें रचिलें, तेव्हां अर्थात् भगवद्गीता व्यासानेंच रचिली. तसेंच कोणताही उत्तम ग्रन्थ व्यासानें रचिला, असें समजण्याची आमची चाल असल्यामुळें वेदान्ताचीं ब्रह्मसूत्रें रचणारा बादरायण व्यास आणि गीताकार व्यास एकच असें पुष्कळ लोक समजतात. वास्तविक असें मानितां येत नाहीं. कारण दोन्ही ग्रंथांत भिन्न मतें तर आहेतच; पण गीतेनंतर सुमारें चारशें वर्षांनीं तरी वेदान्तसूत्रें रचिलीं असलीं पाहिजेत. हे दोन्ही ग्रंथ एकाच व्यासाचे होत, असें मानणारे युरोपीय पंडितांमध्यें प्रमुख मॅक्समुल्लर आणि आपल्या पंडितांमध्यें प्रमुख लो० टिळक हे होते. आपले विद्वान् शोधक रा. चिंतामणराव वैद्य यांचें मत, ते दोन ग्रंथ एकाचे नव्हत, असें आहे; आणि त्यांनीं भारताच्या उपसंहारांत पंडित मॅक्समुल्लर आणि लो० टिळक यांच्या मुद्द्यांचें चांगलें खंडण केलें आहे. परंतु लोकमान्यांचें खंडण केल्यानें स्वतांची लोकमान्यता कमी होईल, असें वाटून कीं काय, रा. वैद्यांनीं व्यासांना अवतार घेण्यास लाविलें आहे!

निरनिराळ्या काळचे थोर पुरुष, कवि, ग्रन्थकार वगैरे यांना एकाकाळीं आणून त्यांचीं संमेलनें भरविण्याची आम्हांस फार खोड आहे, हें सर्वप्रसिद्ध आहेच. प्राचीन ऋषींची गोष्ट राहोच, पण भोजराजा, कालिदास आणि भवभूति यांना आणि दुसऱ्या कित्येक संस्कृत ग्रन्थकारांना समकालीन मानलें आहे. ज्ञानदेव आणि नामदेव यांना समकालीन मानितात. शिवाजी, तुकाराम, रामदास, वामन कवि यांनाही अगदीं समकालीन मानून अनेक आख्यायिका रचल्या आहेत. असल्या समजुती ऐतिहासिक विसंगतीला कारण होतात. वामन कवीला रामदासानें काव्यरचना करण्यास शिकविलें, हें अभिमानाच्या दृष्टीनें कोणाला कितीही इष्ट वाटत असलें, तरी सत्य शोधणें हेंच शोधकाचें ब्रीद असावयास पाहिजे.

कित्येक संशोधकांचीं योग्य मतें ठरलेलीं असतात, आणि इंग्रजींत लिहितांना ते त्याप्रमाणें प्रतिपादन करितात. पण मराठींत लिहितांना, लोक नाखूष होतील म्हणून, चुकीच्या लोकमतांचेंच प्रतिपादन करितात, असें पुष्कळदां आढळून येतें. कित्येक संशोधक असे असतात कीं, अमुक एक गोष्ट अशी आहेच असें अगोदर ठरवून, नंतर स्वमतस्थापनेसाठीं प्रमाणें शोधीत बसतात. मग तशीं प्रमाणें मिळण्यास अथवा ओढून ताणून मिळविण्यास कधींच अडचण पडत नाहीं!

संशोधन करितांना ज्या गोष्टींचें संशोधन करावयाचें तत्संबंधाच्या सभोंवारच्या परिस्थितीचा चांगला शोध करावयास पाहिजे. तसेंच देशोदेशींची स्थिति आणि लोकांच्या समजुती या नीट लक्षांत घेतल्या पाहिजेत. सर रामकृष्णपंत यांनीं मद्रासेकडील एका हुषार संशोधकाची अशी गोष्ट लिहिली आहे कीं,

त्यानें "युरोपियन लोक परस्परांशीं युद्ध करितात तेव्हां लोकांच्या घरादारांचा, शेताभातांचा, इमारतींचा वगैरे विध्वंस करितात. पण आमच्या जुन्या इतिहासांत असें सांपडत नाहीं. आमच्यांत राजाराजांमध्यें युद्धें होत, तेव्हां प्रजेला त्रास पोंचत नसे; उलट असा त्रास देऊं नये असें जुन्या ग्रंथांत सांगितलेलें आढळतें;-"अशी टीका केली आहे. या लेखकानें दोहोंकडील परिस्थितीचा विचार केला नाहीं. आपले प्राचीन राजे एकमेकांवर वर्चस्व स्थापन करण्यासाठीं युद्धें करीत. शत्रूचा पराभव करून कारभार मिळविला, आणि विजयी राजानें जित राजाकडून आपलें चक्रवर्तित्व कबूल करविलें, म्हणजे युद्ध संपलें. यूरोपांतली मुळारंभापासूनची स्थिति अशी आहे कीं, तिकडे **राजे** लढत नसून निरनिराळीं **राष्ट्रें** आणि **लोकसंघ** एकमेकांशीं लढतात. नुकत्याच संपलेल्या युद्धावरून ही गोष्ट कोणाच्याही लक्षांत येईल.

संशोधनामध्यें नेहमीं सत्यशोधनाकडेसच करडी नजर ठेविली पाहिजे. मग तें सत्य आपल्या मनोभावनेच्या विरुद्ध असलें, तरी आपणास कांहीं वाटतां नये. पारसी, असीरियन, हे आमचे प्राचीन भाऊबंद आहेत, आमचें जुनें वसतिस्थान एकदां आशियामैनरमध्यें, इराणांत किंवा मिसापोटेमियामध्यें होतें, अशा गोष्टी जर सत्य ठरूं लागल्या तर त्यांत बिघडलें काय ? त्याबद्दल आपणास मानहानि झाल्याप्रमाणें कां वाटावें ? याचें कारण, अजून आमच्या संशोधकांनीं विकारवशता सोडलेली नाहीं, हें होय.

संशोधन आणि टीका करितांना सहिष्णुता पाहिजे; दुसऱ्याच्या मताचा आदर पाहिजे; आपला प्रतिस्पर्धी असला तरी त्याच्या मतांविषयीं सुबुद्धि हवी. एकादें मत ठरवून तें प्रतिपादण्याचा आपल्यास जसा अधिकार असतो, तसा दुसऱ्यासही असतो. परंतु आमच्या कित्येक मंडळीला असें वाटत असतें कीं, आपलें जसें मत असेल तसेंच दुसऱ्याचें असलें पाहिजे. दुसऱ्याचें मत तसें नसेल, तर तो केवळ चुकतो असें नव्हे, तसेंच त्याला सोयीच्या मार्गानें स्वमताकडे वळवावा असेंही नव्हे, तर तो मूर्ख, आणि त्याला शिव्याच दिल्या पाहिजेत. अलीकडे आमच्या संशोधक म्हणविणाऱ्या मंडळीमध्यें असले वितंडवाद पुष्कळच होतात,हें सर्वांस माहीत असेलच. कित्येकांस तर असें वाटत असतें कीं, एखाद्या गोष्टींत आपल्याखेरीज दुसरा कोणी मत देण्यास लायकच नाहीं. कित्येक तर आपणास जगांतील सर्व गोष्टी पूर्णपणें अवगत आहेत असें समजतात. असले लोक कोणत्याही विषयावर नुसतें मत देण्यासही अगदीं कुचकामाचे होत. मग संशोधनाचे कामास तर अगदींच उपयोगाचे नाहींत.

ज्याला खऱ्याचा शोध करावयाचा आहे, त्यानें उघड्या मनानें दुसऱ्याच्या मताचें आकलन करून त्यांतून सत्यांश काढून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आमचें मराठी जुनें वाङ्मय, जुने कवी, आणि ग्रन्थकार जे थोडे आहेत ते, जुना इतिहास आणि जुने ऐतिहासिक पुरुष, यांच्यासंबंधाने सध्यां जे शोध करीत आहेत, त्यांतील पुष्कळ शोधक या दुराग्रहानें भरलेले असतात,असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागत आहे. सर रामकृष्णपंत यांनीं आपल्या एका लेखांत असेच उद्गार काढले आहेत.

एकदां एक तरुण शोधक सर रामकृष्णपंत यांस म्हणाला; "जुने ग्रन्थ शोधतांना त्याच्या प्रती मिळाल्यास त्यांचे लेखक, त्यांचीं स्थळें, त्यांचे शक, त्यांचा कागद, त्यांची लिहिण्याची पद्धत वगैरे तपासीत बसण्यांत काय फायदा ?" सर रामकृष्ण यांनीं त्यास सांगितलें कीं, "न्यायाधीशापुढें साक्षीदार उभा राहिल्यावर न्यायाधीश प्रथमतः त्याचें वय, जात, धर्म, कूळ, शिक्षण, उद्योग वगैरे यांची चौकशी करितो. यावरून, पुढें तो जें सांगतो त्याच्या खरेखोटेपणाचा आणि योग्यतेचा विचार करावयाचा असतो. कारण वरील प्रत्येक गोष्टीचा साक्षीदारावर परिणाम झालेला असतो. आपल्यापुढें एखाद्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत आली असतां तिच्यावर मागें उल्लेखिलेल्या सर्व गोष्टींचा परिणाम झालेला असलाच पाहिजे."

सांप्रत मराठी भाषेच्या द्वारें, विशेषतः प्राचीन महाराष्ट्र कवि आणि महाराष्ट्राचा इतिहास,यांचें संशोधन चाललें आहे. त्यांत उद्योग करणारे कित्येक लेखक निर्मळ अंतःकरणानें व चांगल्या शोधक बुद्धीनें प्रयत्न करीत आहेत;परंतु कित्येकांमध्यें दुरभिमान, अहंभाव, दुराग्रह, असहिष्णुता इत्यादि या कामाला घातक असे दोष दिसून येतात, ही दुःखाची गोष्ट आहे. प्राचीन

मराठी कवींच्या संशोधनाच्या संबंधानें ज्ञानदेवाचें संशोधन कसें व्हावयास पाहिजे, याचा आपण नमुन्यादाखल विचार करूं.

ज्ञानेश्वरी हा मराठींतला अगदीं पहिला ग्रन्थ आहे. त्याचें स्वरूप पाहातां, त्याचे अगोदर जरी ग्रंथ झाले नव्हते, तरी मराठी भाषा कित्येक शतकें उपयोगांत असून चांगली अजमावलेली होती, असें दिसून येतें. हा ग्रन्थ फार लोकप्रिय झाल्यामुळें त्याच्या आरंभापासून आतांपर्यंत असंख्य प्रती झाल्या. तो असंख्य भाविक वाचक आणि ज्ञाते अज्ञाते असे लेखक यांच्या हांतून गेला, आणि कालांतरही फार झालें, यामुळें मूळचा ग्रन्थ कसा होता, हें आतां समजणें कठीण झालें आहे. भाषेच्या आणि वाङ्मयाच्या दृष्टीनें संशोधन म्हटलें म्हणजे अगदीं प्रथमतः ग्रन्थाचें स्वरूप कसें होतें याचा छडा लाविला पाहिजे. तेव्हां प्रथमतः अगदीं खरीखरी त्यावेळचे अशी प्रत मिळविली पाहिजे. त्यावेळचे किंवा जवळजवळचे दुसरे ग्रन्थ असतील तर त्यांच्या भाषेची तुलना करावयास पाहिजे. ज्ञानेश्वरीच्या वेळचें एक पंचतंत्राचें भाषांतर आहे, आणि थोडे मागूनचे महानुभावपंथाचे ग्रन्थ आहेत. हे ग्रन्थ ज्ञानेश्वरीच्याइतके बिघडलेले नाहींत. कारण पंचतंत्र हें लोकांच्या वाचनामध्यें फार असण्याचा संभव कमी, आणि महानुभाव लोक आपल्या ग्रंथांस फार जपतात. तथापि हे लोक आपले ग्रन्थ गुप्त राखीत आले आहेत, हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे. हे ज्ञानेश्वरीचे समकालीन ग्रन्थ घेऊन त्यांची भाषा आणि ज्ञानेश्वरीची भाषा यांची तुलना केली पाहिजे. यानंतर एकनाथापर्यंत निदान शंभर वर्षांच्या मुदतीची एकेक अशा प्रती मिळविल्या पाहिजेत. एकनाथाच्या वेळीं ज्ञानेश्वरी बिघडली होती, ती त्यानें शुद्ध केली. बिघडली होती म्हणजे काय, आणि ती त्यानें शुद्ध केली म्हणजे काय, या गोष्टींचा विचार झाला पाहिजे. सांप्रत आपली जशी भाषेच्या संबंधाची दृष्टि आहे, तशी एकनाथाची दृष्टि असणें अशक्य. तेव्हां त्यानें ज्ञानेश्वरी शुद्ध केली म्हणजे ती त्याला विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें बिघडली अशी वाटली, आणि ज्ञानदेवाचें इंगित स्पष्ट होत नाहीं असें त्याचें मत झालें, म्हणून या दृष्टीनें ती त्यानें शुद्ध केली. त्याचप्रमाणें एकनाथाची ज्ञानदेवाच्यासंबंधानें जरी पूज्य बुद्धि होती, तरी दोघांच्या धर्ममतांत फार फरक होता, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. सर्वप्रकारचें ज्ञान संस्कृतांत भरलें आहे, तें स्वभाषेंत आणावयाचें हा स्तुत्य हेतु मात्र दोघांचा एकच होता. आपणास शुद्ध केल्यानंतरची प्रत, आणि त्यानंतर नियमित काळानंतरच्या खास प्रती मिळाल्या पाहिजेत. तसेंच एकनाथानें ज्ञानेश्वरी शुद्ध केल्यावरही शुद्ध न केलेल्या प्रतींवर कित्येक वाचकांचा भाव होता, आणि तेही प्रती करीत आले आहेत. त्यांच्यांपैकीं निवडक अस्सल प्रती मिळविल्या पाहिजेत. वास्तविक ज्ञानेश्वरी ह्या ग्रन्थांतील प्रतिपादन अद्वैतवेदन्ताच्या दृष्टीचें आहे. त्यांत शंकराचार्यांचें भक्तिमत आणि रामानुजाचें भक्तिमत यांची थोडीशी छाया मात्र दृष्टीस पडते. असें असून ज्ञानेश्वरी हा ग्रन्थ पूर्ण वैष्णवपंथी आणि कट्टे भक्तिपंथाभिमानी अशा विठोबाच्या वारकरी मंडळीचा पूज्य ग्रन्थ झाला कसा, याचा विचार व्हावयास पाहिजे. त्याचप्रमाणें आपल्याइकडे जे निरनिराळे सांप्रदाय आहेत त्यांच्याजवळच्या प्रती मिळविल्या पाहिजेत, आणि त्यांची तपासणी झाली पाहिजे. कारण यांनीं आपापल्या सांप्रदायाच्या मतास जुळतील असे फेरफार केलेले असण्याचा फार संभव आहे. या संशोधनाच्या संबंधानें, विशेषतः भाषेच्या दृष्टीनें एक शेवटची मर्यादा घालितां येईल. ख्रिस्त-पुराण हा ग्रन्थ इ० स० १६२० च्या सुमारें रचला जाऊन लगेच छापला गेला. यामुळें तो त्या वेळच्या मराठी भाषेचा खरा खरा नमुना आहे. तेव्हां मागें दर्शविल्याप्रमाणें ज्ञानेश्वरीच्या प्रती मिळून यथासांग संशोधन झाल्यास, ज्ञानेश्वरीची भाषा आणि ख्रिस्त-पुराणाची भाषा, यांची तुलना करून सुमारें तीनशें वर्षांच्या अवधींत मराठी भाषेच्या ठेवणीमध्यें आणि घटनेमध्यें कोणते फरक झाले हें ठरवितां येईल. इतका प्रयत्न करावा तेव्हां ज्ञानेश्वरीचें खरें खरें संशोधन होईल. या कामाला किती अडचणी आहेत हें येथें सांगण्याची गरज नाहीं.

आतां इतिहाससंशोधनाचा थोडा विचार करूं. सर्व प्रकारचे दुराग्रह सोडून मनाची समता राखली पाहिजे; आणि केवळ सत्यान्वेषणाकडे दृष्टि पाहिजे.

अशा रीतीनें जी गोष्ट खरी ठरेल, तिच्याबद्दल आपणास वाईट वांटण्याचें कारण नाहीं. मुसलमान इतिहासकार, युरोपियन इतिहासकार आणि आपणामधीलच देशाभिमानी इतिहासकार, अथवा जुने लेख लिहिणारे, यांमधून आपणास मार्ग काढावयाचा आहे. तसेंच आमच्या लोकांस गप्पा मारणें आणि हव्या त्या काल्पनिक गोष्टी रचून टाकणें, याची संवय फार आहे. या सर्व अडचणींतून धिमेपणानें आणि शांत चित्तानें आपण मार्ग काढूं तरच आपलें संशोधन नीट होईल. परंतु खेदाची गोष्ट अशी आहे कीं, सध्यां जरी कांहीं थोडे संशोधक चांगले सशास्त्र मार्गानें काम करीत आहेत आणि त्यांच्या उद्योगानें खराखरा इतिहास पुढें येत आहे, तरी दुराग्रहाचा, अंधपरंपरेचा आणि गप्पाष्टकांचा भाग अजूनही पुष्कळ आढळून येतो.

यासंबंधानें आपण येथें एका लहानशा गोष्टीचा विचार करूं. नारायणराव पेशव्यास धरावें असें रघुनाथरावानें पत्र लिहिलें, आणि त्यामध्यें 'ध' चा 'मा' केला, अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. तिच्यावर आजला इतका दृढ विश्वास आहे कीं, तें पत्र पुढें रामशास्त्री यांस सांपडून त्याच्या आधारें त्यांनीं रघुनाथराव पेशव्यास देहान्त प्रायश्चित्त सांगितलें, अशी एक दंतकथा आहे. आतां हें पत्र कल्पनामय आहे असें साफ म्हणण्याचें धाडस मी करीत नाहीं. कारण या आख्यायिकेवर आमच्या लोकांची पूर्ण श्रद्धा आहे. परंतु इतिहाससंशोधनाच्या दृष्टीनें या आख्यायिकेच्या खरेखोटेपणाचा पूर्ण शोध झाला पाहिजे. तसा शोध झाल्यावर तसें पत्र होतें असें ठरलें, अथवा नव्हतें असें ठरलें, तर त्यांत आपलें नफानुकसान काय आहे ?

ह्या पत्राच्या अगोदरच्या काळांतले, त्यावेळचे, आणि त्या नंतरचे शेंकडों लेख उपलब्ध असून त्यांतले पुष्कळ संगतवार प्रसिद्धही झाले आहेत. परंतु हें पत्र, त्याची नक्कल अथवा तें पाहिल्याचा प्रत्यक्ष पुरावा कोठें उपलब्ध नाहीं. पटवर्धनी ऐतिहासिक पत्रव्यवहारांत याचा उल्लेख नाहीं. असें एक पत्र होतें असें आपण खात्रीनें समजत आहों पण तें मोडींत लिहिलें होतें कीं बाळबोध लिपींत होतें, त्यांतील 'ध' अक्षराचें 'मा' अक्षर निदान फारसें उमगून येणार नाहीं अशा रीतीनें कसें करितां येईल ? तसेंच 'ध' अक्षर ज्या शब्दांत होतें तो शब्द कोणता, तो शब्द ज्या वाक्यांत होता तें वाक्य काय, हें पाहण्याचा कधीं कोणीं यत्न केलेला नाहीं. या पत्रांत एकंदर मजकूर काय होता, हेंही कोणास ठाऊक नाहीं. आकाशांतील चंद्रसूर्याप्रमाणें हें पत्र होतेंच असा आपला ग्रह आहे. याचा खरेपणा इतिहासाला कसा जुळतो, हेंही कोणीं विचारपूर्वक पाहिलेलें दिसत नाहीं. रघुनाथराव स्त्रीलंपट होता आणि आनंदीबाईच्या नादानें वागत होता असें आपण समजतों. कित्येक नाटकग्रंथांत तर त्याला अगदीं अजागळ, बाईलवेड्या ठरविलेला आहे. पण इतिहासावरून तो इतका अप्रयोजक पुरुष होता असें दिसत नाहीं. तो जरी नानासाहेब किंवा सदाशिवराव भाऊ यांच्याइतका राजनीतिनिपुण नसला, तरी त्याचीं अनेक पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांवरून तो आपल्याविरुद्ध लेखी पुरावा कायमचा करून ठेवण्याइतका खास मूर्ख नव्हता. तेव्हां त्यानें असें एकादें पत्र लिहिलें असेल असें वाटत नाहीं. तसेंच इतकें प्रख्यात जें पत्र, तें किंवा त्याची एकादी नक्कलही कशी उपलब्ध नसावी याचें मोठें आश्चर्य वाटतें. या प्रकरणाचा अलीकडे जो इतिहास माहीत झाला आहे, त्यावरून आनंदीबाईला या राजकारणांतील पहिला मान द्यावा असें वाटत नाहीं. एकंदर कटामध्यें तिचा नंबर बराच खालीं लागेल असें वाटतें. कित्येक संशोधक तर तिला मुळींच निरपराधी ठरवीत आहेत. नारायणराव हा मूर्ख असून त्यानें राज्यकारभार वाईट रीतीनें चालविला होता, आणि त्यास अनेक शत्रु झाले होते, असें आढळून येतें. तेव्हां केवळ दंतकथेवर न विश्वासतां या राजकारणाचें पूर्ण संशोधन व्हावयास पाहिजे आहे, असेंच दिसून येईल.

संशोधन कसें व्हावयास पाहिजे हें सांगण्यासाठीं या दोन गोष्टींचीं उदाहरणें घेतलीं आहेत. जास्त चर्चा करण्यास आपल्याला स्थलावकाश नाहीं, आणि तशी चर्चा इतरत्र चालूही आहे. पुण्याच्या इतिहास संशोधक मंडळीचें काम अलीकडे चांगलेंच चाललें आहे, आणि त्या मंडळींतले पुष्कळ लोक आस्थापूर्वक उद्योग

करीत आहेत. त्यांना आतां अनुभवानें मागल्यापेक्षां जास्त चांगलें वळणही लागत आहे. तथापि या मंडळांतील प्रमुखांनीं संशोधनकार्याच्या संबंधानें उद्योग करण्याचे कांहीं फुटकळ नियम इतरांना घालून दिले तर याहीपेक्षां व्यवस्थित काम चालेल. या ऐतिहासिक शोधनाच्या योगानें अनेक पत्रें, लेख आणि नवीन सामुग्री उजेडांत येत आहे. त्यामुळें कित्येक जुनीं ठरलेलीं मतें आणि निर्णय बदलावे लागतील असें दिसत आहे. शिवाजीच्या संबंधानें आपल्या लोकांचीं बरींच ठरींव मतें झालेलीं आहेत; परंतु अलीकडे दोन वर्षांत मालोजी, शहाजी आणि शिवाजी यांच्या संबंधाची जी नवीन सामुग्री हातीं आली आहे, तीवरून आपल्यास जुना शिवाजी अगदीं विसरून जाऊन नवीनच शिवाजी ठरवावा लागतो कीं काय, असें वाटूं लागलें आहे. सन १८०५ सालीं आस्टरलीड्झ येथील प्रचंड लढाईंत नेपोलियननें साऱ्या युरोपाचा पराभव केला, हें कळलें, तेव्हां इंग्लंडचा मुख्य प्रधान पिट् यानें आपल्या समोरचा युरोपाचा नकाशा, 'याचें आणखी दहा वर्षें तरी कारण नाहीं,' असे निराशेचें उद्गार काढून गुंडाळून ठेवविला. याच्या उलट आपल्यास चांगल्या उत्तेजनपर आशेनें आपल्या महाराष्ट्राच्या इतिहासाचे अखेर निर्णय ठरविण्याचें काम सर्व सामुग्री हातीं येईपर्यंत बाजूला सारून ठेवणें भाग पडत आहे !

प्राचीन संशोधन हें इतिहासशास्त्राचें अंग आहे. आपला प्राचीन व मध्यकालीन इतिहास तर लिहिलेला नाहींच, पण अर्वाचीन इतिहासही कोणी आस्थेनें लिहिलेला नाहीं. परकीयांनीं लिहिलेला अलीकडील इतिहास तर त्यांच्या दृष्टीनें त्यांला वाटला तसा लिहिलेला आहे. खरें इतिहासशास्त्र आपल्यास अगदीं नवीनच ठाऊक झालें आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. आपला सर्वकालीन इतिहास जुळण्यास अनेक प्राचीन साधनें मात्र उपलब्ध होत आहेत. कित्येक ऐतिहासिक निकालांची तर केवळ प्राचीन संशोधनावर भिस्त आहे. तेव्हां त्यांचा शोध लावणें तो फार आस्थापूर्वक आणि मोठ्या काळजीनें लाविला पाहिजे.

याविषयीं थोडक्यांत चिकित्सा करण्याचा उद्देश होता. यासाठीं तूर्त हा लेख येथेंच थांबवितों.



# ग्रन्थप्रकाशनाचे मालकी-हक्क.

( रा. रा. सालोमॅन मोझेस वाकरूळकर, B. A., LL. B., Solicitor, Bombay. )

## १ प्रास्ताविक.

मुद्रणकला प्रचारांत येण्यापूर्वी ग्रंथकार ग्रंथ लिहीत, कवि काव्यें करीत, नाटककार नाटकें रचीत, व त्या ग्रंथांचा, काव्यांचा व नाटकांचा प्रसार व प्रसिद्धि त्यांच्या योग्यतेनुरूप व लोकाभिरुचीस अनुसरून कमी जास्त प्रमाणानें होत असे. मुद्रणकलेच्या अभावीं कर्त्यानें, त्याच्या मित्रमंडळानें, शिष्यवृंदानें किंवा आश्रितगणानें मूळावरून किंवा नकलेवरून केलेल्या हस्तलिखित प्रतीवांचून ह्या कामीं दुसरें साधन नव्हतें. अर्थात् सर्वच प्रती कर्त्याच्या संमतीनें होत नसत. फार तर मूळावरून कोणी व किती प्रती करून घ्याव-याच्या, एवढेंच कर्त्यास पाहतां येत असे. अशा परि-स्थितींत कर्त्यास जरी इच्छा झाली, तरी त्यास आपल्या ग्रंथाच्या, काव्याच्या अगर नाटकाच्या प्रतींची संख्या नियमित करण्याचें किंवा प्रती करण्यासंबंधीं अनधिकारी लोकांस प्रतिबंध करण्याचें साधन नव्हतें. वास्तविक तसा प्रतिबंध करण्याचें बहुधा कोणास प्रयोजन देखील वाटलें नसावें. कारण त्या काळी ग्रंथकारांस व कवींस आपल्या श्रमाचा मोबदला व स्फूर्तीस प्रोत्साहन बहुधा राजे किंवा सरदार ह्यांच्या आश्रयानें मिळत असे. ग्रंथाच्या किंवा काव्याच्या अनेक प्रती करवून त्यांच्या विक्रीनें धन संपादन करण्याची कल्पना त्यावेळीं येणें शक्य नव्हतें. मुद्रणकलेचा प्रारंभ व प्रसार झाल्या-पासून ग्रंथाच्या प्रती करण्याच्या हक्कास महत्त्व आलें; किंबहुना, मुद्रणकलेच्या प्रसारामुळें हा हक्क अस्ति-त्वांत आला असें म्हटलें तरी चालेल.

प्रत्येक भाषेंतील ग्रंथप्रकाशनासंबंधींच्या हक्कांचें महत्त्व ती भाषा प्रचलित असलेल्या प्रदेशाच्या विस्तारावर व त्या प्रदेशांतील रहिवाशांच्या साक्षर-तेवर अवलंबून असतें. इंग्लिश भाषा आज एकंदर ब्रिटिश साम्राज्यांत व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत रूढ आहे. शिवाय इंग्लंड, स्कॉट्लंड, आयर्लंड, कानडा, आस्ट्रेलिया, व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, यांतील साक्षरतेचें प्रमाण फार मोठें आहे. तसेंच इंग्लिश भाषेचा प्रचार ब्रिटिश साम्राज्याबाहेरील दुसऱ्या अनेक देशांत झाला आहे. त्यामुळें इंग्लिश भाषेंतील ग्रंथलेखनाचा व्यवसाय मोठ्या किफायतीचा झाला आहे. त्या मानानें हिंदुस्थानांत देशी भाषेंतील ग्रंथप्रकाशनाच्या मालकीहक्कास आज महत्त्व नाहीं. कारण काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत, व बलुचि-स्तानाकडील सरहद्दीपासून आसामच्या पूर्व हद्दीपर्यंत, हिंदुस्थान हा एक देश आहे असें जरी कल्पिलें, व अनेक परस्परविरोधी धर्मांमुळें हिंदुस्थानांतील रहिवाशी विभागलेले असूनही हिंदी राष्ट्र या नात्यानें ते सर्व एक आहेत असें जरी मानिलें, तरी हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतून ज्या निरनिराळ्या भाषा चालू आहेत त्यामुळें हिंदुस्थानाचीं अनेक खंडें पडलीं आहेत असें कबूल करणें प्राप्त होतें. तसेंच हिंदु-स्थानांतील साक्षर वर्ग अजून मर्यादित आहे. ह्या कारणामुळें देशी भाषेंत ग्रंथलेखनाचा धंदा अद्यापि विशेष फायद्याचा झालेला नाहीं, व ग्रंथप्रकाशना-संबंधीं हक्कांच्या महत्त्वाची जाणीव बहुजनसमाजांत फारशी उत्पन्न झालेली नाहीं. परंतु ही स्थिति बदल-ण्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ह्या देशां-तील साक्षर वर्ग वाढत चालला आहे; देशी भाषा दिवसेंदिवस प्रगल्भ होत आहेत; दुय्यम व उच्च प्रतीचें शिक्षण देखील देशी भाषांतून देण्याची प्रवृत्ति वाढत चालली आहे; एक राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें म्हणा कीं निरनिराळ्या प्रांतांतील सुशिक्षितांच्या पर-स्परांच्या संघट्टनानें म्हणा, बंगाली, हिंदी वगैरे प्रमुख देशी भाषांचा प्रसार सर्व देशभर होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं आहेत. हिंदी किंवा बंगालीसारखा जरी मराठीचा प्रसार आजला नसला, तरी मराठीविषयीं नाउमेद होण्याचें कारण नाहीं. मराठी भाषा आरंभीं जरी केवळ महाराष्ट्रापुरती असली तरी मराठ्यांच्या राजसत्तेबरोबर हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या प्रांतांत तिचा शिरकाव होऊन तीं कमी अधिक प्रमाणानें बडोदें, ग्वाल्हेर, इंदूर, धार, देवास वगैरे संस्थानांत प्रचारांत आहे. वऱ्हाड प्रांत म्हणजे दक्षिणी लोकांनीं केलेल्या वसाहतींचें उत्कृष्ट उदाहरण होय. राजसत्ता नष्ट झाल्यानंतर देखील वऱ्हाडांत महाराष्ट्रीयांनीं आपल्या कर्तबगारीनें अग्रस्थान पटकावून मराठी भाषेचें वऱ्हाडांतील ठाणें कायम राखिलें आहे. मराठी

भाषेच्या भाग्यानें महाराष्ट्रीयांत आजवर अनेक विद्वद्रत्नें निपजून त्यांनीं आपल्या प्रयत्नांनीं मराठी भाषेस उज्ज्वल स्वरूप दिलें आहे. मराठींत साक्षर लोकांची संख्या झपाट्यानें वाढत आहे, व देशी भाषेंतून उच्च शिक्षण देण्याचा प्रयत्न मराठीसंबंधींच प्रथम झाला आहे. मराठींतील ग्रंथरचनेस ह्या सर्व कारणांमुळें महत्त्व येऊं लागलें असून मराठी ग्रंथलेखनाचा व्यवसाय आजवर क्वचित् प्रसंगीं द्रव्यदृष्ट्याही फायदेशीर झाला आहे, व पुढें होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. अशा वेळीं ग्रंथप्रकाशनाच्या हक्कासंबंधीं महाराष्ट्रीयांत जिज्ञासा उत्पन्न होणें साहजिक आहे.

## २ ग्रंथप्रकाशनासंबंधीं कायद्यांचा इतिहास.

इंग्लंडमधील ग्रंथप्रकाशनाच्या कायद्याचा इतिहास बऱ्याच घोटाळ्याचा दिसतो. इंग्लंडांत पंधराव्या शतकांत छापखाने सुरू झाल्यानंतर निरनिराळे ग्रंथ प्रसिद्ध होऊं लागले, व त्यांतील धर्मविषयक मतें अनेकदां राज्यकर्त्यांच्या धर्ममताविरुद्ध असल्याचें दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें. हा काळ युरोपखंडांत धर्मच्छलाचा असल्यामुळें, प्रचलित धर्ममतें व धर्मगुरु ह्यांच्याविरुद्ध प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांस आळा घालण्याचें अगत्य राज्यकर्त्यांस वाटलें. म्हणून राजाज्ञेवांचून कोणताही ग्रंथ छापण्यांत येऊं नये असा निर्बंध घालण्यांत आला; म्हणजे प्रत्येक ग्रंथ छापण्यापूर्वी त्याकरितां सरकारी "लायसन्स" किंवा परवाना मिळविणें भाग झालें. अर्थात् ज्याला परवाना मिळाला त्यानेंच ग्रंथ छापावयाचा, इतरांस छापतां येणें शक्य नव्हतें, व छापण्याचा त्यांस अधिकारही नव्हता.अशा रीतीनें इंग्लंडमध्यें ग्रंथ छापण्यासंबंधीं जे निर्बंध घालण्यांत आले त्यांमुळें ग्रंथप्रकाशनाचे हक्क प्रस्थापित होण्यास सुरवात झाली. पुढें 'स्टेशनर्स हॉल' म्हणून छापखानेवाल्यांनीं आपला संघ स्थापन केला, व सरकाराकडून त्याला सन १५५६ सालीं "चार्टर" किंवा सनद मिळाली. ह्याच सुमारास इंग्लंडांत "स्टारचेम्बर" नांवाचें एक मंडळ अधिकारारूढ होतें,व ह्या मंडळाकडून निघणाऱ्या फर्मानांप्रमाणें राज्यकारभार चालत असे. सन १५५६ पासून सन१६४० पर्यंत ग्रंथ छापण्याचे परवाने देण्याचा अधिकार ह्या स्टार चेम्बरकडे होता; व छापलेल्या ग्रंथांची नोंद ठेवण्याची व्यवस्था वर दर्शविलेल्या स्टेशनर्स हॉल या संस्थेनें केली होती. सन १६३७ सालीं स्टार चेम्बरनें फर्मान काढून या नोंदींत अनधिकारी लोकांनीं छापलेल्या ग्रंथांची नोंद करण्याविषयीं मनाई केली. "स्टार चेम्बर" चा अवतार सन १६४० सालीं संपला, व तदनंतर इंग्लंडच्या इतिहासांत जी पार्लमेंट 'लाँग पार्लमेंट' म्हणून प्रख्यात आहे तिच्या कारकीर्दीस प्रारंभ झाला. ह्या लाँग पार्लमेन्टनें सन १६४९ सालीं जो कायदा केला त्या कायद्यानें ग्रंथप्रकाशनाच्या हक्कास व्यवस्थित रूप देण्याचा प्रथम प्रयत्न झाल्याचें दिसतें. परवाना मिळाल्यावांचून, व स्टेशनर्स हॉलमध्यें नोंद केल्यांवांचून,तसेंच ग्रंथकर्त्यांच्या परवानगीवांचून, कोणताही ग्रंथ छापण्यांत येऊं नये, असे नियम ह्या कायद्यानें घालून दिले होते. राज्यक्रांति होऊन लाँग पार्लमेन्ट नाहींशी होतांच तिनें केलेले कायदेही नष्ट झाले, व कांहीं काळपर्यंत इंग्लंडांत ग्रंथप्रकाशनाचे हक्क संरक्षण करणारा कायदा उरला नव्हता. ही गैरसोय दूर करण्याकरितां स्टेशनर्स हॉल या संस्थेनें सन १६८१ व १६८४ सालीं ग्रंथप्रकाशनाच्या हक्कासंबंधीं नियम केले; परंतु कायदेशीर बंधनाच्या अभावीं ह्या नियमांचा विशेष उपयोग झाला नाहीं. सन १७०९ सालीं स्टेशनर्स हॉल संस्थेनें ग्रंथप्रकाशनाच्या हक्कास कायदेशीर स्वरूप मिळावें म्हणून पार्लमेंटकडे अर्ज केला. त्याच वर्षीं ग्रंथप्रकाशनाच्या हक्कासंबंधीं कायदा झाला. ह्या कायद्यानें कर्त्यास ग्रंथप्रकाशनाचा मालकीहक्क सन १७१० पर्यंत छापलेल्या ग्रंथांच्या बाबतींत त्या सालापासून एकवीस वर्षें, व १७१० सालानंतर छापलेल्या ग्रंथांच्या बाबतींत ग्रंथ छापल्यानंतर १४ वर्षें, व त्यापुढें ग्रंथकर्ता हयात असल्यास आणखी चौदा वर्षें, अशा मुदतीनें दिला होता. ह्या कायद्याविरुद्ध पुष्कळ ओरड झाली. त्याचें कारण उघड आहे. कोणताही ग्रंथ उपयुक्त होण्यास लिहिणारा पोक्त विचारांचा व अनुभवी असावा लागतो. ग्रंथ लिहिण्याकरितां त्यास कित्येक ग्रंथांचें परिशीलन करावें लागतें, किती तरी काळ अवलोकन व मनन करण्यांत घालवावा लागतो, मेंदूस शीण द्यावा लागतो, व कंबर वांकवून व डोळ्यांस ताण देऊन बोटें झिजवावीं लागतात. अशा पोक्त व विचारी माणसानें पूर्वतयारी संपूर्ण करून लिहिलेला ग्रन्थ अजरामर होण्यास लायक ठरतो.

परंतु ग्रंथकर्ता बहुधा वयातीत झाल्यावांचून त्याज-कडून तसला ग्रंथ निर्माण होत नाहीं. त्या ग्रंथासाठीं त्यानें केलेल्या श्रमाचें फळ चवदा वर्षांच्या अवधींत त्याला व त्याच्या कुटुंबाला कसें मिळावें ? पहिलीं चवदा वर्षे संपण्यापूर्वी बहुधा त्याचा अंत झालेला असणार, त्यामुळे पुढील चवदा वर्षांची त्यानें आशाच करणें व्यर्थ ! ग्रंथ प्रसिद्ध झाल्याबरोबर त्याची खरी किंमत जाणणारे लोक थोडेच असतात. ग्रंथाची व ग्रंथकर्त्याची कीर्ति होण्यास व खरी योग्यता कळण्यास सामान्यतः कालावधि लागतो, त्यामुळें चवदा वर्षांच्या अवधींत कर्त्यास आपल्या श्रमाचा मोबदला मिळविणें बहुतेक अशक्य कोटींतलें आहे हें उघड आहे. शिवाय बुद्धि परिपक्व व ग्रंथ-कार म्हणून ख्याति होण्याबरोबर बहुतकरून उतार-वयास आरंभ झालेला असणार. अशा वेळीं ग्रंथरचना झाल्यास ती जगाच्या दृष्टीनें हितावह व आदरणीय होईल हें खरें; परंतु त्याचा पूर्ण मोबदला मिळण्यास कायद्यानें जर पुरेशी मुदत ठेवली नाहीं, तर कर्त्यास ग्रंथरचना करण्यास उत्साह कसा वाटावा ? असे उघड दोष ह्या १७०९ सालच्या कायद्यांत असून देखील तो कायदा सन १८११ पर्यंत तसाच अमलांत राहिला हें आश्चर्य आहे. सन १८११ मध्यें ग्रंथप्रकाशनाच्या हक्काच्या मुदतींत कायद्यानें कांहींशी भर घातली; म्हणजे ग्रंथप्रसिद्धीच्या तारखेपासून २८ वर्षे, व ग्रंथकार त्यापुढें हयात राहिल्यास त्याच्या मरणापर्यंत अशी ही मुदत ठरविण्यांत आली. पुन्हां १८४२ सालीं ह्या मुदतींत जास्त भर घालण्यांत आली. म्हणजे ग्रंथप्रकाशनाच्या तारखेपासून ग्रंथकाराच्या निधना-पर्यंत—व त्यापुढें आणखी सात वर्षे, व जर ही मुदत ४२ वर्षांहून कमी भरली तर एकंदर ४२ वर्षे, अशी ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची मुदत ठरली. १९११ साला-पर्यंत हीच मुदत कायम राहिली. ग्रंथप्रकाशनाचा हक्क संपादण्यासाठीं स्टेशनर्स-हॉलमध्यें ग्रंथ रजिष्टर करण्या-संबंधीं पूर्वीच्या कायद्यांतील अट ह्या कायद्यानें कायम ठेविली होती. इंग्लंडांत १९११ सालीं झालेल्या कायद्यानें ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची मुदत साधारण-तः ग्रंथकर्ता हयात असे तोंपर्यंत, व त्यापुढें पन्नास वर्षे, अशी ठरविलेली आहे. परंतु कर्त्याच्या मरणानंतर पंचवीस वर्षांच्या पुढें, व सन १९११ पूर्वी प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांच्या बाबतींत तीस वर्षां पुढें, ग्रंथाच्या प्रती करून विकण्याची मुभा इतरांस कांहीं अटींवर दिली आहे. पहिली अट अशी कीं, अशा रीतीनें प्रती काढणारानें ग्रंथकर्त्याच्या वारसाला अगाऊ नोटीस द्यावी, व ज्या प्रति विकल्या जातील त्यांच्या किंमतीं-तून त्यास स्वामित्वाबद्दल दहा टक्के द्यावे. तसेंच कॉपीराइटसाठीं स्टेशनर्स हॉलमध्यें ग्रंथ रजिष्टर करण्याविषयींची अट ह्या कायद्यानें काढून टाकली. सन १९११च्या ह्या कायद्यास "Imperial Copyright Act" म्हणजे "साम्राज्यांतील ग्रंथप्रकाशनाचा कायदा" अशी संज्ञा आहे. कारण ब्रिटिश साम्राज्यांत अंतर्भूत होणाऱ्या सर्व देशांत त्याचा अंमल होईल असें ह्या कायद्यांत फर्माविलें आहे. परंतु ब्रिटिश सा-म्राज्यांतील कित्येक वसाहती व हिंदुस्थान, ज्यांस स्वतःकरितां कायदे करण्याची सत्ता आहे, त्यांच्या सत्तेस बाध येऊं नये म्हणून ह्या कायद्यांतच अशी शर्त ठेविली आहे कीं, जोंपर्यंत अशा वसाहती किंवा हिंदु-स्थान ह्यांनीं हा कायदा जसाच्या तसाच अगर फेर-बदल करून आपणांस लागू करून घेतल्याचें प्रसिद्धी-पत्रक ( Notification ) काढलें नाहीं, तोंपर्यंत तेथें ह्या कायद्याचा अंमल होणार नाहीं; मात्र फेर-बदल करावयाचे ते "Procedure & remedies" म्हणजे कार्यपद्धति व शासन किंवा दाद ह्यांसंबंधींच असावे.

हिंदुस्थानांत ग्रंथप्रकाशनाचा पहिला कायदा ईस्ट इंडिया कंपनीच्या अमदानींत सन १८४७ च्या २०-व्या ॲक्टानें झाला. विद्वत्तेला उत्तेजन देण्याकरितां व ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची व्याख्या करून त्याची अंमलबजावणी करण्यासाठीं केलेला कायदा असें ह्या कायद्याचें वर्णन सदर ॲक्टांत आढळतें. हिंदुस्थानां-तील ईस्ट इंडिया कंपनीच्या अमलांतील मुलखां-करितां हा स्वतंत्र कायदा करण्याचीं कारणें ह्या ॲक्टांत दिलीं आहेत तीं अशीं:"-कलकत्ता, मुंबई वगैरे इलाख्यांच्या ठिकाणीं, इंग्लंडांतील रूढीनें प्रस्थापित झालेल्या कायद्याप्रमाणें, म्हणजे Com-mon Law प्रमाणें, व इलाख्यांतील इतर ठिकाणीं न्यायाचे व सदसद्विवेकबुद्धीचे नियम-म्हणजे Equity & good conscience—ह्यांस अनु-सरून, ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची अंमलबजावणी

कोर्टास करतां येते किंवा नाहीं, हा वादग्रस्त प्रश्न आहे; तसेंच इंग्लंडच्या पार्लमेंट सभेनें १८४२ सालीं केलेल्या कायद्याचा अंमल हिंदुस्थानांतील ईस्ट इंडिया कंपनीच्या मुलखांत जरी निर्विवाद असला, तरी त्या कायद्याप्रमाणें हिंदुस्थानांत अंमलबजावणी होण्याची तजवीज होणें इष्ट आहे." ह्या कारणामुळें सन १८४७-चा २० वा ॲक्ट हिंदुस्थानाकरितां स्वतंत्र कायदा म्हणून करावा लागला. हा ॲक्ट म्हणजे जवळ जवळ इंग्लंडमधील सन १८४२ च्या कायद्याची नक्कल आहे. म्हणजे ह्या कायद्यानें ग्रंथप्रकाशनाचे मालकीहक्काची मुदत ग्रंथप्रसिद्धीच्या तारखेपासून ग्रंथकर्त्याच्या निधनापर्यंत व त्यानंतर सात वर्षें, व जर ही मुदत बेचाळीस वर्षांहून कमी भरली तर एकंदर बेचाळीस वर्षें अशी ठरविली व ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क प्रस्थापन होण्याकरितां ग्रंथ सरकारांत रजिष्टर करावा असा निर्बंध घातला. हा ॲक्ट सन १९१२ तील आक्टोबर महिन्याच्या ३० तारखेपर्यंत अंमलांत राहिला. ह्या तारखेस हिंदुस्थान सरकारच्या प्रसिद्धी-पत्रकानें इंग्लंडांतील १९११ चा Imperial Copyright Act हिंदुस्थानास लागू करण्यांत आला, व त्याचवेळीं १८४७ च्या २० व्या ॲक्टाचा लोप झाला. पुढें सन १९१४ मध्यें, इंग्लंडांतील ह्या कायद्यांत इकडील परिस्थितीप्रमाणें फेरफार करून हिंदुस्थानाकरितां ग्रंथप्रकाशनाचा कायदा म्हणून सन १९१४ चा ३ रा ॲक्ट पसार करण्यांत आला सध्यां हिंदुस्थानांत ग्रंथप्रकाशनाचा हाच कायदा अंमलांत आहे.

३. **ग्रन्थप्रकाशनाचे हक्काची उभारणी.**

हस्तकौशल्यानें अगर अंगमेहनतीनें घडविलेल्या वस्तूंवर घडविणाराचें स्वामित्व सर्वांस कबूल असून त्या स्वामित्वाचें संरक्षण कायद्यानें होणें इष्ट आहे, ह्याबद्दल मतभेद नाहीं. ग्रंथकर्त्यानें लिहिलेला ग्रंथ त्यानें आपल्या बुद्धीच्या बळानें, मेंदूस श्रम देऊन, निर्माण केलेला असतो, व त्याचें महत्त्व हस्तकौशल्यानें अथवा अंगमेहनतीनें बनविलेल्या इतर वस्तूंसारखेंच-किंबहुना अधिक असतें. त्यामुळें, ग्रंथावरील ग्रंथकर्त्याचें स्वामित्व कायद्यानें मान्य करून त्याचें संरक्षण करणें योग्य आहे. याबद्दल कोणीही वाद घालणार नाहीं. ग्रंथाचे स्वामित्वाचीं तीन अंगें आहेतः ( १ ) ग्रंथ म्हणजे केवळ जंगम माल ह्या दृष्टीनें ज्या कागदांवर ग्रंथ लिहिला असेल त्या कागदांवरील मालकी; ( २ ) ग्रंथाच्या प्रती प्रसिद्ध करण्याची व इतरांस प्रती करण्याविषयीं प्रतिबंध करण्याची सत्ता, म्हणजे Copyright अथवा ग्रंथप्रकाशनाचा हक्क; व (३) ग्रंथांतील ( शब्दांविरहित ) केवळ कल्पना, विचार किंवा माहिती यांचा स्वतंत्र ग्रंथरचना करण्यांत उपयोग करण्याचा अधिकार. ग्रंथाच्या मूळ प्रतीवरील मालकीमुळें ग्रंथाची मूळ हस्तलिखित प्रत कोणी हातचलाखीनें लांबविली, किंवा जबरीनें उचलून नेली, अगर अन्य तऱ्हेनें तिचा अपहार केला, तर इंडियन पीनलकोडप्रमाणें तो गुन्हेगार ठरेल; शिवाय कर्त्यास दिवाणी कोर्टांत दावा करून ती परत घेतां येईल; अथवा ती नाहींशी झाली असल्यास नुकसानीबद्दल रक्कम वसूल करतां येईल. तसेंच ग्रंथप्रकाशनाच्या मालकीमुळें आपला ग्रंथ प्रसिद्ध करणें वा न करणें ही सत्ता सर्वस्वीं कर्त्याची आहे. कर्त्याच्या मर्जीविरुद्ध त्यानें लिहिलेला ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा अधिकार इतर कोणास नाहीं; व जर कोणी तसें करूं लागला तर त्यास अटकाव करण्याचा व अशा अनधिकारी प्रकाशनामुळें होणारें नुकसान भरून मागण्याचा हक्क कर्त्यास आहे. ग्रंथ प्रसिद्ध केल्यानंतर देखील इतरांस विक्रीकरितां त्याच्या प्रती करण्याविषयीं प्रतिबंध करण्याचा अधिकार ग्रन्थकर्त्यास आहे. तथापि ग्रन्थांत ग्रथित झालेल्या कल्पना, नमूद केलेले विचार, किंवा दिलेली माहिती, स्वतंत्र ग्रन्थरचनेनें प्रसिद्ध करण्याविषयीं इतरांस प्रतिबंध करण्याची सत्ता ग्रन्थकर्त्यास नाहीं. कारण, एकच कल्पना किंवा विचार अनेकांच्या मनांत एकाच वेळीं येणें शक्य आहे; एकच स्थळ किंवा प्रसंग अनेकांनीं पाहून त्यासंबंधाची माहिती देण्याची योग्यता एकाच वेळीं अनेकांस असणें संभवनीय आहे; परंतु ती कल्पना, विचार किंवा माहिती अनेकांनीं त्याच शब्दांनीं व्यक्त करणें असंभवनीय आहे. म्हणून ग्रन्थप्रकाशनाच्या हक्काचा विषय शब्दरचना आहे; शब्दांच्या अभावीं केवळ कल्पना, विचार किंवा माहिती ह्यांला ग्रन्थप्रकाशनाच्या हक्कांत स्थळ नाहीं. तथापि, अनेकदां ग्रन्थकार ग्रन्थरचना करण्यापूर्वी ग्रन्थांत येणारे आपले विचार, आपण गोळा केलेली माहिती, विषयाची जुळणी, वगैरे गोष्टी आपल्या

भरंवशाच्या एखाद्या माणसाजवळ विश्वासानें सांगत असतो; किंवा ग्रन्थकाराशीं असलेल्या संघटनामुळें त्यास अशा गोष्टी समजत असतात. अशा रीतीनें मिळालेल्या माहितीचा फायदा घेऊन, अर्थात् विश्वासघात करून, जर त्या माणसानें ते विचार, ती माहिती व विषयाची संगति आधारभूत घेऊन स्वतःच ग्रन्थ लिहिला, व मूळ ग्रन्थकाराचा ग्रन्थ लिहून संपण्याच्या अगोदर किंवा प्रकाशित होण्यापूर्वी तो प्रसिद्ध केला, तर **कॉपीराइट ॲक्टा**च्या साधारण नियमाप्रमाणें पाहिलें तर, विश्वासघात केला असून देखील ग्रन्थप्रकाशनाचे सर्व हक्क त्यास प्राप्त होण्यास आडकाठी नाहीं. हा अन्याय होऊं नये, व विश्वासघात करणारास मूळ कल्पकाच्या बुद्धीचें व श्रमाचें फळ मिळूं नये, म्हणून इम्पीरियल कॉपीराइट ॲक्टानें निर्बंध घातला आहे कीं, ज्या ठिकाणीं विश्वासघात किंवा दगलबाजी करून ग्रन्थाचें कर्तृत्व कोणीं पटकाविलें असेल त्या ठिकाणीं कॉपीराइट ॲक्टांतील नियमांस न जुमानतां असल्या विश्वासघातकी किंवा दगलबाजीच्या कृत्यास मनाई करण्याचा व त्यासंबंधीं कायद्यास अनुसरून मूळ ग्रंथकारास इतर दाद देण्याचा अधिकार योग्य कोर्टास आहे.

ग्रंथकर्त्याच्या मालकीविषयीं वर केलेल्या निरूपणावरून दिसून येईल कीं, ग्रंथप्रकाशनाच्या हक्कांचे स्वाभाविकरीत्या दोन विभाग होतात. पहिला विभाग, कर्त्यानें ग्रंथ लिहिल्यानंतर छापून प्रसिद्ध करण्यापूर्वीच्या हक्कांचा; व दुसरा विभाग, ग्रंथ छापून प्रसिद्ध झाल्यानंतरच्या हक्कांचा. सन १९११ चा "Imperial Copyright Act" पसार होईपर्यंत अप्रकाशित ग्रंथासंबंधीं हक्कांस इंग्लंडांतील Common Law म्हणजे पूर्वापार चालत आलेला किंवा रूढीनें प्रस्थापित झालेला कायदा प्रमाण मानीत व प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाचे हक्कांचे बाबतींत पार्लमेन्ट सभेनें केलेले कायदे प्रमाण समजत. सन १९११ च्या कायद्यानें हा भेद नाहींसा केला असून प्रकाशित ग्रंथासंबंधीं तसेंच अप्रकाशित ग्रंथासंबंधीं देखील हक्कांचें नियमन सदर ॲक्टाप्रमाणें होत आहे.

### ४ हक्काची व्याख्या.

कोणत्याही ग्रंथाच्या किंवा त्यांतील महत्त्वाच्या भागाच्या प्रती काढण्याचा, किंवा ग्रंथ अप्रकाशित असल्यास तो ग्रन्थ किंवा त्यांतील महत्त्वाचा भाग प्रसिद्ध करण्याचा कर्त्याचा जो हक्क तो Copyright, अशी ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची व्याख्या आहे. ग्रंथाच्या प्रती छापून प्रसिद्ध करण्याचा, त्याच्या आवृत्या काढण्याचा, रंगभूमीवर त्याचा प्रयोग करण्याचा व कोणत्याही भाषेत त्याचें भाषांतर करून प्रसिद्ध करण्याचा अधिकार, तसेंच ग्रंथ आरंभीं नाटकरूपानें प्रसिद्ध झाला असल्यास त्याची कादंबरी करून प्रसिद्ध करण्याचा अधिकार, कादंबरी अगर अन्य ललित वाङ्मयरूपानें प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचें नाटकांत रूपांतर करण्याचा अधिकार, व यांत्रिक साधनांनीं ग्रंथांतील कथानकाची, नाट्याची सिनेमा-फिल्म करून व शब्दांचा किंवा संगीताचा ग्रामोफोन किंवा फोनोग्राफवरील रेकार्ड बनवून, प्रसिद्ध करण्याचा अधिकार, अशी ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची व्याप्ति Imperial Copyright Act मध्यें सांगितली आहे. परंतु अनेक प्रसंगीं ग्रंथाची नक्कल करण्याचा हेतु नसतांही त्यांतून मुद्द्याचे लहान मोठे उतारे करावे लागतात. खासगी अभ्यासाच्या सोईकरितां, शास्त्रीय किंवा ऐतिहासिक संशोधनाकरितां, टीकात्मक लेख लिहितांना, किंवा वर्तमानपत्रांतून संक्षिप्त वृत्तांत देतांना, ग्रंथांतून अनेक अवतरणें द्यावीं लागतात. अशीं अवतरणें प्रसिद्ध केल्यामुळें ग्रंथकर्त्याच्या हक्कास बाध येत नाहीं, असें ह्या कायद्यानें ठरविलें आहे; कारण, ग्रंथप्रकाशनाविषयीं कायदा करण्याचा मुख्य हेतु-विद्येस उत्तेजन देणें, हा होय. ग्रंथकर्त्यावांचून इतरांस ग्रंथाच्या प्रती न करूं देण्याचा उद्देश ग्रंथलेखनास उत्तेजन मिळावें व चांगले ग्रंथ निर्माण होऊन विद्येचा प्रसार व्हावा, हा आहे. परंतु ग्रंथकर्त्याचे हक्क-संरक्षणाचे बाबतींत उपाय योजतांना, ज्ञानप्रसाराच्या मार्गांत प्रतिबंध न येण्याविषयीं खबरदारी घेणें अवश्य आहे. ज्ञानाचा प्रसार ग्रंथांच्या परिशीलनानें होतो; त्यासाठीं आपल्या विद्यार्थ्यांकरितां अध्यापकास ग्रंथांतून उतारे करून देण्याची पाळी येते. शास्त्रीय व ऐतिहासिक संशोधनाकरितां हाच मार्ग स्वीकारावा लागतो ग्रन्थाचें परीक्षण झाल्यावांचून ग्रन्थाची खरी किंमत बहुजनसमाजास कळत नाहीं, व ग्रन्थांतील विषयाचा साधकबाधक विचार होऊन त्यासंबंधीं योग्य मत बनण्यास

त्या ग्रन्थावरील टीकेसारखें दुसरें साधन नाहीं. तसेंच वृत्तपत्रांत ग्रन्थाविषयीं संक्षिप्त वर्णन किंवा ग्रन्थाचा सारांश प्रसिद्ध झाल्यानें ग्रन्थांतील विषयाची माहिती लोकांत पसरते. त्यामुळें ग्रन्थकर्त्याच्या हक्कास बाधा-त्कारीं बाध आणणारे त्याच्या ग्रन्थांतून उतारे प्रसिद्ध करण्याचे वरील प्रकार आक्षेपार्ह नाहींत, व निव्वळ भाडोत्री ग्रंथकारांखेरीज इतर ग्रन्थकारांस तसें वाटण्याचा संभव देखील नाहीं. ग्रन्थकाराच्या मालकी-हक्कास दुसरा एक अपवाद कायद्यानें ठेविला आहे, व तो केवळ शाळांमधून देण्यांत येणाऱ्या शिक्षणाच्या सोयीकरितां राखणें प्राप्त झालें आहे. विद्यार्थ्यांस जुन्या वाङ्मयाची गोडी लागावी, त्या वाङ्मयाचें व तद्द्वारा भाषेचें खरें रहस्य त्यांस कळावें, व भाषेच्या वैभवाची खरी कल्पना त्यांस यावी, म्हणून शाळेच्या अभ्यास-क्रमांत जुन्या ग्रंथांतून घेतलेले उतारे ठेवीत असतात; हे उतारे संग्रहित करतांना त्यांच्या कर्त्यांबद्दल किंवा ज्या ग्रंथांतून ते उतारे घेतले असतील त्या ग्रंथांसंबंधानें जुन्या किंवा नव्या विद्वानांचीं मतें विद्यार्थ्यांच्या माहितीकरितां उताऱ्यांबरोबरच नमूद करणें इष्ट असतें. त्यामुळें विद्यार्थ्यांची अनेक दृष्टीनें सोय होते. निरनिराळ्या ग्रंथकारांचीं मतें समजण्याकरितां अनेक ग्रंथ धुंडाळावे लागत नाहींत. अर्थात् पैशाचा व वेळेचा बराच अपव्यय वांचतो, व सहजासहजीं अनेक मतें व विचार डोळ्यांखालून जातात. परंतु ज्या ग्रन्थांत हीं अवतरणार्ह मतें आढळतात त्या ग्रन्थांसंबंधीं ग्रन्थप्रकाशनाच्या हक्कास अशीं अवतरणें दिल्यामुळें बाध येतो, हें उघड आहे. म्हणून शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां रचलेल्या जुन्या ग्रन्थांतील उताऱ्यांच्या पुस्तकांत जरी आधुनिक ग्रन्थकर्त्यांच्या ग्रन्थांतून त्यांच्या ग्रन्थप्रकाशनाच्या हक्कास बाध आणणारीं वरील तऱ्हेचीं अवतरणें दिलीं, तरी तें क्षम्य आहे असें कायद्यानें ठरविलें आहे. फक्त त्याबद्दल दोन अटी प्रकाशकानें पाळल्या पाहिजेत. पहिली अट, पांच वर्षांच्या मुदतींत त्याच प्रकाशकानें त्याच ग्रन्थकाराच्या ग्रन्थांतून दोहोंहून अधिक अवतरणें घेऊं नयेत; व दुसरी अट, अवतरणें घेतल्याबद्दल ज्या ग्रंथांतून तीं घेतलीं असतील त्या ग्रंथांचा उल्लेख करून कबुली देण्यांत यावी. ग्रन्थप्रकाशनाच्या हक्कास तिसरा एक अपवाद आहे. कांहीं लोक उपजीविकेचें साधन म्हणून लहान किंवा मोठ्या जनसमूहापुढें निरनिराळ्या ग्रन्थांतून चुटके किंवा उतारे किंवा पाठ बोलून दाखवितात. त्यामुळें ग्रन्थकर्त्याच्या हक्काचें तात्त्विकदृष्ट्या उल्लंघन होतें खरें; परंतु जोंपर्यंत अशा रीतीनें उपयोगांत आणलेले उतारे बेसुमार नाहींत तोंपर्यंत त्याविषयीं ग्रन्थकर्त्यास आक्षेप घेण्याचें कारण नाहीं, असें कायद्यानें फर्माविलें आहे.

### ५. हक्कासंबंधीं अटी.

प्रकाशित झालेल्या कोणत्याही ग्रंथासंबंधीं कॉपी-राइट उत्पन्न होण्यास, तो ग्रंथ सन १९११ च्या कॉपी-राइट ॲक्टाचा अंमल असेल अशा ब्रिटिश साम्राज्यांतील देशांत प्रथम प्रकाशित झाला पाहिजे. अर्थात् ग्रंथकर्त्याच्या संमतीवांचून किंवा अधिकारावांचून त्याचा ग्रंथ इतर देशांत प्रथम प्रसिद्ध झाल्यानें ब्रिटिश साम्राज्यांतील ग्रंथकर्त्याकडून पहिल्यानें होणारें प्रकाशन प्रथम प्रकाशन नव्हे असें मानण्यांत येत नाहीं. अप्रकाशित ग्रंथासंबंधीं कॉपीराइट मिळण्यास ग्रंथरचनेच्या वेळीं ग्रंथकर्ता एक तर ब्रिटिश प्रजेपैकीं असला पाहिजे, किंवा ब्रिटिश साम्राज्यांतील ज्या देशांत कॉपीराइट ॲक्टाचा अंमल आहे अशा देशांत त्याचें वास्तव्य असलें पाहिजे. प्रकाशित व अप्रकाशित ग्रंथासंबंधीं अशा निरनिराळ्या अटी केल्यामुळें क्वचित् प्रसंगीं चमत्कारिक घोटाळे होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, समजा, ब्रिटिश साम्राज्याबाहेरील ग्रंथकर्त्यानें लिहिलेला अप्रकाशित ग्रंथ कोणा ब्रिटिश नागरिकानें हिंदुस्थानांत आणला व छापून प्रसिद्ध केला, तर १९११ च्या ॲक्टाप्रमाणें त्याचें करणें अर्थात् बेकायदेशीर ठरणार नाहीं. समजा कीं, त्यानंतर खुद्द ग्रन्थकर्त्यानें हिंदुस्थानांत तोच ग्रन्थ स्वतः प्रसिद्ध केला, तर ग्रन्थकर्त्यास कॉपीराइट प्राप्त होईल, व त्यानंतर इतरांनीं त्या ग्रन्थाच्या प्रती करणें बेकायदेशीर ठरेल. परंतु ग्रंथकाराकडे कॉपीराइट येईपर्यंत ज्या प्रती दुसऱ्यांनीं प्रसिद्ध केल्या असतील, त्यांची वाट काय? ग्रन्थकर्त्याकडे कॉपीराइट जाई तोंपर्यंत इतरांनीं प्रती छापणें व विकणें कायदेशीर असल्यामुळें ग्रंथकर्त्यास त्याबद्दल तक्रार करतां येणें शक्य नाहीं; परंतु आपला कॉपीराइट प्रस्थापित केल्यानंतर अनधिकारी लोकांनीं अगोदर छापलेल्या प्रतींच्या विक्रीस ग्रंथकर्त्यास प्रतिबंध करतां येतो किंवा नाहीं? हा

बराच बिकट व अद्यापि मुग्ध राहिलेला प्रश्न आहे. अशा विक्रीस प्रतिबंध करतां येत नाहीं, असें साधारण मत दिसतें. तसेंच, अप्रकाशित ग्रन्थाच्या बाबतींत ग्रन्थरचना ब्रिटिश साम्राज्यांतील मुलखांत कितपत झाली म्हणजे ग्रन्थ ब्रिटिश मुलखांत रचला गेला असें समजायचें ? सन १९११ च्या ॲक्टानें ग्रन्थाचा बराच भाग जेथें रचिला असेल तेथें ग्रन्थ लिहिला असें समजावयाचें असें मोघम म्हटलें आहे; परंतु बराच भाग म्हणजे काय, हा प्रश्न शिल्लक राहतोच. शिवाय ब्रिटिश साम्राज्यांतील देशांत वास्तव्य करणें म्हणजे स्वदेशत्याग करून ब्रिटिश साम्राज्यांत कायम वसतिस्थान ( Domicile ) करणें, किंवा तात्पुरतें ब्रिटिश साम्राज्यांत बिऱ्हाड करणें, हें निश्चित नाहीं. साधारणत: कॉपीराइट संपादन करण्याकरितां ब्रिटिश साम्राज्यांतील देशांत कायम वसति करण्याची आवश्यकता नाहीं, एवढेंच निश्चयानें म्हणतां येतें; पण किती दिवस व कशा रीतीनें केलेलें वास्तव्य कॉपीराइट संपादण्यास पुरेसें होईल, हें समजण्यास ( प्रस्तुतच्या कायद्यांत ) आधार नाहीं.

वरील निरूपणामध्यें ग्रन्थप्रकाशन या शब्दाचा अनेकदां उपयोग झालेला आहे. परंतु ग्रन्थप्रकाशन म्हणजे काय ? वस्तुत: ग्रन्थप्रकाशनाच्या व्याख्येचें हल्लींच्या कायद्याच्या दृष्टीनें विशेष महत्त्व नाहीं; कारण ग्रन्थप्रकाशनाच्या हक्काची मुदत, सन १९११ च्या ॲक्टानें, ग्रन्थकर्त्याची हयात व त्यापुढें पन्नास वर्षें, अशी ठरविल्यामुळें ग्रन्थप्रकाशनाच्या तारखेविषयीं चिकित्सा करण्याचें विशेष कारण राहिलें नाहीं. तथापि प्रकाशित ग्रन्थांसंबंधीं ग्रन्थप्रकाशनाचा हक्क प्राप्त होण्यास प्रथम प्रकाशन ब्रिटिश साम्राज्यांत होणें अवश्य असल्यामुळें, व ग्रन्थकर्त्याच्या निधनानंतर प्रसिद्ध होणाऱ्या ग्रन्थांच्या बाबतींत कॉपीराइटची पन्नास वर्षांची मुदत ग्रन्थप्रकाशनाच्या तारखेपासून मोजावयाची असल्यामुळें, प्रकाशनाच्या व्याख्येचें महत्त्व अजून अजिबात गेलेलें नाहीं. मित्र, शिष्य, वृत्तपत्रांचे संपादक, वगैरे निवडक मंडळींत ग्रन्थ प्रसिद्ध केल्यानें ग्रन्थप्रकाशन होत नाहीं. रंगभूमीवर प्रयोग केल्यानें ग्रन्थप्रकाशन होत नाहीं. ग्रन्थप्रकाशन म्हणजे लोकांस ग्रन्थ उपलब्ध करणें; मग ग्रन्थ विक्रीसाठीं ठेवून हें घडो किंवा मोफत ग्रन्थ वांटल्यामुळें हें होवो. परंतु प्रकाशन घडून येण्यास अमुक प्रती खपल्या पाहिजेत असा मात्र निर्बंध नाहीं. प्रकाशनाची क्रिया एक प्रत खपल्यानें देखील होते.

### ८. कॉपीराइटच्या कक्षेंतील ग्रंथ.

ग्रंथासंबंधीं कॉपीराइट प्राप्त होण्यास तो ग्रंथ ग्रंथकर्त्याची मूळ कृति (Original) असली पाहिजे, असा निर्बंध सन १९११च्या कायद्यानें घातला आहे. परंतु मूळ कृति म्हणजे काय ? स्वकपोलकल्पित किंवा जुन्या ग्रंथांच्या आधारावांचून केलेल्या ग्रंथलेखनास मूळ कृति म्हणावयाचें, किंवा ग्रंथकर्त्याची स्वत:ची कृति ग्रंथलेखनांत अथवा ग्रन्थरचनेंत अल्पांशानें जरी असली तरी कर्तृत्वाचा हक्क ग्रन्थकर्त्याकडे जातो असें समजावयाचें ? ह्या प्रश्नाचा तात्त्विकदृष्ट्या ऊहापोह करणें शक्य आहे. परंतु त्या भानगडींत न पडतां कोर्टांनीं लाविलेल्या कायद्याच्या अर्थाप्रमाणें मूळ कृतींत कोणत्या ग्रन्थांचा समावेश होतो, इतकें पाहणें सध्यां पुरे.

एका ग्रंथाची निव्वळ नक्कल करून दुसरा ग्रन्थ लिहिणारा ग्रंथकर्ताच नव्हे; कारण त्या ग्रंथांत त्याचें स्वत:चें असें कांहींच नसतें. अशा ग्रन्थांसंबंधीं कॉपीराइट उत्पन्न होऊं नये म्हणून कायद्यानें ग्रन्थ मूळ कृति असावा असा नियम घातला आहे. परंतु ग्रन्थांत स्वतंत्र कृति अमुक प्रमाणांत असावी, कर्त्याचें कौशल्य ग्रन्थांत अमुक अंशानें अतर्भूत असावें, ग्रन्थांत वैचित्र्य व नावीन्य व वाङ्मयदृष्ट्या ग्रंथाची किमान पक्षीं किंमत इतकी असावी म्हणजेच ग्रन्थ मूळकृति मानण्यांत येईल, असा कांटेतोल न्याय देण्याचें बिकट काम कायद्यानें कोर्टाकडे सोंपविलेलें नाहीं. अनेक जुन्या ग्रंथांतून जरी उतारे घेऊन ग्रन्थ बनविला असला, ग्रंथांत कर्त्याची कृति अगदीं अल्पांशानें जरी असली, ग्रन्थांत वैचित्र्य किंवा नावीन्याचें नांव जरी नसलें, व वाङ्मयदृष्ट्या ग्रन्थ कुचकामाचा असला, तरी त्या ग्रन्थाविषयीं कर्त्यास ग्रन्थप्रकाशनाचे सर्व हक्क मिळतात. उदाहरणार्थ, सर्वांस उपलब्ध असलेल्या जुन्या ग्रंथांतील वेंचे घेऊन बनविलेल्या ग्रंथासंबंधीं ग्रंथकर्त्यास कॉपीराइट प्राप्त होतो. कारण वेंचे निवडून काढण्यांत व त्याची एकत्र जुळणी करण्यांत त्यानें आपल्या अकलेचा व तुलनात्मक बुद्धीचा उपयोग केला असतो. अशा ग्रन्थांत कॉपीराइटचा हक्क केवळ अनेक वेंच्यांच्या विवक्षित रचनेविषयीं असतो, भिन्न भिन्न

वेंच्यांविषयीं अर्थात् नसतो. अनेक ग्रन्थांचें निरीक्षण करून त्यांतील वेच्यांची निवड व जुळणी करण्याकरितां कर्त्यास जे परिश्रम करावे लागतात व बुद्धि खर्च करावी लागते त्यामुळें वेंचे एकत्र करून बनविलेला ग्रन्थ कायद्याच्या दृष्टीनें कर्त्याची मूळ कृति ठरतो. * व्यापाऱ्यांनीं तयार केलेल्या विक्रीच्या जिनसांच्या याद्यांविषयीं देखील कॉपीराइट प्रस्थापित करण्याकडे कोर्टाची प्रवृत्ति आहे. जिनसांच्या याद्यांतील वर्णनात्मक मजकूर वाङ्मयात्मक असणें संभवनीय आहे; परंतु जिनसांच्या निव्वळ याद्या देखील कोर्टाच्या मतानें कॉपीराइटखालीं येतात. कारण जिनसांच्या याद्या तयार करतांना जिनसांचा अनुक्रम लावणें, त्यांची जातिवार विभागणी करणें, संग्रहांत असणाऱ्या व नसणाऱ्या अशा सर्व जिनसांचा याद्यांत समावेश करणें,–हें मेहनतीचें व अकलेचें काम आहे. त्यामुळें अशा याद्या किंवा कॅटलॉग मूळकृति म्हणविण्यास पात्र होतात, व जरी जिनसांचीं नांवें घेऊन स्वतंत्र याद्या तयार करण्याची सर्वांस मुभा असली तरी एकानें बनविलेल्या याद्यांची दुसऱ्यानें नक्कल करून घेणें बेकायदेशीर ठरतें. तसेंच व्यापारधंद्याच्या किंवा शहरें देश वगैरेंच्या डायरेक्टऱ्या ज्या माहितीवरून रचलेल्या असतात ती माहिती सर्वांस सारखीच उपलब्ध असते; परंतु ती माहिती ग्रथित करून डोळ्यांत भरेल अशा रीतीनें वाचकांपुढें मांडणें हें कर्त्याच्या बुद्धीचें काम असतें. म्हणून एकानें बनविलेल्या डायरेक्टरीच्या इतरांनीं प्रती करणें म्हणजे मूळ कर्त्याच्या हक्काचें उल्लंघन करणें होय. नकाशे, पंचांगें, कोष्टकें वगैरे सर्वांस उपलब्ध असणाऱ्या सामुग्रीवरून तयार करावयाचीं असतात; परंतु तवढ्यानें वाटेल त्याची वाटेल त्यानें नक्कल करावी असें मात्र होत नाहीं. निरनिराळ्या कर्त्यांनीं आपापले नकाशे, पंचांगें किंवा कोष्टकें आपापली बुद्धि खर्च करून केलीं पाहिजेत. देश वगैरे विषय एकच असल्यामुळें, किंवा सारख्या आंकड्यांचें सारखेंच फल निघणार असल्यामुळें, अनेकांच्या अशा कृतींत साम्य दिसून येईल. परंतु कृतींत परिणामीं उतरणाऱ्या साम्यामुळें एकानें दुसऱ्याची नक्कल करण्यास कायद्यानें प्रत्यवाय नाहीं असें समजूं नये. साहाजिकरीत्या साम्यनिष्पत्ति होत असल्यामुळें एकानें दुसऱ्याची नक्कल केली हें शाबित कसें व्हावें, ह्या प्रश्नाचा विचार येथें कर्तव्य नाहीं. कारण पुराव्याच्या अडचणीमुळें कायद्याच्या तत्त्वास बाध येतो अशी शंका कोणीही घेणार नाहीं.

अनेकदां ग्रन्थकार आपल्या ग्रन्थाच्या अनेक आवृत्त्या काढतो. त्यांपैकीं कांहीं आवृत्त्या ग्रंथकार स्वतः काढतो, व या निरनिराळ्या आवृत्त्या काढतांना त्यांत सुधारणा करतो किंवा भर घालतो. जर ही सुधारणा किंवा भर महत्त्वाची असली तर ती आवृत्ति मूळकृति म्हणून गणली जाते, व त्या आवृत्तीसंबंधीं ग्रंथकर्त्यास स्वतंत्र कॉपीराइट प्राप्त होतो. मग ही सुधारणा ग्रंथाचा विस्तार कमी करून किंवा वाढवून होवो, अथवा ग्रन्थ तपासून किंवा पुन्हां लिहून काढल्यामुळें किंवा अन्य रीतीनें ग्रन्थांत बदल केल्यामुळें होवो. ग्रन्थाच्या प्रथमेतर आवृत्तींत टीपा, अवतरणें वगैरे जास्त मजकूर घातल्यामुळें देखील ती आवृत्ति मूळ कृतींत मोडते, व तिजविषयी स्वतंत्र कॉपीराइट उत्पन्न होतो. मूळ ग्रन्थावरून लिहिलेला संक्षिप्त अथवा लघु ग्रन्थ कर्त्याची मूळ कृति कीं मूळ ग्रन्थाची नक्कल समजावयाची, हा प्रश्न जसा महत्त्वाचा तसा बिकटही आहे. कारण जर संक्षिप्त किंवा लघु ग्रन्थ मूळ कृतीच्या सदराखालीं आला तर तो प्रसिद्ध केल्यानें मूळ ग्रन्थांतील हक्कांचें उल्लंघन होणार नाहीं एवढेंच नव्हे, तर त्या संक्षिप्त किंवा लघु ग्रन्थाच्या कर्त्यास कॉपीराइटचा लाभ मिळेल. परंतु केवळ मूळ ग्रन्थांतील पाल्हाळाचा व अनवश्यक भाग वगळून मुद्द्याच्या भागांची नक्कल करून घेणें हें कायद्याच्या दृष्टीनें लघुकरण अतएव मूळ कृति नव्हे. खरें लघुकरण म्हणजे मूळ ग्रन्थांतील भावार्थ, तत्त्व व स्वारस्य, मूळांतील शब्दांचा अनुवाद न करितां, स्वतःच्या शब्दांनीं थोडक्यांत वठविणें हें होय. अशा लघुकरणास मूळ कृति कोण म्हणणार नाहीं ?

### ७. ग्रंथाच्या नांवासंबंधाची मालकी.

ग्रन्थकार आपल्या ग्रन्थास कांहीं तरी नांव देत असतो, व त्या नांवानें तो ग्रन्थ लोकांत कालांतरानें प्रसिद्ध होतो. त्यामुळें असा प्रश्न उद्भवतो कीं ग्रन्थाच्या नांवाविषयीं ग्रन्थकर्त्यास कॉपीराइट मागतां

* मुंबई हायकोर्टाच्या अपील कोर्टानें, कूपर वि. मॅक्मिलन कंपनी ह्या दाव्यांत ( 23 Bombay L.R.p. 1299 ) दिलेला निकाल ह्या विधानाविरुद्ध आहे त्यावर प्रिव्ही कौन्सिलकडे अपील चालू आहे.

येतो कीं काय ? सामान्यतः ग्रन्थाच्या केवळ नांवासंबंधीं कॉपीराइट नसतो.कारण बहुधा सर्वांस परिचित असे भाषेंतील एक किंवा अधिक शब्द ग्रंथाचें नांव म्हणून वापरण्यांत येतात. त्या शब्दांवर मूळ कृति म्हणून ग्रन्थकर्त्यास हक्क सांगतां येत नाहीं. परंतु ग्रन्थाच्या नांवासंबंधीं जरी ग्रंथकारास मालकीहक्क पोंहचत नसला तरी ट्रेडमार्कचा हक्क पोहोंचतो. म्हणजे अमुक नांवानें ग्रन्थ प्रसिद्ध झाल्यामुळें लोकांत त्याची माहिती त्या नांवानें होते, व त्या ग्रन्थाकरितां मागणी त्या नांवानें करण्यांत येते; त्यामुळें दुसऱ्यानें आपल्या ग्रन्थास तेंच नांव दिल्यास लोकांमध्यें गैरसमज उत्पन्न होण्याचा किंवा लोकांची फसवणूक होण्याचा संभव असतो. अशा रीतीनें नांवाच्या सारखेपणामुळें लोकांची फसगत होऊं नये, एका ग्रन्थाच्या प्रख्यातीचा किंवा लोकप्रियतेचा फायदा दुसऱ्या ग्रन्थास नांवाच्या सारखेपणामुळें मिळूं नये, म्हणून एका ग्रन्थाचें नांव दुसऱ्या ग्रन्थास देण्याविषयीं कायद्यानें प्रतिबंध केला आहे. परंतु असा प्रतिबंध होण्यास बहुजनसमाजांत पहिल्या ग्रन्थाची प्रसिद्धि दुसरा ग्रन्थ प्रसिद्ध होण्यापूर्वी झाली असली पाहिजे, व दुसऱ्या ग्रन्थाचें तेंच किंवा त्यासारखें नांव ठेविल्यास साधारण लोक चकतात असें मानण्यास आधार पाहिजे. परंतु क्वचित् प्रसंगीं नांवाच्या वैचित्र्यामुळें ग्रन्थाचें नांव देखील कॉपीराइटचा विषय होणें शक्य आहे,व अशीं कांहीं उदाहरणें झालींही आहेत. मराठींत " नवनीत" नांवानें कवितासंग्रह प्रसिद्ध आहे.तें नांव ज्या अर्थानें योजिलें आहे, त्यांत वैचित्र्य आहे. त्यामुळें त्याविषयीं कॉपीराइट आहे असें मानल्यास तें अपवादात्मक होणार नाहीं.

**८. ग्रंथप्रकाशनाच्या हक्काची मुदत.**

कॉपीराईटची अर्थात् ग्रन्थप्रकाशनाच्या हक्काची मुदत हल्लींच्या कायद्यानें ग्रन्थकर्त्याचे हयातीपर्यंत व त्यापुढें पन्नास वर्षें इतकी ठरविली आहे, हें वर सांगितलेंच आहे. परंतु ग्रन्थकर्त्याच्या हयातींतील कॉपीराइट व त्याच्या मरणानंतरचा कॉपीराइट सारख्या दर्जाचे नाहींत. ग्रन्थकर्त्याच्या हयातींतील कॉपीराईट अगदीं पूर्ण किंवा अबाधित असतो; म्हणजे ग्रन्थकर्त्याखेरीज इतरांस ग्रन्थाच्या प्रती प्रसिद्ध करण्यास अजिबात प्रतिबंध असतो. ग्रन्थकर्त्याच्या निधनानंतरच्या पन्नास वर्षांपैकीं पहिलीं पंचवीस वर्षें ( व सन १९११ च्या अगोदर प्रसिद्ध झालेल्या ग्रन्थांच्या बाबतींत तीस वर्षें ) कॉपीराईट तसाच अबाधित असतो. म्हणजे कॉपीराइटच्या मालकाशिवाय इतरांस त्या ग्रन्थाच्या प्रती प्रसिद्ध करण्याचा पूर्ण प्रतिबंध असतो. परंतु शेवटल्या पंचवीस ( १९११ सालाअगोदर प्रसिद्ध झालेल्या ग्रन्थाच्या बाबतींत वीस ) वर्षांत कॉपीराइट मर्यादित स्वरूपाचा होतो. तो असा कीं, त्या मुदतींत कांहीं अटींवर ग्रन्थाच्या प्रती प्रसिद्ध करून विकण्याचा अधिकार इतरांस संपादन करणें शक्य असतें. त्या अटी अशा:–प्रती प्रसिद्ध करणारानें कॉपीराइटच्या मालकास आपण प्रती प्रसिद्ध करणार आहोंत त्याबद्दल आगाऊ नोटीस द्यावी, व ज्या प्रती विकल्या जातील त्यांच्या किंमतींतून स्वामित्वाबद्दल ( Royalty ) म्हणून शेंकडा दहा टक्के त्यास द्यावे. नोटीस कशी द्यावयाची, नोटिशींत कोणता खुलासा करावयाचा, स्वामित्वाबद्दल रक्कम कशी व केंव्हा–आगाऊ किंवा पहिल्यानें जामिन पटवून नंतर–द्यावयाची वगैरे बावींविषयीं नियम करण्याची सत्ता कायद्यानें हिंदुस्थान सरकाराकडे सोंपविली आहे. ग्रन्थकर्त्याच्या हयातींतील कॉपीराइट व हयातीनंतरचा कॉपीराइट ह्यांमध्यें दुसरा एक महत्त्वाचा फरक कायद्यानें केला आहे, तो असा कीं, ग्रन्थकर्ता हयात असतां आपला ग्रन्थ आरंभीं प्रसिद्ध करणें किंवा न करणें हें त्याच्या मर्जीवर असतेंच, परंतु ग्रन्थ प्रसिद्ध केल्यानंतर देखील ग्रन्थाच्या अधिक प्रती छापून विकणें किंवा न विकणें, तसेंच इतरांस त्या छापून विकण्याची परवानगी देणें किंवा न देणें, हें सर्वस्वीं ग्रन्थकर्त्याच्या अगर कॉपीराइटच्या मालकाच्या इच्छेवर अवलंबून असतें. ग्रन्थकर्त्याच्या निधनानंतर हा प्रकार बदलतो. तो असा कीं ग्रन्थकर्त्याच्या हयातींत प्रसिद्ध झालेल्या कोणत्याही ग्रन्थाच्या अधिक प्रती छापून विकण्याचें, किंवा इतरांस छापून विकण्याबद्दल परवानगी देण्याचें कॉपीराईटच्या मालकानें नाकारल्यामुळें लोकांस तो ग्रन्थ मिळेनासा झाला तर प्रिव्ही कौन्सिलकडे अर्ज करून तो ग्रन्थ छापून विकण्याचें लायसन्स–अर्थात् परवाना–संपादन करण्याचा हक्क इतरांस कायद्यानें ठेविला आहे. हा परवाना देतांना प्रिव्हि कौन्सिलनें कॉपीराइटच्या मालकास स्वामित्वाबद्दल

काय द्यावयाचें वगैरेंबद्दल अटी घालावयाच्या असतात.

ग्रन्थकर्त्याच्या मरणानंतर प्रथम प्रसिद्ध होणाऱ्या ग्रन्थाच्या कॉपीराइटची मुदत ग्रन्थ प्रसिद्ध झाल्यापासून पन्नास वर्षें अशी कायद्यानें ठरविली आहे. अनेक ग्रन्थकारांनीं मिळून लिहिलेल्या एक ग्रन्थाच्या कॉपीराइटची मुदत किती हा थोडा भानगडीचा प्रश्न आहे. अनेक लेखकांचे पृथक् पृथक् लेख एकत्र ग्रथित करून बनलेला ग्रन्थ कायद्याच्या दृष्टीनें एक ग्रन्थ नव्हे. परंतु जो ग्रन्थ अनेक ग्रन्थकार एकमेकांच्या सहकारित्वानें लिहितात, व ज्यांतील अमका भाग अमक्याची पृथक् कृति म्हणून दाखवितां येणें शक्य नसतें, अशा ग्रन्थास अनेक ग्रन्थकारांनीं लिहिलेला एक ग्रन्थ असें कायद्यानें मानिलें आहे. अशा ग्रन्थाच्या कॉपीराइटची मुदत त्याच्या अनेक कर्त्यांपैकीं प्रथम जो मरण पावेल त्याच्या हयातीपर्यंत व त्यापुढें पन्नास वर्षें, किंवा सर्वांच्या मागून मरणाऱ्या कर्त्याच्या हयातीपर्यंत, ह्या दोन मुदतींपैकीं जी मुदत जास्त भरेल ती कॉपीराइटची मुदत असें कायद्यानें ठरविलें आहे. हा नियम कर्त्यांपैकीं एक किंवा अधिक हयात असतांना ग्रन्थ प्रसिद्ध झाल्यास लागू पडतो. ग्रन्थकर्त्यांपैकीं सर्वच मयत झाल्यानंतर जर ग्रन्थ प्रसिद्ध झाला तर कॉपीराइटची मुदत प्रसिद्धीच्या तारखेपासून पन्नास वर्षें समजावयाची असते. ह्या नियमामुळें कांहीं प्रसंगीं चमत्कारिक परिणाम होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, दोन ग्रन्थकारांनीं मिळून एक ग्रन्थ लिहिला, व त्यांजपैकीं एकजण समजा १९२१ सालीं वारला. समजा १९७० सालीं, म्हणजे पहिल्या कर्त्याच्या मरणानंतर ४९ वर्षांनीं, दुसरा कर्ता हयात असतां ग्रन्थ प्रसिद्ध झाला, व त्याच वर्षांत दुसरा कर्ता वारला. अशा स्थितींत कॉपीइराट फार तर एकच वर्ष टिकेल. परंतु जर दोन्ही कर्ते मयत झाल्यानंतर तो ग्रन्थ प्रसिद्ध झाला तर कॉपीराइट प्रसिद्धीच्या तारखेपासून ५० वर्षें टिकेल. एका वर्षाच्या अंतरामुळें असा विचित्र परिणाम होण्याचा संभव आहे.

१९११ सालचा कॉपीराइट ॲक्ट अंमलांत येण्यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांच्या बाबतींत कॉपीराइटची कोणती मुदत प्रमाण धरावयाची, हा प्रश्न थोडा घोटाळ्याचा आहे. पूर्वीच्या कायद्यानें ठरविलेली कॉपीराइटची मुदत १९११ सालच्या कायद्यानें ठरविलेल्या मुदतीहून कमी आहे, म्हणून नव्या व जुन्या मुदतींचा मेळ बसवितांना हा घोटाळा झाला आहे. जुन्या कायद्याप्रमाणें कॉपीराइटची मुदत संपून ज्या ग्रंथांसंबंधींचे हक्क नवा कायदा अंमलांत येण्यापूर्वीच नष्ट झाले असतील त्यांचें पुनरुज्जीवन नव्या कायद्यानें होत नाहीं. परंतु ज्या तारखेस नवा कायदा अंमलांत आला त्या तारखेस त्या पूर्वी प्रसिद्ध झालेल्या ज्या ग्रन्थांच्या कॉपीराइटची मुदत जुन्या कायद्याप्रमाणें अवशेष राहिली होती त्या ग्रन्थांस नव्या कायद्यानें ठरविलेल्या जादा मुदतीचा लाभ मिळावा, अशी तजवीज नव्या कायद्यांत केली आहे. परंतु ह्या जादा मुदतीचा फायदा शक्य तोंपर्यंत ग्रन्थकर्त्याच्या वारसांस मिळावा, बेचनदारांस मिळूं नये, असें ह्या कायद्याचें धोरण असल्यामुळें, बेचनदारांसंबंधीं ह्या बाबतींत विशेष नियम घालून दिले आहेत. पहिला नियम असा कीं, जुन्या कायद्याप्रमाणें कॉपीराइटची मुदत संपण्यापूर्वी कमींत कमी सहा महिने किंवा जास्तींत जास्ती एक वर्ष अगोदर बेचनदारानें ग्रन्थकर्त्याच्या वारसास नोटीस देऊन कॉपीराइटच्या जादा मुदतींत कॉपीराइटचे हक्क आपल्याकडे राहूं द्यावे अशी त्यांजकडे मागणी करावी, व त्याबद्दल त्यांस काय मोबदला द्यावयाचा हें आपसांत तडजोड करून, किंवा तडजोड साध्य नसल्यास कायद्याप्रमाणें लवादनामा करून, ठरवून घ्यावें. दुसरा नियम असा कीं, पहिल्या नियमाप्रमाणें आगाऊ तजवीज ज्यानें केली नसेल त्या बेचनदारानें आपल्या मर्जीनुरूप कॉपीराइटच्या जादा मुदतींत प्रती प्रसिद्ध कराव्या, परंतु ग्रन्थकर्त्याच्या वारसांकडून जादा मुदतीच्या प्रारंभापासून तीन वर्षांच्या आंत मागणी झाल्यास त्यांच्या स्वामित्वाबद्दल जी रकम तडजोडीनें किंवा लवादनाम्यानें ठरेल ती त्यानें द्यावी.

१९११ सालच्या कायद्यापूर्वी एका भाषेंतील ग्रन्थाचें दुसऱ्या भाषेंत भाषांतर करण्यास कॉपीराइटच्या कायद्यानें प्रतिबंध नव्हता. परंतु १९११ सालच्या कायद्यानें भाषांतर करण्याच्या हक्काचा समावेश कॉपीराइटमध्यें केला आहे. हिंदुस्थान सरकारच्या १९१४ सालच्या ॲक्टानें हिंदुस्थानांत प्रथम प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांच्या बाबतींत भाषांतर करण्याच्या

मालकी-हक्काची मुदत दहा वर्षे ठरविली आहे. परंतु हीं दहा वर्षे संपण्यापूर्वी ग्रन्थकर्त्यानें अगर त्याच्या परवानगीनें कोणीं भाषांतर प्रसिद्ध केलें तर भाषांतर करण्याविषयींच्या हक्काची मुदत कॉपीराइटमधील इतर हक्कांच्या इतकीच—म्हणजे ग्रन्थकर्त्याची हयाती व त्यापुढें पन्नास वर्षे अशी होते. शिवाय भाषांतरकार आपल्या भाषांतराचा स्वतंत्र कृति ह्या नात्यानें मालक असल्यामुळें भाषांतररूपी ग्रंथाचा त्याला स्वतंत्र कॉपीराइट मिळतो, व इतरांस त्याची नक्कल करण्यास प्रतिबंध होतो, हें निराळें.

## ८. कॉपीराइटची मालकी.

कॉपीराइटच्या दृष्टीनें ग्रन्थांचे दोन विभाग आहेत. पहिला विभाग, निरनिराळ्या कर्त्यांच्या पृथक् प्रसिद्ध होणाऱ्या ग्रन्थांचा; व दुसरा विभाग अनेक कर्त्यांनीं लिहिलेल्या अनेक लेखांचा समुच्चय करून बनलेल्या ग्रन्थांचा. पहिल्या विभागांतील ग्रन्थांच्या स्वामित्वावर प्रथम हक्क अर्थात् कर्त्याचा असतो. ह्या नियमास एक अपवाद आहे. तो असा कीं, जर कर्त्यानें ग्रन्थ-रचनेची नोकरी पतकरून, नोकरींतील कामगिरी म्हणून ग्रन्थरचना केली, तर त्या ग्रन्थाचें स्वामित्व-तत्संबंधीं निराळ्या ठरावाच्या अभावीं-कर्त्याच्या मालकाकडे जातें. ग्रंथरचना करण्याकरितां कर्त्यानें नोकरी पतकरली असें कधीं मानतां येतें, हा प्रश्न सुलभ नाहीं. अमुक ओळींचा किंवा अमुक पृष्ठांचा ग्रन्थ लिहून द्यावा व त्याबद्दल अमुक मोबदला घ्यावा अशा स्वरूपाच्या ठरावामुळें कर्ता मोबदला देणाराचा नोकर बनत नाहीं. हा व्यवहार कायद्याच्या दृष्टीनें बेचनाचा ठरतो, व म्हणून कॉपीराइट संपादन करण्याकरितां मोबदला देणारानें कॉपीराइटचें लेखी बेचन करून घेणें प्राप्त होतें. तसेंच अशा व्यवहारांत बेचनदाराच्या हक्काची जी कालमर्यादा कायद्यानें ठरविली आहे त्या मर्यादेस अनुसरून मोबदला देणाराकडे कॉपीराइटचें स्वामित्व कर्त्याच्या हयातीपर्यंत व नंतर पंचवीस वर्षे एवढ्याच मुदतींत राहतें.

दुसऱ्या विभागांत वृत्तपत्रें, मासिकें, ज्ञानकोश, वगैरे अनेक लेखकांचे पृथक् लेख एकत्र करून बनलेल्या कृतींचा समावेश होतो. अशा अनेक लेखकांचे एक किंवा अनेक विषयांवरील पृथक् लेख एकत्र ग्रथित करून बनलेल्या कृतीचें अथवा ग्रन्थाचें स्वामित्व कायद्यानें ग्रन्थप्रकाशकास दिलें आहे. तथापि ह्या स्वामित्वाच्या जोरावर त्या ग्रंथांतील विवक्षित लेख स्वतंत्र ग्रन्थरूपानें प्रसिद्ध करण्याचा अधिकार ग्रन्थ-प्रकाशकास प्राप्त होत नाहीं. तो अधिकार, तत्संबंधीं विरुद्ध ठरावाच्या अभावीं, त्या लेखांच्या कर्त्याकडे निषेधात्मक स्वरूपानें राहतो. म्हणजे लेखसमुच्चयांतील विवक्षित लेख पृथक् ग्रन्थरूपानें प्रसिद्ध करण्याविषयीं [illegible] प्रकाशकास प्रतिबंध करण्याचा अधिकार मात्र त्या लेखाच्या कर्त्यास पोहोंचतो. परंतु स्वत: तो लेख पृथक् ग्रन्थरूपानें प्रसिद्ध करण्याचा अधिकार त्या लेखाच्या कर्त्यास कायद्यानें दिलेला नाहीं. अर्थात् कॉपीराइटची मुदत संपेपर्यंत प्रकाशक व कर्ता ह्यांनीं आपसांत तडजोड केल्यावांचून लेखसमुच्चयांतील कोणताही लेख पृथक् ग्रंथरूपानें प्रसिद्ध होण्यास मार्ग नाहीं.

कॉपीराइट बेचन करून देण्याचा, तसेंच मृत्युपत्रानें त्याची विल्हेवाट लावण्याचा अधिकार कर्त्यास आहे. मृत्युपत्राच्या अभावीं कॉपीराइट कर्त्याच्या वारसांमध्यें विभागाला जातो. बेचनदार या नात्यानें अगर अन्य तऱ्हेनें कॉपीराइट ज्यांस प्राप्त होतो त्यांस कर्त्याप्रमाणेंच त्याचें बेचन करण्याचा अगर मृत्युपत्रानें त्याची विल्हेवाट लावण्याचा अधिकार आहे. तथापि ह्या बाबतींत कर्त्याच्या व बेचनदारांच्या हक्कांत एक फरक आहे, तो असा कीं, कर्त्यानें आपल्या हयातींत कॉपीराइटचें बेचन केलें तर खरेदीदारास किंवा त्याच्या वारसांस कॉपीराइटचे हक्क कर्त्याच्या हयाती-पर्यंत व नंतर पंचवीस वर्षे इतक्याच मुदतीपुरते मिळतात. खरेदीदारानें कर्त्याकडून कसेही करार-मदार करून घेतले तरी ह्या क्रमांत बदल होत नाहीं. फक्त कर्त्यानें मृत्युपत्र करून कॉपीराइटची बाकी राहिलेली मुदत खरेदीदारास दिली तरच कर्त्याच्या वारसांचे हक्क नष्ट होतात.

कोणताही ग्रन्थ प्रसिद्ध होण्यापूर्वी त्याच्या कॉपी-राइटचें बेचन करतां येतें. परंतु केवळ ग्रन्थाच्या हस्त-लिखित किंवा मूळ प्रतीची मालकी मिळाल्यामुळें त्या ग्रन्थाचा कॉपीराइट मिळत नाहीं. उदाहरणार्थ, ज्या कागदावर आपण खासगी पत्रें लिहितों, त्या कागदां-

वरील मालकी ज्यांला आपण पत्रें पाठवितों त्यांची असते. परंतु त्या मालकीमुळें त्या पत्रांतील मजकूर प्रसिद्ध करण्याचा हक्क म्हणजे कॉपीराइट त्यांस मिळत नाहीं. पत्रांचा कॉपीराइट पत्रें लिहिणाराकडे राहतो. तसेंच एखाद्या ग्रन्थाची हस्तलिखित प्रत रद्दींतील सामानांत अगर घरांतील किंवा कारखान्यांतील एकंदर सामानाबरोबर विकल्यामुळें ज्याच्या हातीं येईल त्यास कॉपीराइट मिळत नाहीं. ह्या नियमास दोन अपवाद कायद्यानें प्रस्थापित केले आहेत.त्यांपैकीं सन १९११ च्या ॲक्टानें दर्शविलेला अपवाद असा आहे कीं, कर्त्यानें आपल्या मृत्युपत्रानें आपल्या अप्रकाशित ग्रन्थाच्या हस्तलिखित किंवा मूळ प्रतीची मालकी एखाद्यास दिली तर त्या मालकीबरोबर त्यास कॉपीराइटही मिळतो.दुसरा अपवाद कायद्याच्या मूळ तत्त्वाच्या आधारानें स्थापित झाला आहे;तो असा कीं, जरी खासगीं पत्रें प्रसिद्ध करण्याचा हक्क ज्याला पत्रें पाठविण्यांत येतात त्याचा नसतो, तरी कांहीं प्रसंगीं स्वत:वर आलेला वृथा आरोप किंवा स्वतःचा झालेला निष्कारण दुर्लौकिक दूर करण्याकरितां इतरांकडून आलेलीं पत्रें प्रसिद्ध करण्याची जरूरी असते. अशा परिस्थितींत तीं पत्रें प्रसिद्ध करणें कायद्यानें क्षम्य ठरविलें आहे.

### ९. मालकीसंबंधीं पुरावा.

१९१४ सालच्या कायद्यानें कॉपीराइटसाठीं सरकारांत ग्रंथ रजिस्टर करण्याविषयीं निर्बंध काढून टाकला आहे. ग्रंथकर्त्याचें नांव व प्रकाशकाचें नांव ग्रंथाच्या छापील प्रतींतील मूळ पृष्ठावर देण्यांत यावें, व तेंच कॉपीराइटकरितां प्रमाणभूत मानलें जावें, असें या कायद्यानें फर्माविलें आहे. त्याविरुद्ध पुरावा करण्याची मुभा इतरांस आहे. परंतु जोंपर्यंत तसा पुरावा कोर्टापुढें आलेला नाहीं तोंपर्यंत मूळ पृष्ठावरील ग्रंथकर्ता व प्रकाशक यांचीं नांवें खरीं असें मानण्यांत येतें. पुराव्याच्या बाबतींत सरकारांत ग्रंथ रजिस्टर करण्यामुळें पूर्वीं हाच परिणाम होत असे.

### १०. उपसंहार.

कॉपीराइटचा इतिहास, त्याचें स्वरूप, त्याची कालमर्यादा, व स्वामित्व त्यांजबद्दल येथवर निरूपण झालें. कॉपीराइटचें उल्लंघन झाल्यास दिवाणी किंवा फौजदारी कोर्टांत दाद मागतां येते. कोणत्या कोर्टांत दावा किंवा फिर्याद चालते, दिवाणी कोर्टांत मनाईचा हुकुम व नुकसानीची भरपाई कोणत्या तत्त्वांस अनुसरून देण्यांत येते, ह्या प्रश्नांसंबंधीं माहिती दिल्यानें वकिलाच्या मदतीवांचून पक्षकारानें कोर्टांत काम चालविणें शक्य किंवा इष्ट होणार नाहीं,म्हणून सामान्य वाचकांकरितां लिहिलेल्या ह्या लेखांत ती माहिती देण्याच्या भानगडींत लेखक पडत नाहीं. आपल्या हक्कांची जाणीव लेखकांस व त्याचप्रमाणें प्रकाशकांस व्हावी, व कायद्याच्या अज्ञानामुळें किंवा त्यासंबंधींच्या गैरसमजामुळें अनेकदां कोर्टांत जाण्याचे जे प्रसंग येतात ते टाळतां यावे, इतक्याच हेतूनें हा लेख लिहिला आहे. मराठी भाषेंत स्वतंत्र लेख प्रसिद्ध करण्याचा अग्रमान संपादणाऱ्या व स्वतंत्र लेख लिहिण्याची स्फूर्ति अनेक मराठी लेखकांस देणाऱ्या **विविधज्ञानविस्ताराच्या** अर्ध शतकाच्या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ प्रसिद्ध होणाऱ्या निबंधावलींत हा लेख प्रसिद्ध होत आहे, त्याबद्दल लेखकास विषयाच्या उपयुक्ततेमुळें आनंद वाटत आहे.